॥ श्री ॥

# ★ कथा कल्पतरु ★

(सरळ गोष्टीच्या रूपानें सुलभ मराठी भाषांतर)



## उत्तरार्ध

### भाग २ रा

( स्तबक ११ ते १४ संपूर्ण )



आवृत्ति पांचवी

सन १९५५



किंमत ५ रुपये

# प्रस्तावना

प्रिय वाचक

चौदा महिन्यांनीं आज हाती घेतलेला हा 'कथाकल्पतरु' ग्रंथ पूर्ण होत आहे या भागाच्या शेवटीं आम्ही विस्तृत उपसंहार जोडलेला आहे. त्यामुळें ग्रथ वाचतांना विसंगत वाटलेल्या कथा व निर्माण होणाऱ्या शंका यांचें बऱ्याच अंशानें समाधान होईल अशी आमची खात्री आहे.

यापुढें आम्ही 'स्कंद पुराण' चार भागात प्रसिद्ध करणार आहोत. मध्यतरी कथासरित्सार घेण्याचा विचार ठरवला होता पण कांहीं कारणामुळें तो विचार बदलला आहे.

आम्ही प्रकाशन खालील तीन मालातून प्रसिद्ध करण्याचें ठरवले आहे.

आर्यधर्म ग्रंथमाला, सुबोध ग्रंथमाला व मनोरंजन माला. दरसाल या या तीनहि माला मिळून १५००-२००० पृष्ठें पूण करण्याचे ठरवले होते. व त्याप्रमाणें खालील पुस्तकें गेल्या वर्षात पूर्ण केलेली आहेत गणेशपुराण ( ३०० पृष्ठें ) आनंदरामायण ( ३०० पृष्ठें ) कथाकल्पतरू ( १७५० पृष्ठें ) ही सुबोध ग्रंथ मालेतून प्रसिद्ध झाली आहेत. व कालिकामूर्ति ( ७०० पृष्ठें ) व अधःपात ( ७०० पृष्ठें ) ही मनोरंजन मालेतून प्रसिद्ध झाली आहेत.

मनोरंजन मालेतून कै. नाथमाधव यांची 'तरूण रजपूत सरदार' ही कादंबरी आम्ही लवकरच प्रसिद्ध करत आहोत.

प्रकाशनाचें कार्यास ज्यानीं मदत केली व प्रोत्साहन दिले ते माझे मित्र श्री. उमराणीकर, श्री. गजाननराव पाटणकर श्री. ठक्करशेट ( मालक लक्ष्मी बुक डेपो, मुंबई ) यांचा मी आभारी आहे.

या प्रकाशनास महत्वाचें साह्य श्री. व. वि. आपटे, हिंदुस्थान मुद्रणालय यांचे झाले आहे. यापुढील प्रकाशनाचे कार्यहि त्यांच्या सहकार्यानें जास्त आकर्षक व व्यवस्थित होईल अशी आशा या प्रसंगी व्यक्त करतो.

कथाकल्पतरू हा ग्रंथ किती महत्वाचा आहे व त्याची आवश्यकता प्रत्येक कुटुंबात किती आहे हे वाचकांनीं आपल्या मित्र परिवारांस समजावून देऊन या ग्रंथाची विक्री होण्यास मदत करावी अशी विनंती करून ही प्रस्तावना संपवतो.

प्रकाशक

# अनुक्रमणिका



## स्तबक ११ वा



— —

## स्तबक १२ वा



---

## स्तबक १३ वा

## स्तबक १४ वा

---

# ⋆ कथा-कल्पतरु ⋆



## स्तबक अकरावा.



## अध्याय १ ला



### मंगलाचरण

हे कृपासागरा गजानना ! तुला मी सर्वारंभीं भक्तिभावानें वंदन करितो. हे गणनाथा ! तूं चराचरांचा आधार आहेस. हे ब्रह्मांडधीशा ! हे पूर्णज्योति पुराणपुरुषा ! हे बुद्धिप्रकाशक जगत्पते ! तुझा जयजयकार असो. हे अनंता ! तूं नांवाप्रमाणेंच अनंत आहेस. तुझीं रूपें अनंत असून तुझीं चरित्रेंही अनंत आहेत. हे गणपते ! ब्रह्मादिकांसारख्यानाही तुझा पार लागत नाहीं. तूं ज्याच्यावर कृपादृष्टि करितोस, त्याच्या सर्व कामना पूर्ण होतात. तूं सर्व विघ्नांचें निरसन करितोस. व भक्तांचें कार्य पार पाडतोस. हा कथाकल्पतरु रचण्याची प्रेरणा तूंच मला केली आहेस. आतां ब्रह्मदेवाची कन्या जी वीणा-पुस्तक-धारिणी, आणि आपल्या भक्तांना वरदान देण्यासाठीं फारच उतावीळ, अशा वाग्देवीं सरस्वतीला नमन करितो. शारदावंदनानंतर कुलदैवत श्रीगुरु श्रीवेदव्यास आणि मंत्रश्रोते यांना साष्टांग प्रणिपात करून, आतां एकादश स्तबकाला आरंभ करितों.



# अध्याय २ रा



## कर्णपर्व

भीष्म व द्रोण यांच्या संहाराच्या कथा ऐकल्यावर जनमेजयराजा वैशंपायन ऋषींना म्हणाला,–'ऋषें, युद्धांत भीष्म व द्रोण मरण पावल्यावर पुढें कौरवानी काय व्यवस्था केली, ती कथा मला कृपा करून निवेदन करावी.' तेव्हां वैशंपायन म्हणालें,–' राजा, भीष्म व द्रोण यांच्यासारखे अतिरथी, महारथी वीर मृत झाल्यामुळें, सर्व कौरव-सैन्य साहजिकच हताश होऊन गेलें. दुर्योधन तर अगदी निराश झाला व यापुढें काय करावें, ते त्यास सुचेना त्या वेळी कौरवाकडे कर्णावांचून कोणी चांगला योद्धाच नसल्यामुळें, सर्वांचें लक्ष त्याच्याकडे वळले. दुर्योधन कर्णाकडे गेला, व त्याला विनयपूर्वक म्हणाला,–' कर्णा, कौरवांचा अभिमान आतां तुझ्यावर काय तो अवलंबून आहे. त्याची लाज राखण्यास तूच ( समर्थ आहेस. यासाठी सर्व कौरव-सैन्याचा भार तू स्वीकार, व युद्ध चालीव.' याप्रमाणें दुर्योधनाने कर्णाची विनति केल्यावर, अश्वत्थामा, दुर्योधनाला म्हणाला, दुर्योधना, आता कौरवानाच जय प्राप्त होणार, याबद्दल शंका बाळगण्याचें काहीच कारण नाही. कर्णाचा एकही बाण फुकट जात नाही, अशी त्याची ख्याति आहे. शिवाय युद्ध करीत असतां, त्याला कोणताही मोह उत्पन्न होण्याचें कारण नाही. भीष्माचे पाडवावर प्रेम असल्यामुळें त्यानी युद्धांत पाडवाचे रक्षणच केलें. माझा पिता द्रोण,–त्यानेही ऐनवेळी वात्सल्यामुळेंच योग्य शरसधान केले नाही. तसा प्रकार कर्णाचा नाही. अश्वत्थाम्याच्या भाषणाने दुर्योधनाची चिता दूर झाली, व त्यानें कर्णाची सेनापतीच्या जागी योजना केली.

कर्णाकडे सेनापतित्व आल्यावर दुस-या दिवशीं सकाळीं त्यानें सर्व सैन्य रणांगणावर गोळा करून मोठया उत्साहानें युद्धाची तयारी चालविली. कर्णाचा जो उत्साह पाहून सर्व कौरवसैन्यही उत्साहभरीत झाले; व जे कार्य भीष्मद्रोणानी केलें नाही. ते आज कर्ण निश्चयानें करील. असे सर्वांन

वाटूं लागले. कर्ण आपल्या रथांत बसून त्यानें जेव्हा आपला प्रचंड शंख फुंकला, तेव्हां त्या नादानें भुमी थरथरली. व लोक भयभीत होऊन त्यांना त्यावेळीं कर्ण कृतान्ताप्रमाणें उग्र दिसूं लागला. पुष्कळ विचार कर्णानें आपल्या सैन्याची रचना मकराकार करण्याचे ठरविले. व त्याप्रमाणें त्यानें व्यूह तयार केला, मकराच्या मुखस्थानीं त्यानें आपला स्वतःचा रथ उभा केला. शकुनी उलूक या दोघाना नेत्रस्थानी ठेविले व अश्वत्थामा सैन्यासह मस्तकांच्या ठिकाणी राहिला. ग्रीवाभागी दुर्योधनाचे सर्व बंधू उभे राहिले. चाऱ्ही पायांच्या ठिकाणी गौतमपुत्र, शल्य, सुषेण व चित्रसेन, या चौघांना उभें केले. आणि पुच्छभागाचे संरक्षण करण्यास कर्णानें चित्राला सांगितलें. कर्णाचीं ही अपुर्व व्यूहरचना पाहून पांडवांना त्याच्या चातुर्याचें मोठे कौतुक वाटले. ती व्यूह-रचना पार्थाला दाखवून धर्मराज म्हणाला,' अर्जुना, कर्णानें आपल्या सैन्याची रचना फार चांगली केली आहे असें वाटते. हा व्यूह तसाच ठेवून जर आपण कौरवांशी युद्ध करूं लागलो तर जय मिळणें अशक्यच होय यावेळी कर्ण, देव व दानव या सर्वांना अजिक्य असा दिसत आहे, यासाठी आपल्या सैन्याची रचनाही चांगल्या प्रकारची केली पाहिजे. जोपर्यंत कर्ण जिवंत आहे तोंपर्यंत जयाची आशा नाही, ही गोष्ट लक्षांत ठेवून त्याच्या संहा-राची तजवीज प्रथम होईल, अशा रीतीनें सैन्य सिद्ध केलें पाहिजे ' धर्माची सूचना लक्षांत घेऊन अर्जुनाने आपल्या सैन्याची चंद्राकार रचना केलीं. या व्यूहाची उजवी बाजू धृष्टद्युम्न यानें सांभाळली, डाव्या बाजूला भीमसेन उभा राहिला, मध्यभागीं श्रीकृष्णानें अर्जुनाचा रथ आणून उभा केला; व मागच्या बाजूस धर्म, नकुल, सहदेव व द्रौपदीचें पुत्र उभे राहिलें. याप्रमाणें दोहोंकडे व्यूह-रचना झाल्यावर युद्धास आरंभ झाला.

## नकुल-पराभव

युद्धाला आरंभ होऊन दोन्ही सैन्यें जेव्हां एकमेकांवर शस्त्रास्त्रांचा मारा करूं लागलीं. तेव्हां तो देखावा मोठा विलक्षण दिसू लागला. जणूं काय आकाशांतून दिव्य तारकांची भूमिवर वृष्टीच होत आहे, असें वाटू लागलें. मग सात्यकी. शिखंडी. धृष्टद्युम्न वगैरे उजव्या बाजूनें, व भीम, नकुल वगैरे डाव्या बाजूनें पुढें होऊन शत्रूसैन्याची कोंडी करूं लागले. त्या वेळीं

कौरववीरही पुढें येऊन भीमाबरोबर क्षेमधूर्ति, धर्माबरोबर दुर्योधन, प्रतिविध्याबरोबर चित्र, धृष्टद्युम्नाबरोबर कृपाचार्य, शिखंडीबरोबर कृतवर्मा व अर्जुनाबरोबर कर्ण, याप्रमाणे परस्परांचें युद्ध सुरू झालें. कौरव आपली शिकस्त करून युद्ध करीत होते; परंतु पांडव सैन्याचा उत्साह विलक्षण असल्यामुळें, प्रत्येक क्षणी कौरवांचे हजारो वीर मरून पडूं लागले. सात्यकीनें विंद, अनुविंद, व कैकेय या तिघांना मारून त्यांच्या सैन्यास सैरावैरा पळावयास लाविलें, भीमाशी युद्ध करणारा क्षेमधूर्ति हा लवकरच भीमाच्या गदाघातानें मृत होऊन पडला. तो पडतांच त्याचें सैन्य पळूं लागलें. परंतु इतक्यांत अश्वत्थामा पुढें झाला, व तो आपल्या सैन्यास धैर्य देऊन भीमाबरोबर युद्ध करूं लागला. त्या युद्धांत भीम व अश्वत्थामा असे दोघेही परस्परांच्या आघातानें मूर्छित होऊन रणांत पडले. तेव्हां त्यांच्या सारथ्यांनीं त्यांना रथांत घालून आपापल्या शिबीरांत नेलें. इकडे श्रुतसेनानें चित्रसेनाला मारलें. प्रतिविध्यानें चित्राला मारलें. याप्रमाणें कौरवांचे एकामागून एक असे वीर मरून पडूं लागले. अर्जुनानें तर युद्धकौशल्यानें सर्वांना चकित करून टाकलें. अर्जुनाचे युद्ध–नैपुण्य पाहून इंद्रादि देव त्याचगावर पुष्पवृष्टि करूं लागले.

पांडवांचा असा सर्व [illegible] विजय होत आहे असें पाहून कर्ण, दुर्योधन, अश्वत्थामा असे तिघे [illegible] ऊन पुढें आले. अश्वत्थामा मोठ्या वेगानें पांडवांकडील पाड[illegible] झाला व त्याच्याशी युद्ध करून त्याला त्यानें मारून टाकलें, [illegible] अश्वत्थाम्याला अधिक स्फुरण चढलें व तो अर्जुनाला [illegible] करूं लागला या वेळीं अर्जुन समसप्तकाबरोबर युद्ध करीत [illegible] अर्जुनानें कृष्णाच्या सांगण्यावरून अश्वत्थाम्याबरोबर [illegible] युद्धांत निपुण असल्यामुळें, तो अर्जुनाशी [illegible]; पण अर्जुनाचा भयंकर मारा सुरू होतांच समसप्तकांचा [illegible], व अश्वत्थामाही मूर्छित होऊन रणांत पडला. त्यास त्याच्या सारथ्यानें [illegible] नेलें. याच वेळी अंगराजाचा शिरच्छेद नकुलानें मोठ्या [illegible] सहदेवानें दुःशासनाला मूर्छित केलें. दुःशासन त्याचवेळी मरावयाचा; परंतु त्याच्या सारथ्यानें त्याला चपळाईनें पळवून नेलें. तेव्हा नकुल युद्ध [illegible] करीत अगदी कर्णाच्या रथाजवळ गेला कौरवांचा संहार झालेला पाहून, कर्ण अत्यंत संतप्त झाला होता. त्यानें

नकुल जवळ आलेला पाहताच त्याचा ... युद्ध सुरू केले. कर्णा-प्रमाणें युद्धनैपुण्य नकुलाचा अंगी नसल्यामुळें, त्याचा लवकरच पराभव झाला; व कर्णाने त्याच्या गळयात आपलें धनुष्य घालून त्याला आपल्या रथाजवळ ओढून घेतले. नतर कर्ण म्हणाला,–' ... कुशा, या वेळीं मी तुझा वधच करावयाचा परतु मी अर्जुनाशिवाय इतराचा वध करणार नाहीं, असें कुंतीला अभिवचन दिल्यामुळें तुला जिवंत सोडून देतो.' असें म्हणून कर्णानें त्याला सोडून दिले. इतक्यात सूर्यास्त झाल्यामुळे त्या दिवशीचे युद्ध बंद झालें व दोनही सैन्यें आपापल्या शिबिरात विश्रातिसाठीं गेली.

---

# अध्याय ३ रा



## शल्याचें सारथ्य.

त्या रात्री कौरव आपल्या शिबिरांत, भोजन वगैरे झाल्यावर दुसऱ्या दिवशीं युद्धाची व्यवस्था कशी करावयाची, याचा विचार करूं लागले. उदयीक होणाऱ्या युद्धांत आपणास अर्जुन जिंकील, अशी दुर्योधनाला काळजी वाटूं लागली. तेव्हा कर्ण हंसून म्हणाला,– "दुर्योधना, आज अर्जुन व कृष्ण हे शर चुकवून जिवंत राहिले; परतू उद्या ते दोघेहि तुला जिवंत दिसावयाचें नाहींत. हे लक्षात ठेव. इतकेच नव्हे. तर मी अशी प्रतिज्ञा करितो कीं, 'उद्यां मी पार्थाचा वध करणार, व न केल्यास शिबीरात परत येणार नाही.' अर्जुनाला आपल्या युद्धकौशल्याचा मोठा अभिमान आहे; परतू खरे पाहिले असतां युद्ध-विद्येत मीच त्यापेक्षां कुशल आहे. त्याला ... शंकरानी गांडीव धनुष्य दिलें आहे. त्याप्रमाणेंच माझें धनुष्यही इंद्राकरता ... ते विश्वकर्म्याने निर्माण केलें आहे. हे धनुष्य देवेंद्राने परशुरामाला ... होते. याच धनुष्यानें परशु-रामानें एकवीस वेळां पृथ्वी निःक्षत्रिय ... ते धनुष्य परशुरामानें मला दिले असून, मी त्याने ... करीन, हे निश्चयाने जाण दुर्योधना, एकदा पाडवाच्या ... या पृथ्वीचा सहजच

भूपति होशील; परंतू त्याचा सारथी साक्षात परब्रह्म श्रीकृष्ण आहे. तसेंच त्याचा रथही दिव्य असून तो त्याला अग्निनें दिला आहे. तो सुवर्णभूषणांनी अलंकृत असून त्यावर अभेद्य कवच आहे. त्या रथाचे घोडे विलक्षण वेगवान् असून सारथ्याच्या इच्छेप्रमाणें मार्गक्रमण करितात. तसेंच त्या रथाचा ध्वजही तेजस्वी आहे. हीं सामुग्री जर माझ्याजवळ असती तर मी एका क्षणार्धात पांडवांचा नाश केला असतां. तथापि आपणाकडील वीर जो शल्य, तो सारथ्य करण्यात कृष्णाप्रमाणें कुशल आहे. तो जर माझें सारथ्य करील, तर उद्या मी अर्जुनाचा वध करीन.

कर्णाचें हें भाषण ऐकून दुर्योधनाची चिंता दूर झाली. दुसऱ्या दिवशीं कौरवसैन्य युद्धासाठी सिद्ध झालें असतां, दुर्योधन शल्याकडे गेला. व त्याला कर्णाचें सारथ्य करण्याविषयी विनंती करूं लागला. दुर्योधनाची ती विनंती ऐकून शल्यास फार क्रोध आला. कारण दुर्योधनानें आपणास सारथ्याचें हलके काम करण्यास सांगून अपमान केला, अशी त्याची समजूत झाली. तो दुर्योधनास म्हणाला–' दुर्योधना, माझी योग्यता तूं कर्णाचे सारथ्य करण्याइतकी समजतोस, यावरून तुला परिक्षा नसून तूं अत्यंत अविचारीं व क्षुद्रबुद्धीचा आहेस. यापुढें मी तुला कोणतेही साह्य न करितां आपल्या देशी परत जाणार आहे. शल्यानें असे म्हटल्यावर दुर्योधन त्याला अधिक विनवून म्हणाला,–' शल्या, तुझी समजूत चुकीची झाली आहे. मी हें कार्य तुझी योग्यता जाणल्यावाचून तुला सांगितलें नाहीं. सांप्रत या पृथ्वीतलावर खरें सारथ्य जाणणारें दोघेच आहेत, एक श्रीकृष्णभगवान आणि दुसरा तूं अशीं तुझी कीर्ति असून तूं मजवर निष्कारण रागावला आहेस. तिकडे श्रीकृष्णभगवान सारथ्य करीत आहेत. त्याप्रमाणें तू जर कर्णाच्या रथाचे अश्वरज्जू हातांत धारण करशील, तर आज कौरवाचा जय होऊन तुझी कीर्ति दिगंतरी होईल. '

दुर्योधनानें शल्याची अशी समजूत घातल्यावर त्यानें सारथ्य करण्याचे कबूल केलें. व तो कर्णाच्या रथावर जाऊन बसला. शल्यासारखा चतुर सारथी मिळालेला पाहून कर्णाला मोठा आनंद झाला. व त्याचा उत्साह द्विगुणीत वाढला. परंतू शल्यानें तें कार्य केवळ स्वतःच्या कीर्तिसाठीं व वाटेल तेव्हां सोडण्याच्या करारानें पत्करले होते. कर्णाबद्दल त्याला मुळीच सहानुभूति नव्हती. तो रथ चालवित असतां कर्णाला म्हणाला,–'कर्णा, तूं आज पार्थाबरोबर युद्ध करण्यासाठी सिद्ध आहेस. हें पाहून मला फार आश्चर्य

वाटते. तुला आपल्या पराक्रमाचा अभिमान झाल्यामुळें तुझी सारासार विचार-शक्ति लुप्त झाली आहे. अर्जुनाच्या पराक्रमाचा विचार न करितां तूं त्याच्याशी केवळ अज्ञानानें व अभिमानानें युद्ध करण्यास तयार झाला आहेस, या तुझ्या कृत्यावरून मला एका दुरभिमानीं कावळ्याची गोष्ट आठवली आहे, ती तुला सांगतो.'

## हंस-काकीय आख्यान

पूर्वी समुद्रकांठीं एका शहरात एक श्रीमंत वैश्य होता. त्या वैश्याच्या मलांनी उष्टे अन्न खावयास घालून, एका कावळ्याला पोषिलें होते. पुष्कळसें अन्न मिळत गेल्यामुळें, तो कावळा फार पुष्ट झाला होता तसेच त्या कावळ्याला वैश्यपुत्रानीं प्रडीन, उड्डीन, वगैरे आकाशांत उडण्याच्या अनेक चमत्कारीक गति शिकविल्या होत्या. या कारणामुळें तो कावळा इतका अभिमानी झाला होता कीं, त्याला आपण सर्व पक्ष्याचें राजे आहोत, असे वाटे; व त्या प्रमाणें तो सर्व पक्षांबरोबर उन्मत्तपणें वागे. एकदां त्या सागराच्या तीरावर मानसरोवरांत राहाणारें कांहीं हंस आले. त्यांना पाहून तो उन्मत्त कावळा त्यांच्याजवळ गेला, व त्यांचा अपमान करून आपली प्रशंसा सांगू लागला. तो म्हणाला,-' हंसांनो, मला पुष्कळ गति येतात. तुम्हाला कोणाकडे धैर्य असेल तर त्यानें मजबरोबर या सागराच्या पलीकडे यावें' त्या कावळ्याचे आत्मस्तुतीचें हें भाषण ऐकून हंस म्हणाले-' अरें कावळ्या, आम्हांस तुझ्यासारख्या पुष्कळ गति माहीत नाहीत, आम्ही फक्त एक गति जाणतो. तथापि तुझ्याबरोबर उडण्याची आमची तयारी आहे, असे त्या हंसांनी सांगितल्यावर तो कावळा त्यांच्याबरोबर उडाला, व पलिकडें जाण्याचा प्रयत्न करूं लागला पण तो कित्येक योजनें विस्तृत असलेला समुद्र त्यास ओलांडितां येईना. वेगानें सोडलेल्या बाणाप्रमाणें हंस उडत होते, व तो कावळा त्यांच्या मागून मंदगतीनें चालला होता. हंसांबरोबर उडणें तर त्यास मुळींच शक्य नव्हतें. परंतु अभिमानानें त्याचा विवेक नाहींसा झाल्यामुळें तो हंसाबरोबर उडाला, त्या स्पर्धेत तो इतका थकला कीं, त्याला उडण्याची शक्ति राहिली नाहीं. पलीकडचें तीर गांठणें तर अशक्यच होतें. पण अलीकडच्या तीरावर परत येण्यासहि तो असमर्थ झाला. शेवटीं त्या भयंकर समुद्रांत तो कावळा

पडला, व गटगळगा खाऊं लागला तेव्हां हंसांना त्याची दया आली, व त्यानीं त्याला पाण्यांतून काढून परतीराला नेलें.'

ही कथा सांगून शल्य कर्णाला म्हणाला,–' कर्णा, तुझी स्थिति त्या कावळ्याप्रमाणेंच होईल की काय, अशी मला भीति वाटते.' तेव्हां कर्ण म्हणाला;– 'शल्या, मी परशुरामाला फसवून ब्रह्मास्त्रविद्या संपादन केली आहे. त्या विद्येच्या प्रभावानें मी संपूर्ण पांडव–सैन्याचा संहार करण्यासही समर्थ आहे.'-इतकें भाषण होत आहे तों शल्याने कर्णाचा रथ कौरव सैन्याच्या अग्रभागी आणून उभा केला; आणि कृष्णार्जुनास दाखवून तो कर्णाला म्हणाला,–' कर्णा, ते पहा, कृष्णार्जुन पांडव–सैन्याच्या पुढें रथारूढ झालेले असून, तुझी वाट पहात आहेत.'–इकडे पांडव–सैन्य युद्धांला सिद्ध झाल्यावर धर्म सर्वांना संबोधून म्हणाला,–' वीरहो, नीतीनें युद्ध करा अधर्मानें युद्ध केल्यास जयाची प्राप्ति व्हावयाची नाही, हें लक्षांत ठेवा'–या धर्मवाक्या-प्रमाणें वागण्याचा पांडव–सैन्यानें निश्चय केला. त्या दिवशी कर्णाबरोबर अर्जुन, दुर्योधनाबरोबर भीम, वृषसेनाबरोबर नकुल, व सौबळाबरोबर सहदेव याप्रमाणें युद्ध करूं लागले. युद्धाच्या पाहिल्याच प्रसंगाला धर्मानें कर्णावर विलक्षण शरवृष्टि करून त्यास त्याच्या रथांत मूर्छित केलें. कर्ण सावध होऊन पुन: निकरानें युद्ध करूं लागला. तेव्हां भीमानें पुढें होऊन त्याला पुनः मूर्च्छित करून रथाखाली पाडलें. तो प्रकार पाहतांच कौरव–सैन्य हताश झाले. त्या वेळी कर्णाची स्थिति भयकरच झाली असती, परंतु शल्यानें चप लता करून त्यास रथात घेतलें, व त्याची मूर्च्छा दूर केली. एवढया वेळांत इकडे भीमानें बाल्हीक, आवत्य, कैकेय, यावन, सैंधव, सृंजय, मद्रराज वगैरे मोठ्यामोठ्या वीराचा पुरा पराभव करून त्यांना रणांगणावरुन पळावयास लाविलें. तसेच धृष्टद्युम्नानें अश्वत्थाम्यासारख्या महावीराचा पराभव करून त्यासही रणांगण सोडावयाला लावले. पण या पराभवानें अश्वत्थामा अत्यंत संतप्त झाला; व मोठ्या तयारीनें रणावर येऊन त्यानें धृष्टद्युम्नास पुनः युद्धाला पाचारण केले. त्या वेळीं अश्वत्थाम्यानें ' आज मी धृष्टद्युम्नास तरी मारीन, किंवा स्वतः तरी मरेन,' अशी प्रतिज्ञा केली होती. त्याप्रमाणें त्यानें आपल्या प्रयत्नाची शिकस्त करून धृष्टद्युम्नास पराभूत करून मूर्च्छित केलें. व तो रथाखाली उतरून धृष्टद्युम्नाचा वध करण्यासाठीं चालला; परतु तितक्यांत धृष्टद्युम्नाच्या सारथ्याने चपळाईने त्याचा रथ शिबिरांत नेला.

इतक्यांत अश्वत्थामाही अर्जुनाच्या बाणाघातानें मूर्च्छित झाला. अश्वत्थाम्याची ती स्थिति पाहून, कर्ण अत्यंत क्रुद्ध झाला, व त्यानें मोठ्या निकरानें भार्गवास्त्र पांडव-सैन्यावर टाकलें. त्या अस्त्रामुळें सर्व भूमंडळ हाललें व पांडव सैन्यांत मोठा कल्लोळ उडाला. धर्म तर त्यावेळी मुर्च्छित होऊन आपल्या रथांत पडला. त्याच्या सारथ्याने वेगानें रथ हांकून धर्माला पांडव शिबिरांत नेलें, थोड्या वेळानें सैन्यांत शातता पसरल्यावर भीमार्जुन धर्माचा शोध करूं लागले, तों त्यांना धर्माचा रथ कोठेंहि दिसेना. तेव्हां दोघेही चिंतातूर झाले; व शिबिरात जाऊन धर्माची चौकशी करण्यास ते सांगूं लागले. तसें केल्यास आपण भिऊन रणांतून पळालों, असा कौरव-सैन्याचा समज होईल या भीतीनें कोणीही रणांगण सोडून शिबिरांत जाण्यास कबूल होईना. शेवटी अर्जुनानें शिबिरांत जाण्याचे ठरवून त्याप्रमाणें आपला रथ शिबिराकडे नेला.अर्जुन शिबिरांत येत आहे, असें पाहून धर्म आपल्या आसनावरून उठला, व त्याला मोठ्या उत्सुकतेनें म्हणाला,- पार्था, कर्णाला मारून रणांतून आलास असें वाटतें कोणत्या उपायानें तूं कर्णाचा वध केलास, व कौरव सैन्याची काय स्थिति झाली ? तें ऐकण्याची मला फार उत्कंठा लागली आहे. ' -तेव्हां पार्थ म्हणाला,-' धर्मा मी कर्णाचा वध न करितांच रणांतून येथें आलों. तुझा रथ कोठेंच दिसेना, तेव्हां फार चिंता वाटूं लागली, व तुमचा शोध करावा, म्हणून रणांगण सोडलें.' -हें पार्थाचें भाषण ऐकून धर्माला फार राग आला, तो संतप्त होऊन म्हणाला, 'पार्था आपल्या बंधूचा मोह उत्पन्न होऊन तू रणांगण सोडावेस हे अत्यंत अनुचित होय. कुंतीच्या पोटीं जन्म घेऊन तू त्या वीरमातेला या कृतीनें खचित खाली पाहावयाला लाविलेस. यजपुढें तू एक क्षणभरही उभा राहूं नकोस. आतांच्या आतां रणांत जाऊन शत्रूला मार, किंवा स्वतः रण यज्ञांत आपली आहुति दे.'

याप्रमाणें धर्माचें उग्दार ऐकून अर्जुनाला फार वाईट वांटलें. रणक्षे सोडून आल्याबद्दल त्याला फार अनुताप वाटू लागला. परंतु त्या बोलण्यानें त्याला फार त्वेष आला, व तो शत्रुहननासाठीं अगदीं ऊत्सुक होऊन धर्माला म्हणाला,'धर्मा मी केवळ मोहवद्धनेंमुळें रणांगण सोडून तुझे कुशल पाहण्यास आलो. या प्रमादाबद्दल मी तुझ्याजवळ क्षमा मागतो. व अशी प्रतिज्ञा करतो कर्णाचा वध केल्यावाचून रणांगण केव्हांही सोडणार नाही.' असें म्हणून अर्जुनानें धर्माच्या चरणांवर मस्तक ठेवून त्याचा आशीर्वाद घेतला, व तो

रथात बसून युद्धासाठीं पुनः रणावर आला. थोडया वेळानें अस्वास्थ नाहीसे झाल्यावर धर्मही आपल्या शिबीरातून निघाला. व रणांगणावर येऊन पोचला.

## दुःशासन-वध

इकडे रणावरून अर्जुन व धर्म असे दोघेहि जरी गेलें होते. तरी त्यांच्या पश्चात पाडवांनी मोठया निकरानें युद्ध चालविले होते. सात्यकि भीम, धृष्टद्युम्न वगैरें वीरांनीं कौरवांना ' त्राही भगवान ' करून सोडले, इतक्यांत धर्म व अर्जुन पुनः रणांगणावर आलें; तेव्हां पांडव-सैन्याचा उत्साह अधिक वाढला. व त्यानी पूर्वीपेक्षा अधिक जोरानें युद्ध चालविलें. पांडवांचें पुष्कळ वीर उत्साहभरात कौरव-सैन्याच्या अंगाशी गेलें, व त्यानी कौरव हननाचा सपाटा चालविला. कृपाचार्यासारखा महारथी, पण त्यासदेखील त्यावेळीं धृष्टद्युम्नासारख्या पोरानें विरथ केले. व रणांगण सोडण्यास लावले. कृपाचार्यांची स्थिती पाहून कौरव अतिशय खवळलें. व भीम जवळ आलेला पांहताच त्याच्यावर सर्वांनी शस्त्रास्त्रवृष्टी करण्यास आरंभ केला. भीमाच्या रथावर याप्रमाणे चोहोकडून मारा होऊ लागल्यावर, तो पर्जन्यकालाच्या जलधारांनी व्याप्त झालेल्या सूर्याप्रमाणें दिसू लागला. त्या विलक्षण माऱ्यानें तो क्षणभर गोंधळून गेला, व त्याला पुढें काय करावे ते सुचेनासे झाले. परंतू भीमाचा सारथी मोठा चतुर होता. भीम घाबरला असे पाहताच तो म्हणाला,-'भीमा, धैर्य सोडू नकोस. शत्रूपक्षानें हे उगीच अवडंबर माजविलें आहे, अजून आपणाजवळ सहा आयुने बाण शिल्लक असून एक आयुत भालें आहेत. नाराच, विशालमुख वगैरे प्रखर बाणही असंख्य आहेत. शिवाय तुझ्या हातात वज्रमय गदा जोपर्यंत आहे, तोपर्यंत तुला भिण्याचे मुळीच कारण नाहीं.' असे म्हणून त्या कुशल सारथ्यानें न डगमगतां भीमाचा रथ आणखी पुढे नेला. तेव्हा भीमानेंही भिती सोडून दिली. व आज कौरव सैन्याचा मोड तरी करावयाचा किंवा रणयज्ञांत स्वतःची आहुती तरी द्यावयाची असा निश्चय करुन तो कौरव-सैन्यांत शिरला, व त्यांचा सारखा संहार करूं लागला, भीमाचा तो पराक्रम पाहून अर्जूनालाही स्फुरण चढले, व तो भयंकर शरवृष्टी करीत भीमाच्या साहयासाठी त्याच्याजवळ येऊन पोंचला. आपल्या पाठीशी अर्जुन आहे, हे पाहताच भीमाला दुप्पट उत्साह

उत्पन्न झाला. त्यानें आपली अक्षय विजयी गदा घेतली व रथाखाली उतरुन तो थेट दुःशासनाच्या रथावर गेला आणि ज्या नीचानें साध्वी द्रौपदीच भर सभेंत विटंबना केली होती, त्या दुःशासनाला सतापभारांत रथाखाली ओढून, त्यांचा हृदयप्रवेश गदाघातानें फोडून छिन्नभिन्न केला त्यावेळीं दुःशासनाच्या छातीतून धो धो रक्त वाहू लागलें तेव्हां भीम मिटक्या मारून तें रक्त पिऊ लागला. अशा प्रकारे द्रौपदीजवळ केलेली प्रतिज्ञा त्यानें ह्यावेळीं शेवटास नेलीं. शेवटी त्यानें रक्त अजलीत घेऊन तो तसाच द्रौपदीच्या शिबीरांत गेला. व तिच्या केसास तें रक्त लावून तिची इच्छा त्यानें पूर्ण केली. दु.शासनाचा मृत्यू होतांच सर्व कौरव सैन्यांत एकच हाःहाःकार उडाला, व जो तो भीमाचा वध करण्याचा प्रयत्न करूं लागला कर्णपुत्र वृषसेन गदा घेऊन भीमावर धावून गेला; परंतु अर्जुनानें तितक्यात एक तीव्र बाण सोडून वृषसेनाचें शिर गमनमडळात उडवून दिलें.

---

# अध्याय ४ था.



## कर्ण-वध कथा

वैशंपायनऋषि जनमेजयराजाला सांगतात,- 'राजा रणांत अर्जुनाच्या बाणानें कर्ण पुत्र वृषसेन मरण पावल्यावर, सर्व कौरव-सैन्यांत हाःहाःकार उडाला व ते सर्व सैन्य भयचकीत झालें, एकमागून एक मोठमोठे पराक्रमी कौरववीर मृत्यूमुखी पडू लागल्यामुळें बाकी राहिलेंल्यांची जयाशा नाहिशी झाली; व त्यांना पांडवाशी युद्ध करणें, म्हणजे निष्कारण आपण आपल्या हातांनी आपला संहार करून घेणें, असे वाटूं लागलें. परंतू कर्ण दुर्योधन वगैरे वीर भयंकर हानीमुळें अधिकच चिरडीस जाऊन, त्यांचा विवेक नाहीसा झाला; व ते आपल्या वीराना अधिकच निकरानें युद्ध करण्याविषयी प्रोत्साहन देऊं लागले. त्यावेळी अश्वत्थामा, दुर्योधनाला म्हणाला -' दुर्योधना, या युद्धांत तुला आतां जय येण्याची चिन्हे दिसत नाहीत

यासाठीच तूं अर्जून पांडवांशी सख्य जोड, म्हणजे तुला आहे ह्यास्थितीत सुखानें राहाता येईल. '–हे भाषण दुर्योधनाला रुचलें नाही. तो उलट क्रोधानें संतप्त होऊन त्याला म्हणाला, ' अरे तूं स्वामीद्रोही आहेस. पांडवांचें हित व्हावें अशी तुझी इच्छा दिसते. तुझी तशी इच्छा असली तर तूं पांडवांकडे जा, व त्यांना खुशाल साहृय कर' नंतर तो कर्णाला म्हणाला,–' कर्णा, माझी जयाशा आतां फक्त तुझ्यावर काय ती अवलंबून आहे. तूं आज निकरानें युद्ध करून अर्जुनाचा वध कर. म्हणजे बाकी पांडव सैन्याचा संहार करण्यास आपलें सैन्य सहज समर्थ होईल. ' हें ऐकून कर्णानें आपला रथ पुढें घेण्याविषयीं शल्यास सुचविलें. कर्ण व अर्जुन हे दोघेही धनुर्विद्येंत सारखेच निपुण होते. ते दोघे समोर येऊन जेव्हां युद्ध करूं लागले, तेव्हां दोन्ही पक्षांकडील पुष्कळ वीर तो युद्ध-प्रकार पाहत असतां चित्राप्रमाणें स्तब्ध झाले. हला वेळीं कर्ण आपली अगदीं शिकस्त करूं लागला; परंतु त्याच्या प्रत्येक बाणाचें अर्जुनाकडून निवारण होऊं लागलें. कर्ण प्रत्येकक्षणीं नवीन नवीन अस्त्राची योजना करी; पण अर्जुन त्याचा तेव्हांच परिहार करी. इतक्यांत कर्णाला आपल्या भात्यांत एक सर्पबाण सापडला. तो बाण भात्यांत कसा आला, याची त्याला मुळींच स्मृति नव्हती. परंतु तो भात्यांत पाहून कर्णाला मोठा आनंद झाला, व त्यानें तो धनुष्याला लावून मोठ्या त्वेषानें अर्जुनावर सोडला. त्या बाणाला तोड-ण्याचे पुष्कळ प्रयत्न अर्जुनानें त्या वेळीं केलें, परंतु तो बाण सणणण करीत वेगानें येऊन, धाडकन् अर्जुनाच्या रत्नजडित मुकुटावर आदळला. त्या आघातानें अर्जुनाच्या मस्तकावरील मुकुट खालीं पडला, व अर्जुनही मूर्च्छित झाला. परंतु इतक्यांत कृष्णानें त्यास सावध केलें.

आपण एवढ्या निकरानें सोडलेला खात्रीचा बाण फुकट गेला, असें पाहून कर्णास अत्यंत उद्विग्नता व संताप उत्पन्न झाला, व आतां पुढें कोणत्या अस्त्राची योजना करावी, या विचारांत तो पडला. इतक्यांत त्याच्या पुढें आकाशांतून एक सर्प येऊन उभा राहिला, व म्हणाला; ' कर्णा, अर्जुनानें जेव्हां खांडववन जाळलें, तेव्हां त्यांत माझी आई निवर्तली. तेव्हांपासून मी अर्जुनाचा द्वेष करीत आहे. या प्रसंगीं तुला साहृय करून त्याचा प्राण घ्यावा या इच्छेनें मी बाणरूपानें तुझ्या भात्यांत राहिलों होतों. परंतु बाण सोडते वेळीं तूं जरा चुकलास त्यामुळें अर्जुन वांचला. यावरून तुझें प्राक्तन ठीक

दिसत नाहीं.' असें म्हणून तो सर्प अदृश्य झाला. सर्प गेल्यावर कर्णानें शल्याला आपला रथ आणखी पुढें घेण्यास सांगितलें. त्याप्रमाणें शल्य रथ पुढें हाकूं लागला; परंतु इतक्यात पृथ्वी दुभंग होऊन त्याच्या रथांचीं चाकें जमिनींत गलीं. तो प्रकार पाहून शल्य कर्णाला म्हणाला,-' कर्णा, हें एक नवीनच संकट ओढवलें. रथचक्रें भूमींत गुंतल्यामुळें रथ मुळींच हालत नाहीं शल्यांचे हे उद्गार ऐकून कर्ण रथाखाली उतरला, व रथचक्रें काढण्याचा प्रयत्न करूं लागला.

अशा आपदावस्थेंत कर्ण सापडला असतां श्रीकृष्ण अर्जुनाला म्हणाले, ' पार्था कर्णाला मारावयाला हीच चांगली संधि आहे. यावेळीं कुशलतेनें व निकरानें शरसंधान कर. म्हणजे कार्यभाग तेव्हांच साधेल. कृष्णाचें भाषण ऐकून पार्थाला मोठें आश्चर्य वाटलें; व विपदावस्थेंत सांपडलेल्या वीराबर अस्त्र कसें फेंकावें, याचा त्याला मोठा विचार पडला. परंतु कृष्णानीं थोडा बोध करून शरसंधान करण्यास त्याला प्रवृत्त केलें. आपण अशा विपत्तींत असतां अर्जुन आपणावर शर-संधान करण्यास उद्युक्त झाला आहे, असें पाहून कर्ण अर्जुनाला म्हणाला, ' अर्जुना, ही युद्ध नीति नव्हे विचार कर, 'क्षत्रियधर्माला कलंक लावू नकोस,-' हें कर्णाचें भाषण ऐकून श्रीकृष्ण संतप्त होऊन म्हणाले, -' अरे, धर्माधर्माच्या गोष्टी सांगणाऱ्या कर्णा,धर्माचा उपदेश करण्याचा अधिकार तुझा नाहीं. तुला जर क्षत्रियधर्माची इतकी चाड होती, तर कौरवांना तो शिकविण्याचा तू एकादे वेळीं तरीं प्रयत्न करावयाचा होतास ? द्यूतप्रसंगीं कपटी फाशांनी खेळावयाच्या वेळीं तूं दुर्योधनाला धर्माची आंठवण कां करून दिली नाहीस ? भर सभेंत द्रौपदीच्या वस्त्राला जेव्हां दुःशासनानें हात घातला त्या वेळीं तुझा धर्म कोठें गेला होता ? त्या साध्वीची विटंबना पाहतांना तुला आपल्या क्षत्रियत्वाची कां स्मृति झाली नाहीं ? अरे, पांडव पांच गांवे घेऊन राहण्यास संतुष्ट असतां, ज्या दुर्यो-धनानें हें अधर्मयुद्ध चालविले, त्या युद्धांत सेनापति म्हणून पुढें येतांना तुल धर्माची स्मृति का झाली नाही ?'-याप्रमाणे कर्णाचा तिरस्कारयुक्त वाणीनें धिक्कार करून कृष्ण अर्जुनाला म्हणाले,-'अर्जुना, विचार कसला करतोस, प्रकृतीच्या वीराला आपत्कालीं मारण्यास मुळीच हरकत नाही.

---

# अध्याय ५ वा.



## कर्णाला कैवल्यप्राप्ति.

श्रीकृष्णानीं अस्त्र सोडण्याविषयीं जरी प्रोत्साहन दिलें, तरी अर्जुन खरा क्षत्रिय असल्यामुळें तो कर्णाला म्हणाला,–'कर्णा रथोन्मूलनाचा प्रयत्न सोडून दे, व माझ्या अस्त्राचा प्रतिकार करण्यास तयार हो.' हें एकून कर्ण म्हणाला,–'अर्जुना यावेळीं मी अशा संकटात असतां तूं मला युद्धासाठीं पाचारण करणें साहाजिक आहे. पण अर्जूना, तुला जर श्रीकृष्णाचे साह्यच नसतें, तर तुला इतक्या अभिमानाची पात्रताच मिळूं दिलीं नसती. द्रोण, भीष्म यांच्यासारखा वीरांचा पराभव झाला, तो केवळ श्रीकृष्णामुळेंच होय. एरव्ही त्या जगद्विजयी वीरांचा पांडवांकडून पराभव होणें मुळीच शक्य नव्हतें. त्यांनी निर्वाण करण्याचें मनांत आणलें असते तर पांडवाचे दर्शन तर असो, पण पांडव हे नांव देखील गेले असते. त्यांनी केवळ श्रीकृष्णाकडेच लक्ष देऊन तुम्हां पांडवांचें संरक्षण केले, अर्जुना, श्रीकृष्णानीं जर तुझें सारथ्य पत्करलें नसते, तर धनुर्विद्येत कर्ण श्रेष्ठ कीं अर्जुन श्रेष्ठ, हें सर्वांच्या निदर्शनास आलें असते,' हे कर्णाचें भाषण ऐकून अर्जून म्हणाला,–'कर्णा, श्रीकृष्णाच्या अंगचे हे आतुलनीय सामर्थ्य जर तुला चांगल्या रितीनें माहिती होते. तर अशा महात्म्याची संगति सोडून तूं दुष्ट व नीच बुद्धीच्या अशा कौरवांच्या अन्नानें पिंड कां पोसून घेनलास ? अजून तो पक्ष सोड, व श्रीकृष्णाचें पाय धर, आणि दुर्योधनाला दोन हिताच्या गोष्टी साग. असें करण्यास जर तूं तयार होशील तर मी आतां धनुष्य खाली ठेवतो, व राहिलेल्या कौरवांना प्राणदान देतो.' तेव्हां कर्ण म्हणाला,–'अर्जुना, हे बोलणें तुला क्षत्रियाला शोभत नाहीं. ज्याचे अन्न मी खाल्ले आहे. व अंतःकालापर्यंत संरक्षण करण्याची मी प्रतिज्ञा केली आहे. त्या कौरवांचा पक्ष कदापि सोडणार नाही, हें मला जितकें भूषणास्पद आहे. तितकेंच कौरवाचा पक्ष सोडणें निंदास्पद आहे, असे निंद्य आचरण मी केंव्हाही करणार नाही माझ्या आपदावस्थेचा विचार न करितां तू निःशंकपण मजवर शरप्रहार कर,'

कर्णाचें तें विलक्षण धैर्याचें भाषण ऐकून अर्जून चकित झाला. कृष्णाकडून बारंवार त्यास प्रोत्साहन मिळतच होते. शेवटी त्यानें धनुष्य सज्ज करुन युद्धास आरंभ केला. तें कर्णार्जुनाचे युद्ध पाहाण्यांसाठीं सहस्त्रावधी वीर एकत्र झालें. कर्ण एका हातानें भुमीत रुतलेला रथ बाहेर काढण्याचा प्रयत्न करीत होता, व एका हातानें शरसंधान करून अर्जुनाच्या बाणांचा प्रतिकार करीत होता. अशारितीनें कर्णानें युद्ध चालवून आपला रथही बहुतेक वर काढला. आणखी थोडा वेळ जर त्यास कोणी प्रतिरोध केला नसता, तर त्यानें सर्व रथ वर काढून तो त्यांत बसला असता. परंतु इतक्यांत मारुतीनें खाली उतरुन कर्णाचा रथ पुन: भूमीत ओढला. त्यावेळी कर्ण मारुतीला म्हणाला,–' मारुते, दोघा वीरांचें युद्ध चाललें असतां त्यात तिसऱ्यानें येऊन कोणाला साह्य अथवा पीडा करणें हें रणनितीच्या विरुद्ध आहें. तूं रथ सोडून दे व अर्जूनाच्या रथावर जाऊन बैस.' मारुती म्हणाला–' कर्णा, तुझें म्हणणें खरे आहे, परंतु धन्याच्या संरक्षणासाठीं सेवकानें जें कांहीं करावयास पाहिजे. तेच मी करीत आहे. मारुतीनें असें सांगितल्यावर कर्णानें रथोन्मूलाचा नाद सोडून दिला व तो स्वतंत्रपणें अर्जूनाशीं यद्ध करूं लागला सर्व बाजनी अनेक संकटें येत आहेंत, असें पाहून कर्णं कृष्णास म्हणाला,–' कृष्णा, यावेळी रथचक्रे जमिनीत रुतली असून. मारुतीनें तो अडवून धरला आहें. अशावेळी तू मला अर्जूनाकडून मारवीत आहेंस, हें अत्यंत निंद्य होय. ही गोष्ट तुझ्यां कीर्तिस कारण न होतां अपकीर्तिस मात्र कारण होईल ' असें म्हणून कर्णानें अर्जूनावर भयंकर शस्त्राचा मारा सुरुं केला. त्याचा प्रतिकार अर्जूनही अत्यंत निकरानें करूं लागला. व कर्णावर मोठी मोठी अस्त्रें अभिमंत्रून फेकण्यास त्याने आरंभ केला अगोदर कर्ण त्या दिवशी युद्ध करून श्रांत झाला होता. त्यात अर्जूनासारख्या वीरांचा मारा बसल्यामुळे, तो विव्हल होऊन रणांत मूर्च्छित पडला. कर्ण पडतांच अर्जूनानें धनुष्य खाली ठेवले.

कर्ण पडल्याचें ऐकून कौरव–सैन्यात हा:हा:कार उडाला, व जो तो मागच्या बाजूनें रणातून पाय काढू लागला. कर्णासारखा वीर नाहीसा झाल्याबद्दल कौरवाना जितके वाईट वाटलें. तितकेच पांडवांनाही वाईट वाटले. ज्या कर्णाचा शब्द झेलण्यास हजारो वीर त्याच्याजवळ अक्षय्य असत, तोच

कर्ण रथात पडतांच त्याच्याजवळ एकही वीर नाहीं, हा प्रकार श्रीकृष्णाच्या दृष्टीस पडतांच ते रथाखाली उतरले व ब्राह्मणाच्या वेषानें कर्णाजवळ गेले; व म्हणाले– 'कर्णा, तुला रणांत मरण येत आहे, यावरून तूं फार दैववान् आहेस. यावेळी जर ब्राह्मणाला दान देशील तर तुझी सर्वत्र कीर्ति होवून तुला सद्‌गति प्राप्त होईल. मरणसमयी तुला जवळ द्रव्य ठेवून काय करावयाचे आहे?'–ब्राह्मणाचे भाषण ऐकून कर्ण म्हणाला,–'ब्राह्मणा, या समयी मजजवळ एक कपर्दिकहि नाही. तथापि मी तुला विन्मुख दवडीत नाही. सुवर्णतंतुनी मी आपले दांत बांधले आहेत, ते तंतू तुला मी देतो.' असें म्हणून कर्णानें, सर्वांगाला बाण टोंचल्यामुळे जरी अत्यंत पीडा होत होती; तरी तशा स्थितीत विलक्षण कष्ट सोसून त्यानें तें सुवर्णतंतू काढून कृष्णाच्या हाती दिलें. ती उदारता पाहून श्रीकृष्णास अत्यंत संतोष झाला व त्यांनी आपले खरें स्वरुप प्रकट करून ते म्हणालें,–' कर्णा, तुला मी प्रसन्न झालो आहे, इच्छा असेल तें माग.' –तेव्हां कर्ण म्हणाला, 'कृष्णा, अंतकाली तुझें दर्शन झालें, यापेक्षां अधिक काय पाहिजे !' – असें म्हणून कर्णानें कृष्णाच्या चरणावर मस्तक ठेऊन प्राण सोडला. त्यावेळीं सर्व पांडवही जवळ होते. त्या सर्वांना कर्णाच्या मृत्युनें दुःख झालें. श्रीकृष्ण म्हणाले,–'पांडवहो, या वीराचा वध एकट्या अर्जुनानें केला नाहीं. तसें करणें त्याला शक्य नव्हतें. रथचक्रें भूमीत गुंतलीं, मारुतीनें रथ अडविला; अशाप्रकारें अनेक आपत्ति उत्पन्न झाल्या म्हणूनच आज कर्णाचा वध करितां आला.'

---

# अध्याय ६ वा



## शल्य, शाल्व व शकुनी यांचें निधन

कर्ण समरांगणांत पडल्यावर दुर्योधन दुःखित होऊन सैन्यासह हिमालयावर गेला. नंतर सेनापति कोणाला करावा, या विचारांत तो पडला. तेव्हां अश्वत्थाम्यानें शल्याचें नांव सुचविलें. तें ऐकून सर्वांना आनंद झाला व ते मोठ्या उत्साहानें शल्यासभोंवती जमले. मग दुर्योधन त्याला म्हणाला,

'शल्या, मित्र कोण आणि शत्रु कोण; हें पाहाण्याची ही वेळ आहे. तरी तूं आतां सेनापति होऊन माझ्यासाठीं युद्ध कर.' हें ऐकून शल्य म्हणाला,– 'दुर्योधना, माझें धन, राज्य, किंबहुना प्राणही तुझ्यासाठींच आहेत. तुझी आज्ञा मला प्रमाण आहे.' याप्रमाणें शल्याची अनुमति मिळाल्यावर दुर्योधनानें त्याला शस्त्रास्त्रें देऊन सेनापति केलें. दुर्योधनाच्या इच्छेप्रमाणें शल्यानें पांडवांस मारण्याची प्रतिज्ञा करून तो युद्धांत सिद्ध झाला. तेव्हां कौरव-सैन्यांनें दुःख टाकून आतां शल्याच्या सेनापतित्वाखालीं आपल्याला जय मिळणार असें म्हणून ती रात्र उत्साहानें घालविली.

इकडे ही वार्ता दूतांकडून धर्माला समजली; तेव्हां तो कृष्णाला म्हणाला.– 'देवा, आतां कौरवांनीं शल्याला सेनापति केले आहे, तरी आमचें सर्वस्वी रक्षण करणारा तूंच आहेस' हें ऐकून कृष्णानें उत्तर दिलें; कीं–– ज्याप्रमाणें भीम व द्रोण त्याचप्रमाणें शल्य मला वाटतो. धर्मा, त्या महारथ्याला मारील, असा तुझ्या वांचून दुसरा कोणी दिसत नाहीं. तुलाच तें काम केलें पाहिजे.

दुसऱ्या दिवशीं प्रातःकाळीं दुर्योधनानें आपलें सैन्य तयार केलें. नंतर सर्व वीरांनीं दुर्योधनाजवळ येऊन अशी प्रतिज्ञा केली कीं, 'आतां पांडव वीरांबरोबर पूर्वीप्रमाणें एकेकानें युद्ध न करितां, सर्वांनी मिळून एकदम हल्ला करावयाचा. जो एकटाच एकट्या वीराबरोबर लढूं लागेल, तो पंचमहापातकांचा धनी होईल' अशी प्रतिज्ञा करून ते सर्व शल्याबरोबर चालूं लागले. इकडे पांडवांनी आपल्या सैन्याच्या तीन तुकड्या करून, युद्धास सुरवात केली. भीष्म द्रोण आणि कर्ण यांच्याबरोबर असलेल्या कौरवसैन्याचा फार नाश झाला, व त्यांच्याजवळ अगदीं थोडे वीर शिल्लक राहिले होते. ही उणीव पाहून शल्यानें पांडव-सैन्याच्या एका भागावर निकराचा हल्ला करण्याचें ठरविलें. त्या प्रमाणें तो पुढें आला असतां, नकुलानें त्याला अडविलें, मग धर्म–प्रमुख पांडव आणि शल्य प्रमुख कौरव यांचें मोठें दारुण युद्ध झालें. धर्मानें शल्याला एक दोन वेळां मूर्च्छित केलें. परंतु तो महावीर पुनः सावध होऊन अधिक आवेशानें युद्ध करूं लागला इकडे धृष्टद्युम्नानें दुर्योधनावर हल्ला करून, त्याचा पराभव केला. नंतर धर्मानें शल्याचा वध करावा असें योजून, आपली ब्रह्मशक्ति बाहेर काढिली

आणि तिची पूजा करून ती शल्यावर सोडली. तिच्या तेजानें सर्व वीरांचें डोळे अगदी दिपून गेले व ते जिकडे तिकडे पळूं लागले. इतक्यांत मोठ्या त्वरेनें ती शक्ति शल्याच्या कंठाचा नेम धरून आली, व वज्राघातानें जसा पर्वत फुटावा त्याप्रमाणें शल्याच्या हृदयावर तिचा आघात होऊन तो मरून पडला. हा भयंकर प्रकार पाहून, कौरव-वीर दाही दिशा पळूं लागले. परंतु इतक्यांत शाल्व नांवाच्या म्लेंच्छ राज्यानें त्यांना धीर देऊन पुन्हां युद्ध सुरूं केलें. तो. मोठ्या आवेशानें धृष्टद्युम्नावर चालून आला, परंतु धृष्टद्युम्नानें शक्तियुक्त बाण त्याच्यावर सोडून त्याचा प्राण घेतला. त्याबरोबर कौरव सैन्यांत पुनः हाहाकार उडाला. पण कृतवर्मा आणि शकुनी यांनीं युद्ध सुरूं केलें. तेव्हां अर्जुन श्रीकृष्णाला म्हणाला, – ' देवा, आज कौरव-सैन्याचा संपूर्ण नाश केला पाहिजे. भीष्म द्रोण, कर्ण शल्य, शाल्व हे महान् वीर आणि दुःशासनादि बंधु मेले असतांही, दुर्योधन उन्मत्त होऊन युद्ध करीत आहे, भीष्मद्रोणांचा उपदेश न ऐकिल्यामुळें, याच्या कुलाचा समूल नाश होण्याची वेळ आली, तरी अद्यापि हा आमचें राज्य आम्हांस देत नाहीं कृष्णा विदुरानें मला पूर्वीच सांगितलें आहे कीं,–' दुर्योधन जिवंत आहे तोपर्यंत तुम्हांला राज्य मिळण्याची आशा नको,–' तरी आज त्याचा वध करून धर्माचा जयजयकार केला पाहिजे. माझा रथ लौकर कौरव-सैन्याकडे ने. अर्जुनानें असें सांगतांच कृष्णानें त्याचा रथ कौरव सैन्यापुढें नेला, अर्जुनाला पाहतांच त्या सैन्याची त्रेधा उडाली; पण शकुनी व दुर्योधन यांनीं तीन हजार हत्तींसह पांडवांना वेढा देऊन त्यांना व्याकुल केलें. तथापि भीम व अर्जुन यांनीं त्या सर्व हत्तींचा नाश केला. इतक्यांत शकुनी व सहदेव यांचें युद्ध सुरू होऊन, सहदेव शकुनीच्या भाल्यानें मूर्च्छित पडला. तेव्हां भीमानें त्वरा करून शकुनीवर चाल केली, व त्याला रणांतून पळावयास लाविलें. इतक्यांत सहदेवही सावध झाला, व शकुनीची निंदा करून त्याला युद्धास येण्यासाठीं आव्हान करूं लागला. तो म्हणाला,– ' अरे शकुनीमामा, थांब, पळूं नको. खोटें द्यूत खेळून सभेंत जो पूर्वी आनंद केलास, त्याचें फळ तुला आतां लवकरच देतो. दुर्योधनाच्या कुलावर तूं निखारे ठेविलेस; तें तुझें शिर आतां पाडितों पहा. ' असें बोलून सहदेवानें मोठ्या आवेशानें शकुनीचें छत्र, ध्वज आणि धनुष्य यांचा नाश केला, आणि शेवटीं एक दिव्य बाण अभिमंत्रून सोडला.

१८ाबरोबर शकुनीचा शिरच्छेद होऊन तो भूमीवर पडला. हा अनर्थ पाहून सर्व कौरव-सैन्य पळून गेलें; व कृष्णार्जुनांनीं आनंदित होऊन शंख फुंकिले. धर्मानें त्या वेळी सहदेवाची वाहवा केली

याप्रमाणें आपल्या सैन्याचा पुरा मोड झाला, तरी दुर्योधन त्याला पुनः उत्तेजन देऊन धृष्टद्युम्नाला मारावयासाठीं परतावयास सांगू लागला. त्याच्या आज्ञेप्रमाणें तें परतलें परतु त्याचा पांडवांनीं तेव्हांच नाश केला. याप्रमाणें अकराही अक्षौहिणा सैन्याचा नाश होऊन दुर्योधन एकटाच उरला, इकडे पांडव हर्षभरित होऊन दिव्य शंख फुकू लागले. त्यांच्या ध्वनीनें दुर्योधन क्षणभर मूर्च्छित झाला. नंतर सावध होऊन त्यानें तेथून पळून जाण्याचा निश्चय केला, आणि लगेच तो अकरा अक्षौहिणी सैन्याचा अभिमानी अधिपति दीन होऊन पायींच चालत द्वैपायन डोहावर गेला, त्याला पुर्वीं विदुरानें त्या डोहाची माहिती सांगितली होती.

या वेळीं कौरवपक्षाकडील दुर्योधन, अश्वत्थामा, कृपाचार्य, कृतवर्मा आणि संजय एवढेच मात्र वीर जिवंत राहिले होते. दुर्योधन डोहाकडे पळाल्यावर बाकीचे रानांत पळू लागले; परतु वाटेंत सात्यकीनें संजयाला धरिलें; व धृष्टद्युम्नाच्या सांगण्यावरून तो त्याला मारणार, इतक्यांत व्यासानें तेथें येऊन सात्यकीची समजूत करून संजयाला सोडविलें. संजय तेथून सुटल्यावर हस्तिनापुरास जाऊ लागला. तों वाटेंत त्याला डोहापाशीं घायाळ होऊन पडलेला दुर्योधन भेटला. त्याला संजयानें आपली हकीकत सांगितली. तेव्हां दुर्योधन म्हणाला, ‘संजया, समरांगणांत तुझ्याशिवाय आतां कोणीच जिवंत राहिला नाहीं, तरी आता हस्तिनापुरीं जाऊन माझी ही हकीकत तूं धृतराष्ट्राला सांग.’ असें त्याला सांगून दुर्योधन डोहात गेला, आणि जलस्तंभिनी विद्येच्या योगानें दबा धरून राहिला.

इकडे संजयानें हस्तिनापुरास येऊन धृतराष्ट्राला सांगितलें; ‘कृप, कृतवर्मा व अश्वत्थामा यांशिवाय आता कोणी जिवंत राहिलें नाहीं, व दुर्योधन पाण्यांत जाऊन बसला आहे.’ हें वर्तमान ऐकून धृतराष्ट्रानें अश्रु गाळले. नंतर जे लोक युद्धकौतुक पाहण्यासाठी आले होते, तेही परत आपापल्या ठिकाणीं गेले नंतर ही सर्व हकीकत कळविण्याकरितां आणि कौरवस्त्रियांची समजूत करण्यासाठी धर्मानें युयुत्सूला नगरात पाठविलें. तो रडत घरीं येऊन विदुराला भेटला. विदुरानें त्याला आलिंगन देऊन

तो युद्धांत जिवंत राहिल्याबद्दल आनंद मानला. नंतर तो त्याला म्हणाला,— 'अरे, तू दुर्योधनाला टाकून एकटाच कसा आलास ?' तेव्हां युयुत्सूनें दुर्योधनाचा सर्व वृत्तान्त विदुराला सांगितला. तो ऐकून विदुराला फार वाईट वाटलें; व राणीवशांत आकांत होईल म्हणून स्त्रियांची समजूत करावयास तोही युयुत्सूबरोबर राणीवशांत गेला.

---

# अध्याय ७ वा



## गदापर्व

दुर्योधन डोहांत जाऊन लपल्यावर पांडवांनीं त्याचें उरलेलें सर्व सैन्य नाहीसे केलें व त्याच्या रिकाम्या झालेल्या शिबिरांतच त्या रात्रीं ते विश्रांति घेण्यासाठीं राहिले. इकडे कृप, कृतवर्मा आणि अश्वत्थामा हे डोहाजवळ जाऊन दुर्योधनाला म्हणाले,—'दुर्योधना, तू युद्धाचा निश्चय अजूनही सोडू नकोस. पांडवांना जिंकून पृथ्वीचें राज्य कर, नाहींतर युद्धांत देह ठेवून स्वर्गप्राप्ति तरी करून घे.' हे ऐकून दुर्योधन म्हणाला,—'अहो, तुम्हीं युद्ध करून फार थकलां आहां, तरी आतां रात्रभर विसावा घेऊन उद्यां युद्धाचा विचार करूं.'—दुर्योधनाचें भाषण ऐकून अश्वत्थामा म्हणाला,—'मी उद्यां पांडवांना मारल्याशिवाय कवच काढणार नाहीं, अशी प्रतिज्ञा करतों.'—त्याचें हें बोलणें चाललें आहे, तोंच भीमाचे पारधी तेथें शिकार करण्यासाठी रानांत आले होते, त्यांच्या कानीं तें पडलें. तेव्हां ते एकमेकांस म्हणाले,—दुर्योधन लढाईंतून पळून गेल्यामुळें त्याचा शोध लावण्यास आपणास सांगितलें, तो हा आयताच येथें शोध लागला. तरी आतां भीमाला जाऊन हे वर्तमान कळवूं.' याप्रमाणें विचार करून त्यांनीं भीमाला जाऊन ती हकीकत सांगितली. भीमानें ती ऐकिल्यावर संतुष्ट होऊन पारध्यांना बक्षिस दिलें, व धर्माला दुर्योधनाची लपण्याची जागा कोठें आहे तें सांगितलें. तें ऐकून पांडववीरांना आनंद झाला व त्यांनीं दुर्योधनाकडे जाण्याची तयारी केली. हा प्रकार व्यासाला कळतांत तो

दुर्योधनाजवळ डोहांत येऊन बसला. दुसऱ्या दिवशीं सैन्यासह सर्व पांडव डोहाजवळ आले. पांडव येत आहेत असें पाहून कृपादि मंडळी दुर्योधनाची आज्ञा घेऊन दूर एका झाडाखालीं जाऊन बसलीं. पांडव डोहाच्या अगदीं जवळ आल्यावर धर्म कृष्णाला म्हणाला,—'देवा, दुर्योधन मायेनें जलाचें स्तंभन करून आंत राहिला आहे, व शिवाय व्यासही त्याच्याजवळ आहेत; तेव्हां त्याला मारण्यासाठीं आतां काय उपाय करावा ?' कृष्णानें उत्तर दिलें 'धर्मा, पूर्वी मीं अवतार घेऊन मायेनेंच दैत्यांचा संहार केला. दुर्योधन मायावी आहे, तर त्याला कांहीं उपाय करूनच मारिलें पाहिजे.' याप्रमाणें ठरल्यावर धर्म दुर्योधनाला उद्देशून म्हणाला,–'दुर्योधना, तू युद्धांतून पळून पाण्यांत लपून बसलास, हें तुझ्यासारख्या क्षत्रियाला उचित नव्हे. बाहेर येऊन आम्हांशीं तूं धर्मयुद्ध कर.' हें ऐकून दुर्योधनानें उत्तर केलें; 'युधिष्ठिरा, मी भयानें कांहीं येथें लपलों नाहीं. युद्धानें मला फार श्रम झाले आहेत, म्हणून थोडीशी विश्रांति घेण्यासाठीं म. येथें बसलों आहें. थोड्या वेळानें मी बाहेर येऊन तुमच्याशीं युद्ध करितों, परंतु आतां मला राज्याची मुळीच इच्छा नाहीं. तूंच आतां सर्व पृथ्वीचा उपभोग घे. मला आतां अरण्यांत जाण्याची मात्र इच्छा आहे.' त्यावर धर्म म्हणाला,– 'अरे, पूर्वी भगवान् श्रीकृष्ण तुझ्याकडे बोलणें करण्यासाठीं आला असतां, त्याचा अपमान करून सुईच्या अग्राइतकीही माती पांडवांना माझ्याकडून युद्धाशिवाय मिळणार नाहीं असा निरोप पाठविलास, यास्तव आतां तुझ्याकडून राज्यदान घेण्याची आमची इच्छा नाहीं. तुला युद्धांत जिंकूनच क्षत्रियधर्मानें मीं राज्य घेईन, अरे, आम्हांला लाक्षागृहांत जाळण्याचा प्रयत्न केलास, भीमाला विष तर दिलेंस, भर सभेंत दुःशासनाकडून द्रौपदीचे केस ओढविलेस, या तुझ्या निंद्य कृत्यांचा माझ्यानें पृथक् पृथक् उच्चारही करवत नाहीं. अशाप्रकारें आजपर्यंत गांजून आतां राज्य घ्या म्हणतोस, हा तुझा असंबद्ध प्रलाप कोण ऐकेल ? तूं बाहेर येऊन युद्धाला तयार हो.' धर्माचें हें निकराचें बोलणें ऐकून दुर्योधन युद्धाचा निश्चय करून बाहेर आला; आणि धर्माला म्हणाला,–'धर्मा, मीं घायाळ व रथहीन आहे; तरी देखील मीं एकटा तुम्हां सर्वांशीं युद्ध करीन. माझे जे स्नेही, बंधु व सेनापति तुम्हीं मारिलें, त्या सर्वांचा मीं एकटा तुमच्याशीं युद्ध करून–उतराई होईन.' असें म्हणून त्यानें गदा घेतली व 'कोणाशीं

युद्ध करू' म्हणून धर्माला विचारलें. त्यावर धर्म म्हणाला,–' दुर्योधना, तुम्ही सर्वांनी आमच्या अभिमन्यु बाळाला चोहोंकडून वेढून कपटानें मारिले, तसे तुझ्याविषयी करण्याची आमची इच्छा नाही. तुझ्या इच्छेला येईल त्या एकट्या वीराशीच तू युद्ध कर.' धर्माचे भाषण ऐकून कृष्ण रागावून म्हणाला,–' धर्मा, अरे हा दुर्योधन महाकपटी असून त्यानें भीमाला मारता यावें म्हणून तेरा वर्षेपर्यंत लोखंडी पुतळ्याशी अभ्यास केला आहे याच्याशी टिकेल असा तुमच्यात तर मला कोणीच दिसत नाहीं. असें असतां तू काय ही त्याच्याजवळ प्रतिज्ञा केलीस? भीमही याच्याशी गदायुद्धात टिकाव धरील, असा मला भरवसा नाही.' हें ऐकून भीम म्हणाला,– 'देवा, माझें बोलणे ऐक. दुर्योधनाहून माझी गदा दुप्पट बळकट आहे. हिच्या साहाय्यानें मी त्रैलोक्याचा पराभव करीन; मग या दुर्योधनाची तर कथा काय?' भीमाच्या बोलण्यानें कृष्णाला बरें वाटले व तो त्याची स्तुति करून म्हणाला,–' बरें तर, आतां गदायुद्ध करून दुर्योधनाचा वध कर, आणि प्रतिज्ञा सांभाळ.' नंतर भीम धर्माला धीर देऊन व दुर्योधनाच्या अपकारांची फेड आतां करतों पहा, असें म्हणून गदा घेऊन उभा राहिला. धर्मानें त्याला 'विजयी हो' असा आशीर्वाद दिला, आणि दुर्योधनाची निर्भत्सना केली, त्यावर दुर्योधन म्हणाला,–' व्यर्थ बडबड न करितां आतां काय पराक्रम असेल तो प्रत्यक्ष युद्धांत दाखव?' याप्रमाणें एकमेकांचें भाषण होऊन, भीम व दुर्योधन गदायुद्धास प्रवृत्त झाले. इतक्यांत बलराम आपली तीर्थयात्रा संपवून तेथें आला. बलरामाला पाहतांच सर्वांनीं त्याला नमस्कार केला, व सर्व त्याला म्हणाले,–' बलरामा, हे तुझे दोन शिष्य गदायुद्ध करीत आहेत, त्यांचें कौशल्य पहा.' कौरवपांडवापैकीं कोणालाच साहाय्य करावयाचें नाहीं म्हणून बलराम तीर्थयात्रेला निघून गेला होता. कृष्णाची शिष्टाई फुकट गेल्यामुळें कौरवांचा नाश होणार, हें त्याला अगोदरच कळून चुकलें होतें. पण दोन्ही सैन्यें युद्धाला तयार झाल्यावर बलराम कृष्णाला म्हणाला,–' कृष्णा, कौरवांच्या सर्व सैन्याचा नाश झाला म्हणजे तरी त्यांना साहाय्य कर.' परंतु 'ही गोष्ट माझ्या हातून कधींही घडावयाची नाही' असा रोकडा जबाब कृष्णानें त्यास दिला होता.

एवढी कथा ऐकून जनमेजय वैशंपायन ऋषीला म्हणाला,–' मुने बलरामाच्या तीर्थयात्रेचें वर्णन सविस्तर ऐकण्याची माझी इच्छा आहे. तरीं कृपा करून ते मला सांगा.' हें ऐकून वैशंपायन ती हकीकत राजाला सांगू लागले.

# अध्याय ८ वा



## बलरामाची तीर्थयात्रा

वैशंपायन म्हणाले,–' राजा, पुष्य नक्षत्राच्या सुमुहूर्तावर बलराम धनधान्यादि सामग्री बरोबर घेऊन ब्राह्मणांसह तीर्थयात्रेस निघाला. प्रथम सरस्वती तीर्थावर जाऊन, त्यानें तेथें तीर्थविधि उरकले आणि तेथून तो पुष्करास गेला. नंतर पुढें प्रभास नामक प्रसिद्ध तीर्थावर जाऊन त्यानें तेथेंही तीर्थविधि केला. या प्रभास तीर्थाचा महिमा फार मोठा आहे.

## प्रभासतीर्थ–महात्म्य

पूर्वी दक्षप्रजापतीनें आपल्या अश्विन्यादि सत्तावीस कन्या या तीर्थावर चंद्रास अर्पण केल्या. पुढें चंद्र त्या सर्वांवर सारखी प्रीति न करतां एकटया रोहिणीवर मात्र करी. त्यामुळें इतर दक्षकन्या दुःखित होऊन त्यांनीं आपलें गाऱ्हाणें पित्याला जाऊन सांगितलें. तें ऐकून दक्षानें चंद्राला सर्वांवर सारखेच प्रेम ठेवण्याविषयीं आज्ञा केली. परंतु चंद्रानें तिची अवहेलना करून रोहिणीवरच पूर्वीप्रमाणें प्रीति ठेविली. हें पाहून दक्षानें त्याला–' तूं क्षयी होशील '–असा शाप दिला. शापाचा परिहार करण्यासाठीं चंद्रानें यज्ञयाग केले, परंतु रोग सुटेना. त्यायोगें पृथ्वीवरील सर्व औषधी क्षीण झाल्या, व देवांना त्याच्या अमृतमय कला मिळत नाहींशा झाल्यामुळें तेही कृश झाले. तेव्हां सर्व देवांनीं दक्षाकडे जाऊन त्याची प्रार्थना केली; कीं–' हे दक्षा, कृपा करून चंद्राची शापापासून मुक्तता कर.' हें ऐकून दक्ष म्हणाला,–' जर चंद्र आजपासून माझ्या सर्व कन्यांवर सारखी प्रीति करील, आणि प्रभासतीर्थावर जाऊन तीर्थविधि करील, तर त्याची शुक्ल-

पक्षांत वृद्धि आणि कृष्णपक्षात पुनः क्षय होईल पण सर्व शाप कांहीं सुटणार नाही.' दक्षाने असें सांगितल्यावर चंद्र तीर्थयात्रेस निघाला, आणि प्रथम सरस्वतीस जाऊन मग अमावास्येस त्यानें प्रभासतीर्थावर स्नान केलें. त्यामुळें तो अंशतः तरी शापमुक्त होऊन प्रभायुक्त झाला. म्हणून या तीर्थाला प्रभासतीर्थ म्हणतात.

## उदपान तीर्थाचा महिमा

प्रभासपासून बलराम पुढें उदपान तीर्थास गेला. या तीर्थाचाही महिमा मोठा आहे. पूर्वी एकत, द्वित आणि त्रित असे गौतमाचे तीन पुत्र होते. एकदां यज्ञ करण्याचें ठरवून ते त्यासाठी द्रव्य आणावयास निघाले. त्रिताला पुढें करून ते यजमानाकडे गेले. व त्याच्याकडून याग करवून त्यांत मिळालेलें धन व गाई घेऊन ते घरी येऊं लागले. वाटेंत त्रित पुढें झाला, आणि एकत व द्वित हे गाई सांभाळीत मागाहून चालूं लागले. तेव्हां द्वित एकताला म्हणाला,–'अरे, हा त्रित सर्व यज्ञविद्येंत पूर्ण आहे, याला वाटेल तेथें धन व गाई मिळतील तरी या सर्व गाई आपण घेऊन जाऊं या.' असा विचार करून ते चालले. इतक्यांत मार्गात लांडगा आला. त्याला पाहून त्रित भीतीनें पळत असतां, एका विहिरींत पडला. तेव्हां त्याला तेथें तसाच ओरडत ठेवून, एकत आणि द्वित गाई घेऊन पळून गेले. इकडे त्रित विहिरीत विचार करूं लागला, कीं,–'मीं येथेंच मरण पावल्यास माझा यज्ञसंकल्प तसाच राहील.'–असें म्हणत आहे, तों विहिरीच्या कांठावरून आंत लोंबत असलेली एक वेल त्याच्या दृष्टीस पडली. तिलाच सोमवल्ली असें समजून व जलालाच घृत समजून त्यानें सोमाचा रस काढिला, आणि यांतून देवांचे हविर्भाग कल्पून तो यज्ञासाठीं मंत्रघोष करूं लागला. तृतीय सेवनाच्या वेळीं स्वर्गात बृहस्पतीनें त्याचा मंत्रघोष ऐकिला, आणि त्रित यज्ञ करीत आहे असें समजून, हविर्भाग घेण्यासाठीं सर्व देवांसह तो त्रिताच्या कूपाजवळ आला. त्याचे हविर्भाग ग्रहण केल्यावर देवांनीं संतुष्ट होऊन त्रिताला वर काढिलें, आणि त्यानें आपल्या बंधूना शाप दिला की. 'तुम्ही लांडगा आणि रानमोर व्हाल, आणि तुमची संतति वानर होईल.' असो; याप्रमाणे त्रिताला त्या कूपावर देव प्रसन्न झाले, म्हणून त्या कूपाला 'उदपान तीर्थ' असें नाव मिळालें.

## सप्तसारस्वत तीर्थ

नंतर बलराम विनाशन, गधर्व, गर्ग, शंख, इत्यादि तीर्थे करून द्वैतवन तीर्थास गेला आणि तेथून सरस्वतीच्या काठाने दक्षिणेस वळून नागराज तीर्थास गेला. तेथून सरस्वती पूर्वेकडे वळते. या ठिकाणीं पूर्वी ऋषींनीं अनेक द्वादशवार्षिक सत्रें केलीं होती. या ठिकाणी सरस्वती पूर्वी गुप्त झाली असतां, कुरुक्षेत्रांतील ऋषींनी ती पुनः प्राप्त व्हावी म्हणून तपश्चर्या केली. तेव्हां सरस्वती परतून कुरुक्षेत्रास आली, व मग तेथें ऋषींनीं अनेक यज्ञयाग केलें. यापासून आलेल्या सरस्वतीला, सुप्रभा, कांचनाक्षी, विशाला, मनोहरा, आज्यवती, सुवेणु, बिमलोदका, अशीं स्थानपरत्वें नांवें मिळालीं आहेत. या सातही सरस्वती ज्या ठिकाणी एकत्र मिळतात, त्या तीर्थाला ' सप्तसारस्वत तीर्थ ' म्हणतात· या तीर्था. जवळ मंकणक नांवाचा बालब्रह्मचारी राहात असे. एकदां नदीत स्नान करीत असलेल्या एक सुकुमार चारुगात्री अशा स्त्रीला नग्नावस्थेत त्यानें पाहिल्यामुळें, त्याचें वीर्य स्खलन झालें. तेव्हां मंकणानें तें वीर्य कलशांत सांठविलें. पुढे त्यापासून सात मरुद्गणांची उत्पत्ती झाली. या मंकणकाच्या हातमला एका प्रसंगी दर्भाची काडी बोचली व त्यातून शाकरस वाहू लागला. हा चमत्कार पाहून तो नाचू लागला. व त्याच्याबरोबर सर्व स्थावर–जंगम जगतही नाचू लागले.तें पाहून ब्रह्मादि ऋषि शंकराकडें गेले. आणि मंकणकाचें नृत्य थांबविण्याविषयी ते त्याची विनंती करू लागलें. तेव्हां शंकरानें मंकण-काजवळ येऊन आपल्या हाताला छिद्र पाडून त्यातून शुभ्र भस्म काढून त्याला दाखविले. तेव्हां मंकणकाचा अभिमान नाहीसा होवून तो शंकराला शरण गेला. शंकरानें त्याला तपोवृद्धीचा वर देऊन या सप्तसारस्वत तीर्थावर त्याच्यासह स्वतः नित्य राहाण्याचें कबूल केले.

## औशनस तीर्थ.

या सप्तसारस्वत तीर्थाहून बलराम पुढें औशनस तीर्थावर आला. श्रीरामचंद्र पुर्वी दंडकारण्यांत आला असतां, त्यानें राक्षसांचा जो शिरच्छेद केला. त्यातील एक शिर रहोदर नांवाच्या ब्राह्मणाच्या मांडीला चिकटले. त्यामुळें त्याला फार व्यथा होऊं लागली. मग त्यानें ऋषिच्या सांगण्यावरून

या औशासन तीर्थात स्नान केल्यावर शिर गळून पडलें, व ब्राह्मण सुखी झाला तेव्हांपासून यास औशनस कपालमोचन असेही म्हणतात.

# अध्याय ९ वा



## पृथूदकादि तीर्थांचा महिमा

कपालमोचन तीर्थ झाल्यावर बलराम पृथूदक तीर्थास आला. य तीर्थास पूर्वी ऋषंगु नामक ऋषीनें देह ठेविल्यामुळें त्याला मोक्षप्राप्ति झाली. तसेंच कृतयुगांत आर्ष्टिषेण नामक ऋषीनें येथें तप केल्यामुळें, त्याला उत्तम विद्या प्राप्त झाली. सिंहद्वीपाच्या राजानें याच तीर्थावर ब्राह्मणत्व प्राप्त करुन घेतलें. तसेंच विश्वामित्रानेंही येथेंच तप करून ब्राह्मण्य मिळविले. हे तीर्थ करून पुढे बलराम बकदाल्भ्य ऋषीच्या आश्रमास गेला. हा ऋषि एकदां यज्ञ करण्याच्या इच्छेनें दक्षिणप्रांती पांचालदेशाच्या राजाकडे दुसऱ्या ऋषींना घेऊन धन मागावयास गेला. तेव्हां पांचालराजानें त्या ब्राह्मणांना एकवीस बैल दिले. मग बकदाल्भ्य त्या सर्वांना म्हणाला,–' ब्राह्मणहो, हे बैल तुम्ही आपसांत वाटून घ्या, मी भिक्षा मागून आणखी मिळवीन. ' असे म्हणून तो धृतराष्ट्राकडे गेला, आणि त्याच्याजवळ त्यानें गाई मागितल्या. धृतराष्ट्रानें त्याचा अपमान करुन, त्याला मारावयास टेकलेल्या अशा रोडक्या गाई दिल्या. हें पाहून ऋषीला क्रोध येऊन तो आपल्या आश्रमात आला आणि द्वेष धरुन त्यानें यवपिष्टाच्या गाई करुन त्याच्या मांसानें यज्ञ केला. त्याबरोबर धृतराष्ट्राच्या देशाचा विध्वंस होऊं लागला. तेव्हां वैप्रश्निक नांवाच्या ऋषिनें त्याला बकदाल्भ्याची हकीगत सांगितली. तेव्हां धृतराष्ट्राला पश्चाताप होऊन त्यानें बकदाल्भ्याला बोलावून आणून शांतिक होम करविला व त्याला पुष्कळ गाई दिल्या. त्यायोगानें बकदाल्भ्य संतुष्ट होऊन आपल्या आश्रमात आला. हा आश्रम अवकीर्ण तीर्थ म्हणून प्रसिद्ध आहे. बलराम तेथे गेला व तेथून यायात, वसिष्ठप्रवाह, इत्यादि तीर्थे त्यानें केली. या वसिष्ट-प्रवाहावर पूर्वी शंकरानें तप केले. तसेच विश्वामित्र आणि वसिष्ठ यांच्या-मध्ये स्पर्धा उत्पन्न होऊन वसिष्ठाला मारण्यासाठीं विश्वामित्रानें सरस्वतीला

आज्ञा केली. तेव्हां सरस्वतीनें आपल्या प्रवाहाबरोबर वसिष्ठाला विश्वामित्रासमोर आणून उभे केले. त्याला पाहून विश्वामित्र शरप्रहार करणार, इतक्यांत ब्रह्महत्या होईल या भितीने सरस्वतीनें वसिष्ठाला दूर नेले. तेव्हां आपणास सरस्वतीनें फसविलें असे पाहून विश्वामित्रानें शाप देऊन सरस्वतींला रुधिरमय केले. तें तिचें रक्तरूपी जल पिऊन राक्षस उन्मत्त झाले, आणि जवळच्या तापतांना त्रास देऊ लागले. पुढे कांही दूरचें तापस तीर्थयात्रा करीत तेथे आले असतां, सरस्वतीची ही अवस्था पाहून त्यानी शिवाला प्रसन्न करुन तिची शापापासून मुक्तता करविली. नंतर ते राक्षसही तीत स्नान केल्यामुळें उद्धरून गेलें, इद्रानेहि तेंथे स्नान करून ब्रह्महत्येपासून तो मुक्त झाला.

## अरुणादि तीर्थांचे माहात्म्य

एकदां इंद्र दैत्यावर कोपल्यामुळे नमुचि नांवाचा दैत्य भयानें सूर्य किरणात जाऊन लपला. तेव्हां इंद्राने त्याला असें आश्वासन दिलें, की,-' मी तुला रात्र अथवा दिवस अशा कोणत्याही कालीं मारणार नाहीं. तसेंच शुष्क अथवा ओल्या अशाही पदार्थानें मारणार नाहीं.' हें ऐकून नमुचि सूर्यकिरणांतून बाहेर पडला, तेव्हां इंद्रानें संधिप्रकाशांत त्याला पाण्याच्या बुडबुड्यानें ठार केलें. परंतु त्याबरोबर नमुचीचें तुटलेले मस्तक मागें लागलें. तेव्हां ब्रह्मदेवाच्या सांगण्यावरून तो या अरुणसरस्वतीवर स्नान करून ब्रह्महत्येच्या पापापासून मुक्त झाला. या अरुण तीर्थावर स्नान करून बलराम पुढें जेथें सोमानें अत्रीला (ऋत्विज) करून यज्ञ केला, तें सोमतीर्थ, तैजसतीर्थ, वरुणतीर्थ व जेथें भृगुऋषीच्या शापामुळें शमींत लपलेंला अग्नि प्रकट झाला, तें अग्नितीर्थ, ब्रह्मयोनितीर्थ इत्यादि तीर्थे करून नंतर कुबेरानें तप करून जेथें धनपतिपद मिळविलें, त्या कौबेरतीर्थावर गेला, आणि तेथून पुष्कर तीर्थावर गेला.

## बदरपाचनादि–तीर्थ महिमा

भरद्वाज ऋषि तप करीत असतां एकदां घृताची नामक अप्सरेला पाहून त्याचा वीर्यस्राव झाला. ऋषीनें तें वीर्य द्रोणांत सांठवून ठेविलें, व त्यापासून श्रुतावती नांवाच्या सुंदर कन्येचा जन्म झाला. पुढे ती कन्या

इंद्र पति मिळावा या इच्छेनें तप करूं लागली. तेव्हां तिची परीक्षा पाहण्याकरितां इंद्रानें वशिष्टरूपाने तिच्यापाशी येऊन बोराचे भोजन मागितलें. त्यावेळीं श्रुतावतीने बोरें जमवून अग्नीवर ठेविली. परंतु तिच्याजवळ असलेलीं सर्व काष्ठे संपली, तरी बोरे शिजतना. हे पाहून तिनें आपलें पाय अग्नींत घातले व ती बोरे शिजूं लागली. हे पाहून इंद्रानें संतुष्ट होऊन श्रुतावतीला आपलें खरें स्वरूप दाखविले व इच्छित वर दिला. तेव्हांपासून या श्रुतावतीच्या आश्रमाला ' बदरीपावन तीर्थ ' असें नांव मिळालें. याच ठिकाणीं अरुंधतीचें उग्र तप पाहून शंकरानें प्रसन्न होऊन तिला वर दिला. या बदरीपावनतीर्थावर स्नान करून, इंद्राने जेथें शंभर यज्ञ करून शतक्रतु पदवी मिळविली. ते इंद्रतीर्थ, आणि परशुरामानें एकवीस वेळां निःक्षत्रीय पृथ्वी करून ज्या ठिकाणीं अश्वमेध आणि वाजेपय यज्ञ करून कश्यपऋषीला पृथ्वीदान केलें, तें ' रामतीर्थ ' अशा दोन्ही तीर्थांत बलरामानें तीर्थविधि केला. नंतर तो यामुनतीर्थ, आदित्यतीर्थ, सोमतीर्थ, इत्यादि तीर्थें करून सरस्वतीतिर्थावर गेला. पूर्वी दधीचि ऋषि तप करीत असतां त्याच्या तपाचा भंग करण्यासाठी इंद्रानें अलंबुषा नामक अप्सरा त्याच्याकडे पाठविली. तिला पाहून दधीचीचें वीर्य स्रवलें. तें सरस्वती नदीत टाकून तींत एक सुंदर पुत्र उत्पन्न झाला. नदीनें त्याला ऋषीपाशी आणून दिल्यावर, दधीचीनें त्याचें सारस्वत असें नांव ठेवून त्याला सरस्वतीबरोबर पाठवून दिलें. याच वेळीं देवदानवात युद्ध होऊन देव पळालें व आपली शस्त्रास्त्रें इंद्रासह सर्वांनी दधीचीजवळ आणून ठेविली. इकडे अमरावतीस दैत्य राज्य करूं लागलें, तेव्हां ते शस्त्रें घेऊन जातील म्हणून दधीचीनें मंत्रबलानें त्यांना उदकरूप करून आपल्या उदरांत ठेविलें. त्या ठिकाणीं ती सर्व वज्रमय झाली. हें पाहून इंद्राच्या सांगण्यावरुन देव, ' दधीचीजवळ जाऊन आपलीं शस्त्रें मागूं लागले. तेव्हां कामधेनूच्या मुखानें दधीचीनें आपले प्राण घेऊन आपली अस्थिरूप शस्त्रें त्यांना दिलीं. मग त्यांच्या साह्यानें इंद्रानें दैत्यांचा संहार करून अमरावती परत घेतली. नंतर अमृतपान मंत्राच्या योगानें इंद्रानें दधिचीला जिवत केलें. असें, हे सारस्वततीर्थ करून बलराम वृद्धकन्या नामक तीर्थाजवळ आला. या तीर्थावर कुणीक नांवाच्या ऋषीनें तप केलें, आणि एक मानस-कन्या आपल्यामागें ठेऊन तो स्वर्गांत गेला. पुढें तीं कन्याही पतीची इच्छा न करिता तप करून स्वर्गप्राप्तीची इच्छा करूं

लागली. तेव्हां नारदानें तिला सांगितलें कीं, 'सहस्त्र वर्षें तूं तप केलेंस तरी अविवाहित राहून तुला स्वर्गप्राप्ती होणार नाहीं.' हे ऐकून तिने आपलें अर्धें पुण्य खर्चून गालव ऋषीच्या प्रत्युद्भव नांवाच्या पुत्राला वरिलें. त्यानें तिच्याशी विवाह केल्यावर केवळ एक रात्र मात्र क्रीडा केली, आणि नंतर त्या कन्येनें पतीची आज्ञा घेऊन दुसऱ्या दिवशी देहत्याग केला. तेव्हां तिला स्वर्गप्राप्ति झाली. हें वृद्धकन्यातीर्थं करून सलराम स्यमंतपंचकी (कुरुक्षेत्रांत) आला. या भूमींत कुरुराजाकडे इंद्रानें येऊन त्याला सांगितलें कीं, 'राजा या क्षेत्रांत जे देहत्याग करितील ते खचित ब्रह्मपदाला जातील, व येथें सुवर्णदान केल्यास त्याचें सहस्रपट फल मिळालें.' असो. कुरुक्षेत्र करून बलराम पुढें कारपंचक तीर्थास गेला. या ठिकाणीं त्याला नारदाच्या तोंडून भीष्मादिकांचा युद्धांत संहार झाल्याचें वर्तमान कळले. तेव्हां त्यानें आपल्या बरोबरीच्या सर्व मंडळीस परस्पर द्वारकेस पाठविलें आणि आपण दुर्योधन ज्या डोहांत लपला होता त्या डोहापाशीं आला.

सरस्वतीवाससमा कुतो रतिः सरस्वतीवाससमः कुतो गुणः ।
सरस्वतीमेत्य दिवं गता जनाः स्मरिष्यन्ति नदीं सरस्वतीम् ॥१॥
सरस्वती सर्वनदीषु पुण्या सरस्वती लोकसुखावहा सदा ।
सरस्वतीं प्राप्य जनाः सदुष्कृतः कदा न शोचन्ति परत्र चेह च ॥२॥

---

# अध्याय १० वा



## दुर्योधन वध

या प्रमाणे बलराम तीर्थयात्रा संपवून त्या डोहाजवळ आला, तेव्हां त्याला पाहून दुर्योधनाने कुशल प्रश्न विचारलें, आणि त्याला नमस्कार केला. मग बलराम दुर्योधनाला म्हणाला,—' अरे, जे या रणक्षेत्रांत पडलें ते सर्व उत्तम लोकीं गेले. आहेत.'—या प्रमाणे भाषणें झाल्यावर दुर्योधनानें गदा घेऊन भीमाबरोबर युद्धाची तयारी केली. भीमानें मागील सर्व अपकारांचें स्मरण त्याला दिलें आणि त्याला मारण्याची प्रतिज्ञा करून तोही

पुढें सरसावला. इतक्यांत कृष्ण म्हणाला,—' भीमा, दुर्योधन महाकपटी आहे; त्याबरोबर तूं एकटयानें युद्ध करण्याची प्रतिज्ञा केलीस हें बरें झालें नाहीं. यानें तर तेरा वर्षेपर्यंत लोखंडाच्या पुतळयाशीं लढण्याची संवय केली आहे.'—हें कृष्णाचें बोलणें ऐकन अर्जुनानें भीमाकडे पाहून डाव्या मांडीवर मुष्टिप्रहार केला. तीं खूण लक्षांत ठेवून भीमानें युद्धास सुरुवात केली. दोघेही गदा-युद्धांत प्रवीण असल्यामुळें, बराच वेळ युद्ध झालें तरी कोणी हार जाईना. दुर्योधन अर्जुनानें केलेली खूण जाणून, भीमाचें डाव्या बाजूचें आघात सारखें चुकवीत होता; परंतु शेवटीं भीमानें युक्तीनें गदेचा प्रहार करून, त्याच्या डाव्या मांडीचा चुराडा केला. डाव्या मांडीवर प्रहार होतांच दुर्योधन विव्हल होऊन पडला. अशी ही गदापर्व कथा भारतसंमत आहे; पण पुराणांतरीं ही कथा निराळी आहे. ती अशी :—

## दुर्योधनाची दुसरी कथा

शल्य रणांत पडल्यावर दुर्योधन डोहाकडे पळून गेला. तेथें कृप, अश्वत्थामा वगैरे उरलेले वीर त्याच्याजवळ येऊन दुसऱ्या दिवशीं पुनः युद्ध सुरू करण्याचा विचार ठरवूं लागलें तेव्हां दुर्योधन त्यांना म्हणाला,—' अहो, मी गदायुद्ध केल्यास भीमाला मारीन; पण त्याचें अर्धें शरीर वज्रमय असून तेंच तो नित्य पुढें करितो म्हणून कांहीं अन्य उपाय योजिला पाहिजे.'—हें ऐकून कृपाचार्य म्हणाला,—' दुर्योधना, तुझ्या मातेच्या करतलाला अमृत आहे, व ती महापतीव्रता असल्यामुळें तें तिच्या नेत्रांतही ओथंबलेलें आहे. ती जर एकदां तुजकडे पाहून तुझ्या सर्वांगाला स्पर्श करील, तर तूं सर्वस्वी वज्रदेही होशील. करितां तू नग्न होऊन मातेपुढें जा; आणि आपल्या सर्व शरिराकडे अवलोकन करण्याची विनंति कर.'—हें ऐकून दुर्योधन तत्काल रथांत बसून हस्तिनापुरीं गेला; आणि आपल्या मातेकडे जाऊं लागला हा सर्व प्रकार कृष्णानें जाणून त्यानें माळयाचें रूप घेतलें, व फुलांचा एक चोळणा हातांत घेऊन, तो दुर्योधनाच्या वाटेंत उभा राहिला. दुर्योधनाला नग्न होऊन मातेपुढें जाण्याची लाज वाटूं लागली. इतक्यांत कृष्णानें चोळणा त्याच्या हातीं दिला. तो परिधान करून दुर्योधन गांधारीपुढें जाऊन म्हणाला,—' माते मी सर्व शत्रूंचा संहार करून व विजयी होऊन आलों आहे; तरी माझें सर्व शरीर पाहून त्याला स्पर्श कर.'—गांधारीनें डोळे

सोडून त्याच्याकडे पाहिलें, व त्याच्या शरीरावरून हात फिरविला. पण मोळणा होता त्या भागाला मात्र तिच्या हाताचा स्पर्श झाला नाहीं. नंतर दुर्योधन म्हणाला,--' माते, आतां एकटा भीम उरला आहे. त्याचा संहार करण्यासाठीं मी आतां जातों.' हें ऐकून ती म्हणाली,--' अरेरे, त्याचें तर अर्धे शरीर वज्रमय आहे. दुयोधना तुझें जितकें अंग मीं पाहिलें तितकें वज्रमय होईल; परंतु द्रौपदीच्या व मैत्रेयाच्या शापामुळें जेवढें अंग झांकलेलें होतें, तेवढें मृत्युवश होईल. असो, होणार कांहीं टळत नाहीं.' याप्रमाणें मातेनें सांगितल्यावर दुर्योधन त्वरित कृपाजवळ आला आणि त्यानें त्याला झालेली सर्व हकीकत सांतितली. ती ऐकून कृपास वाईट वाटलें मग कृप परत गेल्यावर दुर्योधन डोहांत शिरला, व पुढें त्याच्या मांडीवर गदाप्रहार करून भीमानें त्याला ठार केलें.

## गांधारीचे सांत्वन

याप्रमाणें दुर्योधन पडल्यावर भीमानें त्याला लाथ मारिली. तें पाहून तें पाहून धर्माला फार वाईट वाटलें; आणि त्याबद्दल त्यानें भीमाची निर्भत्सना केली नंतर त्यानें दुर्योधनाचें सांत्वन केलें व तो पडल्याबद्दल फार विलापही केला. भीमाचें कृत्य अनीतीचें वाटून बलरामालाही राग आला, व तो आपला नांगर घेऊन भीमाच्या अंगावर धावला. परंतु कृष्णानें त्याची समजूत केली. कृष्ण म्हणाला,--' दादा, भीमानें दुर्योधनाच्या मांडीचें चूर्ण करण्याची सभेंत प्रतिज्ञा केली होती. मैत्रेयाचा त्याला शापही होता, तरी आतां भीमावर व्यर्थ क्रोध करूं नको.' पण बलराम म्हणाला,--" भीमानें दुर्योधनाला अधर्मानें मारिल्यामुळें त्याची कपटी म्हणून दुष्कीर्ति होईल. ह्या दुर्योधनानें मात्र युद्धदीक्षि होऊन आत्म्याचें हवन केलें, त्याचें हें अवभृथस्नान त्याला आज घडलें.' असें बोलून तो द्वारकेस निघून गेला. नंतर कृष्णानें भीमाची स्तुति केली, व दुर्योधनाची निंदा केली. त्यावर दुर्योधनही कृष्णाला उलट उत्तरे बोलला. मग पांडवांकडील सर्व वीर संध्याकाळ झाली असें पाहून आपापल्या शिबिरांत गेलें. पांच पांडव मात्र दुर्योधनाचें शिबीर पाहून तेथेंच उतरलें. अर्जुनासह कृष्ण रथांतून उतरल्याबरोबर त्या रथाच्या ध्वजस्थानीं बसलेला मारुति एकाएकीं अदृश्य झाला, आणि रथाचें भस्म झालें. हें पाहूय पांडवांना आश्चर्य वाटलें, आणि त्यांनीं कृष्णाला असें

होण्याचें कारण काय, म्हणून विचारलें. तेव्हां कृष्णानें त्यांना सांगितलें कीं, तो रथ ब्रह्मास्त्रानें पूर्वीच दग्ध झालेला होता; परंतु मी व हनुमान् जोपर्यंत त्यावर होतों. तोंपर्यंत तो तसाच राहिला होता.'–हें ऐकून धर्म त्याला म्हणाला,––' देवा, केवळ तुझ्याच कृपाप्रसादामुळें आमचें कार्य सिद्धीस गेलें.' नंतर कृष्ण पांडवांना म्हणाला,––' मी युद्धाच्या आरंभी असा नवस केला आहे कीं, पांडवांना जय प्राप्त झाल्यास, त्यांना घेऊन मीं ओघवती नदीच्या कांठीं जयंती नांवाची देवी आहे, तेथें रात्रभर येऊन राहीन.'–हें ऐकून पांडव कृष्णाबरोबर जयंतीच्या देवालयांत गेले व तेथें राहिले. तेथें गेल्यावर धर्मानें कृष्णाला हस्तिनापुरीं गांधारीकडे तिची समजूत करण्याकरितां पाठविलें, व सांगितलें कीं, ' देवा, गांधारी महासामर्थ्यवती पतिव्रता आहे, तिच्या पुत्रांचा आम्हीं वध केला, असें तिला कळल्यास ती शाप देऊन भस्म करील. यासाठीं तिची समजूत तुझ्यावांचून दुसऱ्याच्यानें व्हावयाची नाहीं.' धर्माचें भाषण ऐकून कृष्ण हस्तिनापुरास गेला, व चार उपदेशाच्या गोष्टी सांगून त्यानें गांधारीची समजूत घातली.

## अश्वत्थाम्यास सेनापतीत्व

इकडे दुर्योधन धर्माची निंदा करीत श्वासोच्छ्वास टाकीत होता. तो आपल्याशींच बोलूं लागला कीं,––' मी भीष्म द्रोणादिकांच्या मरणास कारण झालों, व शेवटीं पांडवांनीं अधर्मानें मला मारिलें. अहो ! जे माझे कोणी बंधु उरले असतील त्यांनां व माझ्या आईबापांना सांगा कीं, क्षत्रियाला योग्य असेंच मरण दुर्योधनाला आलें,' हे ऐकून अश्वत्थाम्याला फार वाईट वाटलें. मग तो कृप आणि कृतवर्मा यांना घेऊन दुर्योधन पडला होता तथें गेला, आणि त्याच्याजवळ बसून त्याला म्हणाला,––' राजा, या संसारांत चांगलें असें कांहींच नाहीं. तूंच पहा, बरें, सर्व योध्यांसह आज तूं धूळ खात पडला आहेस, असो, पण त्या सर्व वीरांसह तूं स्वर्गास जाशील.'–हें ऐकून दुर्योधनाला वाईट वाटलें, व तो आपण हतभाग्य म्हणून आपली निंदा करून लवकर प्राण जाईल तर बरें, असें म्हणूं लागला. त्यावेळीं अश्वत्थाम्याला गहिंवर येऊन तो म्हणाला,––' राजा, अरे, धृष्टद्युम्नादि सर्व जण आज स्वस्थपणें शिबिरांत घोरत पडले असतील, तर तरी त्यांना मीं तेथें मारून टाकतों.' अश्वत्थाम्यांची ही प्रतिज्ञा ऐकून दुर्योधनाला त्या स्थितीं-

तही बरें वाटलें. त्यानें कृपाचार्यांकडून डोहातून पाणी आणून अश्वत्थाम्याला सेनापतीचा अभिषेक करविला, आणि उरलेलें पाणी त्यानें स्वतः पिऊन टाकले. नंतर ते तिघेही रथांत बसून दूर असलेल्या एका वडाखालीं गेलें, आणि पुढे काय करावयाचे तें ठरवू लागले,

येथे भारताची नऊ पर्वे संपली, व एकादश स्तबकही संपूर्ण झाला. हीं नऊ पर्वे जनमेजयानें एकल्यावर त्या अठरा मृत ब्राह्मणापैकी नऊ जिवंत होऊन बसले, नऊ हात वस्त्र उजळले आणि नाभीपर्यंत कुष्टही नाहीसे झालें.

स्तबक अकरावा संपूर्ण

# स्तबक बारावा.



## अध्याय १ ला.



### मंगलाचरण

हे श्रीअनंता, तुला नमन असो; तूं सर्व चराचराचा कर्ता असून, गुण आणि निर्गुण यांना आधारही तूंच आहेस. तूं परात्पर, निर्विकार, जरामरणरहित असून वेद तुझेंच वर्णन करितात. तूं शुद्धस्वरूप व चराचराचा व्यापक असल्यामुळे तुलाच प्रथम वंदन केलें पाहिजे. भक्तांचे मनोरथ पुरविण्यासाठीं तूंन गजाननाचें रूप घेतलेंस, आणि त्यांचें रक्षण करण्यासाठींच अवतार घेऊन दुष्टांचें शासन करितोस. तुझी स्तुति म्यां पामरानें काय करावी ? तुझें नाम, तुझे गुण, तुझें चरित्र, सर्वच अनंत असून साधुलोक तुझें भक्तिपूर्वक सदैव गायन करीत असतात. ही स्तुति ऐकून गणपतीनें प्रसन्न होऊन ग्रंथनिरूपणांत मी सहाय आहे, अशी खूण दिली. असो; आतां वीणापुस्तकधारिणी अशा ब्रह्मकुमारी सरस्वतीला मी नमस्कार करितों. कृपाकटाक्षानें ती भक्तकाम पूर्ण करिते. कुलदेवता, गुरुदेवता, माता, पिता आणि हरीचे भक्त, यांनाही मी वंदन करितों; आणि आतां द्वादश स्तबकाला आरंभ करितां. अनेक ग्रंथांचें सार काढून मी हा प्राकृत ग्रंथ रचिला आहे, तो श्रोत्यांनीं सावधानपणानें श्रवण करावा.

---

## अध्याय २ रा



### सौप्तिकपर्व—अश्वत्थाम्याचा छापा

वैशंपायन जनमेजयास म्हणाले,—' राजा, दुर्योधन रणांत पडल्याव

कौरवसैन्यांत जे कोणी उरले होते, ते सर्व दीनवदन होऊन दक्षिणदिशेकडे पळून गेले. पण कृप, कृतवर्मा आणि अश्वत्थामा हे मात्र दुर्योधनाला भेटल्यावर झाडाखालीं येऊन तेथें ते निजले. थोड्या वेळानें कृप आणि कृतवर्मा यांना निद्रा लागली. परंतु अश्वत्थामा मात्र क्रोधानें संतप्त झालेला असल्यामुळें सर्पाप्रमाणें फूत्कार टाकीत होता. त्याला कांहीं झोप येईना. इतक्यांत त्या वटावर विश्रांतीसाठीं आलेल्या कावळ्यांना मारण्यासाठीं तीक्ष्ण चंचूचा एक घुबड आला. त्यानें त्या निजलेल्या कावळ्यांपैकीं कित्येकांचे हातपाय मोडले, आणि कित्येकांचे पंख व ग्रीवा तोडून टाकिल्या. याप्रमाणें कावळ्यांचा संहार केल्यावर तो मोठा आनंदित होऊन तेथून निघून गेला. शत्रु निजलेला असतां त्याचा सूड घेण्याचा तो प्रकार पाहून अश्वत्थाम्यानेंही त्याचेंच अनुकरण करण्याचा विचार केला. नंतर आपला बेत कृप आणि कृतवर्मा यांना कळविण्यासाठीं त्यानें त्यांना उठविलें. व दुर्योधनाच्या मरणाबद्दल दुःख प्रगट करून, पांडवांना रात्रीं निजलेले असतांच मारण्याचा आपला निश्चय त्यांना सांगितला. तें ऐकून कृप म्हणाला,–' द्रौणे, तुझी उत्कंठा पाहून मला आनंद वाटतो, परंतु माझेंही म्हणणें थोडें ऐकून घे. अरे, सर्व दैवाचे खेळ आहेत. यासाठीं जे दैवहीन ते दीन, आणि जे दैवसंपन्न तेच खरे समर्थ होत. चांगलें किंवा वाईट कर्म करून आपलें हित किंवा अहित करण्याची बुद्धि तरी दैवामुळेंच होते. दुर्योधनानें बलिष्ठ अशा पांडवांशीं राज्यलोभानें वैर मांडिलें, त्याचें फळ त्याला मिळालें. आपल्या आईबापाचेंही त्यानें ऐकिलें नाहीं, त्याचा हा परिणाम होय.' हें कृपाचें बोलणें ऐकून अश्वत्थाम्याची निराशा झाली, व तो दुःखानें मूर्च्छित पडला, त्याला सावध करून कृप व कृतवर्मा, त्याला चार उपदेशाच्या गोष्टी सांगू लागले. ते म्हणाले,–' द्रौणे, बुद्धि हीच काय ती पुरुषाला खरी शोभा देणारी आहे, व ती कर्मानुसार प्राप्त होत असते. यासाठीं सुज्ञ पुरुष त्याविषयीं खेद न मानतां संतुष्ट असतात. हें ऐकून अश्वत्थाम्यानें उत्तर केलें; ' मामा, मीही तेंच म्हणतों. माझी बुद्धि निद्रित पांडवांना मारण्याविषयींच मला सांगत आहे. ब्रह्मदेवानें सृष्टि उत्पन्न केली, त्या वेळीं त्यानें प्रत्येक वर्णाला दैव आणि कर्म वांटून दिलें. त्यांत ब्राह्मणांना शांतवृत्ति व क्षत्रियांना तेजस्विता, अशा वृत्ति लावून दिल्या. मी ब्राह्मणकुलांत जन्म घेऊन कमनशीबामुळें क्षत्रियधर्मी झालों, त्यामुळें

क्षात्रतेज मला सोडतां येत नाहीं. दिव्य अस्त्रांचा मीं ज्ञाता असून, माझ्या पित्याच्या मरणाबद्दल सूड घेतल्याशिवाय मी कसा राहूं ? मी आतांच पांचालांच्या शिबिरात जाऊन त्याचा संहार करतों, व पित्याचें ऋण फेडून टाकितों. पित्याची गाय सहस्रार्जुनानें चोरल्यामुळें परशुरामानें एकवीस वेळां पृथ्वि निःक्षत्रिय केली, आणि मीं स्वस्थ कसा बसूं ? अश्वत्थाम्याचा निश्चय ऐकून कृप म्हणाला,— ' अश्वत्थामा, तुला तुझ्या विचारापासून निवृत्त करण्यास प्रत्यक्ष इंद्रही समर्थ होणार नाही; पण एवढेंच सांगतो कीं, आपण त्यांचा सकाळी संहार करूं. व त्यांची सर्व शिबिरे जाळून मोठी कीर्ति मिळवूं. तरी प्रातःकाळ होईतो तूं स्वस्थ बैस.–' हे मामांचें भाषण ऐकून अश्वात्थाम्यानें उत्तर केले –' मामा, पुरुषाची उत्कंठा त्याला कधीही स्वस्थ बसूं देणार नाहीं तरी मी आता काय करतो तें तूं स्वस्थपणें पहा मात्र. अरे पित्याच्या वधाचें दुःख माझ्या अंतकरणात रात्रंदिवस जाळीत आहे.तो धृष्टद्युम्न जिवंत आहे तोपर्यंत माझ्यानें स्वस्थ कसें बसवेल?त्याचें रक्षण करण्यास प्रत्यक्ष कृष्णही आता समर्थ होणार नाही,'हे अश्वत्थाम्याचें निर्वाणीचे भाषण ऐकून कृपानें त्याला तसे न करण्याबद्दल पुष्कळ उपदेश केला. ' निद्रीत शत्रूचा वध केल्यास नरकवास मात्र प्राप्त होईल. यासाठी प्रातःकाळीं तें उठल्यावर समरांगणांत त्यांचा वध कर, म्हणजे तुझी कीर्ति त्रैलोक्यात पसरेल.'–असेही त्यानें त्याला पुष्कळ सांगितले; परंतू अश्वत्थाम्याचा निश्चय कांही केल्या ढळला नाही त्यानें पांडवांनी केलेला भीष्मवध, द्रोणवध इत्यादि धर्मविरुद्ध कृत्याचा उल्लेख करून आपला निश्चय अगदी बरोबर आहे असे निक्षून सांगितले, आणि पितृवधाचे दुःख आठवीत तो तसाच आपल्या रथात बसला, व पांडवांच्या शिबीराकडे निघाला. कृप आणि कृतवर्मा हेही मग त्याच्या आग्रहास्तव मोठ्या कष्टानें शस्त्रें घेवून त्याच्याबरोबर चालू लागले. तें पांडवांच्या शिबीरात आल्याबरोबर त्याना तेथे मोठा चमत्कार दिसला, हरिहर त्यावेळीं महाभयंकर विक्राळ असें रुप घेऊन तेथें आलें होतें. त्यांच्या नाकाडोळयातून अग्नीच्या ज्वाळा येत असून, त्याबरोबर अनंत श्रीकृष्णरुपे बाहेर पडत होती तें भयंकर स्वरूप पाहतांच अश्वत्थामा जरा घाबरला. परंतू लवकरच धैर्य धरून तो त्या स्वरूपावर आपली अस्त्रे सोडू लागला परंतु त्या मुर्तीनें सर्व गिळून टाकिली. नंतर अश्वत्थाम्यानें आपली शक्ति व तरवार हींही

त्यावर फेंकिली, पण तीही त्या मूर्तीनें आपल्या उदरांत सांठविली. तेव्हां अश्वत्थामा चकित होऊन पाहूं लागला, तों त्याला जिकडे तिकडे कृष्ण-स्वरूपच दिसूं लागलें. तें पाहून त्याच्या मनाला उद्वेग झाला. तो म्हणाला,– 'मीं आपल्या हितकर्त्यांचा उपदेश न ऐकतां येथें आल्यामुळें. हें संकट मजवर आलें आहे; परंतु येथून आतां परतल्यास अपयश मात्र पदरीं येईल. यासाठीं आतां शंकराला शरण जावें, म्हणजे तोच मला या संकटांतून सोडवील.' असें म्हणून तो लगेच रथाखालीं उतरला; आणि आसनस्थित होऊन शंकराचें ध्यान करूं लागला शंकराची अनेक नामें घेऊन तो त्याची स्तुति करीत असतां, त्याच्या मनांत वैराग्य उत्पन्न होऊं लागलें. मग त्याला आपल्यापुढें सुवर्णाची यज्ञवेदी दिसली. त्या वेदींतून धडाधड ज्वाला निघूं लागल्या व त्यांनीं सर्व आकाश भरून टाकिलें असें दिसलें. कांहीं वेळानें त्या ज्वालांतून हत्ती, घोडे, रथ व नानाप्रकारचे व नानास्वरूपांचे वीर निघूं लागले. ते सर्व शंकराचे गण असून मोठ्या आनंदानें नाचत होते. या सर्व गणांसह शंकर व पार्वती तेथें प्रादुर्भूत झालीं. त्यावेळीं भूतें व पिशाचें नानाप्रकारचीं भयंकर रूपें धरून शिवपार्वती पुढें चालून त्यांची स्तुति करूं लागली. तेव्हां अश्वत्थामा शंकरापुढें उभा राहिला, आणि शंकराची स्तुति करून त्यानें त्याचा कोप शांत केला. शंकर शांत झाल्यावर अश्वत्थामा त्याला म्हणाला,–' चंद्रमौले, मी अंगिरसकुलांत उत्पन्न होऊन आज तुला या देहाचें हवन करीत आहे.' असें म्हणून त्यानें हात वर करून त्या वेदींत उडी टाकिली. हें पाहून शंकर प्रसन्न झाले, आणि त्याला म्हणाले;–द्रौणे, तूं आपल्या भक्तिसामर्थ्यानें आज मला वश केलेंस, तरी आतां पांचालांना मारण्याची जी तुझी इच्छा आहे ती पूर्ण होईल. मीं आधींच त्यांचें आयुष्य नष्ट करून टाकिलें आहे' असें म्हणून शंकरानें अश्वत्थाम्याच्या शरीरांत प्रवेश केला. त्या वेळीं त्याचें तें उग्र रूप पाहून भूतगणही घाबरून पळूं लागले. एवढें झाल्यावर तो पांडवांच्या शिबिरांत शिरला; आणि कृप कृतवर्मा हे बाहेर दरवाज्यापाशीं उभे राहिले. अश्वत्थाम्यानें त्यांना सांगितलें कीं, 'मी आंत जाऊन सर्वांचा संहार करितों, त्यांतून जो कोणी चुकून बाहेर येईल, त्याला तुम्हीं येथें दरवाजाजवळ ठार करा.' असें सांगून तो आंत जाऊन पहातो, तों आंत पांडव नाहींत. असें पाहून तो धृष्टद्युम्नाच्या शिबिरांत शिरला. तेथें धृष्टद्युम्न पुष्पशय्येवर निजला होता.

त्याला अश्वत्थाम्यानें लाथ मारून पलंगाखालीं पाडिलें आणि त्याचे केश धरून त्याला तो मारूं लागला. धृष्टद्युम्नानें त्याची पुष्कळ करुणा भाकिली; परंतु त्याला दया न येतां तो त्याचा वध करून रथांत बसून बाहेर आला. रथाच्या आवाजानें सैन्य जागें होऊन काय प्रकार आहे हें पाहूं लागलें. कोणीएक राक्षस धृष्टद्युम्नाला मारून पळून जात आहे, असें वाटून तें सैन्य त्याच्याबरोबर युद्ध करावयास उभें राहिलें, परंतु अश्वत्थाम्यानें त्यानां आपलें खरें नांव सांगून त्यांजवर आवेशानें चाल केली, तेव्हां तें सैन्य पळूं लागलें, पण तितक्यांत त्यानें युधामन्यूला ठार करून हत्ती, घोडे, उंट, यांचाही संहार केला. याप्रमाणें अनर्थ करून अश्वत्थामा पुनः पांडवांच्या शिबिरांत आला, आणि द्रौपदी आपल्या पांच पुत्रांसह जेथें होती, तेथें जाऊन त्यानें मोठ्यानें सिंहनाद केला. नंतर हातांतील तरवारीनें त्यानें त्या घाबरलेल्या पांचही द्रौपदीपुत्रांना यमसदनीं पाठविलें. जवळ शिखंडी होता त्याचाही वध केला. इतक्यांत विराटाचें सैन्य त्याला आडवें आलें, पण त्याचा व द्रुपदाच्या सैन्याचाही अश्वत्थाम्यानें पूर्ण समाचार घेतला. तेव्हां जिकडे तिकडे हा:हा:कार होऊन लहान मुलें व स्त्रिया दाराबाहेर पळून जाऊं लागलीं; पण तेथें उभे असलेल्या कृप व कृतवर्मा यांनीं त्यांना तेथेंच ठार केलें. त्यांनीं प्राण वांचविण्याविषयीं त्या दोघांची नानाप्रकारें विनवणी केली; परंतु त्यांना मुळींच दया आली नाहीं. सरसकट सर्वांची त्यांनीं कत्तल केली. हा भयंकर अनर्थ पाहून, उरलेले लोक म्हणूं लागले कीं, जी गोष्ट दुर्योधनालाही अशक्य झाली ती या अश्वत्थाम्यानें करून दाखविली ! कारण या अनर्थात पांडवही मेले असें त्यांना वाटलें. परंतु कृष्णाला हें भविष्य आधीच कळून आलें होतें; आणि तेवढ्याकरितांच तो पांडवांना घेऊन अंबिकेच्या देवालयांत गेला होता, हें पूर्वीं सांगितलेंच आहे. असो; असा भयंकर संहार झाल्यामुळें भूत, पिशाच्च व क्रूर प्राणी यांना मोठा आनंद होऊन तीं नाचूं बागडूं लागली. याप्रमाणें रात्र संपल्यावर अश्वत्थाम्यानें आपली रक्तानें भरलेली तरवार धुतली, व आपली प्रतिज्ञा खरीं झाली, असें म्हणून तो स्वतःस धन्य मानूं लागला. रात्रीच्या गर्दींत सात्यकीनें, द्रौपदीला रथांत घालून दूर नेल्यामुळें तीं दोघें मात्र वांचलीं; परंतु बाकीच्या सर्वांची शांति झाली. नंतर अश्वत्थाम्यानें पांचही द्रौपदी-पुत्रांची शिरें कापून घेतलीं, आणि दुर्योधन पडला होता तेथें तो गेला.

# अध्याय ३ रा.



## दुर्योधनाचा मृत्यु

याप्रमाणें पांडवांकडील मंडळीचा रात्रौ संहार करून, अश्वत्थामा, कृप आणि कृतवर्मा हे दुर्योधन पडला होता तेथें आले. त्याच्या भोंवतीं अनेक श्वापदें जमलेलीं पाहून कृपादिकांना फार वाईट वाटलें. मग त्यांनीं दुर्योधनाचें तोंडावरील रक्त धुवून काढिलें आणि ते म्हणाले,–" दुर्योधना, अकरा अक्षौहिणी सैन्याचा तू स्वामी असतां, तुझी अशी* दशा व्हावी काय ? परंतु शेवटी तुला क्षत्रियाला उचित अशीच गती प्राप्त झाली, एवढेंच भाग्य! ते अधम पांडव आतां जगून लोकांना काय सांगणार ? ' आम्हीं आपल्या सर्व बंधूंचा संहार केला हेंच ना ! दुर्योधना, तुम्हीं शंभर बंधु मात्र धन्य आहांत. तुम्हांला स्वर्ग–प्राप्ति झाली; परंतु आम्ही मात्र हतभागी म्हणून अद्यापि जीवंत आहोंत. आम्हांला टाकून तुम्हींच मात्र सैन्यासह स्वर्गास जातां ! आतां आम्हीं तुझ्याशिवाय कसे दिवस काढावे ?' याप्रमाणें त्यानीं भाषण करून शेवटीं दुर्योधनाला सांगितलें कीं, आम्हीं धृष्टद्युम्नादि सर्वांचा वध करून, पांडवांचीं शिबिरें जाळून टाकिलीं. दुर्योधना, हें वर्तमान तूं स्वर्गी गेल्यावर भीष्म–द्रोणादिकांस सांग.

## पुराणांतील दुसरी कथा

वैशंपायन म्हणतात,–राजा, पण दुसऱ्या पुराणांत असें म्हटलें आहे कीं, अश्वत्थाम्यानें रात्रीं केलेला पराक्रम दुर्योधनाला सांगून, असें म्हटलें कीं, ' मीं पांडवांनाहीं मारून त्यांचीं शिरें तुला दाखवावयास आणिलीं आहेत. ' हें ऐकून दुर्योधनानें भीमाचें शिर पहावयास मागितलें. तेव्हां अश्वत्थाम्यानें त्याला भीमाच्या पुत्राचें शिर काढून दाखविलें. दुर्योधनानें तें घेऊन, जमिनीवर आपटल्याबरोबर त्याचें पीठ झालें. तें पाहून त्याला उद्वेग झाला; आणि तो अश्वत्थाम्याला म्हणाला,–' अरे, तूं अगदीं असत्य बोललास हें भीम–पुत्राचें शिर आहे. भीम लहान असतांना एकदां कुंतीच्या

हातून तो दगडावर पडला असतां, दगडाचें चूर्ण होऊन गेलें होतें. तुम्ही पाडवाच्या निरपराधी मुलांना मात्र व्यर्थं मारिलें. तुम्हाला पांडव सापडलेच नाहींत.' हें दुर्योधनाचे रागाचें भाषण ऐकून अश्वत्थाम्यानें त्याची समजूत करून त्याला म्हटलें,-'कृष्णानें कपट करून पांडवांना वांचविलें पण त्यांच्याशिवाय इतर सर्वांचा नाश आम्ही केल्यामुळें, आतां दोन्ही सैन्य मिळून, अवघे दहा वीर मात्र जिवंत राहिले आहेत.'-हें ऐकून मात्र दुर्योधनाला संतोष झाला; आणि तो म्हणाला,-'भीष्म द्रोणादिकानांही जें करितां आले नाही, ते माझें प्रिय तुम्ही केलेंत, तुमचें कल्याण असो. आतां तुमची भेट पुनः स्वर्गांत होईल.'- इतकें दुर्योधन बोलत आहे, तोंच त्याचा घुटमळत राहिलेला प्राण देहाला सोडून गेला व त्याचें शरीर स्तब्ध झालें. इतक्यांत स्वर्गातून विमान आलें, आणि कृपादिकांच्या समक्ष देवदूतांनीं दुर्योधनाला स्वर्गीं नेलें.

## द्रौपदीचा पुत्रशोक

दुर्योधनाची वार्ता ऐकून धृतराष्ट्राचा शोक अनावर झाला. इकडे हें वर्तमान धृष्टद्युम्नाच्या सारथ्यानें धर्मादिकांना येऊन सांगितले, त्या वेळी धर्माचा धीर सुटला, व तो मूर्च्छित होऊन जमिनीवर पडला. इतरहीं पांडव शोक करूं लागलें. ते म्हणाले,-'आमच्या जयाच्या शेवटी असा विपरींत परिणाम होऊन आमचें जिणें व्यर्थ झाले. आता द्रौपदी जिवंत असेल तर ती काय करील? किंवा त्या शिबीरांबरोबर जळून गेली असेल, तर त्या वेळीं तिची काय स्थिती झालीं असेंल? ती जिवंत असल्यास तिचे दुःख तरी आम्ही कोणत्या उपायानें दूर करावे?-याप्रमाणें त्यांनी विलाप केला, व नकुलाला द्रौपदीचा शोध करावयास पाठविले. धर्म सावध होऊन म्हणाला,- 'नकुला लवकर जा; आणि द्रौपदीचा शोध कर. ती जिवंत किंवा मृत जशी असेल तशी तिला इकडे लवकर घेऊन ये. त्या राजसेला मला एकदां डोळे भरून पाहू दे.'-धर्मांचे आज्ञेप्रमाणें नकुल रथात बसून तसाच निघाला; आणि आपल्या शिबिराजवळ आला. तेथे आल्यावर तो सर्व प्रकार पाहून त्याचा शोक त्याला आवरेनासा झाला; परंतु धीर धरून तो पुढे गेला; एक शिबिर जळल्याशिवाय राहिले होते. त्यांत द्रौपदी दुःखीत होऊन पडलेली त्याला दिसली. तिला पाहून तो मोठ्यानें रडू लागला, आणि दुःखानें मूर्च्छित पडला

मग त्याच्या सेवकानीं त्याला सावध केलें, आणि द्रौपदीजवळ नेले. सर्वांचा नाश झालेला पाहुन द्रौपदीचीं अवस्था मोठी वाईट झाली. नकुलानें तिला त्वरित आपल्या रथावर घेऊन धर्माकडे नेले. तेथें आल्यावर पुनः तिला हुंदका आला, परंतू भीमानें तिचें सांत्वन केले. ती म्हणाली,–' धर्मा, आतां आपला सर्वनाश झाला आहे, आतां राज्य तरी काय करावयाचे? राज्याचा त्याग करून आपण सर्वजण वनांत जाऊ. सर्वस्वाचा नाश झाल्यानंतर यापुढे राज्य भोगण्याचीं तुझी इच्छा असेल तर तुझे हृदय फारच कठोर आहे असे म्हटले पाहिजे. त्या दुष्ट अश्वत्थामानें सुकुमार बालके पशुप्रमाणे मारिली. धर्मा, आतां विष खाऊन किंवा पाश घेऊन मी प्राणत्याग करणार! द्रौपदीचा विलाप ऐकून धर्म तिची समजूत करण्यासाठीं म्हणाला,– 'द्रौपदी, आपलें सर्व पुत्र व बंधु युद्धांत मरण पावल्यामुळें, त्याविषयीं शोक करणें तुझ्यासारख्या समजूतदार व पतिव्रता स्त्रीला योग्य नाही. त्यांनीं क्षात्रधर्माप्रमाणें वागून स्वर्गप्राप्ति करून घेतली आहे. अश्वत्थामा सर्वांचा घात करुन पळून गेला आहे, तेव्हां त्याला कसे मारावयाचे? शिवाय तो सापडला तरी गुरुपुत्र असल्यामुळे त्याचा वध करणें उचित नव्हे. यास्तव तुझा शोक दूर करण्याचा उपाय काय करावा, ते तूंच सांग. ' द्रौपदीनें उत्तर दिलें,–' महाराज, आपण म्हणतां त्याप्रमाणें त्याचा वध करणें इष्ट नसेल तर त्याच्या मस्तकांत मणि आहे. तो आणून माझ्या मस्तकावर बांधा म्हणजे मी वाचेन. एरव्ही हा देह मी ठेवणार नाही. '– द्रौपदीचे हें शब्द ऐकून धर्माला मोठीच चिंता उत्पन्न झाली. तेव्हां द्रौपदी संतापून भीमाला म्हणालीं,' भीमा, माझे रक्षण करण्यास तूंच योग्य आहेस, तरी त्वरीत जाऊन अश्वत्थाम्याला पकडून त्याच्या मस्त-कावरील मणि घेऊन ये;'–द्रौपदीच्या शब्दाबरोबर भीम रथात बसला; आणि नकुलाला सारथी करून शस्त्रे घेऊन वेगानें अश्वत्थाम्याच्या शोधार्थ निघाला. तो आपल्या जळक्या शिबिरापाशी आला, तेव्हां अश्वत्थामा रथात बसून पळून जात असलेला त्याला दिसला. त्याबरोबर भीमानें रथ वाऱ्यासारखा त्याच्यामागे सोडला.

## भीम व अश्वत्थामा यांचे युद्ध.

भीम गेल्यावर कृष्ण धर्मास म्हणाला,–' धर्मा, भीम गेला खरा परंतू अश्वत्थाम्याला तो पुरा पडणार नाही. पूर्वी जेव्हां अर्जुनानें द्रोणापासून

ब्रह्मास्त्र देऊन अगदी निर्वाणीच्या वेळीं मात्र त्याचा उपयोग करावयास त्याला सांगितलें: परंतु आपला पुत्र दुराचारी असून सन्मार्गानें राहाणार नाही असें त्याला वाटलें· पुढे तुम्ही वनांत गेल्यावर एकदां अश्वत्थामा द्वारकेस मजकडे आला आणि मला भेटून म्हणाला कीं, ' मजपाशीं पित्यापासून प्राप्त झालेलें ब्रह्मास्त्र आहे. तशीच दुसरीहीं इषिकादि अस्त्रे मजजवळ आहेत, तरी तूं तें ब्रह्मशिरास्त्र घेऊन तुझें सुदर्शनचक्र मला दे· '–तेव्हां मी म्हटलें,–" द्रौणे हें माझें चक्र देव, दैत्य व गंधर्व यानांही उचलावयाचे नाही, मोझ्यासारखा जो कोणी झुंझार वीर असेल त्याला मात्र माझी आयुधें उचलतील. तुझी इच्छाच असेल तर तुला तें देतो. '–असें म्हणून तें मी त्याच्यापुढें ठेविलें. तेव्हा अश्वत्थामा डाव्या हातानेंच तें उचलू लागला; पण उचलेना म्हणून मग उजवा हात पुढे केला. परंतु कांहीं केल्या सुदर्शन त्याला उचलेना. मग त्याला म्हटलें,–' अरें, अर्जुन मला एवढा प्रिय असतां त्यानेंही हें सुदर्शन मागितलें नाहीं. शंकराला प्रसन्न करून त्यानें पशुपतास्त्र मिळविलें, परंतु सुदर्शनाची त्यानें कधीं इच्छा धरिली नाहीं अश्वत्थाम्या, अरे माझा प्रत्यक्ष ज्येष्ठपुत्र प्रद्युम्न व बंधु बलराम यांनींही या सुदर्शनाची इच्छा केली नाहीं, आणि तुलाच अभिमान कां उत्पन्न झाला ?' हें ऐकून अश्वत्थामा मला म्हणाला,–' कृष्णा, मी सर्वांना अजिंक्य व्हावें, या हेतूनें तें तुजजवळ मागितलें, परंतु मी हतभाग्य म्हणून ते मला प्राप्त झालें नाहीं. तरी आतां कृपा करून कल्याणप्रद असा आशीर्वाद मला दे.'–त्याप्रमाणें मी त्याला आश्वासन देऊन आशीर्वाद दिला, व तो अश्व व रत्नें मला भेट म्हणून देऊन निघून गेला. धर्मा, याप्रमाणें अश्वत्थाम्याची हकीकत असून तो ब्रह्मशिरास्त्र जाणतो आहे; यास्तव तो भीमाला कधींही आवरणार नाही. तरीं अर्जुनाला घेऊन भीमाच्या रक्षणासाठी मला गेलें पाहिजे–असें सांगून कृष्णानें लगेच रथ तयार केला आणि भीमाच्या पाठोपाठ तो अर्जुनासह निघाला. गंगेचे तीरावर ते आले, तेथें भीम व अश्वत्थामा युद्धास तयार झालेले त्यांना दिसले. कृष्णार्जुनांना पाहतांच अश्वत्थामा मनांत घाबरला, आणि लगेच त्यानें इषिकास्त्राचा त्यांच्यावर प्रयोग केला. तें पाहून कृष्णानें अर्जुनाला ब्रह्मास्त्र सोडून भीमाचें रक्षण करावयास सांगितलें. त्याप्रमाणें अर्जुनानें रथाखाली उतरून द्रोणगुरुचें

स्मरण केलें आणि ब्रह्मास्त्र सोडून त्याला विनति केली कीं, तूं आमच्या शत्रूंचा मात्र वध कर. अर्जुनाच्या हातून तें ब्रह्मास्त्र सुटल्याबरोबर एकदम इषिकास्त्राला जाऊन भिडलें, आणि दोघांचे परस्परांवर आघात सुरू झाले.

# अध्याय ४ था



## अश्वत्थाम्याचा पराजय

मागील अध्यायांत सांगितल्याप्रमाणें अश्वत्थाम्याच्या आणि अर्जुनाच्या अस्त्रांनीं पृथ्वी कापूं लागली असतां, तेथील ऋषींना मोठी काळजी पडली, व नारद आणि व्यास हे त्या दोघांनांही आपआपलीं अस्त्रें आवरण्यास सांगूं लागले. कृष्णानेंही तसेंच सांगितलें. तेंव्हां त्याच्या सांगण्यावरून अर्जुनानें आपलें ब्रह्मास्त्र आवरून घेतलें; परंतु अश्वत्थाम्याला आपलें इषिकास्त्र आवरतां येईना. तेंव्हां तो खजिल होऊन म्हणाला,—'भीमाच्या भयानें हें अस्त्र सोडिलें; पण तें आतां मला आवरत नाहीं.' तेंव्हां व्यासानें त्याला सांगितलें कीं, ब्राह्मणसंहार होईल असें जाणून अर्जुनानें आपलें अस्त्र मागें घेतलें; परंतु तूं क्षत्रिय धर्माचें आचरण करीत असता मरणाला भ्यालास म्हणून अस्त्रावर तुझें स्वामित्व चालत नाहीं. तूं धर्मज्ञ अशा पांडवांचा घात करूं पाहत आहेस, पण तें तुझ्यानें कधींही होणार नाहीं. तरी आतांपासून तूं त्यांचा द्वेष करण्याचें सोडून दे, आणि आपल्या मस्तकांतील मणि त्यांच्या स्वाधीन कर, म्हणजे अर्जुन तुझ्या अस्त्राला अवरून तुझेंही रक्षण करील' व्यासाचें बोलणें एकून अश्वत्थामा म्हणाला, 'अहो, पांडवांना कौरवांचें सर्व राज्य आतां प्राप्त झालें आहे. त्यांतील रत्नांहून हा माझा मणि कांहीं मूल्यवान् नाहीं. शिवाय तो मला प्रिय असून त्याच्यामुळें मला क्षुधा, तृषा आणि शस्त्रास्त्रें यांची बाधा होत नाहीं. यासाठीं प्राणांतीही मी हा त्यांना देणार नाहीं आणखी दुसरी अस्त्रें सोडून मी पांडवांचा घात करीन, व त्यांच्या स्त्रियांच्या उदरांत असलेल्या गर्भांचाही संहार करीन, पण मला तीं अस्त्रें आवरण्याचें मात्र सामर्थ्य नाहीं.' त्यावर व्यास म्हणाला,– 'द्रौणे, असला अविचार करूं नकोस. श्रीकृष्ण पांडवांचा सखा असल्यामुळे, सर्व गोष्टीं

करण्यास ते समर्थ आहेत. तू त्यांना मणि दिल्यास तुझे आजपर्यंतचें अपराध विसरून ते तुझें रक्षण करतील.' व्यासानें असें सांगितलें तरी अश्वत्थाम्यानें तिकडे दुर्लक्ष करून 'पांडव स्त्रियाचें गर्भपात होवोत.' असें म्हणून त्यानें अस्त्रें सोडिली. हें पाहून कृष्ण म्हणाला,–' अश्वत्थाम्या, अरे अर्जुनाची स्नुषा जी उत्तरा तिच्या उदरांत गर्भ आहे; पण त्याला ऋषीनीं ' अनेक वर्षे राज्य करशील ' असा वर दिला आहे. त्याचा तूं काय नाश करणार ? व्यर्थ अभिमान धरूं नकोस, व अस्त्रें आवरून आपले प्राण वांचव.' यावर अश्वत्थाम्यानें उत्तर दिले,' अरे तुझ्या पक्षपातानें असें काय होणार आहे ? माझें वचन मुळीच अन्यथा व्हावयाचें नाहीं. उत्तरेचा गर्भ पडलाच पाहिजे, त्याला तू कसा वाचविशील तें पहातो.' हें ऐकून कृष्णालाही अमळ ईर्षा येऊन तो म्हणाला,–' अरे मूर्खा, तुझ्या अस्त्राच्या योगानें गर्भ पडेल खरा, परंतु मी त्याला जिवंत करून दीर्घायु करीन, व तूं मात्र बालहत्येचा दोषी होशील ? सर्व लोक तुझी निंदा करितील, आणि या पापाचें फळ म्हणून तुला पृथ्वीवर पिशाचाप्रमाणें भटकावें लागेल. तुझें सर्व शरीर व्याधिग्रस्त होऊन त्यांतून पू आणि लस वाहून तुला कोणी जवळ उभाही करणार नाहीं उत्तरेचा पुत्र वांचून कृपाचार्यांपासून उत्तम शस्त्रास्त्रविद्या संपादन करील आणि नीतीनें पृथ्वीचें पालन करील. त्याला तूं अगदीं जाळून टाकलेंस, तरीहि मी पुनः जिवंत करीन.' कृष्णानें असें सांगितल्यावर व्यासानेंही अश्वत्थाम्याला शाप दिला. कीं,—' तुझा सर्वत्र अपमान होईल.'–अशा प्रकारें दोघांनीं शाप दिल्यावर अश्वत्थाम्यानें तो मणि पांडवांनां दिला, आणि गंगेवर स्नान करून तो भयंकर अशा अरण्यांत निघून गेला.

अश्वत्थामा गेल्यावर मणि घेऊन व्यास आणि नारद यांसह पांडव द्रौपदीकडे आले. मग धर्माच्या आज्ञेवरून भीमसेनानें तो मणि द्रौपदीला देऊन म्हटलें,–' तुझ्या पुत्रांचा वध करणाऱ्याचा पराभव करून आम्हीं मणि आणला आहे, मात्र तो गुरुपुत्र असल्यामुळें त्याला सोडून दिलें. आतां तो रानांत जाऊन पिशाचाप्रमाणें भटकत आहे,'–हें ऐकून द्रौपदीला समाधान वाटलें, आणि ती म्हणाली,––' आतां मात्र तुम्हीं सर्व उसनें फेडिले. हा मणि आतां धर्म महाराजांच्या मस्तकावर बांधा.'–त्याप्रमाणें केल्यावर धर्म नवीन उगवलेल्या चंद्राप्रमाणें प्रफुल्लित दिसू लागला. नंतर द्रौपदीनें

हर्षभरित होऊन पांडवांवरून पंचारती ओवाळली. पुढें द्रौपदीनें विचारल्या-वरून कृष्णानें तिला हा मणि अश्वत्थाम्यापासून कसा घेतला, ती सविस्तर हकीकत सांगितली.

## या कथेविषयीं पुराणांतरीचें मत

निद्रित असलेल्या पांडववीरांना मारल्यावर अश्वत्थामा दुर्योधनाकडे आला. व त्यानें बरोबर आणलेलीं पांडव पुत्रांचीं शीरें दुर्योधनापुढें ठेविलीं ती पाहून दुर्योधन म्हणाला,—'अरे, पांडवांच्या लेकरांना तूं मारिलेंस. आतां ते येथें येऊन तुमचा संहार करतील.'–हें ऐकून अश्वत्थामा घाबरला, व शीरें तेथेंच टाकून रानांत पळत सुटला. इकडे सात्यकीनें त्या शिबिरांतून निसटून जाऊन, सर्व वृत्तांत पांडवांना सांगितल्यावर, अर्जुन व कृष्ण दुर्योधन मरून पडला होता तेथें त्वरित आले. तेथें अश्वत्थाम्याच्या रथाचीं चक्रें लागलेलीं पाहून ते त्या मार्गानें आपला रथ नेऊं लागले. थोड्याच वेळानें अश्वत्थाम्याचें घोडे थकल्यामुळें तो एका झाडाखालीं थांबला; इतक्यांत कृष्णार्जुनांचा रथही तेथें येऊन धडकला. त्यांना पाहिल्याबरोबर अश्वत्था-म्यानें ब्रह्मास्त्र सोडलें. त्याबरोबर तो वृक्ष जळून तेथील सर्व प्राण्यांचा नाश झाला. असा प्रकार पहातांच व कृष्णाच्या सांगण्यावरून अर्जुनानेंही अग्नि-बाण सोडला आणि ब्रह्मास्त्राचें निवारण केलें, व तो अश्वत्थाम्याला मारा-वयास धावला; परंतु कृष्णानें त्याचें निवारण करून त्याला सांगितलें:—'गुरुपुत्र असल्यामुळें वध्य नाहीं. तरी आपण याला बांधून द्रौपदीकडे नेऊं आणि ती सांगेल तसें करूं.'–त्याप्रमाणें अश्वत्थाम्याला रथाशीं बांधून ते द्रौपदीकडे आले व 'याचें आतां काय करूं' असें असें त्यांनीं तिला विचा-रिलें. तेव्हां तिला त्याची दया येऊन ती म्हणाली,—'मत्त, निजलेली स्त्री, बालक, ब्राह्मण आणि गुरुपुत्र यांचा घात करणें उचित नाहीं. तरी याला सोडून द्या. हा आपल्या कृतकर्मांचीं फळें आपणच भोगील.'–द्रौपदीचें भाषण ऐकून पांडवांनीं अश्वत्थाम्याचा अपमान मात्र करून त्याला सोडून दिलें असे पुराणांतरी सांगितलें आहे.

नंतर धर्माला जिज्ञासा उत्पन्न होऊन त्यानें कृष्णाला विचारलें कीं,—आमचें सर्व पुत्र व धृष्टद्युम्नादि वीर एकट्या अश्वत्थाम्यानें मारिलें, एवढें

बळ त्याला कोठून आलें ? तेव्हां कृष्णानें उत्तर केलें,--' धर्मा, अश्वत्थामा शिबिरांत प्रवेश करते वेळीं भूतगणांना पाहुन घाबरला होता. पण लगेच त्यानें रुद्राला प्रसन्न केल्यामुळें त्याच्या अंगात रुद्रशक्ति प्रकट झाली. वास्तविक सर्वांना रुद्रानेंच मारिलें आहे. अश्वत्थामा केवळ निमित्त मात्र झाला.' असें सांगून कृष्ण म्हणाले,--' असो, आतां जे मृत्यु पावले आहेत. त्या सर्वांची तूं उत्तरक्रिया कर.'

---

# अध्याय ५ वा



## स्त्रीपर्वकथा--धृतराष्ट्र व्यास-संवाद

दुर्योधनासह आपले शंभरही पुत्र मरण पावले, असें जेव्हां धृतराष्ट्राला समजलें, त्या वेळीं तो-शाखा तुटल्यानें वृक्ष पडावा, त्या प्रमाणें-धाडकन् जमिनीवर पडला. तेव्हां संजय त्याची समजूत करण्यासाठीं म्हणाला,--' राजा, आतां व्यर्थ शोक करून काय फळ ? दुर्योधनाच्या अकरा अक्षौहिणींबरोबर पांडवांचेंही सात अक्षौहिणी सैन्य नाश पावलें आहे तरी आतां व्यर्थ शोक न करितां मृतांची उत्तरक्रिया करणेंच तुला उचित आहे.'-हें ऐकून धृतराष्ट्राला अधिकच वाईट वाटलें. तो आपली निंदा करून घेऊन म्हणाला,--' मीं मोहानें व्याप्त होऊन नारद, व्यास, भीष्म, कृष्ण, इत्यादिकांचा हितोपदेश ऐकिला नाहीं. मी मोठा हतभागी म्हणूनच पांडवांशीं वैर करून भीष्म-द्रोणदिकांच्या वधाला कारण झालो.' याप्रमाणें धृतराष्ट्र शोक करीत असतां, संजय त्याला पुनः म्हणाला,--' राजा, आतां तूं शोक सोडून ऋषींनीं सांगितलेल्या मार्गाचें अवलंबन कर. दुर्योधनानें तारुण्याच्या भरांत दुःशासन, शकुनी, कर्ण इत्यादिकांबरोबर हट्टास पेटून वृद्धांचें व नारद, व्यास, आदिकरून सुज्ञांचें ऐकिलें नाहीं, व त्यामुळें तो तुझ्या म्हातारपणी तुझ्या दुःखाला कारण झाला, त्याबद्दल आतां शोक करून काय फायदा ? अरे, हा संसार केवळ स्वप्नासारखा आहे. ज्याप्रमाणें अग्नींतून ठिणग्या बाहेर पडून विझतात, त्याप्रमाणें तुझे

पुत्र-बंधु आदिकरून उत्पन्न होऊन नष्ट झाले. रडून काय फळ.' याप्रमाणें संजय त्याला समाधानाच्या गोष्टी सांगत आहे. तो विदूरही तेथें आला, आणि धृतराष्ट्राला बोध करूं लागला तो म्हणाला,-' धृतराष्ट्रा, या जगांत स्थावरजंगमापैकीं मरण हें कोणालाच चुकलें नाहीं. हें जग मोठें विचित्र आहे. यास्तव यांत आत्मसाधनाशिवाय दुसरा सुखाचा मार्ग नाहीं. दुसरें असें कीं, तुझे पुत्र युद्धांत मरण पावले आहेत, यास्तव ते जिवंतच समजले पाहिजेत. युद्धांत जो जगतो तोच खरोखर मृतसमान होय. तुझ्या पुत्रांनीं युद्धहोमांत आपली आहुती देऊन स्वर्ग मिळविला आहे. त्यांच्याविषयीं शोक करूं नको. काल हा सर्वांनाच अप्रिय आहे. त्यांत प्रतिदिनीं हर्ष, शोक यांचीं सहस्रावधि कारणें अज्ञानालाच दिसत असतात. परंतु सूज्ञ पुरुष त्याविषयीं कधीं खंत बाळगीत नाहीं. तूंही सूज्ञ आहेस, तुला फार काय सांगावें ? तरी आतां हा निष्कारण मोह टाकून आत्मतत्त्वाचा विचार कर. कर्मानुसार सुख किंवा दुःख प्राप्त होतें. आपल्या कर्माप्रमाणें आपणच आपले शत्रु किंवा मित्र होतों.' हें विदुराचें भाषण ऐकून धृतराष्ट्राचा शोक दूर झाला व तो विदुराला म्हणाला,-' हे बंधो ! या इष्टानिष्ट कर्मफलापासून मुक्त कसें व्हावें तें आतां मला सांग.' हें ऐकून विदूर म्हणाला,-' धृतराष्ट्रा, पुरुष, वस्त्र जुनें झालें म्हणजे तें टाकून जसें नवें घेतो, त्याप्रमाणें प्राणी सुखदुःखाच्या उपभोगासाठीं नवे नवे देहही धारण करितो. त्यांत कालमानाप्रमाणें आणि आपल्या कर्माप्रमाणें यौवन, वृद्धत्व, जरा, मृत्यु आणि इतर अवस्था व भोग भोगितो. यासाठीं जो सत्यधर्मानें वागून सत्कर्मे कोणतीं आणि असत्कर्में कोणती हें जाणून आचरण करितो, त्याला इष्ट अशी परम गति प्राप्त होते; नाहीं तर या संसारामध्यें नेहमीं आपत्तीच भोगाव्या लागतात. प्राणी पूर्वकर्मास्तव दहा महिनेपर्यंत गर्भवास कंठून नंतर अधोमुख आणि ऊर्ध्वपाद असा योनिद्वारा जन्मास येतो. नंतर बालपणांत मलमूत्रांत पडून रहातो, तारुण्यांत अनेक कुकर्मे करितो, आणि वृद्धपणीं त्याला विषयाविषयीं आसक्ति उत्पन्न होते. या स्थितीपासून जो सुटेल त्यालाच कैवल्यपदाची प्राप्ति होते. एरवीं अधोगति ठेवलेलीच आहे. म्हणून, हे धृतराष्ट्रा, जो पुरुष संसारात शुद्धाचरणानें वागून व्यसनापासून अलिप्त असतो, तोच मुक्त होतो. तरी तूं आतां शोकाचा त्याग करून त्या मोक्षमार्गाच्या पायरीचें ज्ञान करून घे. आतां तुला कर्मापासून सुटण्याचा

उपाय सांगतों. ' एका वनांत एक ब्राह्मण फिरत असतां त्याला व्याघ्रादिकांनीं घेरलें, त्यावेळीं घाबरल्यामुळें त्याच्या अंगाला घाम आला, व तो पळूं लागला, जातां जातां त्याला एका मोठ्या वृक्षाखाली एक अत्यंत सुंदर अशी स्त्री दिसली. इतक्यांत पांच पांच फणांचे सर्प त्याच्या भोंवतीं जमले. त्यांना पाहून तो ब्राह्मण भिऊन पळूं लागला असतां एका विहिरींत पडला. परंतु इतक्यांत विहिरीच्या काठांशींच वेल होती. ती त्याच्या हाताला लागल्यामुळें तिला धरून तो तसाच तेथें राहिला. थोड्या वेळानें तेथें एक मोठा मदोन्मत्त हत्ती आला. त्याला पाहतांच ब्राह्मणाला कांपरें भरलें आणि हातांतील वेल सुटून तो पाण्यांत पडला, व बुडून मेला. धृतराष्ट्रा, तो पाण्यांत पडला त्यावेळीं जर त्याला पोहतां आलें असतें तर मात्र तो खचित वांचला असतां. '

ही चमत्कारिक कथा ऐकून धृतराष्ट्र म्हणाला,–' विदुरा, या गोष्टींतील गुढार्थ मला नीट समजाऊन सांग. मला कळला नाहीं. '—तेव्हां विदुरानें सांगितलें, ' एक ब्राह्मण म्हणजे जीव व गहन अरण्य म्हणजे हा संसार होय. प्राण्याला या संसारांत जीं गर्भदुःखें भोगावी लागतात, तींच सिंह, व्याघ्र इत्यादिकांच्या ठिकाणीं कल्पिली आहेत. वृक्ष म्हणजे हें आपलें शरीर असून त्याखाली दिसणारी सुंदर स्त्री म्हणजे माया होय. पांच फणावाले सर्प जे तुला सांगितले ते कामक्रोधादि शत्रू होत. त्यांच्या भीतीनें जीव चितारूपीं विहिरींत पडला. परंतु जीविताशारूपी वेलींच्या आधारावर तो कांहीं वेळ अडकून राहिला. शेवटी कालरूपी मदोन्मत्त हत्तीला पाहून तो कांपूं लागल्यामुळें, जीविताशा ( वल्ली ) हातांतून सुटली व कालानें त्याचा ग्रास केला. गुरूपदेशरूपी पोहण्याची विद्या हाच एक रक्षणाचा उपाय. तात्पर्य, ज्ञानवानच कालाचें अतिक्रमण करूं शकतो.

' धृतराष्ट्रा, ज्याप्रमाणें दोघे वाटसरू वाटेनें चालतां चालतां त्यांतील पायीं चालणारा थकून मध्येंच बसतो, व रथांत बसलेला आपल्या घरीं त्वरीत जातो, त्याप्रमाणें संसारमार्गांत अज्ञानी मनुष्य तसाच रहातो आणि ज्ञानी–साधु मात्र मोक्षस्थानीं जाऊन पोंचतो. या संसार रूप मार्गांतून तरून जावयाचें असेल, तर शरीररूप रथाला इंद्रिय रूपी घोडे जुंपून, चित्ताला सारथी करावा, व गुरूनें निर्दिष्ट केलेल्या मार्गानें रथ हांकावा.

पण कर्मबुद्धीला अनुसरूनच जे अश्वांना हांकतात, ते या संसार चक्रांत सतत भ्रमण करीत राहतात.'–विदूर पुढें म्हणाला,—' धृतराष्ट्रा, तुझ्या शंभर पुत्रांचा वध झाल्यामुळें तुझ्या मनाला मोह पडला आहे खरा, तरी आतां कुमार्ग सोडून आत्म्याची ओळख करून घे. इंद्रियांचें दमन कर, शोकाचा त्याग कर आणि परमात्म पदाची प्राप्ति करून घे.'

एवढा उपदेश विदुरानें केला, तरी शेवटीं धृतराष्ट्राला शोकाचें भरतें आलेंच, व त्यानें धरणीवर अंग टाकिलें. मग संजय, विदूर, व्यास इतर सेवक यांनीं त्याला सांवरून धरिलें. पण तो मोठ्याने ओरडून शोक करूं लागला. तेव्हां व्यास त्याला म्हणाला,–' धृतराष्ट्रा, आतां व्हावयाचें तें तर होऊन चुकलें आहे. आतां वृथा शोक कशाला करतोस ? अरे भूमीला अत्यंत भार झाला होता, तो तुझ्या पुत्रानें एकंदर अठरा अक्षौहिणी सैन्याचा नाश करून दूर केला. देवांनीच हें सर्व घडवून आणिलें आहे. तुझे पुत्र रणांत पडून स्वर्गास गेले आहेत. तरी आतां शोक सोडून दे.'–व्यासांचें भाषण ऐकून धृतराष्ट्राला मात्र थोडें समाधान वाटलें, आणि शोक टाकून तो शांत झाला.



# अध्याय ६ वा

## धृतराष्ट्र आणि गांधारी यांचें सांत्वन

याप्रमाणें धृतराष्ट्राची समजूत केल्यावर, विदुरानें कौरवांच्या सर्व स्त्रियांना बोलावून त्यांचें सांत्वन करावयास धृतराष्ट्राला सांगितलें. त्याप्रमाणें सर्वांना आपल्याजवळ बोलाविलें. त्या दुःखातिरेकानें विव्हलित होऊन रडतच त्याच्या जवळ आल्या व आपआपल्या पतीचे गुण आठवून आक्रोश करूं लागल्या धृतराष्ट्रानें त्यांचीं नानाप्रकारें समजूत घातली, परंतु बराच वेळपर्यंत त्यांचा शोकावेग कमी होईना. त्यांना आपल्या देहाचे भान राहिले नाहीं. धृतराष्ट्राला आपल्या मृत पुत्र–बंधूंचें उत्तरकार्य करावयाचे होतें,

म्हणून त्यासह सर्व स्त्रियांना बरोबर घेऊन, संजय आणि विदूर रणक्षेत्रा-कडे जावयास निघाले. नगराबाहेर येऊन तीं सर्वजण गंगेवर स्नान करीत असतां, अश्वत्थामा तेथे आला; आणि कृप व कृतवर्मा यांसह धृतराष्ट्रा-दिकांना भेटला. आणि त्यानें आपण रात्रीं केलेल्या पराक्रमाचा वृत्तांत त्यांना सांगितला. तसेंच सर्व सुनांसह गांधारी जेथें बसली होती, तेथें जाऊन अश्वत्थाम्यानें तिलाही सर्व वर्तमान कळवून तिची समजूत केली, आणि नंतर तेथून तो व्यासाश्रमांत निघून गेला.

## धृतराष्ट्राचें सांत्वन

इकडे श्रीकृष्ण व पांडव भीष्म शरपंजरीं पडला होता तेथे आले. त्यावेळीं भीष्माला पाहून धर्माला गहिंवर आला. परंतु भीष्मानें त्याला समाधानाच्या गोष्टी सांगून मृत वीरांचें उत्तरकार्य करावयास सांगितलें. भीष्माची आज्ञा होतांच धर्म खालीं मान घालून मोठ्या दुःखानें द्रौपदीसह सर्व स्त्रियांना घेऊन धृतराष्ट्राकडे गेला. धृतराष्ट्र सर्व स्त्रियांसह शोक करीत आहे असें पाहून, धर्माचें हृदय पुनः विव्हल झाले, त्याला पाहून सर्व स्त्रिया त्याची निंदा करून म्हणाल्या, "धर्मा, धर्म हें नांव तूं व्यर्थ धारण केलेंस, राज्याच्या इच्छेनें तूं सर्व–बांधवांचा नाश मात्र केलास. आतां राज्योपभोग मोठ्या संतोषानें घे बरे ?" युधिष्ठिरानें त्यांचें बोलणें मुका-ट्यानें ऐकून घेतलें; आणि धृतराष्ट्राला नमस्कार करून, त्यापाशीं त्यानें अभयदान मागितलें. धृतराष्ट्रानें प्रथम भीमाची चवकशी करून त्याला भेटण्याची इच्छा दर्शवविली. तेव्हां भीम त्याला भेटण्यासाठीं पुढें होऊं लागला. इतक्यांत कृष्णानें त्याला थांबवून सांगितलें;–'अरे धृतराष्ट्र सध्यां फार रागावलेला आहे; आतांच तूं त्याला भेटशील तर तो तुला चिरडून टाकील. क्रोध शांत झाल्याशिवाय त्याला भेटणें इतके इष्ट नाहीं,' असें म्हणून कृष्णानें धृतराष्ट्राला सांगितलें की, 'भीम मागाहून येतो आहे, तो आला म्हणजे तुला भेटेल.' कृष्णानें हें भविष्य पूर्वींच जाणून भीमाच्या आकाराचा एक लोखंडाचा पुतळा आणिला होता. तो पुढें करून कृष्ण म्हणाला, 'हा पहा भीम आला.' कृष्णाचे शब्द ऐकतांच धृतराष्ट्रानें तोच खरा भीम समजून त्याला आपल्या हृदयाशी घट्ट आवळून धरिलें. त्याबरोबर त्या लोखंडी पुतळ्याचें तुकडे तुकडे झाले. ते पाहून मात्र त्याला

वाईट वाटलें आणि आपल्या हातानें भीम मरण पावला असें वाटून तो रडूं लागला. नंतर कांही वेळानें त्याचा राग शांत झाला असें पाहून, कृष्ण त्याला म्हणाला, 'धृतराष्ट्रा, अरें तुझा क्रोधाच्या शांतीसाठीं मी लोखंडाचा पुतळा उभा केला होता. आता कृपा करून पांडवाना आशिर्वाद दे, व भीमाला दुर्योधनाच्या ठिकाणी मान.'

यानंतर सर्वांनी गंगेवर स्नानें केली. धृतराष्ट्राचें स्नान झाल्यावर कृष्ण पुनः त्याला म्हणाला– धृतराष्ट्रा, विदुरापासून तुला उत्तम ज्ञान प्राप्त झाले असूनही पुत्रप्रेमामुळें तुला मोह उत्पन्न झाला. स्वतः दुष्ट आचरणामुळें दुर्योधनाला मरण आलें,हे तूं जाणत असून पांडवांवर रोष कां बरे करतोस? आता त्यांनाच तूं पुत्राच्या ठिकाणी मान. '–कृष्णाचें भाषण ऐकून धृतराष्ट्र म्हणाला–कृष्णा, आता कसला क्रोध! पंडुपुत्रांना मी आतां पुत्राप्रमाणें मानतो. '–असें बोलून पांडवांना त्यानें अलिंगन दिले, व आशीर्वादही दिला.

याप्रमाणें भेट झाल्यावर पांडव धृतराष्ट्राची आज्ञा घेऊन गांधारीला भेटावयास गेले. तिलाही व्यासानें समाधानाच्या गोष्टी सांगून पांडवांवर प्रेम करावयास सांगितलें. परंतू ती म्हणाली. माझें सर्व पुत्र पांडवांनी युद्धांत मारल्यामळें, माझा शोक नाहीसा होणार नाही. दोघांचें युद्ध झाल्यास कोणीतरी एक मरावयाचा हे खरे, परंतु भीम व दुर्योधन यांचें युद्ध चाललें असतां, भीमानें कपटाचे त्याच्या मांडीवर गदा मारुन त्याचा प्राण घेतला हे दुःख कसे बरे जावें? हें गांधारीचें भाषण ऐकून भीम पुढे झाला, व गांधारीला नमस्कार करून विनयानें म्हणाला,–'माते, दुर्योधनानें भर सभेत द्रौपदीचें वस्त्र हरण करण्याचा प्रयत्न करून आम्हांला तेरा वर्षे अत्यंत कष्ट दिल्यामुळें आमच्या हातून हा अपराध झाला त्याची आता कृपाकरुन क्षमा कर.' यावर गांधारी पुनः म्हणाली,–'भीमा हे मी मान्य करितें, पण दुःशासनाला मारल्यावर तूं त्याचें रक्त प्यालास ही गोष्ट मात्र तूं फार वाईट केलीस.' भीमानें उत्तर केलें 'मातें, बंधूचे रक्त प्राशन करणें सर्वथा अनुचित आहे; पण खरा प्रकार असा आहें कीं, त्यावेळी माझी हिंडिंबा राक्षसी जवळ होती. तिनेंच तें रक्त प्राशन केले. माते याविषयी तूं मजवर कोप करूं नकोस. तुझ्या पुत्रानीं आमचे प्राण घेण्यासाठीं अनेक प्रयत्न केलें; परंतू श्रीकृष्णानें साहाय्य करून आम्हाला वांचविलें. हे तूं जाणतेसच.

भीमाचें भाषण ऐकून गांधारी म्हणाली,–' आम्ही दोघेहीं आतां अंध

व वृद्ध आहो. आमचें पुत्रही सर्व मेलें आता आम्हीही मरणाची तयारी करितो. होणार ते होऊन गेले, आतां शोक तरी करून काय उपयोग? असे बोलून धर्माला तिनें दोन शब्द बोलावयास सांगितलें. तेव्हा धर्म हात जोडून म्हणाला,–माते, तुझ्या पुत्रांच्या मरणाला मी कारण झाल्यामुळें, शापाला मी योग्य आहेच. माझ्या मस्तकावर इतक्या जणांच्या हत्या बसल्यामुळें माझी आतां राज्य भोगण्याची व जगण्याची इच्छा नाही.' गांधारी यावर काहीच बोलली नाही. मग कुंती कृष्णाला पुढें करून गांधारीजवळ गेली व म्हणाली, 'बाईगे, तूं तशीच मीही कौरवांची माता आहे. व तूही माझ्याप्रमाणें पांडवांची माता आहेस. सर्वांचा क्षय झालेला आहे, आतां शोक करूं नको. या प्रमाणें दोघींचें भाषण झाल्यावर व्यासानें गांधारीला दिव्यचक्षु चमत्कार देऊन कौरवपांडवांचा युद्धचमत्कार दाखविला. आणि मग तो सर्वांना घेऊन कुरुक्षेत्रास गेला.



## अध्याय ७ वा

### गांधारीचा शोक.

सर्व स्त्रियांना घेऊन पांडव कुरुक्षेत्रास आलें असतां तेथील भयप्रद देखावा पाहून सर्वांची हृदये दुःखानें भरली कुंतींहीं विलाप करून कृष्णाला म्हणाली, 'कृष्णा, येथें पडलेल्या भीष्म, द्रोण, पांचाल द्रुपद, शल्य, इत्यादिकांना पाहून माझ्या अंतःकरणाला अत्यंत पीडा होत आहे. यात धृतराष्ट्राच्या सुनांचा आक्रोश पाहून तर माझी सर्व पापे आज एकवटून माझ्या पुढे उभी राहिली की काय असें वाटते. हा संसार खरोखरीच दुःखदायक असून त्यातून तूच मात्र एक तारणारा आहेस' कुंती याप्रमाणें शोक करीत आहे, तो गांधारीच्या दृष्टीस तिच्या पुत्रांची प्रेतें पडल्यामुळें तिलाही दुःखाचा उमाळा आला. ती एकेकापाशी जाऊन त्याचे गुण आठवून रडूं लागली कृष्णानें तिची नानाप्रकारे समजूत केली. तेव्हां ती म्हणाली,– 'कृष्णा, मी हतभागी! शोक करू नये हें खरे, पण मला तो आवरतच नाही. जे पुत्र

पलंगावर निद्रा करून सुकुमार स्त्रियांच्या हातून नानाप्रकारची सेवा करुन घेत होते; त्याना धुळीत लोळण्याचा प्रसंग यावा काय? त्यांच्या स्त्रिया मंजुळ शद्वानें बोलत असत, त्याच आज असा भयंकर शंखध्वनि करून आपल्या मृत पतिचीं शरिरें शोधीत आहेत! कृष्णा, त्या पहा कित्येक श्रमिष्ट होऊन आपल्या मृत पतिंना आलिंगन देत आहेत! ज्यांच्या मुखाची कांति चंद्राप्रमाणें तेजस्वी होती, त्याच माझ्या सुना आज लावण्याविहीन होऊन, दीन व बीभत्स वेषानें या भयंकर रणांगणांत पतिशोधार्थ भटकत आहेत. त्यांच्या शोकानें ब्रह्मांडही फुटून जाईल. हा माझा दुःशासन सिंहासारखा पराक्रमी असतां, येथें आज छिन्नभिन्न होऊन पडला. इंद्रासारखा पराक्रमी असा हा दुर्योधन भीमाच्या गदाघातानें चूर्ण होऊन तिकडे पडला आहे. तो पहा अभिमन्यू काय त्याच्या शरीराची स्थिति झाली आहे, पहा त्याचा शोध करीत ही विराट राजाची कन्या उत्तरा गेली. पहा. ती आपल्या पतीचें सुंदर मुख पाहून भ्रमानें लज्जा सोडून त्याचें अवघ्राण करीत आहे पहा ! त्याचे गजशुंडेसारखे हात अस्ताव्यस्त पडले असून उत्तरा त्याला आलिंगन देऊन विलाप करीत आहे. हाय ! हाय ! कसा हा विलाप ऐकावा ! त्याला जिवंत समजून ती त्याच्या मुखाचें चुंबन घेत आहे, आणि म्हणत आहे कीं–' हे प्राणेश्वरा, तुझी माता सुभद्रा आणि मी तुझी आवडती कांता, यांना सोडून एकटाच कसारे निघून गेलास ? तुला पाहून कुंतीमातेची कायरे अवस्था होईल ? आपल्या विवाहाला अजून सहा महिने की रे पुरे झाले नाहींत? असें असतां इतक्यांतच मला सोडून तूं एकटाच स्वर्गात कसा गेलास ! शिव, शिव ! हे जगन्निवासा ! आम्हांस. असा दुःखांत लोटलेस ! राजसा अभिमन्यो, मला एकवार तरी हांक दे ! कृष्णा माझ्यानें हा विलाप ऐकवत नाहीं, हा इकडे विराट पडला असून त्याच्याही स्त्रिया भोंवती जमून हृदय पिटीत आहेत. हे इकडे लक्ष्मण, सुदक्षिण, इत्यादि माझे नातू पडले आहेत. हा महाशूर कर्ण, याच्याच जिवावर माझा दुर्योधन पांडवांशीं सामना करावयास तयार झाला. कृष्णा, तुझें साहाय्य नसतें तर अर्जुनाच्यानें यांना मारवलें असतें काय ? कसें त्याचें शरीर आज कलाहीन होऊन पडलें आहे पहा ! कर्णा, माझ्या तान्हुल्या, तुझ्या पराक्रमाच्या जोरावरच दुर्योधनानें पांडवांना वनोवनीं फिरविलें. तुझ्याकडे आतां डोळे भरून पाहूं तरी कसें ? हा इकडे माझा जांवई जयद्रथ. हाय ! हाय ! या सर्वांच्या

सुकुमार स्त्रिया आज विधवा होऊन पडल्याना ! हा इकडे नकुलसहदेवांचा मामा शल्य, यानें अर्जुनाशीं कसें भयंकर युद्ध केलें ! प्रत्यक्ष दुसरा सूर्यच असा हा भीष्म शिखंडीला पुढें करून अर्जुनानें पाडिला. त्रैलोक्यांत ज्याच्या सारखा धनुर्विद्याविशारद दुसरा नाहीं, असा हा परशुरामाप्रमाणें पराक्रमी द्रोणगुरु धृष्टद्युम्नाच्या खड्गानें मरून पडला आहे ! हे इकडे सोमदत्त, युयुधान, यूयध्वज इत्यादि वीर पडले असून, त्यांच्याही स्त्रिया जवळ आक्रोश करीत आहेत. हा शकुनी सहदेवाच्या हातून मरण पावला! हा इकडे द्रुपद व हे धृष्टद्युम्नाचे पुत्र पडले आहेत. कृष्णा, असे पराक्रमी वीर, तूं सहाय्य नसतास तर त्यांस पांडवांच्यानें केव्हांहीं मारतां आलें नसतें. तूं पांडवांना साहाय्य करून त्यांच्या मृत्यूला कारण झाला आहेस. एरवीं ते देवांनाही अजिक्य होते. तूंच या दोघांत वैर पाडून त्यांना मारविलेंस. मी तुला आतां शाप देतें. तूं आमच्या कुलाचा जसा क्षय करविलास. तसाच आजपासून छत्तिसाव्या वर्षी तुझ्याही कुलाचा क्षय होईल, आणि ह्या स्त्रियाप्रमाणें तुमच्याही स्त्रिया रडतील.'

हा शाप ऐकून श्रीकृष्ण हंसून म्हणाला,–' हे पतिव्रते ! तुझा शाप अगदीं सत्य होईल मी देवादानवांनांही अवध्य असल्यामुळें माझ्याशिवाय यादवकुलाचा संहार करणार दुसरा कोण असणार ? कारण यादव सर्वत्र अजिक्य व अमर असल्यामुळें, माझ्या कर्तृत्वानें तेच मात्र एकमेकांचा संहार करतील. आतां तूं मुळींच शोक करूं नकोस. तूं आपल्या पुत्रांचा लोभ धरून वृद्ध हितचिंतकांचे ऐकिलें नाहींस, व पुत्रांना योग्य उपदेश केला नाहींस; या तुझ्याच अपराधामुळें सर्वांना मरण आलें असतां तूं केवळ अज्ञानानें मला दोष लावीत आहेस. प्राणी गेले, मेले, नष्ट झाले, तेथें कोण काय करणार आपआपल्या पापपुण्याप्रमाणें प्राण्यांना यथाकालीं फळ मिळत असतें. असें कर्म तसें फल, असें असतां मजवर व्यर्थ तूं कपटाचा आरोप करीत आहेस. गांधारी, पहा बरें ब्राह्मणांचा पुत्र ब्राह्मण होतो, वैश्यकन्येचा पुत्र पशुपालक होतो, शूद्रीच्या पुत्राला सेवेचीच अभिरुचि लागते, आणि क्षत्रिय–स्त्रीचा पुत्र युद्धालाच उद्युक्त असतो. तात्पर्य, ज्याप्रमाणें मातापित्यांचें आचरण असेल, त्याप्रमाणें पुत्रांचेंही कर्म होतें. यासाठीं शोक सोड. कृष्णाचें भाषण ऐकून गांधारी उठून स्वस्थ बसली.

कांहीं पुराणांत यासबंधानें असें वर्णन आहे कीं, गांधारी दुःखानें भूमी-

वर पडली असतां, तिची सर्वांनीं समजूत केली; तथापि ती कांहीं केल्या उठेना सर्व कौरव-स्त्रिया आपलें दुःख गिळून तिला उठवावयास आल्या; तरीही तीं उठेना. हें पाहून कृष्ण त्या सर्वांना म्हणाला,–'आपण हिला क्षण-भर येथेंच सोडून जरा पलीकडे जावें.'–त्याप्रमाणें सर्वजण गेलीं असतां, तेथें कोणी नाहीं असें पाहून गांधारी उठून उभी राहीली, व खावयासाठीं कांहीं मिळेल म्हणून पाहूं लागली. इतक्यांत जवळ आंब्यांचा वृक्ष फलांनीं लव-लेला पाहून, तीं फळें तोडावयासाठीं तिनें हात वर केला. परंतु हात पोंचेना, म्हणून तीं हत्तीचें प्रेत पडलें होतें त्यावर चढली. तरीही हात पोंचेना, तेव्हां प्रेतावर आपल्या पुत्रांचीं प्रेतें रचलीं; आणि त्यावर उभें राहून ती फळें तोडूं लागली. इतक्यांत कृष्णानें तेथें येऊन तिला विचारलें, "आतां तुला कोणीं उठविलें.' तिनें उत्तर दिलें, 'कृष्णा, सर्व धैर्याचा नाश करणारी, व शीलाचा विध्वंस करणारी अशी जी प्रसिद्ध क्षुधा. तिनें मला उठविलें.' तें ऐकून कृष्णानें तिला आपला अमृतमय अंगूष्ठ चाखावयास सांगितलें. तिनें तसें केल्यावर तिची तृप्ति झाली व सर्व शोक सोडून ती स्त्रियांत जाऊन बसली.



## अध्याय ८ वा

## मृतांचें उत्तरकार्य

मागील अध्यायांत सांगितल्याप्रमाणें गांधारी रणांतून उठून इतर स्त्रियांत जाऊन बसल्यावर धृतराष्ट्रानें धर्माला विचारलें, 'या युद्धांत दोन्ही सैन्य मिळून किती लोक मेले याचे प्रमाण तुला माहीत असल्यास सांग.' तेव्हां धर्मानें उत्तर केलें, 'ताता, या युद्धात अडुसष्ट कोटी एक लक्ष आणि वीस हजार सैनिक मरण पावले. त्यांत एकलक्ष महारथी, चवदा लक्ष चवदा हजार धनुष्यवाले आणि देशोदेशींच्या प्रमुख वीरांपैकीं पांचशेंसाठ मिळून अठरा अक्षौहिणी सैन्याचा या प्रसंगीं नाश झाला.' हें ऐकून धृत-राष्ट्रानें पुनः विचारलें, 'धर्मा, हें तुला कसें बरें कळलें ?' तेव्हां धर्म

म्हणाला, 'ताता, पूर्वी तुमच्या आज्ञेवरून मी तीर्थयात्रेला गेलों असतां, तेथें लोमशऋषीनें मजवर अनुग्रह करून मला दिव्य चक्षू दिले, व त्यायोगें मला परलोकगमनाचें ज्ञान झालें.' हें ऐकून धृतराष्ट्रानें संतोष प्रदर्शित करून सर्व मृतांचें प्रेतकर्म करण्याची धर्माला आज्ञा केली. त्याप्रमाणें धर्मानें विदुर, संजय, युयुत्सु, इत्यादिकांना आज्ञा करून घृत, तेल, चंदन, तुलसी काष्ठें व इतर सुगंधि द्रव्यें जमविली आणि शास्त्रोक्त मार्गानें त्यांची चिता रचून सर्व प्रेतांना रेशमाच्या उंची वस्त्रांत झांकून त्यांचें दहन केलें. त्यावेळीं पुनः सर्व स्त्रियांनीं एकच आकांत केला. सर्व दिशा धूरानें व्याप्त झाल्या व प्रेते नाहींशी झाल्यामुळें क्रूर श्वापदांची निराशा झाली. नंतर धर्मादिक सर्वजण धृतराष्ट्राला पुढें करून स्त्रियांसह गंगेवर गेले आणि तेथें सर्व मृतांना त्यांनीं उदकदान केलें. मग सर्वांनीं गंगेवर स्नानें केली. तेव्हां कुंती शोकाकुल होऊन तेथे आली, आणि धर्माला म्हणाली, 'धर्मा, अरे ज्या महाप्रतापी कर्णाला अर्जुनानें मारिलें, तो कर्ण माझा पुत्र असून सूर्यापासून मला प्राप्त झाला होता. तो तुमचा बंधु असल्यामुळें त्यालाही धर्मा, उदकदान कर.' कुंतीचें भाषण ऐकून कर्णाला मारल्याबद्दल सर्व पांडवांना अत्यंत दुःख झालें. धर्म म्हणाला, 'पांचाल द्रौपदीपुत्र व अभिमन्यु यांच्या वधापेक्षांही हें कर्णवधाचे दुःख फार मोठे आहे.' याप्रमाणें दुःख करून धर्मानें कर्णाच्याही नांवानें उदक सोडलें. सर्व मंत्रविधि आटोपल्यावर कर्णाच्या स्त्रियांना घेऊन पांडवादि सर्वजण गंगेच्या कांठीं आले. धर्माच्या मनाला कर्णाबद्दल फारच हुरहूर लागून राहिली होती.

## पुराणांतील दुसरी कथा

भारतामध्ये पाहतां येथें स्त्रीपर्व संपलें. पण दुसऱ्या पुराणांत असें सांगितलें आहे कीं, पांडव-नगराजवळ आल्यावर, धर्म विजय झाला म्हणून सर्व नागरिक लोक उत्सव करीत असतां, अर्जुनाच्या मनांत गर्व उत्पन्न होऊन तो आपल्याशीं म्हणाला, 'कौरवांचें अकरा अक्षौहिणी सैन्य माझ्याच सामर्थ्यानें नष्ट झालें. माझ्यामुळेच धर्माला राज्यप्राप्ति झाली. यास्तव मीच खरोखर धन्य आहे.' असें मनांत आणून अर्जुन अभिमानानें मिशा चोळूं लागला. हा प्रकार श्रीकृष्णाला समजतांच तो अर्जुनाला म्हणाला, 'अर्जुना, तुझा विचार मला कळला, तरी आपण बभ्रुजवळ याचा खुलासा करूं.'

मग ते दोघे रथांत बसून रणभूमीवर बभ्रूपाशी आले, व कृष्णानें बभ्रूला विचारलें, ' अरे, या रणांत खरोखर कोणी पराक्रम केला, तें पूर्वजांच्या पुण्येंकरून तुला कळलें काय ? कळलें असेल तर सांग.' हें ऐकून बभ्रू म्हणाला, ' मी असत्य सांगावयाचा नाहीं. या रणांत कृष्णा तुझें सुदर्शन चक्र, भीमाची गदा आणि मारुतीचें पुच्छ, यांनींच सर्व सैन्याचा नाश केलेला मी पाहिला. कृष्णा, आतां माझी इच्छा आतां पूर्ण झाली. तू आतां आपलें दातृत्व सांभाळ, मी आतां जातो.' त्यानें असें म्हणतांच कृष्णानें त्याच्या शरीरांतून जीवन काढून घेतलें, व बभ्रू तें शरीर सोडून इहलोकीं गेला. मग त्याचें उत्तरकार्य करून अर्जुन कृष्णासह परत जात असतां, वाटेंत एक गज-घंटा होती, ती उचल म्हणून कृष्णानें अर्जुनाला सांगितलें. अर्जुनानें ती उचलली असतां तिच्याखाली बसलेली लावी पक्षीण उडून गेलीं. अर्जूनानें आंत पाहिले, तो त्या लावींची पिलेंही आंत दिसली. हा चमत्कार पाहून अर्जुनाला आश्चर्य वाटले आणि तो कृष्णाला म्हणाला.–' देवा, येवढ्या युद्धात ही लावी आपल्या अंड्यासह जिवंत कशी राहिली?' कृष्णानें उत्तर केलें, ' अर्जुना, तुला सर्व माहिती असून उगाच कां बरे वेड पांघरतोस? ही लावी वाचावी म्हणून तिच्यावर ही हत्तीची घंटा मुद्दाम ठेविली होतीं बराच वेळ झाल्यामुळे ती व पिलें गुदमरून मरतील यासाठी तीं उचल म्हणून तुला सांगितले, अर्जुना, याच प्रकारानें अठरा अक्षौहिणी सैन्याचा नाश झाला असतां मी तुम्हांला वाचविले. युद्ध आटोपल्यावरोवर मदन आदि करुन यादवांना द्वारकेस पाठवून तुम्हांला दुर्योधनाच्या शिबीरांत घेऊन गेलो. अर्जुना, युद्धाच्या आरंभी तुला विश्वरुप दाखवून सर्व सैन्याला मी मारुन टाकल्याचें तुला सांगितलेंच आहें. तुला मी निमित्तमात्र केलें. माझे व्यक्तीव्यक्त गुण मोठ्या ज्ञानीं लोकांनाही कळत नाहीत.

याप्रमाणें अर्जुनाचा गर्वपरिहार करून आणि बभ्रूला मुक्ति देऊन श्रीकृष्ण अर्जूनासह धर्माकडे आला, व झालेला सर्व वृत्तांत धर्माला सांगितला इतक्यांत असें झालें कीं,पांडवांच्या स्त्रियांच्या गर्भाला घात करण्याचीं प्रतिज्ञा करून अश्वत्थामा उत्तरेदिशेस मंत्राचा जप करीत चालला होता. त्याचे ब्रह्मशिरास्त्र, अभिमन्यूची स्त्री जीं उत्तरा तिच्या उदरांतील गर्भ पाडण्या-साठीं कडाडत आले. ते दुसऱ्या कोणाला न दिसतां उत्तरेस दिसलें, व ती भयानें ओरडून आपल्या गर्भाचे रक्षण करण्याविषयी कृष्णाची करुणा भाकू

लागली. कृष्ण त्यावेळेस द्वारकेस जावयास तयार झाला होता. त्याच्या कानावर उत्तरेची आरोळी गेल्याबरोबर तो तिच्याकडे गेला. आणि तिला आश्वासन देऊन त्यानें गुप्तपणें आपलें सुदर्शनचक्र तिच्या गर्भात रक्षणार्थ तिच्या उदरांत ठेविले. सुदर्शनानें लगेच अश्वत्थाम्याच्या अस्त्राचें निवारण करून उत्तरेच्या गर्भाचे रक्षण केले,

स्तबक बारावा संपूर्ण

# स्तबक तेरावा

## अध्याय १ ला

### शांतिपर्व. धर्म-राज्यभिषेक.

यं ब्रह्मा वरुणेन्द्ररुद्रमरुतः स्तुन्वन्ति दिव्यैः स्तवै-
र्वेदैः सांगपदक्रमोपनिषदैर्गायन्ति यं सामगाः ।।
ध्यानावस्थिततग्दतेन मनसा पश्यन्ति यं योगिनो-
यस्यान्तं न विदुः सुरासुरगणा देवाय तस्मै नमः ।।

हे ज्ञानमूर्ति, तूं सगुण-निर्गुणाच्या पलीकडील असून अचल अनंत आहेस. वेद तुझ्याच स्वरुपाचें प्रतिप्रादन करितात. तुझा सर्वत्र जयजयकार आहे. तुझे आराधन केले असतां आरंभिलेल्या ग्रंथाची समाप्ति निर्विघ्नपणें होते.यास्तव तुला नमस्कार करून उत्तमोत्तम कर्माचे तात्पर्य मी आतां कथन करितो.या तेराव्या स्तबकांत भारतांतर्गत शांतिपर्वातील सुरस कथा यावयाच्या आहेत. पुर्वीप्रमाणेंच जनमेयराजा आणि वैशंपायन यांच्या संवादरुपानें वर्णिलेल्या या कथा वाचकांना आनंददायक होतील, अशी आशा आहे.

जनमेजय राजा वैशंपायनास म्हणतो-'हे मुने, तूं केवळ ज्ञानाचा सूर्यच असल्यामुळें तुझ्या सहवासामुळें माझें सर्व अज्ञान दूर झाले आहे. पूर्वी तूं मला स्त्रीपर्वातील कथा सांगितलीस, गंगाप्रवाहाप्रमाणें पवित्र अशा तुझ्या या वाणीनें माझें सर्व दोष दूर झाले तर आता शांतीपर्वातील युद्ध कथा कृपा करून सांगावी. त्यावर वैशंपायन म्हणाले,- 'हे राजा, संपुर्ण भारतांत हें शांतिपर्व फार महत्वाचें आहे. यांत वेदशास्त्रातील अति पवित्र विषयांचे विवेचन असल्यामुळे, त्याच्या श्रवणानें सर्व दुःखाचा नाश होतो. या पर्वांत राजधर्म, आपद्धर्म आणि मोक्षधर्म ज्या स्थलीं सांगितलें आहेत, ही स्थळें म्हणजें जणू त्रिवेणीसंगमच, किंवा प्रत्यक्ष त्रिमूर्तिच होत. किंबहुना 'तत्त्वमसि' इत्यादि महावाक्यांचाच अवतार समजावा. त्यातील प्रमाणभूत रहस्य काढून मी तुला क्रमानें सांगतों. त्याच्या श्रवणानें जशी धर्मराजाला शान्ति प्राप्त झाली, तशी तुलाहीं होईल.

# कर्णाचा पूर्व इतिहास

रणांगणांत पडलेल्या सर्व बांधवांना तिलांजलि देऊन पांडव, विदूर आणि धृतराष्ट्र हे सर्व स्त्रियांसह एक महिनाभर अशौच निवर्तन करून शहराबाहेर दुःखानें राहिले होते. तेथें धर्मराजाला भेटण्यासाठीं एके दिवशीं व्यास आदिकरून ऋषिमंडळी आली असतां, पांडवांनीं आसनादिकांनीं त्यांचा सत्कार केला. तेव्हां त्या ऋषींनीं दुःखानें होरपाळून गेलेल्या धर्माचें सांत्वन केलें. ते म्हणाले.-'तूं धर्ममार्गानें युद्ध करून शत्रूंचा नाश केलास आणि आपल्या वडिलांचें नांव राखिलेंस, तसेंच त्वां सर्व राज्य जिंकून मोठी कीर्ति संपादन केली आहेस' हें ऐकून धर्माला आनंद न होतां दुःख झालें. तो म्हणाला,-' अहो, सोयरेधायरे, भाऊबंद, यांचा नाश करून मिळविलेल्या राज्यापासून मला सुख तें काय होणार ? त्यांत एका गोष्टीचें तर मला फारच वाईट वाटतें. रणांगणांत पडलेल्या वीरांना तिलांजलि देण्याच्या वेळीं कुंतीनें मला सांगितलें कीं, कर्ण तुझा बंधु होता; तर त्यालाही तूं उदक-दान कर असें म्हणून तिनें मला कर्णाचा पूर्वेतिहास सांगितला. ती म्हणाली,-' युद्धाला आरंभ होण्यापूर्वीं मी त्याला एकीकडे गांठून तूं माझा पुत्र व पांडवांचा बंधु आहेस; तर त्यांच्याशीं सख्य कर, असें सांगितलें. तेव्हां तो म्हणाला, ही गोष्ट लोकाचाराला विरुद्ध होईल. आतां मी पांडवांशीं सख्य केल्यास अर्जुनाला भ्यालों अशी माझी दुष्कीर्ति होईल. तर प्रथम मी कृष्ण आणि अर्जुन या दोघांना जिंकून मग त्यांच्याशीं सख्य करीन. तेव्हां तिनें त्याला विनंति केली कीं निदान युद्धामध्यें पांडवांचें तरी रक्षण कर. तेव्हां कर्ण तिला म्हणाला एका अर्जुनाशिवाय इतरांचें मी रक्षण करीन, व पंचपुत्रा म्हणून तुझी ख्याती यथार्थ होईल. कारण अर्जुनाचा वध झाल्यास माझ्यासह तुझे पांच पुत्र होतील; आणि माझा वध झाल्यास अर्जुन पांचवा आहेच.' असा पूर्व-इतिहास कुंतीनें मला सांगितला; तेव्हां कर्ण हा आमचा बंधु असें मला कळलें व अत्यंत दुःख झालें.' हें धर्माचें भाषण ऐकून, त्या ऋषिमंडलांत नारद होता तो म्हणाला-' बा धर्मा, कर्णार्जुनांचें असें शत्रुत्व उत्पन्न झालें नसतें, तर तूं आदिकरून कुंतीच्या पुत्रांना स्वर्ग-प्राप्तीचें साधन कशानें मिळालें असतें ? क्षत्रिय उन्मत्त झाल्यामुळें त्यांचा नाश व्हावा, म्हणून हा कन्या-गर्भ कर्ण देवांनीं मुद्दाम निर्माण केला धर्मा, कर्णाचा पूर्वीचा आणखी थोडासा

इतिहास सांगतों तो ऐक. अर्जुन आदिकरून सर्व द्रोणाचार्यापाशीं शस्त्रास्त्र-विद्येचा अभ्यास करीत असतां, अर्जुनाला ब्रह्मास्त्राचें ज्ञान झाले, तेव्हां कर्णाला फार वाईट वाटलें व त्यानें द्रोणगुरुंची एकीकडे गांठ घेऊन मलाही ब्रह्मास्त्र शिकवा; अशी त्यांची विनंति केली. तेव्हां ते म्हणाले,–' अरे कर्णा, हें ब्रह्मास्त्र तपस्वी, ब्राह्मण किंवा क्षत्रिय यांच्याखेरीज कोणाच्या उपयोगाचें नाहीं. तूं व्यर्थ त्याच्या नादीं लागूं नकोस. ' द्रोणाचें भाषण ऐकून कर्णाला ईर्षा उत्पन्न झाली व ब्रह्मास्त्राची प्राप्ति करून घ्यावयाची असा त्यानें मनाशीं निश्चय केला. नंतर ब्राह्मणाचा वेष घेऊन तो परशुरामाजवळ गेला, आणि त्याची सेवा करून त्याच्यांपासून अस्त्रविद्येची प्राप्ति त्यानें करून घेतली. पण एके प्रसंगी त्याच्या हातून मोठी चूक झाली. एकदां तो धनुष्यबाण घेऊन नदीच्या तिरावर हिंडत असतां, एका अग्निहोत्री *ब्राह्मणाची गाय त्याच्या दृष्टीस पडली. तिला हरिण समजून कर्णानें अज्ञानामुळें तिच्यावर बाण सोडला व ती मरण पावली. हें पाहून त्या ब्राह्मणानें त्याला शाप दिला कीं ज्याच्याशीं युद्धांत गाठ पडली असतां पृथ्वींत तुझ्या रथाचें चाक रुतेल; त्या वेळीं तोंच तुझें शिर उडविल.' हा भयंकर शाप ऐकून कर्णानें परशुरामा-जवळ येऊन त्याला हा सर्व वृत्तांत सांगितला. तेव्हां परशुरामानें त्याला कर्णाचा एकंदर पराक्रम आणि आपल्या विषयींचें प्रेम पाहून मोठ्या संतोषानें कर्णाच्या मांडीवर मस्तक ठेवून परशुरामानें निद्रा केली असतां; रक्तमांस खाणारा कोणी किडा कर्णाची मांडी खालून पोखरूं लागला, परंतु गुरुची निद्रा मोडेल या भीतीनें कर्णानें मांडीं मुळींच हालविली नाहीं. किड्यानें वर त्याची सर्व मांडी पोखरून परशुरामाच्या मस्तकालाहि दंश केला. तेव्हां परशुराम तडफडून जागा झाला, आणि पाहूं लागला तो रक्ताचा पूर वाहत असलेला त्याच्या दृष्टीस पडला. तो किडा आठ पायांचा व मोठ्या तोंडाचा असा रक्तमांस भक्षक भुंगा होता. परशुरामानें त्याच्याकडे पाहिल्याबरोबरच तो गतप्राण झाला आणि काळ्यावर्णाचा मेघवाहन नांवाचा एक राक्षस अंत रीक्षांत जाऊन तेथून कर्णाला म्हणाला,–' तुझी मांडीं पोखरणारा भुंगा मीच. तुझ्या कृपाप्रासादानें मला परशुरामाचा स्पर्श झाला, व त्यामुळें माझी नरकापासून सुटका झाली. तुझें कल्याण

*अन्य ठिकाणीं गाईचें वासरूं मारिलें असें आहे. मोरोपंत शांतिपर्व १ । १५.

असो.' राक्षसाचें भाषण ऐकून परशुरामानें तूं कोण व तुला नरकप्राप्ति कां झाली असें विचारलें. तेव्हां तो म्हणाला, 'मी दितीचा पुत्र दंश नांवाचा आसुर आहे; कामातुर होऊन भृगूऋषीची स्त्री मी हरण केली असतां, त्याच्या शापामुळे मला हा नरकवास प्राप्त झाला. पण पुनः त्या मुनीनें कृपाळू होऊन उःशाप दिला कीं. परशुरामाकडून तुझी मुक्तता होईल. तो उःशाप तुमच्या कृपेनें असा फलास आला ?' या माणें * दंशासुराचा उद्धार झाला, परंतु हा एकंदर प्रकार पाहून परशुरामाला संशय आला. तो म्हणाला, 'कर्णा, असलें साहस क्षत्रियावांचून इतराच्यानें होणार नाहीं. तूं असत्य भाषण करणारा आहेस. तेव्हां तूं संपादन केलेलें ब्रह्मास्त्र तुझ्या उपयोगी पडणार नाहीं.' याप्रमाणें शाप मिळाल्यावर कर्ण दुर्योधनास येऊन मिळाला, आणि त्याच्याच बलावर दुर्योधनानें एवढा प्रताप केला. असो, एकदां कलिंग देशाच्या चित्रांगद नांवाच्या राजानें आपल्या मुलीचें स्वयंवर मांडिलें.त्यावेळीं तेथें अनेक राजे जमले असतां, कर्ण आणि भीष्म यांच्या बलावर दुर्योधनानें त्या सर्वांस जिंकून चित्रांगदाच्या कन्येचें हरण केलें. कर्णाचे बल पाहून जरासंधानें त्याला द्वंद्वयुद्धाचें आव्हान केलें. त्या वेळीं दोघांत मोठें कडाक्याचें युद्ध होऊन कर्णानें जरासंधाला पराजित करून टाकिलें. तेव्हां जरासंधानें काकुळतीस येऊन त्याच्याशीं सख्य केलें, व आपली * वंगमालिनी नांवाची अंग देशाची राजधानीही कर्णाला देऊन त्यानें त्याच्याशीं स्नेह केला. तेव्हांपासून कर्ण अंग आणि वंग देशाचा राजा झाला. त्याला जन्मतःच अभेद्य कवच-कुंडले प्राप्त झालेलीं होतीं; परंतु तो अति उदार असल्यामुळें, इन्द्रानें ब्राह्मणवेषाने त्याच्यापाशीं येऊन भिक्षारूपानें त्याचें हरण केलें. असा हा महाप्रतापी कर्ण युद्धांत अर्जुनाच्या

*हा भुंगा असुर नसून इंद्र होता, व अर्जुनाचा पक्ष सुदृढ करून कर्णाचा पक्ष कमी करावा, अशा बुद्धीनें त्यानें ही युक्ति केली, असे ग्रंथांतरी वर्णन आहे.

* वंगमालिनी ही अंगदेशाची राजधानी नसून मालिनी ही अंग देशाची राजधानी असावी असे वाटते. (पहा मोरोपंती भारत शान्तिपर्व २, ६२).

होऊन मरण पावला.' याप्रमाणें कर्णाचा वृत्तान्त नारदानें धर्माला सांगून तो म्हणाला, ' धर्मा, आतां शोक टाकून दे.' कुंतीनेंही धर्माला बोध केला. ती म्हणाली, ' कर्ण तुमचा बंधु खरा, परंतु त्यानें तुमच्याशीं विरोध केल्यामुळें मी मुद्दामच त्याची उपेक्षा केली. त्याचा व्यर्थ शोक कां करतोस.' कुंतीचें बोलणें ऐकून धर्माला राग आला, आणि त्यानें मातेला शाप दिला कीं, ' स्त्रियांचें मनोगत न कळल्यामुळें, मी आजपर्यंत जगलो गेलों, तर आजपासून त्यांच्या मनांत गुप्त गोष्ट कधी न राहो.' असा शाप देऊन धर्मराजा अर्जुनाला म्हणाला,–' पार्था, मला त्रैलोक्याचेंही राज्य नको आहे, मग या एका लोकाची कथा काय ? मी आतां अरण्यांत जाऊन राहीन, अथवा तीर्थयात्रा करून बांधवांच्या वधाच्या पापाबद्दल प्रायश्चित करीन पूर्वजांपासून परंपरेनें आलेलें हें राज्य मी तुला देतों. तूं आतां या आपल्या पृथ्वीचा सांभाळ कर. बांधवांच्या रक्तानें माखलेली ही भूमि मला नको. मी आपल्या आत्म्याचें सार्थक्य करणार.' इतकें बोलून धर्मराजा स्तब्ध बसला. तेव्हां अर्जुन म्हणाला,–' हे धर्मराजा ! त्वां राज्याचा असा त्याग केला असतां, लोक तुझी निंदा करितील, राज्य त्यागिल्यास तुला दरिद्री पतित, अधर्मी समजून तुझ्याशीं कोणी संसर्ग करणार नाहींत. अरे, राज्याच्या योगानेंच धर्म, अर्थ काम, मोक्ष, हे चारी पुरुषार्थ होतात. द्रव्य नाहीं तर प्राणी अमंगल होय, असें जाणून मोठमोठ्यांनींही राज्याचा स्वीकार केला. दिलीप अंबरीष, मांधाता, हरिश्चंद्र, इत्यादि अनेक महात्म्यांनीं राज्य केलें आहे. या स्तव राज्य–त्यागाचा विचार विचार तूं सोडून दे.' अर्जुनाप्रमाणेंच भीमाचेंही मत पडलें. तो म्हणाला,–' राज्यहीन क्षत्रियाला अमंगल म्हणतात. हे धर्मा राज्याचा त्याग केलास, तूं इह–पर अशा लोकांस अंतरशील याविषयीं मी तुला एक कथा सांगतो ऐक.'

## धर्मास उपदेश

एका वनामध्यें चार ऋषि–पुत्र राहत होते. त्यांनीं तरुणपणांतच माता पितरांना सोडून संन्यास घेण्याचा विचार केला. तेव्हां इंद्र पक्षिरूपानें त्यांच्यापाशीं येऊन म्हणाला,–ब्राह्मणादिवर्णांना सर्व आश्रमांत गृहस्थाश्रम उत्तम होय. त्याच्या योगानें दोन्ही लोकांची प्राप्ति होते, त्याच्यावांचून सर्व व्यर्थ आहे.'—हें पक्ष्याचें भाषण ऐकून, त्या ब्राह्मण–पुत्रांनीं आपला विचार सोडून

माता-पितरांच्या सेवेंत राहून इह-पर लोकांचें साधन केलें.' भीमार्जुन नकुल, सहदेवही धर्माला प्रेमानें म्हणाले,—हे जेष्ठबंधो ! राज्य करूनच कीर्ति मिळेल. चारी पुरुषार्थही राज्यानेंच साधतात. यास्तव राज्याचा स्वीकारच योग्य होय.'—द्रौपदी म्हणाली,–' पतिराज, आपण वनांत असतांना नेहमी म्हणत असा कीं, युद्ध करून राज्य प्राप्त झाल्यावर मी यज्ञदान करीन; सर्व विषयांचा यथेष्ट उपयोग घेईन; सोयऱ्यांचें प्रतिपालन करीन; तें सर्व विचार आतां व्यर्थ गेले काय? राजा, नपुंसकाला राज्य, द्रव्य, पुत्र, यांचा उपभोग मिळत नाही. करितां पुरुषार्थाचें साधन केलेच पाहिजे. क्षत्रियानें आचरावयाचा उत्तम धर्म म्हणजे दंड होय. दंडानें त्यांच्या सर्व कामना पुर्ण होतात व दंडानेंच संतांचा प्रतिपाळ व दुष्टांचें शासन करतां येतें. राज्य असेंल तरच परसैन्याचा पराजय करणें शक्य आहे, दंडानें स्वर्गप्राप्ति होईल, व दंडत्यागानें नरकप्राप्ति होईल. 'यानंतर अर्जुनानेंही राजदंडाचें महत्त्व वर्णन केले तो म्हणाला,–' दंडाशिवाय क्षत्रियाला उत्तम धर्म नाही. त्यानेंच प्रजापालन करितां येते. ऐहिक उपभोग व परमार्थ साधन दंडानेंच साध्य आहे. दंडामुळें कार्ये सिद्धीस जातात. धर्म व निती यांचें पालन दंडानेंच होते. राजदंड नसेल तर एकमेक एकमेकांना खाऊन टाकतील. मात्र देश, काल. वर्तमान इत्यादि परिस्थिती पाहून दंडाचा उपयोग करावा; नाहीं तर नरकांत पतन होईल. स्थावर-जंगमादि या जगातील *जारज, स्वदेज, अंडज, उभ्दिज, या ज्या चार कोटी, यांचा नैसर्गिक धर्मही दंडामुळें कायम राहीला आहें. यास्तव नीतिनें राज्य करणें याशिवाय क्षत्रियाला दुसरा धर्म नाही.' याविषयी अर्जुनानें दुसरी कथा सांगितली, तो म्हणाला,- 'एकदां जनकराजानें राज्य टाकून भिक्षावृत्ति स्वीकारली. तेव्हां त्याच्या स्त्रिया त्याला म्हणाल्या,–' महाराज, आपण राज्य, स्त्रिया व पुत्र यांना सोडून भिक्षा मागू लागला यात काय पुरूषार्थ जोडलात? गृहस्थाश्रमात राहिल्यानें चारी आश्रमात सार्थकता होते. भिकाऱ्याच्या हातून कृमिकींटकांना तरी अन्न मिळेल काय? हीं कथा ऐकून धर्म म्हणाला, –

* जारज- गर्भापासून होणारें मनुष्यादि प्राणी; स्वेदज- घामापासून उत्पन्न होणारे उवा, ढेकूण वगैरे; अंडज-अंड्यापासून उत्पन्न होणारे पक्षी वगैरे आणि उभ्दिज- बीजापासून होणारें वृक्ष वगैरें,

राज्योपभोगानें कर्माची गति व जन्ममरणानें सुख-दुःख ही कां टळणार आहेत? सर्वसंग परित्याग करुन अरण्यात योगाभ्याग केल्यास अंतःकरण निर्मळ होऊन आत्मप्राप्ति होते. व आत्मप्राप्तीत संसारापासून पूर्ण निवृत्ति होतें, म्हणून तर विषयाचा त्याग करून बुद्धीवान लोक वनाचा आश्रय करितात.' धर्माचें वचन एकून व्यास म्हणालें,-युधिष्ठीरा, इंद्रपद म्हणतात हे काही यज्ञाहून निराळे नाहीं. सायुज्यदिमुक्तीही यज्ञावाचून प्राप्त होत नाही. असे असून, यज्ञ तर राजदंड धारण करणाऱ्या गृहस्थाश्रम्यालाच साध्य आहे; तस्मात् सर्व आश्रमांत गृहस्थाश्रम श्रेष्ठ होय. पूर्वी बृहस्पतीनें इंद्राला हाच धर्म सांगितला. सुद्युम्न नांवाचा राजा राजदंड धारण करूनच स्वर्गपद पावला.' धर्मानें सुद्युम्न कथा ऐकण्याची इच्छा दर्शविली, तेंव्हां व्यास सांगू लागले.

## सुद्युम्नाची कथा.

एका अरण्यांत शंख आणि लिखीत असे दोन बंधू दोन ठिकाणी आश्रम करून राहात होते, एके दिवशीं लिखीत हा आपला ज्येष्ठ बंधु जो शंखऋषि त्यास भेटण्यासाठीं त्याच्या आश्रमांत गेला. तेव्हां शंख समिधा आणण्यासाठीं बाहेर गेला होता इतक्यात लिखीताला फार भूक लागल्यामुळें तो त्या आश्रमातील अमृतवृक्षाची मधुर फले खाऊं लागला. थोड्या वेळानें शंख घरी येऊन त्यानें ही फलें तूं कोठून खातोस? असें लिखीताला विचारले, 'तुझ्याच आश्रमातील' असें लिखीताने उत्तर दिलें, तेव्हां अविवेकी शंखाला क्रोध येऊन तो बंधूला म्हणाला,-अरे, तू चोर आहेस. तर त्वरित सुद्युम्नराजाकडे जा, आपला अपराध सांग.' -लिखीतानें ज्येष्ठ बंधूच्या आज्ञेप्रमाणें केले. सुद्युम्न राजानें विचार करून त्याचें दोन्ही हात तोडून टाकण्याची शिक्षा त्याला सांगितली. त्याप्रमाणें हस्तहीन झाल्यावर तो शंखाकडे पुनः आला; तेव्हां शंखानें सांगितलें. आतां तूं चोरीच्या पापापासून मुक्त झालास, तर आता बाहुदानदीजवळ जाऊन तिची आराधना कर. त्याप्रमाणें आराधना केल्यावर लिखीताला नवीन बाहु प्राप्त झाले व सुद्युम्नालाही योग्य दंड केल्यामुळें उत्तम सिद्धी मिळाली. अशी कथा सांगून व्यास म्हणाले,-धर्मा, याप्रमाणें दंडावाचून क्षत्रियाला दुसरा धर्म नाही. राजा हयग्रीवहीं दंडाच्या योगानेंच उत्तम गति पावला

सर्व सुख-दुःख कालाच्या योगानें प्राप्त होतात, याकरिता भले पुरुष स्वधर्म त्याग करीत नाहीं. युधिष्ठीरा, तरी अज्ञान पांघरून मतिभ्रष्ठ होऊं नको. राज्याचा उपभोग घेऊन सुखी हो, अथवा अश्वमेध करून दिव्य लोकांची प्राप्ति करून घे. तेव्हां धर्म म्हणाला-महाराज, दोष घडणार नाहीत अशा राजधर्मांचा उपदेश करावा तेव्हां व्यासांनी त्याला सांगितलें की तुमचा दिव्यज्ञानी पितामह जो भीष्म तो सर्व शास्त्रवेत्ता आहे. त्यानें बृहस्पति शुक्र, इत्यादि देवाची आराधना करून उत्तम नीतिशास्त्र संपादन केलें आहे. तो तुला उत्तम राजधर्म सांगेल. श्रीकृष्णानेंहीं व्यासाच्या म्हणण्याला दुजोरा दिला. कृष्णवचनानें धर्माला संतोष झाला व सर्वजण तेथून हस्तिनापूरास जावयास निघाले. सर्वांनी मिळून धृतराष्ट्राला पुढे केलें आणि सर्व स्त्रिया व दासदासी यांसह धर्म निघाला. देवब्राह्मणांची पूजा केल्यावर धर्म रथांत बसला, भीमानें घोड्याचे लगाम धरिले, अर्जुनानें त्याजवर छत्र धरिलें, आणि नकुल-सहदेव त्याजवर चवरी व पंखें वारूं लागले. बरोबर सात्यकि, विदुर व श्रीकृष्ण, हेंही आपापल्या परिवारासह होते. ही स्वारी नगराजवळ येतांच लोक धांवत येऊन धर्माला आरति ओवाळूं लागले. वाद्यांचा घोष चालू असतां धर्म राजवाड्यांत प्रवेश करूं लागला तेव्हां सुवर्णकलश घेऊन कुमारीगण त्याला सामोरा आला, व ब्राह्मणांनीं आशीर्वाद दिले, असा आनंदाचा प्रकार सर्व नगरांत चालला. हा सुखकारक मंत्रघोष ऐकून स्वर्गस्थ कर्णाला बरें वाटलें, परंतु* दुर्योधनाला वाईट वाटून तो धर्माच्या अंतःकरणांत येऊन त्याची निंदा करूं लागला; परंतु ब्राह्मणांनीं मंत्रघोषानें त्याला दूर केला. नंतर मोठ्या उल्हासानें धर्मानें गृहप्रवेश केला. नंतर अनेक तीर्थांचें उदक आणून व्यासादि मुख्य ऋषींनीं उत्तम विधियुक्त असा धर्मावर अभिषेक केला.

---

* या आनंदाच्या प्रसंगीं धर्माची निंदा करण्यासाठीं दुर्योधनाचा मित्र चार्वाक नांवाचा राक्षस त्रिदंडधर भिक्षुवेषानें तेथें आला होता. त्यानें धर्माचा धिक्कार केला. तेव्हां ब्राह्मणांनीं धर्माची पुनः समजूत करून मंत्रानें चार्वाकाचा वध केला. अशी गोष्ट इतरत्र आढळते पहा; मोरो. शा. प. ५-२०-३१ वरील कथेंत धर्माचें अंतःकरणच त्यास खात होतें. तें पुनः पुनः उचल करी असा भावार्थ दिसतो.

# अध्याय २ रा



## राजधर्मनीति—कथव

जयमेजय वैशंपायनास म्हणतो,—'मुनें धर्माला राज्याभिषेक होऊन जिकडे तिकडे आनंद झाला येवढें ऐकिलें आतां पुढील कथा कृपा करून सांगा.'–तेव्हां वैशंपायन म्हणाले,–' मागील अध्यायांत सांगितल्याप्रमाणें नीतिशास्त्र ऐकण्याकरितां श्रीकृष्णादि करुन मंडळी धर्माला घेऊन भीष्म शरपंजरीं पडले होते तेथें आले. श्रीकृष्णास पाहून भीष्माला संतोष झाला, सर्वांनीं भीष्मास नमस्कार केले. अनेक शस्त्रास्त्रांनीं मरण पावलेल्या वीरांच्या तसेंच हत्ती घोडे यांच्या शरीरांनीं रचिलेलें कुरु-क्षेत्रांतील पूर्वापर चितास्थान तेथें त्यांच्या दृष्टीस पडलें. तेव्हां श्रीकृष्ण धर्मास म्हणाले,' हें कुरुक्षेत्र फार प्रख्यात आहे. पूर्वी याठिकाणीं परशुरामानें क्षत्रियांच्या रक्तानें पांच डोह भरून पितृतर्पण केलें. सहस्त्रार्जुनाच्या पुत्रांनीं आपल्या मातापितरांचा वध केलेला पाहून परशुरामानें पृथ्वी एकवीस वेळां निःक्षत्रिय करून ब्राह्मणास देईन, अशी भयंकर प्रतिज्ञा केली. त्याप्रमाणें क्षत्रियांचा संहार करून त्यानें येथें जमलेल्या पांच डोह रक्तानें पितृर्पण केलें, व पुढें अश्वमेध करून कश्यपाला पृथ्वीदान केलें. हे जे कुरुक्षेत्रांतील रक्तडोह म्हणतात, ते तेव्हांपासून झाले. ही समग्र कथा दुसऱ्या स्तबकांत आली आहेच. पुढें पृथ्वी कटाळून कश्यपाला शरण गेली व म्हणाली, क्षत्रि-यांचा संहार झाला तो माझ्याकरितां झाला. आतां त्यांचे नातू पणतू माझें पालन करावयास तयार आहेत. असें पृथ्वीचें भाषण ऐकून. कश्यपानें क्षत्रि-यांच्या पुत्रपौत्रांची पुनरपि स्थापना केली, व त्यांचेच वंश सध्या चालले आहेत. याप्रमाणें धर्माला कथा सांगून श्रीकृष्ण भीष्मास म्हणाले,–' भीष्मा तूं त्रिकालज्ञ आहेस यास्तव वर्णाश्रमधर्माचा समग्र उपदेश धर्माला करून तो यथायोग्य राज्य करील असें कर. असें श्रीकृष्णाचें भाषण ऐकून भीष्म म्हणाले, ' कृष्णा, तूंच सर्व सृष्टीचा-उत्पत्ति, स्थिति व लयकर्ता आहेस; तुझ्या दर्शनानें त्रिविध तापापासून माझी मुक्तता झाली आहे.' त्यावर नारदानें धर्माला नीतिशास्त्र सांगण्याविषयीं भीष्माची विनंति केली तेव्हां भीष्म धर्माला नीतिशास्त्र सांगूं लागले. ते म्हणाले,–' बा धर्मा, युद्धामध्यें वध करणें हा क्षत्रियांचा धर्मच आहे. त्यांत खंत बाळगण्याचें कारण नाहीं

हे ऐकून धर्म म्हणाला,—" आजोबा चारी पुरुषार्थ ज्यानें साधतील, असा सर्वोत्तम राजधर्म मला सांगा."

भीष्म म्हणाला,–' बा, धर्मा, गोब्राह्मणांचें व प्रजेचें रक्षण व सत्य-भाषण हें पुरुषार्थाचें मुख्य साधन आहे. संकट प्राप्त झालें असतां राजानें धैर्य सोडूं नये. शांतचित्तानें, उदारपणानें, न्यायनिष्ठुरतेनें धर्माचरण करून इंद्रियांचे दमन करावें. याप्रमाणें वागल्यास वैभव त्याला कधींही सोडून जाणार नाहीं. व्यवहारामध्यें सरळ वागावें. अति मृदु किंवा अति कडक कधींहीं होऊं नये व ब्राह्मणास दंडूं नये. पराक्रम हाच क्षत्रियांचा खजिना होय. राजानें मृदुपणा धरिल्यास सहजच शत्रु त्याचा पराभव करितात. वसंतऋतूं-तल्या सूर्याप्रमाणे राजानें नेहमीं प्रखर असावें. आपले मित्र कोण व शत्रु कोण, हें प्रत्यक्ष जाणून घ्यावें. सर्व व्यसनें टाकून द्यावी व आपला उद्वेग कोणाला सांगू नये. अपराध्याला योग्य दंड करावयास भिऊं नये, व सेवकांबरोबर थट्टा करूं नये. तसें झाल्यास ते आपली अवहेलना करून कामांत कसूर करूं लागतात. द्यूत खेळणारे, स्त्रिया व जिंकलेले लोक, यांची संगति राजानें कधीं करूं नये. राजाजवळ बोलतांना थुंकणारा, राजाच्या आवडत्या हत्तीवर किंवा घोड्यावर आज्ञेशिवाय बसणारा, राजाजवळ सलगी करूं इच्छिणारा, व राजा आमच्या वचनांत आहे असें लोकांत सांगणारा, कोणी असेल तर राजानें त्याचा अवश्य त्याग करावा; व त्याच्यापासून नेहमीं सावध रहावें. कारण मृदु राजा व प्रवासी ब्राह्मण, या दोघांनाही पृथ्वी ग्रासून टाकते असें ज्ञाते म्हणतात, ज्यांशीं समेट करणें योग्य असेल त्यांशीं तो त्वरित करावा. तसेंच ज्यांशीं विरोध करणें योग्य असेल त्यांशीं विरोध करण्यासही उशीर लावूं नये. आपल्याशीं विपरीतपणे वागणारा, मग तो गुरु असो कीं मंत्री असो, त्याचा त्याग करावा. चारी वर्णांना आपापले धर्म राजानें शिकवावे, व कोणावर अति विश्वास टाकूं नये. आपल्या राष्ट्राचे गुणदोष आपण नेहमीं पहावे, परंतु शत्रूचें नेहमीं कोठे कमी पडतें तें पहात असावे. सर्वांची विचारपूस करून समाचार घ्यावा. नेहमीं सावध राहून स्थान,+ वृद्धि÷ क्षय,× पहात असावें. लोभ धरूं नये, भित्र्या माणसाचें वित्त हरण

+ राजाची शक्ति, सैन्य, खजिना, नगर आणि प्रदेश यांवर अवलंबून असलेली. ÷ वसुलाची वाढ. × खजिन्याची तूट.

करूं नये. परंतु दुष्टाचें हरण करण्यास हरकत नाहीं. मात्र तें सत्कार्याकडे खर्च करावें. दान देणें, उपभोग घेणें, तें नेहमीं यथाकालीं करावें.' भीष्म म्हणाले,–' धर्मा, आतां साहाय्य कोणाला करावें तें सांगतों. जे शूर, चांगल्या कुलांत जन्मलेले, ईश्वरभक्त, आरोग्ययुक्त, विद्वान्, धर्माच्या ठायीं श्रद्धा असणारे, इहपर लोकांची प्राप्ति करून घेण्याची अपेक्षा करणारे, असे सज्जन असतील त्यांना साहाय्य करावें. निर्व्यसनी व जितेंद्रिय राजावर सर्वांचा विश्वास बसतो. सुज्ञ, गुणवान् शत्रूंचा कमी पक्ष नेहमीं लक्षांत ठेवणार, न्याय व अन्याय यांची योग्य निवड करणारा, असा राजा पाहिजे. जो चांगला राजा असतो तो कार्याच्या आरंभींच प्रौढी न मिरवितां कार्य उत्तम रीतीनें शेवटास नेतो. राजानें गुप्त हेर ठेवून त्यांच्याकडून माहिती मिळवावी, अपराध्यांना योग्य दंड करावा, व साधूंचा त्याग करूं नये. शत्रु निर्बल असला तरी त्याची उपेक्षा करूं नये. कारण विष थोडें असलें तरी तें घातकच होतें. बाहेर सरळपणा, पण आंतून धूर्तपणा ठेवून राज्य करावें. नेहमीं धर्माचरण करावें, कारण धर्माशिवाय राजाला दुसरें इष्ट कांहीच नाहीं.' भीष्म म्हणाले,–' धर्मा, हें नीतिशास्त्र प्रथम नारायणानें शिवास, शिवानें इंद्रास व इंद्रानें बृहस्पतीस सांगितलें. पुढें बृहस्पतीकडून तें शुक्रास कळलें व शुक्राचार्यांनें तें नारदास सांगितलें, नारदमुनीपासून हें नीतिशास्त्र मी संपादन केले.' एवढें बोलून भीष्म म्हणाला,–' धर्मा, याप्रमाणें या नीतिशास्त्राचा या लोकांत प्रसार झाला.' नंतर ज्याच्या सुखदुःखानें सर्व लोक सुखी किंवा दुःखी होत होते, अशा त्या सर्वोत्तम धर्मराचानें भीष्मास विचारिलें; राजा आणि प्रजा यांचीं शरीरें समसमान असतां राजा विष्णूचा अंश म्हणतात तें कां ? धर्माचा प्रश्न ऐकून भीष्मानें त्याला एक कथा सांगितली.

## राजाला विष्णूचा अंश कां म्हणतात ?

भीष्म म्हणाले,–' धर्मा, पूर्वीं राजा, राज्यव्यवस्था, कायदाकानू असें कांहींच नव्हतें. सर्व लोक आनंदानें राहत होते. असें असतां एकाएकीं त्यांच्या बुद्धीला भ्रंश होऊन मोह उत्पन्न झाला व त्यांना खेद होऊं लागला, आणि कोणी नियता नसल्यांमुळें धर्माचा लोप होऊं लागला. तेव्हां सर्वांनीं

मिळून अंग नांवाचा राजा अधिकारावर नेमिला. त्यानें मृत्यूची मानसकन्या सुनीता नांवाची होती, तिच्याशीं विवाह केला. तिच्या पोटीं त्याला वेन नांवाचा पुत्र झाला. त्या वेनानें प्रजेच्या विरुद्ध वर्तन केल्यामुळें ऋषींनीं शाप देऊन त्याचा वध केला. परंतु राजा नाहींसा झाल्यामुळें त्या ऋषींनीं त्याच्या उजव्या मांडीचें मंथन केलें. तेव्हां त्यापासून एक अति कुरुप ठेंगू पुरुष उत्पन्न झाला, आणि त्याच्यापासून भिल्लांची उत्पत्ति झाली, म्हणून ऋषींनीं पुनः वेनाच्या दक्षिण हस्ताचें मंथन केलें. तेव्हां त्यापासून पृथु नामक शास्त्रास्त्रांनीं युक्त असा पुरुष जन्मास आला. त्यानें ऋषींचीं प्रार्थना करून त्यांना ‘ काय करूं ?’ असें विचारिलें, तेव्हां त्यांनीं सांगितलें,‘ हे पृथो, धर्मरक्षण कर; काम–क्रोधादिकांचा त्याग करून व आवड निवड सोडून यथान्याय शासन कर, ’ असें सांगून त्यांनीं शुक्राची पुरोहिताच्या जागीं योजना केली, आणि वालखिल्य ऋषींना मंत्रिपद दिलें, नंतर पृथूनें धनुष्य-बाण घेऊन पृथ्वीवरील उंचपर्वत मोडून तिला सपाट केलें, त्या वेळीं इंद्रादि-देवांनीं पृथ्वीवर येऊन पृथूची सिंहासनीं स्थापना केली, व त्याच्या राज्यांत आपल्या सामर्थ्यानें धनधान्यांची समृद्धि केली, मेरु पर्वतानें आपली कन्या पृथूला दिली, तेव्हां पृथूनें मनांत आणतांक्षणींच कोटयावधि हत्ती घोडे त्याच्या पुढें प्रकट झाले, पृथूच्या योग्य प्रकारच्या कायद्यामुळें सर्व लोक स्वधर्मानें राहू लागले. व पर्वतावरून मार्ग तयार होऊन पृथ्वी इच्छित मनोरथ पूरवि-णारी झाली. पृथूवर सर्व प्रजा संतुष्ट झाली, तेव्हा श्रीविष्णू त्यास सांगितलें हे पृथो, तूं मजप्रमाणेंच तिन्ही लोकांस मान्य होशील. योग्य दंड आणि नीती याही करून पृथूच्या घरी राहू लागली. तेव्हांपासून राजाला विष्णूचा अंश म्हणूं लागलें, चौदा विद्यांचा प्रसारहीं तेव्हांपासून झाला. यासाठी जो सर्वमान्य राजा असेल तो देवांश समजावा. धर्मा, अशा प्रकारें उत्तम राज्य करणार राजा चिरकाल स्वर्गसुख भोगितो; आणि पुण्यक्षय झाल्यानंतर तो पुन्हां राजकुलातच अवतार घेतो. परंतू याच्या उलट वागणारा नरकप्राप्ति ठेवले लीच आहें धर्मा, आतां नीति लक्षांत ठेवून त्वां उत्तमरितीनें राज्य करावे (हे पृथुचरित्र सातव्या स्तबकांत संपूर्ण आलें आहे.)

# अध्याय ३ रा.



## वर्णाश्रमधर्म आणि राजनिति.

जनमेजय राजा वैशंपायनास म्हणाला, 'मुने, आतां पुढील कथा सांगावी.' तेव्हां वैशंपायन सांगू लागला, 'भीष्मानी धर्माला राजनीतीचा महिमा सांगितल्यावर धर्मानें त्यांना चारी वर्ण आणि आश्रम यांचें धर्म, तसेच कोश दंड, दुर्ग इत्यादि राज्यवृद्धीचें उपाय पुरोहित व उपाध्याय निवडण्याचें प्रकार आपत्तिधर्म आणि आत्मसंरक्षण करण्याचे मार्ग याविषयी उपदेश करण्याची विनंति केली. भीष्म म्हणालें, सर्व वर्णांना मुख्य असें नऊ धर्म सांगितले.

अक्रोधः सत्य वचनं संविभागं क्षमा तथा ।
प्रजनं स्वेषु दारेषु शौचमद्रोह एव च ॥
आर्जवं भृत्यभरणं नवैते सार्ववर्णिकाः ॥

ते असें:-क्रोध येऊं न देणें, सत्य भाषण करणें, आपल्यापाशी असलेल्या वस्तूचा इतरांना यथाशक्ति वाटा देणें, क्षमा करणें, स्वस्त्रीच्या ठायीं मात्र प्रजा उत्पन्न करणें, स्वच्छता ठेवणें, कोणाचा द्वेष न करणें, सरळपणा धरणें व सेवकांचे पोषण करणें याशिवाय देहदमन, वेदशास्त्राचें अध्यतन आणि कर्म-निष्ठपणा हे गुण ब्राह्मणांमध्ये असावे. आपल्या वृत्तीनें द्रव्य मिळवून त्यानें धर्माविरूद्ध कर्म न करितां यज्ञानुष्ठान करावे. देव, ऋषि आणि पितर यांना भाग देऊन मग आपण भोग भोगावे, क्षत्रियांना दान करावे, परंतु घेऊं नये. यज्ञयागाचे रक्षण करून पराक्रम करावें, युद्ध करून चोरांना शासन करावे, याप्रमाणें राजाचा धर्म आहे. त्याने स्वतः धर्मनिष्ठ राहून धर्मानें प्रजेचें रक्षण करावे. वैश्यांनें सर्व प्रकारें पशूंचें पालन करावे. क्षुद्रातें वरील तिन्ही वर्णांची सेवा करावी. शूद्रानें ब्राह्मणांची सेवा केल्यास तो जन्ममर-णाच्या फेऱ्यांतून मुक्त होईल, असो; स्त्रिया आणि + शूद्र यांनी कर्मे करणें

+स्त्रिया व शूद्र ह्या अज्ञान व विद्याहीन असत. म्हणून शास्त्रकारांनी त्यास मंत्राचा अधिकार ठेविला नाही; परंतू विद्या संपादन करून ज्ञानवान झालेल्या सर्व मनुष्य प्राण्यास सर्व अधिकार आहेत.

तीं मंत्राशिवाय करावी. दान करणें हाच त्याचा मोठा धर्म, याप्रमाणें निरनिराळ्या वर्णांचें धर्म आहेत.

भीष्म म्हणाले,–'धर्मा, आता तुला आश्रमधर्म सांगतो तो ऐक. पहिला ब्रह्मचर्याश्रम. त्यांत गुरुची सेवा करुन शास्त्राभ्यास करावा. नंतर ब्रह्मचर्य-व्रत सोडून गृहस्थाश्रमाचा स्वीकार करावा. या आश्रमात अग्निहोत्र, सत्यभाषण व अथितीसत्कार करून स्वस्त्रीचे मात्र सेवन करावें, आणि वेदविहीत मार्गाचे आचरण करावें. हा आश्रम सुटल्यावर पुनः ब्रह्मचर्याचा स्वीकार करून अरण्यांत राहावें व कंदमुळें फळे, यावर निर्वाह करून शास्त्राभ्यासात काल घालवावा याला वानप्रस्थाश्रम म्हणतात. यांच्या पुढचा संन्यासाश्रम, यांत सर्व विषयाचा त्याग करून बुद्धी सर्वत्र सारखी ठेवून निर्विकार अशा ब्रह्माचें चिंतन करावे, म्हणजे तो पुरूष ब्रह्मपदाला पोचतो. जो ब्राह्मण निषीद्ध कर्मांचें आचरण करून शूद्रादिकांची सेवा करतो, तो नरकवास भोगतो. जे आपल्या श्रेष्ठ वर्णाला उचित अशी कर्मे करितात त्यांना उत्तम गति मिळते. जो राजा यथायोग्य राज्य करून नंतर आपल्या पुत्राला राज्यावर बसवितोः व अश्वमेधादि यज्ञ करून राजर्षि होतो. त्याला उत्तम गति मिळते. ज्याप्रमाणें गजान्त लक्ष्मीत सर्व अधिकारांचा समावेश होतो, त्याप्रमाणें राजधर्मातही सर्व धर्मांचा अन्तर्भाव होतो, असो. धर्मा, चारही वर्णाला आश्रमधर्म, नित्यनैतिक कर्मे हीं विहीत असून, धर्म, अर्थ, काम आणि मोक्ष, या चारी पुरूषार्थाचे ते अधिकारी आहेत. धर्मा, राजधर्मासारखा दुसरा धर्म नाहीं. राज्यसुखाचा योग्य उपभोग घेतल्यानें स्वर्ग आणि मोक्ष हे दोन्ही साध्य होतात, इतर धर्मांचें फल अल्प असून, त्यांत कष्ट मात्र फार आहेत. सिद्ध, साध्य, वसु, रुद्र, आदित्य, अश्विनीकुमार, इंद्र इत्यादि सर्वांना राजधर्मानेंच श्रेष्ठत्व मिळालें आहे. या विषयीं मी तुला एक इतिहास सांगतों. एकदां दैत्यांनीं मोठें तप करून सर्व पृथ्वीवर जिकडेतिकडे एक समुद्रच करून टाकिला. याप्रमाणें समुद्राला मर्यादा नाहींशीं झाल्यावर, मांधाता राजानें यज्ञ करून विष्णूची आराधना केली; पण विष्णु कोणालाच प्रत्यक्ष दर्शन देत नसल्यामुळें, त्यानें मांधात्याला इंद्ररूपानें दर्शन दिले. तेव्हां मांधात्यानें त्याला विचारलें कीं,–राजधर्म लोकांत कसा उत्पन्न झाला,–तें मला सांगा. तेव्हा इंद्ररूपी विष्णु म्हणाला,—'राजा, हा क्षात्रधर्म

मुळीं अनादि असून इतर सर्व धर्म याच्या पोटांत आहेत. पूर्वी विष्णूनें राक्षस कुलाचा नाश करून सर्व वर्णाश्रमांचा प्रतिपाल केला, व राजधर्माला श्रेष्ठ पदवी प्राप्त करून दिली. याप्रमाणें हा क्षात्रधर्म प्रख्यात आहे. या एका धर्माच्या रक्षणानें सर्व धर्माचें रक्षण होते ब्राह्मणांचेंहीं त्या शिवाय कल्याण होणार नाहीं.'—या प्रमाणें कथा सांगून भीष्म म्हणाले,—'धर्मा, राजधर्मानें दंड धारण करून परराष्ट्राचें मर्दन व आपल्या प्रजेचें पालन कर. असें करणाऱ्या राजाला सर्व यज्ञांचें फल प्राप्त होते अपराध्यांस दंड करणें व सज्जनांवर कृपा करणें, हें व्रत पत्करून जो राजा स्वधर्मनिष्ठ ब्राह्मणादि चार वर्णांचें रक्षण करितो तो त्या सर्वांच्या पुण्याचा वांटेकरी होतो, जो राजा आपल्या इंद्रियांवर जय मिळवितो, तो शत्रूंना सहज जिंकतो. असो.

## राज्य करण्याचे प्रकार

आतां कौशल्यानें राज्य करण्याचा प्रकार तुला सांगतों. खेडीं, गांवें, शहरें, व राजवाडे यांची राजानें उत्तम निगा राखावी. विश्वासू हेर जिकडे तिकडे नेमून त्यांच्याकडून बातमी काढावी. शत्रूस बळ असल्यास त्यांना आपलें बळ समजू न देतां त्यांशीं सलोखा करावा. निर्बल शत्रूला नष्ट करावें. प्रजेपासून तिच्या रक्षणासाठींच कर घ्यावा. जाणते पुरुष अधिकारावर नेमून राष्ट्रांत सर्वत्र धान्याचा संग्रह करावा. संकटकाळीं धान्यांच्या शेतांचें नीट रक्षण करावें, व शत्रूच्या ताब्यांत जाण्याचा प्रसंग आल्यास तो जाळूनच टाकावीं. नदींवरील उताराच्या जागा आणि किल्ले यांचें रक्षण करावें. किल्लयावर व शहरांच्या वेशीवर + तोफा लावून ठेवाव्या. देशांत जलाचा पुरवठा करण्यासाठीं विहिर व तलाव खणावें. खजिना, शस्त्रास्त्रें, हत्ती, घोडे, यांचें रक्षण करण्यासाठीं राजानें शूर शिपाई ठेवावें. आपण स्वतः आपलें प्रधान, आपले हितकर्ते, मित्र, खजिना, राजदंड (न्यायखातें), देश, आणि नगर या सातांचा राजानें अत्यंत काळजीनें प्रतिपाल करावा. ओस पडलेलीं शहरें पुनः वसवावीं. आणि धर्म, अर्थ, व काम यांचें यथाशास्त्र सेवन करावें. याप्रमाणें दंडनीतीनें राज्य केल्यास सत्ययुगा प्रमाणें लोक

+ मुळांत भडिमार यंत्रे म्हटलें आहे. भारतांत यंत्राणि, शतघ्नाः असें शब्द आहेत.

सुखी होतील. नाहीतर कलीचा फैलाव होईल. कलीचा प्रसार असा आहे कीं,-शुद्र भिक्षा मागू लागून ब्राह्मणादिवर्ण सेवावृत्तीनें रहातील. वैदिक कर्माचा नाश होऊन जिकडेतिकडे रोगप्रसार होईल आणि अनेक स्त्रियांच्या कपाळीं वैधव्य येईल. पाऊस चांगला पडणार नाहीं, व एकंदरींत प्राणी-मात्राला क्लेश होतील. या कलिमार्गानें राजाला नरकप्राप्ति होईल. यास्तव राजानें योग्य मार्गाचें ज्ञान करून व सत्यधर्मानें वागून स्वर्गप्राप्ति करून घ्यावी, राजानें आत्मस्तुति करूं नये, सत्पात्री धर्म करावा आणि शत्रूवर विश्वास कधींही ठेऊं नये. विषयांचें अतिसेवन करूं नये, देव-ब्राह्मणांची भक्तीने पुजा करावी, व अपकार करणारावरही भलत्याच प्रसंगी रागावूं नये. गाईची कांसच छेदल्यास, ज्याप्रमाणें प्राण्याला दूध मिळणार नाहीं, त्याप्रमाणें प्रजेला पीडा झाल्यास, पृथ्वीपासून राजाला अनर्थ प्राप्त होईल. माळी झाडांची जशीं जोपासना करितो, त्याप्रमाणें राजानें प्रजेला वागवावें. विद्यावंत पुरोहित ठेवून अदृष्ट संकटांपासून, प्रजेचें रक्षण करवावें; आणि दृष्ट संकटांचा स्वत: राजानें परिहार करावा.

## मुचकुंद राजाची कथा

एकदां मुचकंद राजानें स्वपराक्रमानें सर्व पृथ्वी जिंकून, आपल्या बलाची परीक्षा करण्याकरितां तो कुबेरावर चालून गेला. तेव्हां राक्षसांच्या साह्यानें कुबेरानें त्याच्या सर्व सैन्याचा नाश केला. त्यामुळें मुचकुंद राजानें आपला पुरोहित जो वसिष्ठ याचें साहृय मागितलें. वसिष्ठानें आपल्या तपोबलानें सर्व कुबेर-सैन्याचा नि:पात केला. तेव्हां कुबेर म्हणाला,---मुच-कुंदा, तूं कपट करून ब्राह्मणांकरवीं माझें सैन्य मारविलेंस. त्यावर मुचकुंद म्हणाला, मंत्राच्या बलावर ब्राह्मण पराक्रमी आहेत, व क्षत्रीयांचा पराक्रम शस्त्रांच्या बलावर आहे. अर्थात् दोहोंच्या संयुक्त बलावरच सर्व प्रजा सुखीं होतें. यासाठीं पुरोहित आणि राजा या दोघांनींही सदा एकमतानें असावें. जो ब्राह्मण खरोखर चांगला असून, निर्वाहाचे साधन नसल्यामुळें जर अन्यायानें वागत आहे, तर राजानें वृत्ति देऊन, त्याला न्यायमार्गाला लावावे. ब्राह्मणानें आपत्काली फार तर क्षत्रियधर्म स्वीकारावा; परंतु याहून खालच्या वर्णाचीं कर्में करूं नयेत. मद्य, मांस, यांचा विक्रय ब्राह्मणानें कोणत्याही स्थितीत करूं नयेत विद्वान,

समदर्शी शमदमांनी युक्त, अशाच ब्राह्मणांना राजानें उपाध्याय नेमावे. थोडकेही कृत्य एकट्याच्या हातून पूर्णपणें तडीस जात नाही. यास्तव राजानें नेहमी अधिक प्रधान नेमावे. सहार्थ, सहज, भजमान कृत्रीम आणि धर्मात्मा असे पांच प्रकारचें प्रधान असतात. त्यात सहज भजमान हे श्रेष्ठ होते प्रधानमंडळ असलें तरी राजानें सर्व काम स्वतः पहावी, पण कोणापाशी उन्मत्तपणें वागू नये. विश्वास किंवा अविश्वास कोणावरही अति न टाकतां राजानें समवृत्ति धारण करावी. स्वामीची उणीव पाहून ज्याला वाईट वाटते; व जो स्वतंत्रपणें अर्थप्राप्ति करूं इच्छित नाही, तो खरा मित्र होय, त्याचा मात्र राजानें पूर्ण विश्वास धरावा. परस्परविरोध असें प्रधान राजानें नेमू नयेत. विद्वान व धोरणीं अशा प्रधानाचें गौरव करून त्याच्याकडून कार्यें करवावी. आपल्या ज्ञातीशी भेदभाव करूं नये. कारण ह्यायोगानें वैरी व खुद्द ज्ञातिगृहस्थ या दोघांपासूनहीं भय प्राप्त होते. ज्ञातीला प्रसंगी मान द्यावा; पण त्याचें गुणदोष बोलूं नयेत. प्रसंगीं लोक वेडेवाकडे बोलले तरी धूर्त पुरूषांनें त्याकडे विशेष लक्ष देऊ नयें. ज्ञाती-संबंधानें पहातां, अन्नदान, मानमरातब, सहनशीलता, ही एकप्रकारचीं शस्त्रेच होत. एकादा प्रधान प्रजेला पीडा करून किंवा राजभंडारातून द्रव्य हरण करीत असून, त्या संबंधामें एकाद्या सेवकानें योग्य बातमी दिली तर त्या सेवकाचें राजानें नीट रक्षण करावे. याविषयी एक पूर्वींची कथा तुला सांगतो.'

## कालकक्षीय ऋषीची कथा.

एकदां + कालकक्षीयऋषि एक कावळा पिंजऱ्यांत घालून कोसल देशाच्या राजाला भेटावयाला गेला. हा कावळा भूत, भविष्य, सर्व जाणत असें. ऋषीनीं सभेंत जाऊन राजाला सांगितले, कीं हा कावळा सर्वज्ञ असून, त्याच्या प्रसादानें मी बोलत असतो. महाराज, आपला प्रधान भांडारातून द्रव्य हरण करीत असतो.' हे ऐकून राजा म्हणाला,–'हा ऋषि खोटें बोलणार नव्हे.' परंतू जेव्हा प्रधानाला हीं वार्ता समजली, तेव्हां त्यानें दूतांकरवी त्या कावळाला ठार मारविले. त्यावेळीं ऋषिस चिंता प्राप्त होऊन तो

+ मूळ भारतांत कालकवृक्षीय असें नांव आहे.

राजाला म्हणाला;–'हे राजा, मला जीवदान द्यावे. आपल्याला होत असलेल्या अपायाची आपल्याला मी बातमी दिली. त्यायोगे माझा कावळा प्राणास मुकला. यावरून राजसेवा फार कठीण आहे असें झाले. आपल्या पदरी दुष्ट प्रधान असून, तो राज्याचा नाश करून आपली खळगी भरूं पहातो त्यानें कपटानें माझा कावळा मारिला, यास्तव मला येथें राहाणें धोक्याचें वाटते. राजा, तुझ्या हितासाठी म्हणून मी तुला सत्य सांगितले. परंतु खरोखर माझ्याकडून हा दोषच झाला म्हणावयाचा, असो झाले ते झाले; आतां मी येतो.' हे ऋषिचें भाषण ऐकून राजा म्हणाला,–'ऋषे, आपण म्हणतां याप्रमाणें आजपासून मी खचित करीन, जे तुमच्यांपाशीं नीट वागणार नाहीत, त्यांना मी कडक शासन करीन.'–असें सांगून राजानें कालकक्षीय ऋषिला ठेवून घेऊन प्रधानाला काढून टाकले. अशी कथा सांगून भीष्म धर्माला म्हणालें,–'धर्मा, आपल्याच हितासाठीं म्हणून राजानें मुचकुंदाप्रमाणें वर्तावे, आणि सर्व प्रकारचें ज्ञान करून घेऊन दुष्टांचें उन्मूलन करावे, नाहीतर आपली गुप्त कारस्थानें बाहेर फूटून राज्याचा नाश होईल मंत्री नेमावयाचा तो विचार करून नेमावा. कुलीन, परंपरा जाणणारा, शूर बहूश्रुत विवेकी, राजावर प्रीति करणारा, असा गुणी प्रधान असावा. सरळ मार्गानें न जाणारा, क्रोधी, लोभी, फितुरी करणारा, लोकांचा द्वेष करणारा असा असल्यास त्याचा त्याग करावा. ज्याप्रमाणें मंत्री फितुर झाल्यास राज्य समूल नाश पावेल. राज्याचा मुख्य आधार मंत्री होय. तो सर्वांशीं हसून बोलणारा दान मान देऊन त्यांना संतोषविणारा असल्यास त्याला सर्वजण वश होतात. असा मंत्री उत्तम होय.' वैशंपायन म्हणतात,–' जनमेजया, याप्रमाणें भीष्मांनी धर्माला वर्णाश्रम धर्म आणि राजधर्मनीति यांचा उपदेश केला. आतां पुढच्या अध्यायांत राज्याचें पालन कसे करावे, कार्य कोणते. अकार्य कोणते, हें संक्षेपानें सांगणार आहेत.

---

## अध्याय ४ था



### प्रजाधर्म प्रतिपालन

जनमेजय म्हणतो,–' हे मुने, राजनीतिप्रभाव मी येथवर ऐकिला,

आतां, पुढील नीति कथन करावी.' तेव्हा वैशंपायन सांगू लागले. धर्मानें या प्रमाणें राजनीति ऐकल्यावर भीष्म पुढें म्हणाला,–' धर्मा, चार वेदशास्त्र जाणणारे शूचिर्भूत ब्राह्मण, आठ बलवान् क्षत्रिय, एकवीस शुद्ध वैश्य आणि तीन शूद्र, यांच्या साहाय्यानें राजानें राज्यकारभार करावा, आणि प्रजेचें कुशलतेनें पालन करावें. अधर्मानें प्रजापालन केल्यास अमात्यासह राजा नरकांत जातो. भाषण करणाऱ्या दूताचे राजाने संकटसमयीं रक्षण करावें. चांगल्या कुलांत जन्मलेला सच्छील, तेजस्वी, चतूर, गोड भाषण करणारा, खरे बोलणारा, सर्वांस आवडता आणि उदार, अशा सात प्रकारच्या गुणांनीं युक्त असाच दूत राजानें जवळ ठेवावा. त्याचप्रमाणें सेनापति नेमावयाचा तोही धर्म जाणणारा. संधि किंवा विग्रह (युद्ध) करण्यांत कुशल, शीलवान् व पराक्रमी असावा. त्याला आयुधांचें व यंत्रांचें ज्ञान असून, तो सोशीक प्रकृतीचा असावा; व शत्रूच्या मर्मस्थानांची त्याला चांगली माहिती असावी. राजानें दुर्ग करून त्यांत रहावें. ते दुर्ग सहा प्रकारचे आहेत. धनदुर्ग, महीदुर्ग, गिरीदुर्ग, मनुष्यदुर्ग, वृक्षदुर्ग आणि वनदुर्ग, या दुर्गांत राजानें सुंदर नगर बनवून त्याच्या भोंवतीं मजबूत पोंकळी व कोट करून बाहेर खंदक करावा. नगरांत हत्ती, घोडे, असावे. ब्राह्मणांच्या वेदघोषांत देवतापूजनादि विधि थाटानें होत असावे. अशा नगरात राजानें आपल्या अमात्यांना व सैन्याला खुष ठेवून आपल्या कुटुंबासह रहावे. नगरांत राजाने खजिना शस्त्रास्त्रें, औषधें, सर्व प्रकारची बीजें, नानाप्रकारची फळें, इत्यादिकांचा संग्रह करावा. ठिवठिकाणीं बागबगीचे, कारंजीं हीही करावी. सर्व राष्ट्रांवर लक्ष ठेवून दीनांना अन्न, वस्त्र पुरवावें, तापसी लोकांना संतुष्ट ठेवावें व शत्रूचा निग्रह करावा.' नंतर भीष्म म्हणाले,–' धर्मा, संपूर्ण देशाचा राज्यकारभार करण्याची रीत आतां सांगतो; ' एकग्राम, वीस ग्राम, शभर आणि सहस्र ग्राम, असे देशाचे भाग करून त्यांवर निरनिराळे अधिकारी नेमावे. लहान भागांचे गुणदोष उत्तरोत्तर मोठ्या भागांनीं पहावें. तसेंच कर वसूलही लहान भागांकडून मोठ्या कडे, अशा यथोत्तर क्रमानें गोळा करावा. प्रधानानें देशांतील संपत्ति, धनधान्य उद्योग-धंदे, यांविषयीं सूक्ष्म माहिती मिळवून राजाला कळवावी. खर्चाचा अंदाज पाहून त्याच्या धोरणानें कर ठेवावा. राजा व प्रजा या दोघानाही सुखी करणें हें काम फार बिकट खरें; परंतु तें प्रधानानें मोठ्या दक्षतेनें केलें पाहिजे.

नरपतिहितकर्ता द्वेष्यतां याति लोके,
जनपदहितकर्ता त्यज्यतं पार्थिवेन ।
इति महति विरोधे विद्यमाने समाने,
नृपतिजनपदानां दुर्लभ कार्यकर्ता ॥

असो; राजानें अतिमहत्त्वाकांक्षा धरूं नये. राजाला विपत्काल आल्यास आपल्या कुटुंबासह रक्षण करण्यासाठीं त्यानें लोकांत विनंति करावीं त्यांच्यावर जुलूम करूं नये, व त्यांचा अपमानही करूं नये. ज्याप्रमाणें भुंगा फुलांतील मध काढून घेतो, परंतु फुलाला दुखवीत नाहीं; त्याप्रमाणें सौम्य उपायांनीं राजानें आपलें कार्य साधावें. धर्मा, राजा जर नियमानें चालणार नाहीं, तर तो लोकांच्या पापाच्या चतुर्थ भागाचा वांटेकरीं होतो, सुज्ञ, विद्वान, तपस्वी या लोकांचें संरक्षण केल्यास राज्याचा उत्तरोत्तर उत्कर्ष होतो. फळें येणारे वृक्ष न तोडतां राजानें नित्यशः लक्षावधि वृक्षांची लागवड करावी. परकी लोकांचें संकटसमयीं आपल्या लोकांपासूनही रक्षण करावें त्यांतल्यात्यांत राजानें आपलें रक्षण सर्वांपासून करावें. राजा पापमार्गी असल्यास लोकही पाप करूं लागतात, व तेणेंकरून राजाला नरकप्राप्ति होते. यास्तव राजानें कसेंही करून स्वधर्मनिष्ट असावें. थंडी, उन्हाळा, पाऊस, यांत विपरीत प्रकार होण्यास राजाच्या चुकाच कारणीभूत होतात. कृत, त्रेता, द्वापार आणि कलि, ही युगे राजावरच अवलंबून आहेत. राजानें कोणाला अन्यायानें दंड केल्यास त्यांच्या अग्नीसमान अश्रुपातानें राजाचें कुटुंब दग्ध होतें. राजानें सच्छील असे दूत नेमावें. नानाविध उपाय करून राजानें धर्म राखावा. स्वदेशीं किंवा इहपरलोकीं धर्मच आपल्या कामीं येतो. धर्मा ही संपूर्ण राजनीती उतथ्य ऋषीनें मांधात्याराजास सांगितली, ती मीं तुला आज निवेदन केली. त्यांतील तात्पर्य एवढेंच कीं, यथान्याय गोब्राह्मणांचें पालन करणें व धारातीर्थीं देह ठेवणें, याशिवाय क्षत्रियाला उचित धर्म नाहीं. हे भीष्माचे भाषण ऐकून धर्मराजानें मध्येच विचारलें की,–'जे 'क्षत्रिय रणांगणांत प्राणत्याग करितात, त्यानां कोणती गति प्राप्त होते?' तेव्हां भीष्म म्हणालें,–'धर्मा, याविषयी तुला इंद्र व अंबरीष यांचा संवाद सांगतो तो ऐक. पुर्वी अंबरीष नावाचा राजा होता. त्या राजाचा सुदेव नावाचा प्रधान त्या राजाहून श्रेष्ठ असून इंद्राप्रमाणें होता हें पाहुन त्याचे कारण काय असावें, असे अंबरीषानें प्रत्यक्ष इंद्राला विचारले. तेव्हां इंद्र म्हणाला,

या सुदेवानें पूर्वी उत्तमप्रकारचा पुत्रयज्ञ केला होता, व त्याच्या पुण्यामुळे तो तुझ्याहून श्रेष्ठ झाला आहे. त्याच्या रणयज्ञात घोडे, हत्ती, हेच अध्वर्यू व ऋत्विज् असून वीरांचे मांस आणि रुधिर हीच यज्ञसामुग्री व घृत होती. याप्रमाणें सर्वांगपूर्ण रणयज्ञ केल्यामुळेंच सूदेवाला हे श्रेष्ठपद मिळालें आहे. यासाठीं जे वीर युद्धांत मरण पावतात, त्याच्यासाठी सुज्ञ पुरुषानें कधीही शोक करूं नये. त्या वीरांना सहस्रावधि अप्सरा माळ घालतात. त्याच्याबद्दल स्नान करणे किंवा अशौच(सुतक) धरणेंही अयोग्य होय. तसेच युद्धांत मूल, वृद्धपुरुष किंवा स्त्री यांस कोणी दांती तृण घेऊन शरण आल्यास त्यासही क्षत्रियानें अभयदान द्यावे.' असे सांगून इंद्र अंबरीषास म्हणाला, 'अंबरीषा, मीही नमुचिआदिकरून शत्रूंचा युद्धांत वध केल्यामुळेंच इंद्रपदाला पावलो.'

याप्रमाणें इंद्र व अंबरीष यांची कथा सांगून भीष्म म्हणाले,-'कोणी एके काळी प्रतर्दन आणि जनक, यांच्यात भयंकर युद्ध सुरुं झाले. त्यावेळीं जनकानें आपल्या वीरांना दिव्यचक्षु देऊन त्याना स्वर्गनरकादि सर्व लोक दाखविले; आणि सांगितलें की युद्धांतून पळून जाणारा हा नरकलोक प्राप्त होतो; व युद्धातच देह ठेवल्यास स्वर्गलोक प्राप्त होतो' हे ऐकून जनकाच्या सैनिकांनी लढण्याची पराकाष्टा करून जय मिळविला. असो; युद्धांस निघताना सुमुहूर्त पाहून प्रयाण करावें, व लहान मोठे सर्व सरदार मिळवून नीट खलबत करावें. वैऱ्याची कधी उपेक्षा करूं नये. कारण त्याला अर्धवट ठेवल्यास राखेतील अग्नीप्रमाणें तो जागृत असतो, व प्रसंग पाहून पुनः उठतो. यासाठीं मंत्र-तंत्र, साम-दाम, इत्यादि उपायानी त्याला समूल नष्ट करून टाकावे. वेळी शत्रू आपल्याहून प्रबल दिसल्याम त्याशीं प्रथम नमून वागून, नेहमी सावध राहावें.' याप्रमाणें भीष्मानी सांगितलेला क्षात्रधर्म ऐकून, युधिष्ठीरानें विचारले,-' धर्म अनंत आहेत; तर त्यांत उत्तम कोणता?' तेव्हां भीष्म म्हणाले,-'माता व गुरू यांची सेवा करणें, हा सर्वात उत्तम व श्रेष्ठ धर्म होय, ही तीन म्हणजे गार्हपत्य, दक्षिणाग्नि आणि आहवनीय अशा तीन अग्नीचींच रूपें होत. हें अग्निहोत्र जो पुत्र उत्तम प्रकारें पाळील, त्याला सर्व देव, वेद व तीन्ही लोक यांची सेवा केल्याचें पुण्य मिळेल. त्याचे इहपरलोकींचे सर्व मनोरथ पूर्ण होतील. हा

धर्म जो पाळणार नाहीं, तो सर्वात अधम होय.' यानंतर प्रजापालन, पदार्थसंग्रह व राजधर्म हे तीन प्रकार भीष्मानें धर्माला संक्षेपानें सांगितले.

---

# अध्याय ५ वा



## राजधर्म

वैशंपायन जनमेजयाला म्हणाले,–'सत्य आणि असत्य हीं कोणाजवळ व केव्हां बोलावीं ?'–असें धर्मानें विचारिलें असतां भीष्म सांगू लागले;–'धर्मा, मरणप्रसंगीं, विवाहाकरितां धर्मरक्षणास्तव व गाईचें रक्षण करण्यासाठीं, केलेलें असत्य भाषण असत्य नसून सत्यच होय. जे सत्य बोलले असतां दुसऱ्याच्या नाशास कारण होते, त्याहून दुसरे भयंकर असत्यच नाही. पापी पुरुषांशीं राजानें कसलाही संबंध ठेवू नये. कपटाशी कपटानें वागावे व साधूशी प्रेमानें वागावे. मनापासून धर्मनिष्ठ, वैराग्यशील प्राणान्तीही खोटे न बोलणारे, स्वदारासक्त आणि पात्रापात्र जाणणारे, अशा लोकांना वैकुंठादि उत्तम लोक प्राप्त होतात.'–हे ऐकून धर्मराजानें विचारलें 'पात्रापात्र विचार म्हणजे काय?' तेव्हां भीष्म म्हणाले, 'धर्मा, याविषयीं मीं तुला एक कथा सांगतो,'

## एका ऋषीची गोष्ट

एका निर्जन अरण्यांत एक ऋषी तपश्चर्या करीत होता, त्याची समवृत्ति पाहून सिंह, व्याघ्र वगैरे हिंस्र पशूही त्याच्याजवळ प्रेमानें बसत असत. हें पाहून गांवातील कृश झालेले एक कुत्रे त्या ऋषिजवळ येऊन बसले. इतक्यांत एक *वेऊळ त्याला दंश करावयासाठीं आला. त्याला पाहून श्वान ऋषीला म्हणाला

---

* वेऊळ म्हणजे इंगळी असें कथाकल्पतरूच्या टीपेंत दिलें आहे; परंतू ते बरोबर नाही. मूळ भारतांत द्वीपी (चित्ता), व्याघ्र (वाघ), नाग (हत्ती) केसरीं (सिंह) आणि शरभ असा कुत्र्याच्या शत्रूंचा क्रम दिला आहे.

मला कृपा करून या वेरूळापासून वांचवा. तेव्हां ऋषींला करुणा येऊन त्यानें त्यानें त्या श्वानाला वेरुळ केले. कांहीं वेळानें त्या वेरुळाला खावयास एक वाघ धावून आला. वेरुळ वाघाला भ्याला असे पाहून त्याला वाघ केले. त्या स्थितीत त्याला मारावयाला हत्ती आला, तेव्हां ऋषीनें त्यालाच हत्ती करून शेवटी सिंह केले. त्यावेळी रक्ताच्या लोभानें तो सिंह ऋषिलाच मारू लागला. तेव्हां ऋषीनें आपल्या तपोबलानें पुनरपि त्याला झडे कुत्रे करून आश्रमाबाहेर हाकलून दिलें. यासाठीं सांगतो की बरे वाईट गुण पाहून पाहून सेवकांची योजना करावी. यालाच पात्रापात्र विचार म्हणतात, राजाचें मुख्य गुण म्हणजे प्रजेचे पालन करण्यास तत्परता, धर्मनिष्ठा, धैर्य, शुद्धपणा, पराक्रम, सारासार विचार, इंद्रियदमन, इत्यादि होत. त्याचप्रमाणें त्याचे मंत्री, ज्ञानी व योद्धे असे असतील, तरच राजाचा उत्कर्ष होईल. दंडनीतीशिवाय राज्य निरुपयोगी होय.

## दंडाचें स्वरूप व उत्पति

नीलवर्ण कमलाप्रमाणें श्याम, चार दाढा, चार भुज, आठ पाय' अनेक मुखे, शंखाकार कर्ण, उभे केस, डोक्यावर जटा, दोन जिव्हा व ताम्रवर्ण मुख, अशाप्रकारचे सिंहाप्रमाणें क्रूर व शस्त्रांनीं सज्ज असें दंडाचें स्वरूप आहे. तो तीन्ही लोकात भयकर रूपाने आपल्या इच्छेनुसार वावरत असतो. वर्णाश्रम धर्माची व्यवस्था त्याच्यामुळें पृथ्वीवर रहाते. म्हणून या दंडाच्या साहाय्यानेंच राजानें प्रजापालन करावें, नाहीतर त्याला नरकप्राप्ति होईल. याविषयीं थोडा पूर्वेतिहास तुला सागतो. एकदां वसुहोम नांवाचा राजा आपल्या स्त्रीसह मेरु पर्वतावर तपश्चर्या करण्यासाठीं गेला. तेव्हां तेथें अकस्मात् मांधाताराजा आला; त्याची पूजा करून वसुहोमानें त्याला दंडाच्या उत्पत्तीची कथा विचारली. तेव्हां माधाता म्हणाला, ' एके कालीं ब्रह्मदेवानें यज्ञ आरंभिला असतां, त्याला योग्य असा ऋत्विज् मिळेना. तेव्हां त्यानें सहस्र वर्षेपर्यंत स्वसामर्थ्यानें आपल्या मस्तकामध्यें गर्भ धरिला. त्या गर्भापासून क्षुपऋषीची उत्पत्ति झाली. त्याला ऋत्विज करून, ब्रह्मदेव यज्ञ करूं लागला; परंतु दंड नसल्याकारणानें तेथें पापाची उत्पत्ति होऊ

लागली. अशा स्थितींत ब्रह्मदेव शंकरास शरण गेला; तेव्हां शंकरानें आपल्या देहापासून दंडपुरुष उत्पन्न केला; व त्यामुळें धर्मकार्यात मर्यादा राहूं लागली. यास्तव हा दंड केवल रुद्ररूपी होय. चारी पुरुषार्थांपैकीं, अर्थ व काम यांचें साधन करतांना, धर्माशीं विरोध न होईल असें करावें. सर्व धर्मांचें मूळ आचार आहे. यास्तव आचार पाळण्यांत दक्षता ठेवावी. तो कसा पाळावा, याविषयीं एक प्राचीन इतिहास सांगतों. एकदां प्रतर्दन राजानें आपल्या आचाराच्या बलावर, इंद्राला जिंकिलें. त्या वेळीं इंद्रास दुःख होऊन तो बृहस्पतीजवळ गेला, आणि म्हणाला,–' गुरो, पुण्य आणि सुख हीं कोणत्या उपायानें प्राप्त होतील तें मला सांगा.' तें ऐकून, बृहस्पति म्हणाला;–' इंद्रा, पुण्य म्हणजे काय, हें जाणण्याची इच्छा असेल तर प्रल्हादालाच जाऊन विचार.' तेव्हां इंद्रानें प्रल्हादाकडे जाऊन त्यास विचारलें कीं, ' हे प्रल्हादा ! तूं या त्रैलोक्याच्या राज्याचा स्वामी झालास तो कोणत्या पुण्यामुळें बरें ?' हा प्रश्न ऐकून, प्रल्हाद म्हणाला,–' मी सर्वदा ब्राह्मणाच्या आज्ञेंत वागतों, दुसरें कांहीं नाहीं.'–तेव्हां इंद्रानें प्रल्हादाची विनवणी केली व तो म्हणाला,–' हे प्रल्हादा ! कृपाकरून त्वां आपलें उत्तम शील मला द्यावें.' प्रल्हादानें तें मान्य करून आपलें शील इंद्राला दिलें. त्यावेळीं असें झालें कीं, त्याच्या देहापासून शील, लक्ष्मी, धर्म आणि सत्य हीं चारी मूर्तिमंत बाहेर निघून जाऊं लागली आणि प्रल्हाद निस्तेज झाला. त्यानें त्या चौघांस कोठें चाललां असे विचारतां, त्यांनीं सांगितलें कीं, तूं आपला आचार इंद्राला दिलास, त्या अर्थीं आम्हांला त्याच्याकडे जाणें भाग आहे. जिकडे आचार तिकडेच आम्हांला रहाणें आहे.' यास्तव धर्मा, आचाराहून दुसरें चांगलें कांहीं नाहीं. यावर धर्म म्हणाला,–' हे तात ! आशा ही आकाशाहून थोर आहे असें म्हणतात; तर ती उत्पन्न झाली कशी, हें जाणण्याची इच्छा आहे.' हें ऐकून, भीष्मांनीं त्याला सुमित्र ऋषभ यांची कथा सांगितली.

## सुमित्र–ऋषभ यांचा संवाद

एके दिवशीं सुमित्रराजा शिकारीस गेला असतां, तेथें त्यानें एका मृगाला बाण मारिला. त्या वेळीं तो मृग बाण घेऊन पळूं लागला, व राजा त्याच्यामागून नदी-पर्वत इत्यादि ओलांडीत जाऊं लागला. शेवटीं मृगानें

बाण टाकून दिला व तो अरण्यांत जाऊन आपल्या कळपांत मिसळून गेला. राजा मृगामागें पळतां पळतां थकून ऋषभऋषीच्या आश्रमांत आला, त्याचें ऋषीनें आदरातिथ्य केल्यावर राजा ऋषीला म्हणाला,–'हे ऋषेश्वरा, मी निराश झाल्यामुळें, आपल्याकडे आलों आहें. तरी आशा व आकाश यापैकीं थोर कोण, तें मला कृपा करून सांगा.' तें ऐकून ऋषि म्हणाला,—'राजा, मीही पूर्वीं अनेक तीर्थें फिरत असतां, एकदां बदरिकाश्रमीं गेलों. त्या ठिकाणीं एक अतिकृश असा ऋषि मी पाहिला, त्याचें नांव तनु, त्याला साष्टांग नमस्कार करून मी कुशल प्रश्न विचारीत आहे, इतक्यांत रघुद्युम्न नामक राजा तेथे आला. त्याचा भूरिद्यून्म नांवाचा पुत्र नष्ट झालेला असून, त्याच्या शोधार्थ तो चालला होता. तनूऋषीला पाहून तो म्हणाला,–'महाराज, पुत्राची पुनरपि प्राप्ति होईल, या आशेनें आपल्याकडे आलो आहें. हे ऐकून तनु म्हणाला, –पुर्वीं माझा असाच एका ऋषीनें आशा लावून मनोभंग केला; आणि मीं मी फार कष्टी झालो. तेव्हां मनांत विचार केला कीं, आतां प्रतिग्रह कधी करावयाचा नाही. असा निश्चय करून व आशा सोडून बसलो आहे. या आशेसारखे दुःसह दुःख दुसरे नाही. जो तिला सोडील त्यालाच सुखप्राप्ति होईल असे सांगून तनुऋषीनें आपल्या तपःसामर्थ्यानें पुत्रदर्शन करविलें, व ज्ञानदृष्टीं देऊन आपले दिव्यरूपही दाखविलें, 'याप्रमाणें आशेमुळें कृश झाला असतां, तीं टाकून देऊन तनुऋषीनें दिव्य देहाची प्राप्ति करून घेतली अशी ही कथा ऋषभऋषीनें सुमित्रराजाला सांगितली. ही कथा ऐकिल्यावर धर्मानें भीष्माला विचारिलें कीं, 'जो राजा खोटया मित्रांनीं वेष्टिलेला असून, द्रव्यहीन व बलहीन झाला, त्याला कोणत्या उपायानें परचक्राचा नाश करून सुखी होतां येईल.' तेव्हां भीष्म म्हणाले,–'कोश, बुद्धि, आणि न्याय याचा क्षय झाला असतां, सर्वांचा क्षय होतो. यास्तव राजानें खजिना व बुद्धि यांची वृद्धि करावी. शास्त्रपुराणें नेहमीं ऐकिल्यानें बुद्धि वाढते, व नीति आणि दंड यांनीं करून धन मिळतें. धनानें सर्व आपत्ति टाळतां येऊन धर्म, अर्थ आणि काम यांची प्राप्ति होते.' याप्रमाणें धर्माच्या प्रश्नांना उत्तर देऊन, भीष्मांनीं त्याला राजधर्माचा उपदेश केला.

# अध्याय ६ वा



## आपद्धर्म

जनमेजय राजानें आपद्धर्म सांगण्याविषयीं विनंति केल्यावर वैशंपायन सांगूं लागला. धर्मानें भीष्मास विचारलें कीं, 'जो राजा क्षीणबल आणि दीर्घसूत्री आहे, ज्याचे बंधु त्याच्यावर प्रीति करीत नाहींत, जो नेहमीं भयानें भेदरून गेलेला आहे, ज्याच्या खजिन्यांत द्रव्य नाहीं, मंत्री व अमात्य फितूर होऊन ज्याचें राज्य दुर्बल झालें आहे, व ज्यावर परसैन्यानें स्वारी केली आहे, अशा बिकट संकटांत सांपडलेल्या राजानें काय करावें?' तेव्हां भीष्म म्हणाले,–'स्वारी करणारा राजा जर धर्मार्थकुशल असेल, तर या दुर्बल राजानें त्याशीं एकदम तह करावा. तसेंच तो पापात्मा असेल तर त्यालाही द्रव्यानें वश करून आपला प्राण वांचवावा. कारण जगल्यास द्रव्य मिळवितां येईल.' यावर धर्मानें विचारिलें, 'जो राजा आंतून बाहेरून गांजलेला असेल, त्यानें काय करावे ? भीष्म म्हणाले,–'धर्मा, अशा राजानें त्वरित तह करावा. तसें नच जमेल तर दैवावर हवाला देऊन पराक्रम करावा. कारण थोडेंही विश्वासु सैन्य जिवावर उदार होऊन लढल्यास मोठ्या सेनेलाही जिंकून टाकील. असो; साधू संकटांत सांपडले असतां दुष्टांचें द्रव्य घेऊन तें त्यांना द्यावें, कारण आपत्कालीं जाणून बुजून निंदितकर्म केलें असतांही दोष लागत नाहीं. राजानें आपलें ऋत्विज, आचार्य, पुरोहित, यांच्यावर विनाकारण दोष घालूं नये. अज्ञानी लोक न जाणतां भलतेसलते बोलले तरी त्यांचा घात करूं नये. सभेंत जमलेल्या सभासदांचे गुण मात्र घ्यावेत, त्यांचे दोष कधींही काढूं नयेत. निंदेचे फल नरकप्राप्तिशिवाय दुसरें नाहीं. एकंदरीत आपत्तिसमयीं जेणेंकरून बहुत लोकांचें साहाय्य मिळेल, अशीच वर्तणूक ठेवावी. सर्व राज्याचें मूल खजिना; तो नाना उपायांनीं जमविला पाहिजे. परंतु त्यांतहीं निंदित मार्गाचें अवलंबन करूं नये. कोशाशिवाय सैन्याचें पालन व्हावयाचें नाहीं. सैन्याशिवाय राज्य चालणार नाही. राज्याशिवाय वैभव नाहीं व वैभवा-

शिवाय कीर्ति नाहीं. म्हणून राजानें कोशसंग्रह करावा. जो राजा प्रसंग जाणत नाहीं. तो नाश पावतो. याविषयीं एक पुरातन कथा आहे.

## तीन मत्स्यांची कथा

एका सरोवरांत दीर्घसूत्री, दीर्घकालज्ञ आणि उत्पन्नप्रतिभ असे तीन मत्स्य होते. एकदां ते सरोवर फुटून त्यांतून पाणी वाहूं लागले असतां, दीर्घकालज्ञाला तेव्हां कांहींतरी संकट आलें आहे असें वाटून तो म्हणाला, 'आतां येथून निघून दुसऱ्या ठिकाणीं जाणें हें बरें.'–हें ऐकून दीर्घसूत्री म्हणाला,–'अहो, जावयाचें तर जाऊं, पण आतांच घाई कशाला करितां ? परंतु या म्हणण्याकडे लक्ष न देतां दीर्घकालज्ञ आणि उत्पन्नप्रतिभ हे दोघे जलमार्गानें जाऊन एका डोहांत राहिले. इकडे त्या सरोवरावर एक मत्स्यमारी कोळी आला. त्यानें त्या डोहांत जाळें टाकलें. त्या जाळ्यांत दीर्घसूत्री सांपडला व मरण पावला. तात्पर्य; प्रसंग आला असतां राजानें आपलें स्थल सोडून देऊनही स्वतःचें व कुटुंबाचें रक्षण करावें.' यावर धर्मानें विचारिलें, 'अनेक बलवान् शत्रूंनी वेढलेला असतां व मित्रही शत्रू होत असतां, राजानें काय करावें ?'–तेव्हां भीष्म म्हणाले,–'अशा वेळीं परिस्थिति पाहून तह करावा. प्रसंगानुसार शत्रूंशीं सख्य व मित्राशीं शत्रुत्व करावें लागतें, याविषयीं एक प्राचीन इतिहास तुला सांगतों, तो ऐक.

## पलित आणि लोमश यांची कथा

एका अरण्यांत पारंबे व वेली यांनीं गुरफटून गेलेला मोठा वटवृक्ष होता, त्याच्या बुंधाशीं एका वारुळांत पलित नांवाचा उंदीर रहात असे, व वरतीं एका ढोलीत लोमश नांवाचा मांजर रहात असे; तो तेथील पक्ष्यादिकांचा नेहमीं संहार करी. त्या वटवृक्षावरून पारधी श्वापदें पकडून धरून आणीत असत. त्यांत एकदां तो मार्जार सांपडून बंधनांत सांपडला· हें पाहून पलित उंदीर निर्धास्तपणें वर चढला व मांजराच्या ढोलींत जाऊन त्यानें जमविलेलें सर्व मांस खाऊन टाकिलें. इतक्यांत एक मुंगुस तेथें आला. त्याला पाहून उंदीर घाबरला, तोंच चंद्र नांवाचा एक घुबड त्या वृक्षाच्या खांदीवर येऊन बसला. अशा रीतीनें उंदीर दोन शत्रूंच्या मध्यें सांपडला असतां त्यानें विचार केला कीं, येथें एकासारखें एक तीन शत्रू तिहींकडून

बसले असतां, कोणीतरी मला खाणारच. पण हा मांजर पाशांत सापडलेला आहे, त्याशीं सख्य करून आपण त्याचा प्राण वांचला तर पहावा. कारण मूर्ख शत्रूपेक्षां सुज्ञ शत्रु चांगला. असा विचार करून तो मांजराला म्हणाला, 'हे मार्जारा, तूं जर मला न मारण्याचें वचन देशील, तर या वेळीं मीं तुझा प्राण वांचवीन मी तुझें जाळें तोडतों व तुला मोकळें करतों.'–असें बोलून तो मांजराच्या आश्रयाला जाऊन बसला त्याचें हें सख्य पाहून घुबड व मुंगुस निराश होऊन तेथून चालते झाले. नंतर उंदीर हळुहळु मांजराचे पाश तोडूं लागला. तेव्हां मांजर म्हणालें,–'अरे, जरा त्वरा करून मला लवकर सोडव.'–उंदीरानें उत्तर दिलें. 'जेव्हां तो चांडाळ पारधि येथें येईल, तेव्हांच तुझे सगळे पाश तोडीन; मग तूं झाडावर जा, आणि मीही आपल्या बिळांत जाईन. कारण शत्रु आणि मित्र हे कार्यपरत्वें एक होत असतात. स्वभावतःच कोणी कोणाचा मित्र किंवा शत्रु नसतो.' असें बोलून पारधि येतांक्षणींच त्यानें मांजराचें जाळें तोडून त्याला मुक्त केलें, व आपण त्वरेनें आपल्या बिळांत येऊन बसला. मग पारधि निघून गेल्यावर मार्जार उंदराला म्हणूं लागला,–'अरे, तूं मला जीवदान दिलेंस या उपकाराची फेड मी कशी करावी ? तरी तूं मजकडे ये, मीं तुला आपल्या घरचा मुख्य कारभारी करतों'–हें ऐकून उंदीर म्हणाला,–'प्रसंगानें शत्रूचा मित्र, व मित्राचा शत्रू होतो; कारण न पहातां जो कोणाशीं सख्य करितो, त्याची बुद्धि चळली असें समजावें. कारण नाहींसें झाल्यास आई-बापही पुत्राचा त्याग करितात, स्त्रीही आपल्या पतीचा कारण संपल्यास त्याग करिते तात्पर्य; तुझ्या माझ्या मैत्रीचें कारण आतां नाहींसें झाल्यामुळें, यापुढें मी अन्न व तू माझा भोक्ता असाच संबंध रहाणार. तरी आतां तुझी व माझी मैत्री दुरूनच चांगली. कांहीं झालें तरी मी आतां तुझ्याजवळ प्रत्यक्ष येणार नाहीं.' यावर मांजरानें त्याची नानाप्रकारें विनवणी केली, परंतु उंदीर वळत नाहीं असें पाहून तो आपल्या घरीं गेला. ' यास्तव, धर्मा, प्रसंगानुसार शत्रूशींही सख्य करावें; परंतु त्यावर विश्वास टाकूं नये. हें ऐकून धर्म म्हणाला,–'हे भीष्मदेवा, शत्रूनें निष्कटपटपणा दाखविल्यास त्यावर विश्वास न टाकून कसें जमेल ?'–तेव्हां भीष्म म्हणाले,. याविषयीं मीं तुला पूर्व इतिहास सांगतों.

# पूजना पक्षिणीची गोष्ट

ब्रह्मदत्त नामक राजाच्या अंत:पुरांत *पूजना नांवाची पक्षिणी बरेच दिवस राहिली होती. एकदां तिला एक सुंदर पुत्र झाला व त्याच दिवशीं राणीलाही पुत्र झाला. पुढें हीं दोन्ही लहान मुलें एका ठिकाणीं खेळत असत. एके दिवशीं पूजना समुद्रतीरावर गेली असतां, तिला तेथें अमृताप्रमाणें मधुर फलें मिळालीं. तीं तिनें घरीं आणून आपल्या पोराबरोबरच राजपुत्रालाही दिलीं. तीं राजपुत्राला फार मानवलीं. याप्रमाणें अनेक दिवस गेले असतां, एकदां ती पक्षिणी पुन: समुद्रतीरावर गेली. इकडे तिचें पोर जेथें होतें, तेथें खेळण्यासाठीं राजपुत्र आपल्या दासीसह आला. तो विशेष चपल असल्यामुळें, खेळण्याच्या भरांत त्यानें पूजनेच्या पोराला मारून टाकिलें. पूजना समुद्रावरून फलें घेऊन घरीं आली, तो आपलें बाळ मरून पडलेलें पाहून तिला फार दु:ख झालें, व ती मनांत म्हणाली,—‘शत्रूवर प्रसंगीं उपकार केला, तरी त्यावर कधीं विश्वास टाकूं नये. असो, झालें तें झालें; परंतु आतां हें फल या राजपुत्राला देऊन, त्याच्या विश्वासघाताचा सूड घ्यावा व येथून चालतें व्हावें, हें बरें.’—असा विचार करून तिनें तें फल राजपुत्राला दिलें. तें तो खात असतां पूजनेनें आपल्या नखांनीं त्याचे दोन्ही डोळे फोडून टाकिलें व ती आकाशमार्गानें उडून गेली. उडतां उडतां ती म्हणाली,——‘हे राजपुत्रा, आपण केलेल्या अपराधाबद्दल असें त्वरीत प्रायश्चित मिळत असते. कृतकर्मांचा क्षय कधी होत नांहीं.’—हे भाषण व आपल्या अंध झालेल्या पुत्राला पाहून ब्रह्मदत्त राजा पुजनेला म्हणाला,—‘गे पक्षिणी, तुझी आमची उपकाराचीं फेड आतां अपकारानें होऊन गेली. यास्तव आतां तूं आमच्या घरी निर्भयपणें रहा,’—पक्षिणीनें उत्तर केले; जाणत्या मनुष्यानें एकदां ज्याचा अपराध केला असेल, त्यांशी कधी विश्वास धरू नये. कारण हे वैर तीन पिढयाही ढळत नाही, स्त्री, पदार्थ कार्य, सावत्रसंबंध आणि अपराध या पाच कारणावरून वैर उत्पन्न होत असते, व ते हजारो उपकार केले तरीही फिटत नाही. ज्याप्रमाणें अग्नि काष्टीत गुप्त असतो. त्याप्रमाणें तेही गुप्तपणें आपले कार्य करीत असते. मी तुमच्या घरीं अनेक दिवस राहिलें,

* मूळ भारतात पूजनी असे आहे.

परंतू आता विश्वास धरवत नाही,-'हे ऐकून राजा म्हणाला,-'कालेकरून वैर नष्ट होते. तर देवदैत्य इतका काल कां झगडत राहिलें आहेत? तसेच ज्ञाते पुरुषही रोगशमनार्थ औषध घेतात तें तरी कशाला? राजा, वैराला नाहिसे करण्याचा उपाय जगात नाही. तुझा अंधपुत्र पाहून तुझ्या मनांत क्षणोक्षणी हे वैर जागृत हाईल. याकरिता मीं येथून निघून जाणें श्रेयस्कर आहे.'-असें बोलून धर्मा, ती पक्षीणी आपल्या घरट्यात निघून गेली.

---

# अध्याय ७ वा.



## भारतद्वाज व शत्रुंजय यांचा संवाद.

धर्मराज म्हणाले, 'भीष्मदेवा, युगक्षय झाल्यामुळें धर्माला ग्लानि आली असतां आणि प्रजेला चोराकडून पीडा होऊ लागलीं असतां, राजानें काय करावे?'तेव्हां भीष्म म्हणाले,-'याविषयी भारद्वाज व शत्रुंजय यांचा संवाद सांगतो तो ऐक, शत्रुजय हा सौवीर देशाचा राजा होता. तो एकदां भारद्वाजाकडे जाऊन म्हणाला,-'महाराज, अप्राप्त वस्तूंची वृद्धि व प्रतिपाल हीं कशी करावीं, तें भारद्वाज ऋषी बोलले, राजानें दड व पराक्रम यांच्या योगानें स्वतः निर्दोष राहून सर्व प्राणिमात्राना वश करून नेहमी नम्रपणें बोलावे. वैऱ्यापासूनही प्रसंगी कार्य साधून घ्यावे. परंतु त्यावर विश्वास टाकू नये. प्रसंग पडल्यास शत्रुला शरण जाऊन व त्याशी मित्राप्रमाणें वागून त्याच्या वचनात असावे; परंतू काल अनुकूल झाल्याबरोबर धोंड्यावर मडके टाकावे, त्याप्रमाणें त्याला टाकून द्यावे. कृतघ्न माणसाठीं राजानें कधी संबंध ठेवू नये. कारण कार्य संपल्यावर ती उलट फिरेल. कोणतेही कार्य करणें ते चातुर्यानें करावे. कोकील* व पोपट हे शब्दासाठी पाळावे. वराह

* मूळ भारतांत असें नाही. नट, भक्त इत्यादिकाबरोबर कोकील-वराह-यांचेही घेण्यासारखे गुण घ्यावे, तसेंच त्यांत म्हटले आहे. कोकीलेचा गुण लोकांकडून परस्पर आपलें काम करून घेण्याचा. वराहाचा गुण मुळा-

(रानडुक्कर) भक्षणासाठीं पाळावा. व पर्वतावर आपल्या रक्षणासाठीं दुर्ग बांधावे. ओसाड घर वसवावे, आणि नट, भक्त, सेवक व मित्र, यांच्या गुणापैकी घेण्यासारखे जे गुण असतील तें घ्यावे, शत्रुगृही नित्य जाऊन कुशल प्रश्न करावे. परंतु आपला दोष कधी बाहेर काढू नये. बगळ्या-प्रमाणे आपल्या हेतूंकडे लक्ष ठेवावें. सिंहाप्रमाणें पराक्रम व बाणाप्रमाणें सत्कार्यी तुटून पडावे. मद्यपान, स्त्री, मृगया (शिकार) द्यूत (जुगार) यांच्या अति सेवनानें अनेक रोग जडतात. तरी त्या संबंधानें जपून वागावे. धनुष्य तृणमय करावे मृगाप्रमाणें हलकीं झोप घ्यावी. प्रसंग पाहून दृष्टी असून आंधळे व्हावे. व कर्ण असून बहिरे व्हावे. देशकाल पाहून पराक्रम करावा, नाहीतर व्यर्थ नाश होईल. जो दंडानें शत्रुचें निर्मूलन करीत नाहीं, तो गर्भिणीं + इंगळीप्रमाणें नाश पावतो. जोपर्यंत भय खरोखर आले नाहीं. तोवर भीत असावें. परंतू प्रत्यक्ष भय प्राप्त झाल्यास धैर्यानें प्रहार करावा पुढें मिळणाऱ्या सुखानें आत्ताच आनंदीत होऊं नये. शत्रुशी स्नेह केल्या-वरही बेसावध असू नये. आपले कोण व शत्रुपक्षीय कोण हें नीट पहावे. राजानें आपलें मनोगत सेवकांस कळवू नये, तसें केल्यास कार्याचा बिघाड होतो. शत्रुमध्ये विश्वास उत्पन्न करून त्याचा नाश करावा. कारण मित्र किंवा शत्रु हें स्वभावतः कोणी नसून कार्यसामर्थ्यामुळें होतात, ज्यानें पूर्वी अपकार केला आहे; त्यानें कितीही करूणा भाकिली तरी त्याला सोडूं नये. निरर्थक कोणाशीं शत्रुत्व करूं नये. कर्ज, रोग आणि शत्रुत्व हीं शिल्कीस कधीं ठेवूं नयेत. कारण थोडीही शिल्लक असल्यास कालानें ती वाढून पीडाकारक होतात, शूर शत्रूला नमस्कार करून वंश करावें. भ्याडाला दम भरून, व लोभ्याला द्रव्यानें वंश करावें; आणि तो आपल्या बरोबरीचा असल्यास त्याशीं युद्ध करावें; वेळ पडेल त्याप्रमाणें मृदु किंवा कठोर व्हावें. आपल्या शौर्याच्या अभिमानावर बेफिकीर असूं नये. प्रजेचे योगक्षेम, चांगली वृष्टि, रोग, मृत्यु, हीं सर्व राजावर अवलंबून अस-तात. प्रजेचे कठीण प्रसंग आल्यास, राजाने आपल्या ज्ञानाच्या जोरावर त्यांना वांचवावे. यांविषयीं, धर्मा, विश्वामित्र ऋषि आणि चांडाल यांचा संवाद तुला सांगतो तो ऐक.

---

संकट उपटून टाकण्याचा इत्यादि भारतकारानें म्हटलें आहे. हाच चांगला लागतो, +भारतांत इंगळीच्याऐवजी खेचर म्हटले आहे.

# विश्वामित्र व चांडाल यांचा संवाद

त्रेता आणि द्वापार या युगांच्या संधीस एकदां बारा वर्षे पाऊस न पडल्यामुळें मोठा दुष्काळ पडला. तेव्हां सर्व लोकांस पीडा होऊन अनेकांनीं निरुपायास्तव धर्मत्यागही केला. राजे प्रजेला पीडूं लागले, प्रजा एकमेकांना मारूं लागली चोर मत्त झाले, यज्ञयाग, शेतकी, व्यापार, वगैरे बंद पडलीं, मनुष्यें मनुष्यांस खाऊं लागलीं व सर्व देश ओसाड झाला. चारी वर्णांतील लोकांनीं आपलें धर्म सोडून गाई, म्हशी, इत्यादि प्राणी भक्षण केले. ऋषीही अन्नासाठीं वाट फुटेल तिकडे धावूं लागले. अशा स्थितींत विश्वामित्र राजा भुकेनें व्याकुल होऊन बायकामुलांना सोडून, सैरावैरा धावूं लागला असतां एका चांडालाच्या घराजवळ आला. तेथें कुत्रीं, डुकरें, इत्यादिकांचीं हाडें व कातडीं पडली होती, व एकंदरींत तें स्थान] अमंगलाचें माहेरघर दिसत होते. तेथें जाऊन विश्वामित्र राजानें त्या चांडालाजवळ अन्न मागितलें. चांडाल देईना, असें पाहून विश्वामित्रांला फार वाईट वाटलें, व मनांत म्हणाला,–' मला अभाग्याला आतां मृत्यु तरी कां येत नाहीं ? अशा स्थितींत जगून तरी काय करावयाचें ?' असा विचार करीत आहे, इतक्यांत त्या चांडालाच्या घरांत ज्याला अतिशय दुर्गंध येत आहे, असें एक कुत्र्याचें कुजलेलें कातडें त्याच्या दृष्टीस पडलें. तें पाहून तो मनात म्हणूं लागला,–' आपत्कालीं चोरी करूनही आत्मसंरक्षण करावें असें आहे. तरी ही कुतऱ्याची त्वचा चोरण्याचा प्रयत्न करूं' असें म्हणून तो हळुच चांडालाच्या घरांत शिरला. इतक्यांत चांडाळ रागानें डोळे लाल करून त्याला अपशब्द बोलूं लागला; व म्हणाला,–' तूं येथून बऱ्या बोलानें जा, नाहींतर व्यर्थ मरण पावशील. तेव्हां विश्वामित्र म्हणाला,–' मी विश्वामित्र राजा क्षुधेनें व्याकुल होऊन तुझ्याकडें आलों आहें. माझा वध करूं नको. ईश्वर तुला दीर्घायु करील.' हें ऐकून चांडाल बिछान्यावर निजला होता, तो म्हणाला,–' अरे विश्वामित्रा, श्वान व शृगाल ( कोल्हा ) यांच्या इतके अमंगल कांहीं नाहीं. यासाठीं आपला जीव वांचविण्याचा तूं दुसरा कांहीं तरी उपाय कर. तूं राजा धर्मज्ञ असून स्वधर्माचा असा रीतीनें त्याग करूं पाहातोस हें उचित नाहीं.' हें ऐकून विश्वामित्र म्हणाला,–' माझा प्राण वांचविण्याचा दुसरा उपाय मला दिसत नाहीं. यावेळीं प्राण वाचल्यास पुढें

अनेक रीतीनें मला धर्म करितां येईल. तरी मला हें श्वानाचें कातडें घ्यावयाची आज्ञा दे.' चांडालानें उत्तर केले,–'अरे हें कातडें भक्षण करून तृप्ति होणें शक्य नाहीं तेव्हां विश्वामित्र म्हणाला,– ' पण मला यावेळीं यांतच सर्व स्वाद भरलेला आहे असें वाटतें. याच्या सेवनानें मीं व माझें कुटुंब तृप्त होऊं.' चांडाल म्हणाला,—' विश्वामित्रा, तुला पुनः नीट सांगतों, तूं विनाकारण पातकांत पडूं नकोस. '

विश्वामित्र —' प्राण वांचविण्यांत पातकाचा विचार नाहीं ? '

चांडाल—' तुझें म्हणणें मला मान्य करितां येत नाहीं. कारण मी असें दान केल्यास, व तूं घेतल्यास दोघांसही नरकवास प्राप्त होईल. '

विश्वामित्र—' देवपितरांना अर्पण करून अपवित्र भक्षण केल्यास तें पवित्रच होतें. त्यांत पातक लागत नाहीं.' हें विश्वामित्राचें निकराचें बोलणें ऐकून चांडालानें कातडें त्याला दिलें; व तो घरांत निघून गेला. इकडे विश्वामित्राचें तें कातडे घेऊन, इंद्र, अग्नि, इत्यादि देवता आणि पितर यांना यथोचित भाग देऊन, उरलेला भाग कुटुंबासह भक्षण केला. त्या वेळीं देवता संतुष्ट होऊन जिकडेतिकडे उत्तम पर्जन्य पडला, व सर्व वनस्पति पुनः उगवल्या. विश्वामित्रही निष्पाप होऊन उत्तम सिद्धि पावता झाला. यासाठीं आपत्कालीं कसेंही करून प्राण वांचवावें. ' याप्रमाणें कथा सांगून भीष्म म्हणाले, धर्मा बुद्धीच्या बळावरच राजाला धर्म आणि बळ हीं प्राप्त होतात. जे धर्माचे शत्रु, खोटया ज्ञानानें मत्त झालेले, परनिंदा करणारे, ते राक्षस होत. अवध्याचा वध न करण्यांत हितआहे. यासाठीं अत्यंत कठोरपणानें राजानें प्रजेला धर्ममार्गाला लावावें. राजा मऊ असल्यास प्रजेला चोर पीडा करतात जेथें सोयरीक× नाहीं, दुष्ट लोकांना दंड होत नाहीं, व शिष्टांचें रक्षण होत नाहीं, तें राज्य राजाला नरक देणारें होतें. ही शुक्राचार्यांची नीति तुला सांगितली. विद्वान् आचारशुद्ध व पवित्र ब्राह्मणाची सेवा केल्यानें अपयशाचें भय नाहीसें होतें, याप्रमाणें शांतिपर्वातील आपद्धर्माचें सार आहे.

---

× असें मूळ भारतांत म्हटलेलें नाहीं, व त्याचा अर्थ नीट लागत नाहीं. भारतांत या संदर्भात सौहृद (स्नेह) शब्द घातलेला आहे; परंतु तो राज्यासंबंधानें नसून भीष्मानें धर्माला ' माझ्या मनांत तुझ्या मनांत तुझ्याविषयीं सौहृद आहे ' असें म्हटलें आहे.

# अध्याय ८ वा



## कपोताख्यान.

वैशंपायन जनमेजयाला म्हणाले,–' राजा, भीष्मानें धर्माला जें सांगितलें तें मी तुला सांगतों. शरणागताचा प्रतिपाल करणें हा मोठा धर्म आहे. याच धर्मानें पूर्वी शिबि आदिकरून राजे परम सिद्धि पावले. याविषयीं भार्गवमुनींनी राजा × मुकुंदाला सांगितलेलें पुण्यकारक चरित्र मी तुला सांगतों. एक पारधि फार क्रूर असून अनेक पक्ष्यांचा संहार करून उपजीविका करीत असें. त्याचे डोळे लाल, कर्ण काळा व जीभ लांब असून त्याच्या नातेवाईकांनीं त्याचा त्याग केला होता. तो पूर्णपणें धर्मपराङ्मुख असून पक्षांना मारण्याशिवाय त्याला दुसरें कांहीं सुचत नसे. अशा स्थितींत तो म्हातारा झाला असतां, एकदां असें घडलें कीं, मोठा वारा सुटून व भयंकर वीज कडाडून अतोनात पर्जन्य पडला आणि सर्व पृथ्वी पाण्यानें भरून गेली. त्यावेळीं श्वापदे अगदीं दीन होऊन गेलीं व तो पारधीही थंडीनें आणि भुकेनें व्याकुल होऊन एका वृक्षाखालीं रात्र घालविण्यासाठीं बसला. त्यानें त्या दिवशीं एका कपोतीला पकडून घरीं न्यावयासाठीं पिंजऱ्यांत घातलें होतें. त्या कपोतीचा भर्ता त्याच वृक्षाच्या फांदीवरील एका ढोलींत दुःखित होऊन बसला होता. स्त्री विरहानें संतप्त होऊन तो म्हणाला,–माझी पतिव्रता स्त्री मजवर अत्यंत प्रेम करीत असे. माझ्याशिवाय तिच्या अंतःकरणांत दुसरा विचार नसे. तिच्या विरहामुळें मला एकएक क्षण युगाप्रमाणें वाटतो आहे. स्त्रीविरहित घर म्हणजे केवळ अरण्य होय. ज्याच्या घरांत पतिव्रता स्त्री आहे. तो गृहस्थ संसारांत धन्य आहे. महाकष्टानें पीडिलेल्या मनुष्यास स्त्री सारखें औषध नाहीं. तिचें धर्मसाधनांत केवढें तरी साहाय्य असतें. अशा रीतीचा त्याचा तो विलाप कपोतीनें ऐकिला व ती म्हणाली–माझा भर्ता माझे गुण वर्णीत आहे त्याअर्थी माझें जिवित धन्य आहे. पति हें महाथोर दैवत असून जी अभागी स्त्री त्याला संतोषवीत नाहीं. तिचा संसार काय जाळावयाचा? असें मनांत आणून दुःखित अंतःकरणानें ती तेथूनच कपोताला म्हणाली,–' हे स्वामी, हा पारधि आज तुमच्या आश्रमांत भुकेनें होऊन निजला आहे. तरी

× भारतांत मुचकुंद आहे.

या शरणागतांचें रक्षण करून त्याचें आदरातिथ्य करावें. अतिथीचें यथाशक्ति स्वागत करणारे गृहस्थ उत्तम गति पावतात. आपण माझ्या देहाची काळजी सोडून धर्मानें याची पूजा करावी. परोपकार केल्यानें तुम्हांला दुसऱ्या उत्तम स्त्रिया प्राप्त होतील.' हें स्त्रीचें धर्मयुक्त भाषण ऐकून कपोताला आनंद झाला, आणि तो खालीं येऊन म्हणाला,–' हे व्याधा हें तुझेंच घर आहे; तुला काय पाहिजे तें सांग.'–हें ऐकून पारधि म्हणाला,– मला थंडी फार लागत आहे, तिचें निवारण कर तेव्हां कपोतानें चंचूनें कांहीं सुकलेलीं पानें जमविली, आणि एका झाडाच्या ढोलींत अग्नि पेटत होता, तेथें जाऊन थोडासा अग्नि चंचूनें आणून तीं पानें त्यानें पेटविलीं. पारध्यानें त्या अग्नि-जवळ आपलें अंग शेकलें व आनंदित होऊन तो त्याला म्हणाला;' आतां मला भूक फार लागली आहे, तिचें कांहींतरी उपायानें निवारण कर.' त्या-वेळीं कपोतानें विचार केला कीं, आपण दररोज अन्न मिळवून खाणारे. आप-ल्यापाशीं कसलाहि संग्रह नाहीं. तरी आतां काय करावें? अशा विवंचनेंत पडला. शेवटीं अग्नि प्रदीप्त करून ो पारध्याला म्हणाला,–' अरे लुब्धका अतिथिभोजनाचा उत्तम मार्ग मी पूर्वीं ऐकिला आहे, त्याचें आतां अनुकरण करितों, तरी तूं क्षणभर वाट पहा.'–असें बोलून त्यानें अग्नीला तीन प्रदक्षिणा केल्या आणि त्यांत उडी टाकली. हें पारध्यानें पाहिलें तेव्हां त्या-लाही अत्यंत वाईट वाटलें, व आपल्या हातून आज मोठा अनर्थ घडला, असें म्हणून तो आपली निंदा करूं लागला. आणि म्हणला, ' या कपोतानें आपलें मांस देऊन मला त्यानें उपदेश केला; तरी आजपासून स्त्रीपुत्रांचा त्याग करून येथें तपश्चर्या करून उपवासादि उपयांनीं शरीर शुष्क करीन, आणि परलोक साधीन. असें म्हणून त्यानें कपोतीला सोडून दिलें, आणि धनुष्य व पिंजरा मोडून अग्नींत जाळून टाकिलें. इकडे कपोतीनें आपला पति दग्ध झाला, व पतिशिवाय सर्व शून्य आहे, असें जाणून तिनेंही अग्नींत उडी टाकिली. तो त्या दोघांच्याही पुण्याच्या योगानें त्यांना विमान आलें, व त्यांत बसून तीं दोघेही स्वर्गास गेलीं. त्यांना विमानांतून जातांना पाहून व्याध म्हणाला,–' मीही अती अशीच गती पावेन.' असें मनांत आणून तो पंपासरोवरावर गेला, व तेथील अरण्यांत शिरला. तेथे वणवा पेटलेला होता. कपोताचे उदाहरण पाहून त्याचा अहंकार नाहीसा झाला होता. तेव्हां वणवा दृष्टीस पडतांच त्यांत त्या पारध्यानें प्रवेश केला, आणि पुण्याच्या

बलावर तोही विमानांत बसून स्वर्गास गेला. हें कपोताचें पवित्र आख्यान जो श्रद्धापूर्वक वाचील, त्याच्या पापाचा निःसंशय क्षय होईल, व तो अंतीं उत्तम गति पावेल.' असो याप्रमाणें शरणागताचें पालन करण्याचा धर्म आहे. इतकें ऐकल्यावर धर्मानें विचारलें,–' जें पाप न जाणतां मनुष्याच्या हातून घडेल त्यापासून कोणत्या उपायानें उद्धार होतो? तेव्हां भीष्म म्हणाले,–' याविषयीं इंद्रद्योत व शौनक यांचा संवाद तुला सांगतो.'

## इंद्रद्योत + आणि शौनक यांचा संवाद

एकदां इंद्रद्योतराजाला न कळतां त्याच्या हातून एक ब्रह्महत्त्या घडली. तेव्हां सर्व प्रजेने व ब्राह्मणांनीं त्याचा त्याग केला असतां, त्या दुःखानें होरपळून तो ब्रह्महत्येच्या निवारणासाठीं तपश्चर्या करण्याकरितां अरण्यांत निघून गेला. अनेक दिवस तप केल्यावरही ब्रह्महत्या त्याला सोडीना. हें पाहून तो शौनकाला शरण गेला. तेव्हां शौनक म्हणाला,– 'अरे पाप्या, येथें कशाला आलास? तुझा वंश तुझ्या पापामुळें अघोर नरकांत पडला आहे. तूं तर त्याहून भयंकर नरकांत पडशील, व तेथें तुला अनेक यातना होतील.' हें ऐकून राजा करुणा भाकून बोलला.–' हे ऋषे, हा पापरूप अग्नि माझ्या शिरावर सारखा जळतो आहे, तरी माझ्या वंशावर कृपादृष्टि करावी.' तेव्हां शौनकानें सांगितलें, 'राजा तूं पुष्कर आदिकरून तीर्थांच्या ठिकाणीं अतिदारुण तप कर. कारण त्या योगानें भ्रुणहत्या ( गर्भहत्या ) वगैरे पातकांचाही नाश होतो. नाहींतर अश्वमेध-यज्ञ कर, म्हणजे या पापापासून मुक्त होशील. याचविषयीं सर्व देव-दैत्यांनीं एकदां बृहस्पतीला प्रश्न केला होता. तेव्हां त्यानेंही सागितलें कीं, पाप-कर्माची निवृत्ति पुण्यकर्म केल्यानें त्वरित होते.' हें ऋषीचें बोलणें ऐकून इंद्रद्योतानें आपल्या नगरास येऊन अश्वमेधयज्ञ केला, व त्यामुळें तो ब्रह्महत्येच्या पापापासून मुक्त झाला.' याप्रमाणें भीष्मानें कथा सांगितली. त्यावर धर्मानें विचारलें, 'एकदां मेलेलें मनुष्य पुनः जिवंत झाल्याचें आप-णास माहित असल्यास कृपा करून मला सांगावें.' तेव्हां भीष्मांनीं नैमिषा-रण्यांत घडलेला गृध्र जंबूकांचा संवाद सांगितला.

---

+ भारतांत इंद्रोत असें शौनकाचें नांव असून, राजाचें नांव परीक्षित् जनमेजय आहे.

# गृंध्र–जंबूक–संवाद

एका ब्राह्मणाचा पुत्र मरण पावला असतां, त्याचे नातेवाईक त्याचें प्रेत घेऊन स्मशानांत गेले. व तेथें विलाप करूं लागले. इतक्यांत एक गृध्र तेथें आला; आणि त्या रडत असलेल्या लोकांना म्हणाला,–‘ अहो ! जितकें ज्याचें आयुष्य, तितका तो जगतो. आजपर्यंन्त येथें अनेक स्त्री–पुरुष नाश पावले आहेत. यासाठीं तुम्हीं या मृत बालकाला येथें टाकून घरीं जा. आपापल्या कर्मानुरूप प्राणी गति पावत असतात. हें भयंकर स्मशान असून या ठिकाणीं मेलेला कोणी जिवंत झाला नाहीं. या मर्त्यलोकांत सर्वांनाच मरण आहे. ’ हें गृध्राचें बोलणें ऐकून ते पुरुष भयभीत होऊन घरीं जाऊं लागलें असतां त्यांच्या मार्गांत एक जंबूक आला आणि त्यांना म्हणाला,– ‘ अहो, नष्टपुरुषहो, पुत्राविषयीं निष्ठुर होऊन तुम्हीं घरीं कसें चाललां ? मोठ्या प्रेमानें तुम्हीं त्याच्यासाठीं रडा म्हणजे तुमच्या शोकानें तो पुन उठून तुम्हाला भेटेल.’ हें ऐकून ते बांधव पुन: स्मशानाकडे परतले.

तेव्हां गृध्र पुन: बोलूं लागला, ‘अरे, या क्षुद्र कोल्ह्याच्या नादीं लागून मूर्खपणें तुम्हीं परतलेत यास काय म्हणावे ? हा पुत्र आतां काष्ठासारखा झाला असून त्याच्याविषयीं शोक करणें व्यर्थ आहे. तुम्हीं आपलें हिताहित पहा, व या संसारांतून सुटण्यासाठीं कांहीं तप करा. कोणाला कोणाचें कर्म उपयोगास येत नाहीं. प्रत्येक आपल्या कर्माचा अधिकारी आहे. मूर्ख, विद्वान, श्रीमान, गरीब, लहान, मोठे सर्व कालाचे अंकित आहेत. तुम्हीं शोक आवरून घरीं जा.

जंबूक म्हणाला,–अरे, हा मूर्ख गृध्र बोलतो आणि तें तुम्हीं खरें मानून पुत्र स्नेहाचा त्याग करितां हें काय ? तुमच्या वंशाचा भूषणभूत असा हा बालक तुम्हीं बरेच रडल्याशिवाय कसा उठेल? प्रयत्नानें सर्व साध्य होते. ’ गृध्र म्हणाला,– ‘ अहो, मी आज एक हजार वर्षें येथें आहें. परंतु या संपूर्ण स्थावर जंगमात्मक सृष्टींत कोणीहि मेलेलें जिवंत झालें असें पाहिलें किंवा ऐकिलेंहि नाहीं. या बालकाचें स्मरण केल्यास तुम्हाला शोक मात्र होईल. ‘ तेव्हां जंबूक म्हणाला,–‘ गृध्राच्या बोलण्यावर विश्वास ठेंऊन हा सोन्यासारखा मुलगा सोडून जाणें आम्हांला उचीत नाहीं मी पुराणांत ऐकीले आहे कीं एका ब्राह्मणाचा अल्पवयी पुत्र मेला असतां

+ जंबूक नामक शूद्राच्या वधानें तो पुनः जिवंत झाला.तसाच श्वेतराचा पुत्रही मेलेला जिवंत झाला. तेंव्हां तुम्हीं अतिशय शोक केल्यास ऋषी व देवता कृपा करून याला उठवितील,'हे जंबुकांचें बोलणें ऐकून ते बांधव पुनः पुत्राचें शिर मांडींवर ठेवून धाय मोकलून रडू लागले. तेव्हां गृध्र जवळ येऊन त्यांना म्हणाला,– अरे, तुम्ही रडून रडून हृदय फुटून मराल, पण हजार वर्षांनीही तुमचा मृत पुत्र उठावयाचा नाही. जंबुकाच्या शब्दानें तुम्हांला काय मोह पडला आहे. ब्रह्मा, विष्णू, महेश आदि देवतांचेंही मृताला उठविण्याचें सामर्थ्य नाही.' हे ऐकून ते पुरूष प्रेत ठेवून घरी जाऊ लागले तेव्हां जंबूक पुनः म्हणाला, 'एकंदरीत या मनुष्यांपेक्षां आमची पशुयोनीच चांगली सर्व प्रकारे चांगली सुखामागून दुःख आणि दुःखामागून सुख हे ठेवलेलें असते. इतकाही विचार या माणसाला नाही. याप्रमाणें आपल्या कृत्यात तत्पर असलेले ते गृध व जंबूक आणखीही वादविवाद करू लागलें. इतक्यांत पार्वतीला दया येऊन तिनें शंकराला तेथे पाठविलें. शंकरानें त्यास दर्शन देऊन वरदान मागावयास सांगितले. तेव्हां त्यांनी त्या मृतपुत्राला उठविण्याविषयी त्याची विनंती केली. शंकरानें कृपा दृष्टीनें त्या मुलाला उठविलें. आणि शंभर वर्षे आयुष्य दिलें. गृध्र जंबुकानाहीं शंकरानें त्यांच्या क्षुधेचा नाश करून तृप्त केले. व तें महादेवाला वंदन करुन उद्धरून गेलें. तो पुत्रही आपल्या घरी गेला. याप्रमाणें धर्मा, निश्चयानें प्रयत्न केल्यास अल्पकाळातहीं फळ मिळते.' ही कथा ऐकल्यावर पुनः धर्मानें विचारलें, 'अनेक बळकट वैरी प्राप्त झालें असतां दुर्बल पुरूपानें.काय करावे?'तेव्हां भीष्म म्हणालें, –याविषयी शाल्मली (सांवरीचें झाड) आणि वायु यांचा इतिहास सांगतो

## शाल्मली–पवन–संवाद

हिमालयपर्वतावर एक मोठा शाल्मलीचा वृक्ष होता. त्याच्या आश्रयानें अनेक पक्षी, श्वापदे, प्रवासी, यति, तपस्वी रहात असत. त्याच्या मोठमोठ्या असंख्य खांद्या असून, तळाशीं अगदी गाढ अंधार असें.

+ हें खरे नांव शंबूक आहे. हा शंबूक तपश्चर्या करू लागल्यामुळें ब्राह्मणपुत्र मेला. तेंव्हां रामानें शंबुकाचा वध करून ब्राह्मणपुत्राला उठविले, अशी एक कथा रामायणात आहे.

या शाल्मलीला पाहून एके दिवशी नारद म्हणाला,-'हे सुंदर तरो! तुझ्या दर्शनानें मनाला आल्हाद वाटतो, पण कायरे! वाऱ्याची आणि तुझी काय मैत्री आहे? तो मोठमोठ्या नद्यांना शुष्क करुन टाकतो. आणि पर्वत वृक्ष यांना जमीनदोस्त करुन टाकतो. तथापि स्वर्गलोकांतहीं संतोष होईल अशी तुझी ही शोभा अद्यापि राहिली नाहीं. त्याअर्थीं तुझी व त्याची मैत्री असावी असे दिसतें.'हे नारदाचें भाषण ऐकून शाल्मलीनें उत्तर दिलें,–'माझें तेज पवनाला (वायूला) सहन होत नाही. मोठमोठे वृक्ष मोडून थकून वर आले, म्हणजे मी त्याना अडवितो. तेंव्हा त्याचें मजपुढें चालत नाही. 'नारद म्हणाला ' वायु सर्वांचे जीवन आहे. त्याची बरोबरी इंद्रादि देवांनाही व्हावयाची नाही तूं गर्वानें बोलत आहेस; परंतु त्याचें फळ तुला मिळेंल.'असें बोलून नारद पवनाकडे गेला, व त्याला म्हणाला,–'हे वायो, हिमालयावर एक शालमली वृक्ष उन्मत्त होवून तुझा अपमान करीत आहे. 'हे ऐकून वायुला राग आला. आणि शालमलीकडे जाऊन तो त्याला म्हणाला,–'मी वायु आहे हें पक्के समज. तूं आजपर्यंत माझ्या कृपेनें वाचलास, परंतु आतां तुझ्या गर्वाचें फळ तुला लवकरच प्राप्त होईल.' शाल्मीलीनें उत्तर दिलें, मी निःसंशय तुझ्याहुन अधिक बलवान आहे तुझ्याहुन मला कांहीच भय नाहीं. तेंव्हां ठीक आहे, योग्य काळीं प्रतिती येईल. असें म्हणून वायु निघून गेला. इकडे शालमकीनें मनांत विचार केला की मी वायूपेक्षां निर्बल खरा; परंतु बुद्धींबलाच्या साह्यानें मी त्याचें भय टाळीन इतर वृक्षांना भय नाही म्हणून तें कष्ट पावतात. असे म्हणून त्यानें आपल्या सर्व शाखा टाकून दिल्या; आणि केवळ खोड होऊन राहिला. कांही वेळानें वायु संतापानें तेथें आला असतां अशा स्थितीत तो त्याच्या दृष्टीस पडला. तेंव्हां तो म्हणाला,–'हे दुष्टा, माझे काम आपणच करून तूं आपल्या दुर्बूद्धीचें फळ पावलास.'–तेंव्हां नारदाच्या वचनाची आठवण होऊन शालमलीला फार दुःख झाले. यावेळीं दुर्बळाशीं वैर करू नये. निदान तोंडानें तरी बोलू नये. बुद्धीवान शत्रुच्या ठिकाणीं,-अग्नि गवतात वाढतो त्याप्रमाणें वैर वाढत असतें बुद्धीपेक्षां दुसरें चांगलें बळ नाही, अर्जुनानें कौरवांच्या अकरा अक्षौहिणी सैन्याचा नाश बुद्धीनेंच केला, असो; लोभ सर्व पापाचे मूळ असून त्या-

पासून क्रोध, काम, मोह माया, अक्षया, अधैर्य, निर्लज्जपणा, धननाश, धर्मनाश, धर्मक्षय, इत्यादिक उत्पन्न होऊन, पुरुषाच्या हातून परवित्त आणि दाराहरणापर पापें घडतात, व अशीं अनेक दुःखें भोगावीं लागतात. इतकें बोलून झालें तरी, नद्यांचे पाण्यानें जशी समुद्राची कधीं तृप्ति होत नाहीं, तशीच लोभाचीही कधीं शांति होत नाहीं ती नाहींच देव दैत्य, गंधर्व, यांनाही, सगळया धर्माला अडथळा करणारा हा लोभ जिंकवला नाहीं. म्हणून बुद्धिमान् पुरुषानें लोभाची संगति करूं नये. निर्दोष आचरणाचे, धर्मपालन करणारें, सुखदुःख यांना समान मानणारे, सत्यवचनी, प्रतिग्रह न घेणारे, देव, पितर आणि अतिथि यांची पूजा करणारे, निरहंकार अशा लोकांची सेवा करावीं.' एवढें ऐकिल्यावर धर्मानें विचारलें, 'अज्ञानाचें मूळ कारण काय ?' तेव्हां भीष्म म्हणाले, लोभ आणि अज्ञान हीं परस्परांची कारणें आहेत. लोभाचे परिणाम तुला पूर्वी सांगितलेच आहेत. त्या लोभापासूनच अज्ञान उत्पन्न होतें. यासाठीं लोभ वर्ज्य करावा. जनकादि राजे लोभ वर्ज्य करूनच स्वर्गाला गेले.' यानंतर धर्म म्हणाला,–' धर्म अनंत आहेत, तरी त्यांत मुख्य कोणता ? कोणत्या धर्माच्या सेवनानें सर्व धर्माचें फळ मिळेल तें सांगा, ' हें ऐकून भीष्म म्हणाले–धर्मा इंद्रिय स्वाधीन राखणें याहून जगांत मोठा धर्म नाहीं. इंद्रियदमनानें मुक्तीहि प्राप्त होते. याच्या योगानें, दान धर्म, यांची सिद्धि होऊन, ज्ञान आणि अभ्यास यांना तेज चढते व अंगीं पवित्रता येते. इहपरलोकीं याच्या योगानें प्राणी सुखी होतो. इंद्रियांचें दमन केल्यानें चित्त प्रसन्न होतें. म्हणून तोच सर्व धर्मात समर्थ होय. इंद्रियें ज्याच्या स्वाधीन नाहींत, तो क्लेश पावतो.' आतां इंद्रियदमनाचीं लक्षणें सांगतों, ती ऐक. ' इंद्रियांचा निग्रह करणारा पुरुष क्षमाशील, धर्मशाली व अहिंसा धर्माचें आचरण करणारा असतो. समबुद्धि सत्यभाषण, सरळपणा, नम्रता, निष्कपटीपणा, संतोष, गोड बोलणें चिकित्सेखोरपणा नसणें, वडिलांविषयीं आदर भूतदया, हीं इंद्रियनिग्रहाची लक्षणें आहेत. सर्व कर्मांचा त्याग करून जो इंद्रिय दमन करण्यांत तत्पर झाला तो ब्रह्मपदवी पावतो. त्याला पुनः जन्ममरणाच्या फेऱ्यांत पडावें लागत नाहीं. त्याला अरण्यवास, तीर्थे, यज्ञ, दान, इत्यादिकांची गरज नाहीं. आणखी, हे युधिष्टिरा सर्व सृष्टींचें मूल तपच आहे. ब्रह्मदेवानें तपाच्या योगानेंच सर्व विश्व उत्पन्न केलें. ऋषींना तपानेंच वेदांची प्राप्ति झाली. फल, मूल, अन्न, औषधें, या

उत्पन्न केले. ऋषींना तपानेंच वेदांची प्राप्ति झाली. फल, मूल, अन्न, औषधें या सर्वांची सिद्धि तपानेंच होते. असाध्य गोष्टी तपानें साध्य होतात. ब्रह्म-हत्यादि पापांची देखील तपानें निवृत्ति होते. अहिंसा सत्यभाषण, दान, अतिथिसत्कार हेच श्रेष्ठ तप होय. सत्यानेंही उत्तम गति प्राप्त होते. तें सत्य, समता, दम, अमात्सर्य, क्षमा, लज्जा, दानबुद्धि इत्यादि तेरा प्रकारचें आहे. असत्य हें महापाप आहे. हजार अश्वमेध आणि सत्य यांची तुलना केल्यास सत्यच अधिक भरेल. दुसऱ्याचे दोष पाहून क्रोध उत्पन्न होतो, त्याचा क्षमेनें नाश करावा. मत्सर परनिंदेला प्रवृत्त करितो, त्याला दयेच्या योगानें दूर करावा आणि उत्तम शास्त्रांचें अध्ययन करून कुबुद्धीचा त्याग करावा. प्रेमाच्या योगानें वैर नाहीसें करावे; सत्पुरुषाचें दर्शन घेऊन गर्वाचा परिहार करावा, आणि ज्ञानानें किंवा साधुसेवेनें मोक्षप्राप्ति करून घ्यावी कौरवांचा मत्सर नाहीसा झाला नव्हता म्हणूनच ते नष्ट झाले. ज्याच्या योगानें परद्वेष उत्पन्न होईल, अशी कोणतीही गोष्ट बाहेर फोडू नये. प्रथम ब्राह्मणाला अन्न देऊन, नंतर जो आपण भोजन करितो, आणि धनधान्यांचा संग्रह यज्ञासाठीं व पितरांसाठीं करितो, त्याला अंतीं स्वर्गप्राप्ति होते. आपत्ति दूर करावयाची ती क्षत्रियानें आपल्या बाहुबलानें, शूद्रानें सेवा करून वैश्यानें धनसंग्रह करून आणि ब्राह्मणानें यज्ञ करून टाळावी. पंचमहापातकें करणाऱ्यांची संगति केल्यास तो तितकाच पातकी होतो.'-अशाप्रकारचें आपद्धर्माचें सार भीष्मानें युधिष्टिरास सांगितलें.

---

# अध्याय ९ वा



## खड्गोत्पत्ति.

धर्म व भीष्म यांचीं याप्रमाणें प्रश्नोत्तरें चालली असतां, खड्गयुद्धांत कुशल अशा नकुलानें भीष्मास विचारलें; ' हे 'भीष्म आजोबा, खड्गाहून दुसरें सबल शस्त्र नाहीं; धनुष्यादिक सामग्री क्षीण झाली असतां वीर खड्ग

घेऊन उभा राहिला म्हणजे तो गदा, शक्ति इत्यादिकांचेंही निवारण करितो. असा हा प्रतापी खड्ग कोणी व कशासाठीं निर्माण केला तें सांगा.' - हा प्रश्न ऐकून भीष्म म्हणाले-' नकुला, पूर्वी जिकडे तिकडे फक्त समुद्रच होता; व त्यावर दुसरें कांहीं नव्हतें. पुढें श्रीविष्णूच्या नाभिकमलापासून ब्रह्मदेव उत्पन्न झाला, आणि त्यानें सर्व सृष्टि उत्पन्न केली. त्यांत मरीचिप्रमुख सप्तऋषि झाले.

पुढें दक्षाला साठ कन्या झाल्या,त्यापासून देवर्षि, गंधर्व, अप्सरा, इत्यादि होऊन जारज, स्वेदज, अंडज, उभ्दिज इत्यादि कोटीं उत्पन्न झाल्या. त्यावेळीं देवर्षि, पितर आदिकरून सर्व स्थावर जंगमात्मक सृष्टि ब्रह्मदेवाच्या आज्ञेवरून धर्ममार्गात राहिली होती. पण पुढे हिरण्याक्ष, हिरण्यकशिपुप्रभृति दैत्य उत्पन्न होऊन त्यांनी धर्ममर्यादा सोडली, आणि ऋषीशी विरोध करून ते प्राणिमात्राला दुःख देऊं लागले. तेव्हां सर्व देवर्षि व ब्रह्मर्षि मिळून हिमालयाच्या शंभर योजनें विस्तीर्ण आणि फलपुष्पांनीं युक्त अशा शिखरावर गेले आणि सुवर्णाची पात्रें घेऊन त्यांनी यज्ञाला आरंभ केला. तेव्हां ज्याप्रमाणें आकाशात चंद्र उगवतो, त्याप्रमाणें यज्ञाग्नीच्या ज्वालेतून नीलवर्ण, कृशोदर, तीक्ष्णदंत व तेजःपुंज असें एक अद्भूत स्वरूप उत्पन्न झालें. त्याच्या योगानें सर्व समुद्र खवळले, मोठे उत्कापात झाले, पृथ्वी थरथरूं लागली व सर्व प्राणिमात्राला मोह उत्पन्न झाला, तेव्हां त्या स्वरूपाला पाहून ब्रह्मा म्हणाला,-' लोकांच्या रक्षणासाठीं देवानें हा खड्ग उत्पन्न केला; याच्या योगानें असुरांचा संहार होईल.'-असे बोलून ब्रह्मानें तो प्रलयकालच्या अग्नीसारखा भयंकर खड्ग, रुद्राच्या हातीं दिला. रुद्रानें तो घेऊन व विक्राळ स्वरूप धारण करून सिंहनाद केला. तेव्हां तो ऐकून दैत्य त्याच्यावर धांवून आले व दगडाचा वर्षाव करूं लागले. रुद्रानें त्या खड्गानें त्यांचा संहार करून रक्ताच्या नद्या वाहविल्या. त्यावेळीं सर्व देवांनीं रुद्राचा जयजयकार केला. नंतर रुद्रानें तो खड्ग विष्णूला दिला, व विष्णूनें मरीचि ऋषीला दिला. त्यानंतर इंद्र, मनु, क्षुप, पुरुरवा, भरत दोष्कर, धुंधुमार, कांबोज, मुचकुंद इत्यादि परंपरेनें शेवटी कृपाचार्याच्या द्वारें तुम्हां पांच जणांना हा खड्ग प्राप्त झाला. या खड्गाचें नक्षत्र कृत्तिका, देवता, अग्नि,

गोत्र द्रुहिण + रुद्र गुरु, आणि हनुमानादि बीजमंत्र आहेत. त्याचीं आठ नांवें असून त्यांच्या जपानें युद्धांत जय मिळतो. तीं अशीं:—

असिर्विशसन.खड्गस्तीक्ष्णधारो दुरासदः ।
श्रीगर्भो विजयश्चैव धर्मपालस्तथैव च ॥

असा हा खड्ग सर्व शस्त्रांत उत्कृष्ट असून प्रथम उत्पन्न झाला, पुढें पृथु राजानें धनुष्य तयार करून पृथ्वी सपाट केली. खड्गाची पूजा सर्व करतात.

याप्रमाणें ही खड्गाची कथा भीष्मानें सांगितल्यावर धर्मानें विदुराला प्रश्न केला कीं,–' धर्म, अर्थ आणि काम यांत उत्तम कोण ?' विदुरानें उत्तर दिलें, ' धर्म सर्वांत श्रेष्ठ, अर्थ मध्यम आणि काम कनिष्ठ होय.' आतां पुरुषाच्या ठिकाणीं अवश्य गुण कोणते असावे ते सांगतो. बहुश्रुतपणा, तप, दानशीलता, कर्म–तत्परता, श्रद्धा, क्षमा, सद्बुद्धि, शुद्धपणा, दया, सत्य आणि इंद्रियनिग्रह, या गुणांत पुरुषाने नेहमी चित्त स्थिर ठेवावें. धर्म खरोखर अपूर्व असून, त्याच्याचमुळें सर्व उत्कर्ष पावतात.' हें ऐकून अर्जुन म्हणाला,–' या तीन पुरुषार्थांत अर्थ श्रेष्ठ आहे. कारण; अर्थानेंच प्राण्याला सर्व पदार्थांची प्राप्ति होते. शेतकी, व्यापार, कला, विद्या, हीं; व धर्म आणि काम हेही अर्थानें साध्य होतात, त्याच्या योगानें सेवक योग्य मार्गांत राहतात, व शत्रूंना दंड करितां येतो असा हा अर्थ सर्व सामर्थ्य देणारा आहे. नंतर नकुल व सहदेव म्हणाले,–' धर्म व अर्थ हे दोन्हीही चांगलेच आहेत. पण त्यांत अर्थापेक्षां धर्मात उत्तमपणा आहे. धर्मानें भक्ति, तप इत्यादि सिद्ध होतात, व नकळतांही अर्थाची प्राप्ति होते; मग कामादिकांची होईल हे सांगावयास नकोच. यावर भीम त्यांना म्हणाला,–' या तिघांत कामच श्रेष्ठ होय. कारण, कामाशिवाय धर्म आणि अर्थ यांची इच्छा कोणी करीत नाहीं. कामाच्या योगानें तपश्चर्या, ध्यान, धारण, अध्ययन, समुद्रादि तरण, इत्यादि साध्य होतात. ज्याप्रमाणें दह्यांत लोणी व तूप दोन्ही असतात; त्याप्रमाणें कामात धर्म आणि अर्थ या दोहोंचाही अन्तर्भाव होतो. यासाठीं काम सर्वांत श्रेष्ठ होय. सर्वांचीं भाषणें ऐकून धर्मानें घटकाभर विचार केला; आणि मग तो म्हणाला,–' सर्व पुरुषार्थांत

+ भारतांत गोत्र रोहिणी म्हटले असून बीजमंत्र मुळींच दिलेला नाहीं.

मोक्षाची सर कोणासही यावयाची नाहीं. ज्याचें मन, धर्म, अर्थ, काम, पाप–पुण्य, यांच्यापासून मुक्त झालें, आणि ज्याला माती व सोनें सारखोंच वाटतात, तेच पुरुष खरोखर धन्य होत. हे धर्मीचे भाषण ऐकून, तेथें जमलेल्या सर्व ऋषिमंडलानें त्याची प्रशंसा केली. नंतर तो पुन: भीष्माला विचारूं लागला,–' आपत्कालीं प्रीति कोणावर करावी व कोणावर करूं नये, तसेंच अशा वेळीं द्रव्य व सोयरे यांचें साहाय्य नसल्यास, आपल्या कामीं कोण येईल तें सांगा. भीष्म म्हणाले,–' मूर्ख, लोभी, आळशी नास्तिक, व्यसनी, निर्लज्ज, मत्सरी, क्रोधिष्ठ, कामापुरती मैत्री धरणारा, इत्यादिकांशीं मैत्री करूं नये. कुलीन, अनुभवी, उद्योगशील, कृतज्ञ आणि वैराग्यसंपन्न, कनक कांता पाहून निर्विकार राहणारा स्वामीकार्य तत्पर, अशा लोकांशीं स्नेह केल्यास पुरुषाची कीर्ती चंद्रप्रकाशाप्रमाणें वाढून, त्याला सहजच सुखप्राप्ति होईल. परंतु वर सांगितलेल्या दोषी लोकांपेक्षांही जे कृतघ्न व घातकी असतात त्यांचा सर्वथा त्यागच करावा.

## कृतघ्न ब्राह्मणाची कथा.

उत्तरेकडील म्लेंच्छ देशांत गौतम नांवाचा एक वेदवर्जित ब्राह्मण, भिक्षेसाठीं चोराच्या गांवीं गेला, त्या गावात एक ब्राह्मण चोरी करून धनवान झालेला होता. तो कोणी आपल्या जातीचा भेटल्यास, त्याला दान धर्म करीत असे. गौतमानें त्याच्या घरी जाऊन भिक्षा मागितली असता त्यानें त्याला वार्षिक भिक्षा व वस्त्रे देऊन आश्रयाला ठेविलें. एक पति–विरहीत सुंदर स्त्रीहि गौतमाला त्यानें दिली. आणि तिच्यासह गौतम त्या चोर ब्राह्मणाच्या घरीं आनंदानें राहिला, कांही काळानें त्याला संतति झाली असतां त्या दासीकुटुंब पोषणासाठीं त्यानें एक वर्षभर धनुष्यबाण घेऊन शिकारींची विद्या संपादन केलीं, व त्या चोरांच्या संगतीनें सर्वस्वी चोर झाला. अशा रितीनें बराच काळ गेला असतां गौतमाचा पूर्वीचा एक स्नेही वेदांत पारंगत झालेला ब्राह्मण त्याला आकस्मात भेटला. हा स्नेही मोठा पवित्र ब्रह्मचारी, व शूद्राच्या घरी अन्न न घेणारा होता. असा गौतमाच्या हातात धनुष्यबाण आणि त्याचें सर्वांग रक्तानें माखलेंले पाहून, तो ब्रह्मचारी ब्राह्मण त्याला म्हणाला,–'अरे तू मध्य देशांत पवित्र देशांत जन्मलेला असतां, आपला सर्व आचार टाकून ही निंद्य-वृत्ति त्वा कां बरे स्वीकारली?' गौतमानें उत्तर दिलें,–'मीं मूर्ख व निर्धन

असल्यामुळें द्रव्यासाठीं येथें आलो. पण तुझ्या दर्शनानें मी कृतार्थ झालो तूं आज येथेंच रहा, मी तुझ्याबरोबर उद्या येतो. ' याप्रमाणें गौतमानें आपल्या मित्राची प्रार्थना केली असतां, तो मित्र-अन्नोदक न घेतां तेथे कायम राहिला. परंतू तेथील अमंगलपणाचा त्याला लवकरच त्रास आला व तो उजाडल्याबरोबर तेथून निघाला, हे पाहून गौतमही तेथून निघाला. तो समुद्रतीरावर गेला. तेंव्हां कांही व्यापारी त्याच्या दृष्टीस पडलें. त्यानां पाहून विचार केला कीं यांना मारून त्याचे द्रव्य हरण करावे. असे म्हणून तो त्याच्यामागून जाऊ लागला. इतक्यांत जवळच्या पर्वतावरून एक उन्मत्त हत्ती आला. आणि त्यानें त्या व्यापाऱ्यांना मारून टाकिले. ते पाहून गौतम घाबरून तेथून पळाला. तो समुद्राच्या बाजूनें जात असता त्याला वाटेत एक फार रमणीय असें उपवन लागले. त्यांत फलपुष्पानी भरलेले नानाप्रकारचें वृक्ष व वेली असून त्यावर अनेक चित्रविचीत्र पक्षी मधूर शब्द करीत होते. त्यात वटवृक्ष फार मोठा विस्तीर्ण असून त्याच्या खाली दिव्य पुष्पांचे थर पडले होतें. गौतमानें हा वट पाहिला,तेंव्हां त्याला फार आनंद होऊन तो विश्रांति घेण्यासाठीं त्याच्या खाली झोपी गेला तो सूर्य मावळला इतक्यांत कश्यपऋषीपासून उत्पन्न झालेला राजधर्मा नांवाचा बकपक्षी अनेक देवकन्यांसह ब्रह्मलोकांहून तेथे आला. त्याला पाहून गौतम विस्मीत झाला, व तहानेनें आणि भुकेनें व्याकूल होऊन त्याची हिंसा करण्याच्या बुद्धीनें त्याच्याकडे पाहू लागला. तेंव्हां राजधर्म, त्याला म्हणाला,–' अरे तूं सायंकाळीं आमच्यांकडे अतिथी आलास, त्याअर्थी तुझे यथाशक्ति स्वागत केलें पाहिजे. ' असे म्हणून त्यानें गौतमाची दिव्य पुष्पांनीं पुजा केली. आणि त्याला नानाप्रकारचें पदार्थ खावयास दिले, व भोजनानंतर आपल्या पंखानीं त्याला वारा घालून त्याचे श्रम दूर केले. मग हा दरिद्री ब्राह्मण आहे असे कळल्यावर राजधर्मा म्हणाला,–तुझे दारिद्र्य दूर होईल असें करितो. तेथून तीन गांवाच्या अंतरावर विरूपाक्ष नांवाचा राक्षसांचा राजा रहात असतो. तो माझा मित्र आहे. तूं उद्या त्याच्याकडे जा. म्हणजे तो तुझे इच्छित पुर्ण करील, हें ऐकून गौतम राजधर्म्यानें दिलेलीं अमृतफलें खात खात विरुपाक्षाकडे गेला. विरूपाक्षाच्या सेवकांनीं त्याच्या वृत्तांत ऐकून त्याला कळविलें कीं राजधर्म्यानें अतिथी पाठविला आहे राजानें त्याला आपणाकडे आणावयास सांगितल्यावर गौतम त्या नगरांची

शोभा पहात पहात त्याच्याकडे गेला. राजानें त्याचें स्वागत करून नांवगांव विचारलें. गौतमानें आपली हकीगत सांगितल्यावर त्याचें कोणत्या तऱ्हेनें प्रिय करावें याचा विरुपाक्ष विचार करू लागला, त्या दिवशी कार्तिकीपौर्णिमा होती. त्या निमित्तानें त्यानें सहस्र ब्राह्मण भोजनासाठीं बोलाविलें, व त्यांना दिव्य अन्नाचें भोजन देऊन अनेक रत्नाची दक्षिणा दिली, अशा रितीनें त्यांचीं बोळवण करून विरूपाक्षाने त्याना दिवस आहे तो ते द्रव्य घेऊन घरी जावयास सांगितलें. कारण ते स्थान रात्री धोक्याचें होते. राजाने सांगितल्याप्रमाणें सर्व ब्राह्मग ते अपार द्रव्य घेऊन त्वरित निघून गेले त्याच्याबरोबर गौतमही आपले द्रव्य घेऊन पुनः त्या उपवनतील वटवृक्षाखाली आला. इतक्यांत पूर्वीप्रमाणें राजधर्म्यानें तेथें येऊन, पूनः त्याची पूजा केली. व पंखांनी वारा घालून त्याचे श्रमपरिहार केलें. इकडे गौतमानें विचार केला. कीं, आपल्याला येथून बरेच दूर जावयाचें आहे व बरोबर शिदोरी तर नाहीं तरी त्या पक्षाला मारून शिदोरी करावी अशी मसलत करून त्यानें राजधर्म्याचा वध केला आणि राजधर्म्यानें थंडीच्या निवारणार्थ पेटविलेल्या शेकुटीत त्याला भाजून त्याची शिदोरी बनविली आणि ती वस्त्राच्या शेवटांस बांधून घेऊन चालूं लागला. इकडे दुसऱ्या दिवशीं राजधर्मा न आल्यामुळें विरूपाक्षाला चिंता उत्पन्न होऊन तो आपल्या मुलाला म्हणाला,–' अरे, आज दोन दिवस झाले, राजधर्मा भेटला नाहीं. त्याला त्या मूर्ख ब्राह्मणानें मारिलें तर नसेल ? असें म्हणून त्यानें पुत्राला राजधर्म्याच्या शोधार्थ पाठविले, तो राक्षसाला बरोबर घेऊन त्या वडाखालीं येतो तों, तेथें त्याला राजधर्म्याचीं पिसें दिसलीं. ती पाहून दुःखानें तो रडूं लागला आणि त्या दुष्ट ब्राह्मणाच्या शोधार्थ त्यानें राक्षसांना चोहोंकडे पाठविलें. त्यांनीं गौतमाला ताबडतोब पकडून त्याचा झाडा घेतला, तों त्याच्या पदरांत राजधर्मा सांपडला. मग त्या गौतमाला घेऊन ते मेरुव्रजशहरीं विरुपाक्षाकडे आले, आणि त्याला त्याच्या कृतघ्नपणाची हकीकत त्यांनीं कळविली. ती ऐकून विरुपाक्षाच्या सर्व कुटुंबाला अत्यंत दुःख झालें व राग आला. विरुपाक्षानें पुत्राला आज्ञा केली कीं, ह्या कृतघ्न ब्राह्मणाला मारून त्याचें मांस राक्षसांना द्या. परंतु राक्षस त्या कृतघ्नाचें मांस खाण्यास कबूल होतना. ते म्हणाले, याचें मांस चोरांना द्या. चोरही म्हणूं लागले कीं. या पाप्याचें मांस आम्ही खाणार नाहीं. कारण म्हटलें आहे कीः–

ब्रह्मघ्ने च सुरापे च चौरे भग्नव्रते तथा ।
निष्कृतिर्विहिता राजन् कृतघ्ने नास्ति निष्कृतिः ।।

सर्व पापांना प्रायश्चित आहे; परतु कृतघ्नपणाला मात्र प्रायश्चित नाही. असो, मग गौतमाचे त्यांनी तुकडे तुकडे करून फेंकून दिलें, आणि विरूपाक्षानें राजधर्म्याची यथोक्त विधीनें उत्तरक्रिया केली. त्या वेळी कामधेनूनें स्वर्गांतून येऊन राजधर्म्याच्या चितेवर दुग्धाचा वर्षाव केला. तो दुग्धाचा फेंस चितेवर पडतांच, राजधर्मा जिवंत झाला. इतक्यांत इंद्र तेथें आला, आणि त्यानें विरुपाक्षाला त्या पक्ष्याचा पूर्ण–वृत्तांत सांगितला. इंद्र म्हणाला;–' हा राजधर्मा एकदां उन्मत्तपणानें ब्रह्मदेवाच्या सभेला गेला नाही, म्हणून ब्रह्मदेवानें त्याला शाप दिला की, तूं कृतघ्न गौतमाची संगति करून प्राणास मुकशील. तो शाप आतां खरा झाला, परंतु त्यानेंच आतां याला कामधेनूकडून वांचविलें. ' हें इंद्राचें भाषण ऐकून, राजधर्मा त्याला म्हणाला,–' हे देवेंद्रा ! गौतम माझा मित्र असल्यामुळें, याल्राही आपण कृपा करून उठवावें. ' ही विनवणी ऐकून, इंद्रानें अमृत शिंपून गौतमाला जिवंत केलें. त्यावेळीं सर्व लोकांना मोठें कौतुक वाटलें. पुढें गौतम, देवांच्या शापावरून एका शूद्रीच्या पोटी जन्मास आला, आणि स्वतःही दुष्ट पुत्रांना जन्म देऊन, शेवटीं दुःखात मरण पावला, आणि त्याला कृतघ्नाचे सर्व नरक भोगावे लागले. ' धर्मा, हें कृतघ्नाख्यान मला नारदानें सांगितलें. तूं हें नीट लक्षांत ठेवून कृतघ्नाशीं केंव्हांहि मैत्री करूं नकोस.

---

# अध्याय १० वा



## मोक्षधर्म

धर्म भीष्माला म्हणाला,–' हे भीष्मदेवा, येथवर आपण मला राजधर्म आणि आपद्धर्म सांगितलेत. आतां मोक्षधर्म कृपा करून सांगावा. ' हें ऐकून भीष्म म्हणाले,–' सर्व धर्मांत मोक्षधर्म श्रेष्ठ आहे. यासाठीं, धर्मा, आत्म-

मोक्षासाठींच सर्वांनीं प्रयत्न करावा.' त्यावर धर्म म्हणाले,–'पिता, पुत्र, स्त्री, बंधु, द्रव्य, यांचा नाश झाला असतां बुद्धि कशी ठेवावी म्हणजे शोकाचें निरसन होईल?' तेव्हां भीष्म म्हणाला,–'धर्मा, जें नाशिवंत त्याचा नाश झाला हें योग्यच आहे, असा विचार करावा, म्हणजे शोक दूर होतो. याविषयीं एक संवाद तुला सांगतों.'

## सेनजित् व ब्राह्मण यांचा संवाद

सेनजिताचा पुत्र मृत्यु पावला असतां तो शोकानें विव्हल झाला. तेव्हां एका ब्राह्मणानें त्याला ज्ञानोपदेश केला. तो म्हणाला,–'राजा, ज्या विषयीं शोक करणें अयोग्य त्याचा तूं शोक काय म्हणून करतोस? आपण सर्व जेथून आलो, तेथेंच पुनः सर्वांना जावयाचें आहे. सर्व चराचर सृष्टि क्षणभंगुर आहे. आपल्यापुढें हा जो पसारा दिसतो तो आपला नव्हे. ही राज्यलक्ष्मी तरी तुझी आहे काय? समुद्रांत लाटांच्या योगानें काष्ठें एकत्र होतात व पुनः दूर जातात, त्याप्रमाणें प्राणी दैववशात एकत्र होऊन पुनः विभक्त होतात. यासाठीं पुत्र, ज्ञातिबांधव, यांच्या ठिकाणीं आसक्ति धरू नये शेवटीं सर्वांचा नाश व्हावयाचा आहे. रात्रीमागून दिवस व दिवसामागून रात्र, हा जसा क्रम आहे, त्याप्रमाणें उत्पत्ति-प्रलयाचेंही चक्र आहे. सुख दुःख हीही एका मागून एक येणारी आहेत. कोणी निरंतर दुःखी निरंतर सुखी असत नाहीं. हें शरीर सुख व दुःख या दोहोंचेंही आश्रयस्थान आहे. स्त्रीपुत्र इत्यादिकांविषयीं आसक्ति धरून मोहानें प्राणी क्लेश पावतो. पुत्रादिकांचा नाश होणें ही गोष्ट केवळ दैवाधीन आहे. शूर, भीरु, बुद्धिमान्, दुर्बल या सर्वांनांही सुखदुःख आहे. यासाठीं विचार करून दुःख सोडून द्यावें. बुद्धिहीनालाच नेहमीं दुःख होतें. दुःखाचें खरें कारण आळस होय. तो टाकून सुखप्राप्तीचा यत्न करावा. मूर्खाला अनेक रीतींनीं शोक व भय प्राप्त होतें, परंतु सुज्ञाला होत नाहीं. सर्व इच्छा पूर्ण होऊन मिळणारें सूख, किंवा स्वर्गसुख यांहून निरिच्छपणाचें सुख श्रेष्ठ आहे पुरुष शत्रू असो, किंवा मूर्ख असो, पूर्व जन्मांतील कर्मामुळेंच त्याला शुभ किंवा अशुभ यांची प्राप्ति होतें. त्याप्रमाणेंच आवडनावडीच्या योगानें त्याला सुख किंवा दुःख होतें. म्हणून सर्व प्रकारचा काम (इच्छा) निंद्य समजून दूर करावा कारण तोच सगळ्या अनर्थांना कारण आहे. पुरुषानें कामत्याग

केल्यास त्याला आत्मत्वाची प्रतीति येतें. ज्याविषयीं त्याला आसक्ति असते, तोच विषय तापदायक होतो म्हणून ज्ञानाच्या बलावर विषयांचाहीं त्याग करावा. कामदिषड्रिपूंना भिऊन जेव्हां तो त्यांच्या पासून दूर होतो. तेव्हां पुरुष ब्रह्मपदवीला पोंचतो सत्यासत्य भयाभय, सुखदुःख प्रियाप्रिय इत्यादि जोडया टाकून शांत झालेला पुरुष ब्रह्मस्वरुप होतो. महत्त्वाकांक्षा ही फार भयंकर आहे. ती टाकावी. म्हणजे निर्विकल्प (शुद्ध) सुखाची प्राप्ति होते. ' राजा, पिंगला नांवाचीं एक वेश्या होती. तिला आपल्या घरीं कोणी येत नाहीं हें पाहून एकदां फार खेद झाला. व ती मनांत म्हणाली,-' धिक्कार असो, या संसाराला ! काभवासना धरून द्रव्यासाठीं मीं आजपर्यंत अनेक क्रीडा केली; परंतु आतां तीं वासना टाकून परमेश्वरालाच मी पति करीन असा विचार करून व विरक्त होऊन ती वनांत तप करावयास गेली असतां, एकदा मला भेटली, व म्हणाली,-' कीं विषयवासनेचा त्याग केल्यामुळें मला सुखप्राप्ति झालीं.' ही पिंगलेची कथा ऐकून, सेनजित्‌राजानें शोक टाकून दिला.' ही कथा ऐकून धर्म म्हणाला, भीष्म आजोबा, हा काल सर्वांचा क्षय करणारा आहे. तरी यापासून कोणत्या उपायानें सुख होईल?" तेव्हां भीष्म म्हणाले,-' धर्मा, एक पिता-पुत्रसंवाद तुला सांगतो.

## पिता पुत्र संवाद

एका ब्राह्मणाचा पुत्र ज्ञानी व सर्व शास्त्रांचें अध्यायन केलेला होता. त्यानें एकदां पित्याला विचारिलें,-' 'बाबा, क्षणोक्षणीं आयुष्य कमीं होत आहे; तरी कोणत्या धर्माचें आचरण केले असतां अंती सुखप्राप्ति होईल तें सांगा.-'तेव्हां पिता म्हणाला,-' प्रथम ब्रह्मचर्यानें वेदाध्ययन करून, पुढें गृहस्थाश्रमाचा स्वीकार करावा, त्यांत अग्निहोत्रादि कर्मे करून उत्तम संगति निर्माण करावी. नंतर वनाचा आश्रय करावा; म्हणजे सुख होईल. सर्व लोक जरा व मृत्यु यांनीं अहोरात्र पीडिलेले असून, प्रत्येक दिवशीं आयुष्य क्षीण होत असल्यामुळें ज्याप्रमाणें थोडया पाण्यांत मत्स्याला सुख होत नाहीं त्याप्रमाणें संसारांत प्राण्याला सुख होत नाही. मृत्यु अगदीं समीप आला आहे असें समजून तप आदिकरून कांहीं तरीं सत्कृत्य केल्याशिवाय, एकही दिवस व्यर्थ जाऊं देऊं नये स्त्रीपुत्रांविषयीं आसक्ति न ठेवितां मृत्यूवर, निजलेल्या वाघाप्रमाणें नजर ठेवावी. पशूला वाघ ओढून नेतो. त्याप्रमाणें

जीवाला क्रूर मृत्यु ओढून नेतो. यासाठीं सत्यव्रत आचरून व इंद्रियनिग्रह करून जो शांत होतो, तोच मृत्यूला तारून जातो. मृत्यु व अपमृत्यु हे दोनहि शरीरांत नांदत असतात. त्यात मोह हा मृत्यु आणि सत्य हा अपमृत्यु समजावा. म्हणून तू धन–पुत्र–दारा यांच्याशीं संबंध न ठेवता ज्ञान संपादन कर.' असें सांगून तो पिता तप करण्याकरिता वनांत निघुन गेला. याप्रमाणें निष्काम होणें हे सुखाचें खरें साधन आहे.' त्यावर धर्म म्हणाला,– 'आजोबा धनवान् आणि निर्धन यांना सुखदुःखें कोणत्या कारणांनीं होतात ?'

भीष्म म्हणाले,–' धर्मा या प्रकरणी शम्यकानें पूर्वी मला एक कथा (दंतकथा) सांगितली तीच तुला सांगतों. एक ब्राह्मण, दुष्ट स्त्रीच्या संगानें क्लेश पावून अनेक दुःखें भोगू लागला. एकदां त्यानें विचार केला कीं ज्यामध्यें सुखाच्या योगानें हर्ष होत नाहीं, व दुःखानें क्लेश होत नाहीं; तो तपाचा मार्ग उत्तम होय. द्रव्यहीन हाताचें उसे करून सुखानें निद्रा घेतो; परंतु धनाढ्याला मृदु शय्येवरहीं त्रास होतो. लक्ष्मीच्या योगानें दुःख होऊन प्राण्याला शेवटीं अधःपात होतो. असा विचार करून तो ब्राह्मण सर्वांचा त्याग करून सुखी झाला. यासाठीं, द्रव्याची आसक्ती टाकून द्यावी.' त्यावर धर्म म्हणाला,—' भीष्म देवा, ज्या पुरुषाला मोठी इच्छा आहे, त्याला सुख कसें प्राप्त होईल ?'

## मंकीची कथा

भीष्म म्हणाले–' धर्मा, सर्वांविषीं समबुद्धि, शांति, अनासक्ति, सत्य वचन आणि वैराग्य, हे पांच गुण ज्याच्यापाशी आहेत, त्याला सुख मिळतें. मंकीची कथा यासंबंधानें बोधपर आहे, ती ऐकः—' मंकी प्रथम मोठा धनाढ्य होता; परंतु कांहीं कालानें त्याचें धन नष्ट झालें असतां, उरलेल्या थोड्याशा धनानें त्यानें एक वासरूं विकत घेतलें. एके दिवशीं तें घरीं बांधलेलें असतां एक उंट धांवत येऊन त्यानें त्याला पायाबरोबर ओढून नेलें, व ते मरण पावलें. तेव्हां आतां कांहीं नाहीं असें पाहून तो दुःखानें गृहत्याग करून जनकाच्या सभेंत गेला. तेथें शुक्राचार्य त्याच्या दृष्टीस पडला. इतरही पुष्कळ लोक जमले होते. त्यांना मंकी म्हणाला,–' अहो, सर्व विषय व भोग टाकून द्या. म्हणजे तुम्हांला शांति मिळेल; नाहींतर व्यर्थ शोक मात्र होईल आजपर्यंत विषयसुखानें कोणी तृप्त झाला नाहीं; व पुढेही होणार नाहीं

तृष्णा, शोक हीं नेहमी वाढतच असतात यासाठीं नेहमीं तृप्त राहून सुखी असावें.' याप्रमाणें मंकीनें जनकसभेंत आपला अनुभव सांगितला, आणखी ही एक इतिहास असाच आहे. नहुष राजाला बोध्य ऋषि एकदां म्हणाला, 'मींही शोक दूर करण्यासाठीं पिंगला, सर्प, कुररपक्षी, सारंग, ईषिका, आणि कुमारी असे सहा ÷ गुरु केले. त्यांचा वृत्तांत पुराणांत सांगितला आहे." त्यावर धर्म म्हणाला,–' वित्तनाशामुळें शोक झाला असतां काय करावें ;' भीष्म म्हणाले,–' धर्मा, याविषयीं अजगर व प्रल्हाद यांचा संवाद आहे.

## अजगर–प्रल्हाद संवाद

प्रल्हादानें अजगराला विचारिलें; 'तूं अगदीं स्वस्थ, शांत व सर्वांना मान्य असून धर्मार्थाचाही अंगीकार करीत नाहीस तरी तुझी वृत्ति आहे तरी कशीं?' अजगर म्हणाला,–' सर्व भूतांना उत्पत्ति, स्थिति आणि नाश आहेत; हें जाणून मीं कधीं सुख व दुःख मानीत नाही. कारण उत्पत्ति आणि नाश हा संपूर्ण विश्वाचा स्वभावच आहे. तटस्थ राहून जें मिळेल तें खातों. नाही मिळालें तर उपवासही करतो. कधीं गोड अन्न खातों, कधीं शुष्क कण खातों, केव्हां दिव्य वस्त्र अंगावर घेतों, कधीं फाटके कौपीनही घालतों. अशाप्रकारें कोणत्याही वस्तूविषयीं आसक्ति न ठेवतां अयाचित वृत्तीनें मीं रहातों; म्हणूनच माझ्या वृत्तीला अजगरवृत्ति म्हणतात. या वृत्तीनें मला सुख होतें.' याप्रमाणें मोक्षधर्मासंबंधानें अजगर–प्रल्हादाचा संवाद भीष्मानें धर्माला सांगिला.

---

÷ यांपैकीं पिंगलेची कथा पूर्वीं आलीच आहे. सर्प स्वतःचें घर न करितां दुसऱ्याच्या घरांत आयताच शिरतो. कुररपक्षी जाळ्यांत टाकलेलें मांस पाहून फसला नाहीं. सारंग कोणाचा द्वेष करीत नाहीं. ईषकाच्या ऐवजीं भारतात इषुकार (बाण करणारा लोहार) आहे. एक इषुकार बाण करीत असतां राजा जवळून गेला तरी त्याला समजलें नाही, इतकें त्याचें एकाग्र मन होतें. कुमारीनें हातांतील कंकणें वाजत म्हणून ती फोडून एकच ठेविलें. अशी ही कथा आहे.

# अध्याय ११ वा



## इंद्र–काश्यप संवाद

वैशंपायन जनमेजयास म्हणतो, अजगराख्यान ऐकिल्यावर धर्मानें विचारिलें, 'बांधव, कर्म, वित्त, प्रजा आणि धैर्य यांपैकीं कोणाचा स्वीकार पुरुषानें करावा ? तेव्हां भीष्म म्हणाले,–' प्रजा, ( गहन विषयांचें ज्ञान करून घेण्याची शक्ति ) हीच भूतमात्राला मोक्षाचें साधन असल्यामुळें तिचाच संग्रह करावा. याविषयीं एक कथा इंद्र–काश्यप संवादरूपानें आहे ती ऐक.

कोणीएक उन्मत्त वैश्य वेगानें रथ हांकीत असतां, त्याच्या धक्यानें काश्यप ब्राह्मण जमिनीवर पडला. तेव्हां काश्यपाला या अपमानास्तव अत्यंत दुःख होऊन त्यानें प्राणत्याग करण्याचा निश्चय केला, त्यावेळीं इंद्र शृगालाच्या रूपानें तेथें आला आणि त्याला म्हणाला,–' अरे, सर्व प्राणी देखील मनुष्य देहाची इच्छा करितात, आणि तूं त्याचा त्याग करावयास तयार झालास हें योग्य नव्हे. ज्या प्राण्याला हात आहेत तो सर्वांत श्रेष्ठ होय. अन्न, वस्त्र, स्पर्श, इत्यादि विषयांचा उपभोग होत असतात त्यांनाच घडतो. हात नाहींत त्यांना पाऊस, ऊन, थंडी यापासून दुःख भोगावें लागते. एकंदरींत मनुष्ययोनि धन्य आहे. मला हस्त नसल्यामुळे फार पीडा होतें. '–असें सांगून शृगाल म्हणाला,–' यास्तव तूं आत्महत्येचा विचार सोडून दे. उगाच पापांत पडूं नकोस. पापामुळेंच मला ही शृगालयोनि प्राप्त झाली. कालपरत्वें सुख किंवा दुःख मिळत असतें. अखंड सुखी किंवा दुःखीं कोणीच नाही. प्रत्येकजण प्रथम मनुष्यत्वाची इच्छा करितो. त्यानंतर द्रव्य, राज्य, इंद्रपद, यांची क्रमानें इच्छा होते. इंद्रियें सर्व सुखाचें मूळ आहेत, त्यांना वश करून प्रजेनें शांत व्हावे' शृगालानें असा नानाप्रकारें काश्यपास बोध केल्यावर कश्यपानें ज्ञानदृष्टीनें पाहिले, तो तो शृगाल नसून इंद्र आहे, असें त्याला दिसले, मग त्याला आपल्या आश्रमांत नेऊन त्याची काश्यपानें पूजा केली, आणि त्याच्या उपदेश करून त्याचा शोक नाहीसा झाला.

# आत्म्याची अजरामर स्थिति

हें ऐकून धर्मानें विचारले 'पृथ्वी आदीकरून पंचमहाभूतांची उत्पत्ती कोणी केली? त्याचें विभाग कोठे व कसे झाले आहेत, तसेंच शरिर नष्ट झाल्यावर त्यातील जीव कोठे जातो?' तेव्हां भीष्म म्हणाला,- 'धर्मा, हा सर्व प्रकार पुर्वी भृगूने भारद्वाजाला सांगितला होता; तोच तुला सांगतो, अनादि, अभेद्य, जरामरणहित, अक्षय्य, अव्यक्त अशा एक महत्वापासून अहंकार, त्यापासून आकाश, आकाशापासून वायु, वायुपासून तेज, तेजापासून जल, जलापासून पृथ्वी अशी सर्व भूतें उत्पन्न झाली. आदिपुरूषाच्या नाभि-कमलापासून ब्रह्मा झाला व त्यापासून वेद निर्माण झाले. विष्णू विराटस्वरूप असून पर्वत त्याच्या अस्थीचें मणी, पृथ्वी मेदमास आणि समुद्र रूधिर होय. वायु त्याचा श्वास, आकाश उदर, अग्नि व नद्या ह्या शिरा आणि चंद्र हे त्याचें नेत्र आहेत, अंतरिक्षांची पोकळी हें त्याचे मस्तक, पाताळ, चरण दशदिशा हे त्या आदिपुरुषाचें हस्त होत. तो अज्ञेय आणि अनंत असून सर्व विश्वाची उत्पत्ति त्यापासून असल्यामुळें त्याला अनंत म्हणतात. '–सिद्ध, सूर गंधर्वादि त्याची सेवा करीत असून, चंद्रसूर्यादिकांना त्याच्या पलिकडें गाढ अंधकार आहे. अंधारापलीकडे जल, जलापलीकडे तेंज आणि त्याच्यापली-कडे आकाश आकाशापलीकडे सर्व जीवन(उदक) पसरलेंले आहे. अशा प्रकारच्या सृष्टीरूप कमलात बसून ब्रह्मदेव ब्रह्मांडे घडवितो, त्यानें प्रथम उदक उत्पन्न केलें, एकदां ब्रह्मलोकांत सर्व ऋषि बसले असतां, एकाएकी अभ्दुत आकाशवाणी झाली व तीपासून क्रमाने आकाशादि पंचमहाभुतांची उत्पत्ति झालीं वास्तविक भुतें अनंत आहेत, परंतू त्या सर्वांची या पांचापासून उत्पत्ति असल्यामुळें, यांना पंचमहाभूतें म्हणतात. ही महाभुतें जशीं प्राण्यांत तशीं वृक्ष–पाषाणादिकांतही आहेत. वृक्ष घन असला तरी त्यांत अंतर्बाह्य आकाश भरलेलें आहे. त्यांची फळें व फुलें म्लान होतात, त्याचें फळ खालीं पडल्यास शद्ब होतो, व तें खालींच पडतें, अन्यत्र पडत नाहीं. यावरून त्याला स्पर्शादि इंद्रियें आहेत. तो तोडल्यास पुनः वाढतो म्हणून त्यांत जीवात्माही आहे. अशा प्रकारें स्थावरांतही पंचभूतें व इंद्रियें हीं आहेत असें दिसून येतें. भारद्वाज म्हणालें,--' वायूच्या योगानें श्वासोच्छ्वासादि शरीराच्या क्रिया होतात. अग्नीच्या योगानें देहांत उष्णता रहातें व तें भूत झाल्यास शरीरां-

तून वायु व अग्नि हेच नाहींसें होतात. यास्तव जीव म्हणून जो तुम्हीं म्हणतां तो निरर्थक दिसतो.' तेव्हां भृगु म्हणाले,--' जीवाचा नाश होत नाहीं, तो एका शरीरांतून दुसऱ्या शरिरांत मात्र जातो. तो शरीरावांचून राहूं शकत नाहीं.' त्यावर भारद्वाज म्हणाले,--' जीवाचा नाश होत नसेल, पण देहांत अग्नि, जल, वायू हीच दिसतात. शरीर फाडलें तरी मांस, रक्त, हाडें इत्यादिकच दिसतात. जीवात्मा दिसत नाहीं ? तेव्हां तो आहे असें कसें म्हणावें ?''

भृगु म्हणाले,--' ज्याच्या योगानें सर्व प्रकारचें ज्ञान आणि सुख-दुःखांचा अनुभव मिळतो तोच जीवात्मा. असो, प्रथम ब्रह्मदेवानें तेजोयुक्त असें ब्राह्मण उत्पन्न केलें, आणि त्यांना सत्य, धर्म, तप, शौच इत्यादि व्यवहार लावून दिले. पुढें देव, गंधर्व, राक्षस पिशाच्यादि आणि ब्राह्मणादि चार वर्ण उत्पन्न झाले. प्रथम सर्व मनुष्यें ब्राह्मणच होतीं. परंतु पुढें कर्माच्या विलक्षणपणामुळें वर्ण भेद झाला. दानाध्ययनादि सहा कर्मे व शमदम यांनीं युक्त होते ते ब्राह्मण राहिले. क्षात्रवृत्तींत निपुण होतें तें क्षत्रिय झालें. शेतकी व व्यापार करणारे वैश्य झाले व आचारविहिन असून सर्व वर्णांची सेवा करणारे ते शूद्र झाले चारी आश्रमांना उचित कर्मे करून शमदमानीं युक्त असमारे ब्राह्मण शेवटीं ब्रह्मपदवी पावतात.'

हा भृगु-भारद्वाजांचा संवाद ऐकून पुनः धर्मानें विचारिलें ' प्रलय-काळीं जग कोठें जातें आणि अध्यात्म म्हणजे काय आहे, तें सांगा.' तेव्हां भीष्म म्हणाले,--' प्रथमतः आदिनाथानें पंचमहाभूतें उत्पन्न करून त्यापासून सर्व विश्व निर्माण केलें. महाभूतापैकीं आकाशाचा गुण शब्द, वायुचा स्पर्श, तेजाचा रूप ( रंग ) जलाचा रस ( चव ) आणि भूमींचा गंध ( वास ) असें आहेत. चक्षु, कर्ण, त्वक् घ्राण, रसना ( जीभ ) आणि सहावें मन यांच्या योगानें प्राणी या पंचमहाभूतांचें गुण जाणतो; आणि म्हणूनच सर्व प्राण्यांचें समत्व आहे. या ज्ञानाला अध्यात्मज्ञान असें म्हणतात. आतां ध्यानयोग सांगतों, तो एक. '

पुरुषानें प्रथम सुखदुःख, शीतोष्ण, इत्यादि द्वंद्वांचा (जोडयांचा) त्याग करून, सर्वदा सात्विक वृतीनें रहावें. आचार नियमाप्रमाणें वागून विषयांचा संग न करितां सत्यवादी व शांत व्हावें, मग सर्व इंद्रियांचा निरोध करून पद्मासन घालून मन परब्रह्माकडे लावावें. याला ध्यानयोग म्हणतात. ज्या

अव्यक्त परब्रह्मापासून जगत्रयाची उत्पत्ति झाली, त्याच अव्यक्तांत यांचा पुनः लय होतो. अध्यात्म-ध्यान आणि उत्पत्ति-प्रलय यांच्या संबंधानें एक कथा आहे. ती अशी—

## जापकाख्यान

वेदशास्त्रपारंगत काढ्यु नामक एक ब्राह्मण व्रतस्थ राहून जप करीत असतां, सरस्वती प्रकट होऊन त्याला वर मागावयास सांगूं लागली. परंतु ब्राह्मणानें कांहीं भाषण न करितां आपला जप तसाच चालू ठेविला, जप समाप्त झाल्यावर त्यानें सरस्वतीला नमस्कार करून तिची स्तुति केली, आणि निरंतर ‘जप करण्याचीच बुद्धि असावी,’ असा तिच्यापाशीं वर मागितला. सरस्वतीने तुला उत्तम पद प्राप्त होईल, असा वर दिल्यावर जापक ब्राह्मणानें देवांचा शंभर वर्षें जप केला. त्या वेळीं प्रत्यक्ष यमधर्म त्याच्यापुढें उभा राहून म्हणाला,—‘तूं सर्व लोक जिंकिलेस, आतां तुझ्या शरीराचा अंत होतांच तुला मोक्ष प्राप्ती होईल.’—यावर ब्राह्मण म्हणाला ‘मला शरीर टाकावयाचें नाहीं. शरीर असेल तरच माझा जप चालेल.’— इतक्यांत मूर्तिमंत मृत्यु तेथें प्रगट होऊन त्याला म्हणाला,—‘तुझें जपफळ पूर्ण झालें, म्हणून मी तुला न्यावयास आलों.’— तेव्हां ब्राह्मणानें सांगितलें,— ‘मीच पूर्वींचा अंतकर्ता काल आहे.’—असें म्हणून त्यानें मृत्यूची स्तुति केली तो इक्ष्वाकु राजा तेथे येऊन दोघांचेंही स्वागत करून म्हणाला,—‘मजजवळ कांहीं मागणें मागा.’ तेव्हां ब्राह्मणानें उत्तर केलें,—‘मला कांहीं मागावयाचें नाहीं मजजवळ माग, तें मी देतों.’—इक्ष्वाकु म्हणाला,—‘मी क्षत्रिय आहे. मी ‘दे,’ हा शब्द जाणत नाहीं, तथापि तूं देत असल्यास आपल्या जपाचें सर्व फल मला दे.’—ब्राह्मणानें ठीक आहे म्हटलें, व यमधर्म आणि मृत्यु यांना साक्षीस ठेवून आपलें जपफळ राजाला दिलें. तेव्हां राजा पुनः म्हणाला,— ‘मला जपफळाचें प्रयोजन नाहीं.’ तेव्हां ब्राह्मणानें सात्याची यथार्थ स्तुति करून त्याला सांगितलें, कीं, सत्यामुळें सर्व जग चाललें आहे. सत्याचा त्याग केल्यास अधःपात होतो. मी तुला जपफळ दिलें आहे, तरी सत्याला स्मरून तुला तें घेतलेंच पाहिजे.’ हें ऐकून राजा उलट बोलला, ‘असें असेल तर

माझें तपफळ तूं घे.' असा त्यांचा वाद चालला असतां, एकाएकीं आकाशवाणी झाली कीं, 'तुम्हीं आतां वाद करू नका. दोघांनांही आपापलीं फळें प्राप्त झाली आहेत.' तेव्हां राजा म्हणाला,–'मला स्वर्गफलाची इच्छा नाही. तरी माझ्या तपाचें फळ हा ब्राह्मण भोगो.' ब्राह्मणानें उत्तर दिलें–'मी लहानपणीं हात पसरिला तेवढा पुरे. आतां प्रतिग्रह घेणें नाहीं. असें दोघे बोलत आहेत, तो विष्णुदूत विमान घेऊन तेथें आला. तरी ब्राह्मण व राजा आपलें वचन सोडीनात. त्या समयीं इंद्रादिदेवांनीं त्या दोघांवर पुष्पवर्षाव करून त्यांना धन्यवाद दिला, आणि म्हणाले,–'तुम्ही दोघेही स्वर्गाला जाल.'–परंतु ते दोघेही तिकडे लक्ष न देतां इंद्रियांचा निरोध करून ब्रह्माकडे मन लावून ध्यानस्थ बसले. तेव्हां त्या दोघांच्याही तालुप्रदेशांतून दिव्य तेज निघून तें ब्रह्मांत प्रविष्ट झालें. हें पाहून सर्व देव आश्चर्यभरित होऊन आपापल्या ठिकाणीं निघून गेले.' धर्मा, जापाकख्यान जे ऐकतील त्यांना खचित स्वर्गप्राप्ति होईल.

---

# अध्याय १२ वा



## ज्ञानयोग

धर्म भीष्मास म्हणाला,–'तात, ज्ञानयोग, यमनियम, यांचें फळ काय, आणि जीवाला कसें जाणावें, तें सांगा.' तेव्हां भीष्म म्हणाला,–'मनूनें बृहस्पतीला हाच प्रश्न केला होता. तेव्हां बृहस्पती म्हणाला,–'इष्ट प्राप्त व्हावें व अनिष्ट होऊं नये, या बुद्धीपासून कर्माची प्रवृत्ति होते; आणि इष्ट व अनिष्ट या दोघांचाही संसर्ग होऊं नये, या बुद्धीने ज्ञानाची प्रवृत्ति होते. ब्रह्मचर्यव्रतानें वेदाध्ययन केल्यावर विहित कर्मे करून गृहस्थाश्रमापासून स्वर्गप्राप्ति होते. व्रतादिकांचें आचरण केल्यास भक्तिमार्गानें तेंच फळ मिळते. हें ज्ञानयोगाचें व व्रतनियमांचें सार होय.' असो. 'पंचमहाभूतांव्यतिरिक्त, उष्ण, थंड, मऊ, कठीण इत्यादिकांच्या पलीकडील, सर्वव्यापि,

अनादि, अनंत, असें जें तत्व त्याला आत्मा म्हणतात.' त्यावर धर्म म्हणाला;–'भीष्मदेवा, ब्रह्मादिकांची उत्पत्ति कशी झाली. तें कथन करा.' तेव्हां भीष्म म्हणाले,–'ब्रह्मा स्वयंभू असून त्याला मरीचि, अत्रि, अंगिरा, पुलस्त्य, पुलह, ऋतु आणि वसिष्ठ, असे सात मानसपुत्र झाले. त्यांत अत्रीच्या वंशांत प्राचीनबर्हीपासून दक्ष प्रजापति उत्पन्न झाला. मरीचीला कश्यप नामक पुत्र झाला आणि त्याच्यापासून सर्व देवांची उत्पत्ति झाली. त्यांत शक्र × अर्यमा, ब्रह्मा, मित्रावरुण, सविता, धाता, विवस्वान्, त्वष्टा, पूषा, इंद्र आणि विष्णु हे बारा आदित्य होत. ब्रम्ह्याचे पुत्र अश्विनीकुमार आणि त्वष्ठ्याचे तेरा ÷ रुद्र होत. ते असेः–विश्वरूप, अजैकपात्, अहिर्बुध्न्य, विरूपाक्ष, रैवत, हर, बहुरूप, अपराजित, त्र्यांबक, सुरेश्वर, जयंत, पिनाकी आणि सावित्र. तसेच ध्रुव, अध्रुव, सोम, आप, अनल, नल, प्रत्यूष, प्रभाव आणि हेमवर्ण हे आठवसु + होत. हे मुख्य देव जाणावे. यांचें प्रातःकलीं स्मरण करावें. आतां ऋषीची माहिती सांगतों. यवक्रीत, रैभ्य, अर्वाबसु, अजिष्ट, कक्षीय, अनल, परावसु आणि अंगिसू हे पूर्वदिशेचे ऋषि आहेत. आत्रेय, इध्मवाहन, उन्मुच, दृढव्रत, विमुच, अगस्ति, आणि प्रमुच हे दक्षिण दिशेचे; ऋतग्र, कवि, सारस्वत, धौम्य, परव्याध, एकत, द्वित आणि त्रित, हे पश्चिमेचे; आणि अत्रि, वसिष्ठ, कश्यप, गौतम, भारद्वाज, विश्वामित्र आणि जामदग्न्य हे उत्तर दिशेचे होत.

## मोक्षयोग

हें ऐकून धर्म म्हणाला,–'भीष्म आजोबा, आतां मोक्षयोगाचा विचार मला सांगा.' तेव्हां भीष्म म्हणाला,–धर्मा, याविषयीं गुरुशिष्यांचा पुरातन संवाद तुला सांगतों. ते म्हणाले,–'एकदां शिष्यानें गुरुला प्रश्न केला

× यांच्या ऐवजीं भारतांत भग आणि अंश अशीं नांवें आहेत.

÷ रुद्र तेरा नसून अकरा आहेत. भारतांत यांना रुद्र म्हटलेलें नसून केवळ त्वष्टयाचे पुत्र म्हटलें आहे.

+ आठ म्हणून खरोखर नऊ दिले आहेत. धरो ध्रुवश्च सोमश्च अहश्चैवानिलोऽनलः। प्रत्यूषश्च प्रभासश्च वसवोऽष्टवितिस्मृतः। अशीं आठ वसूंचीं नांवें आहेत.

असतां, गुरु शिष्याला म्हणाला,–' ऐक, या विश्वाचें आदिकारण वासुदेव होय. तो ज्ञान, यज्ञ, सत्य, तितिक्षा इत्यादि रूपांचा असून अविनाशी आहे, तोच कृष्णरूपानें अवतरला आहे. उत्पत्ति आणि प्रलय या लक्षणांनीं युक्त अशा ज्या अनादि कालचक्रांत हें विश्व सवंदा भ्रमण करतें आहे, तेंही कृष्णरूपच आहे. तोच एकटा उत्पत्ति, स्थिति आणि संहार, यांचा कर्ता आहे. या कृष्णाला जे जाणतात, ते सर्वप्रकारें मोक्षाचे अधिकारी होतात. याच्याच कृपेनें पूर्व युगाच्या अंतीं नष्ट झालेले वेद ऋषींना तपश्चर्येनें प्राप्त झाले, भृगुऋषीला नीतिशास्त्र मिळालें व भारद्वाजाला धनुर्वेद प्राप्त झाला. ऋषींना आणि देवदानवांना सर्व ज्ञान या नारायणापासूनच प्राप्त झालें. दीपापासून ज्याप्रमाणें दीप उत्पन्न होतात, त्याप्रमाणें त्या मोक्षस्वरूप नारायणापासूनच सर्वांना मोक्षाचें साधन मिळालें. विषयांपासून इंद्रियांचीं निवृत्ति करून ज्ञानानें मायेचा नाश केल्यानें मोक्षप्राप्ति होते. ' हा संवाद ऐकिल्यावर धर्म पुनः म्हणाला,–' कार्याच्या योगानें पुरुषाला शुभ किंवा अशुभ फळ प्राप्त होतें असें म्हणतात, ' तरी पुरुष कर्तृत्वाचा अधिकारी आहे किंवा नाहीं, तें सांगा ?

## इंद्र व प्रल्हाद यांचा संवाद

एकदां इंद्रानें प्रल्हादाला प्रश्न केला कीं, ' प्रल्हादा, पुरुष हा कर्ता आहे कीं अकर्ता आहे ?' त्यावर प्रल्हाद म्हणाला,–प्रवृत्ति आणि निवृत्ति ह्या जीवांच्या आहेत असें जो म्हणतो, तो अज्ञानी होय. पुरुष स्वभावतः मुक्तच आहे, आणि प्रवृत्ति किंवा निवृत्ति ह्या प्रकृतीच्या आहेत. पुरुष जर खरोखर कर्ता किंवा अकर्ता असेल तर त्याला इष्टाची प्राप्ति व अनिष्टाचा परिहार नेहमीं करतां यावा; परंतु तसें होत नाहीं. यावरून कृतकर्मच प्रेरक होय, असें सिद्ध होते. ' त्यावर इंद्र म्हणाला,–' ज्ञान व शांति यांची प्राप्ति कशी होते ? ' प्रल्हाद म्हणाला,–' इंद्रा, गुरु व वृद्ध यांची अप्रमत्तपणें सेवा केली असतां, पुरुषाला त्यांच्या प्रसादानें ज्ञान व शांति यांची प्राप्ति होते; किंवा कोणाला तीं संकटकाळीं स्वभावतःच प्राप्त होतात. हें प्रल्हादाचें भाषण ऐकून इंद्राला मोठा संतोष झाला.

## दुःखदायक योनीची कथा

धर्म म्हणाला,—'आजोबा, कालाच्या दोषामुळें कोणा राजाला दुःखदायक योनि प्राप्त झाली असल्यास त्याची कथा सांगा.' तेव्हां भीष्म धर्माला बलीची कथा सांगू लागले. ते म्हणाले,–'धर्मा, एकदां इंद्र ब्रह्मदेवाजवळ जाऊन म्हणाला,–'हे ब्रह्मदेवा,! ज्या बलीचें द्रव्य देतां देतां कधींही संपत नव्हतें, तो प्रस्तुत काय बरें करीत आहे.' त्यावर ब्रह्मदेव म्हणाले,–'भूतलावर एक ओसाड घर आहे, त्यांत बलिराजा कालाच्या दोषास्तव गर्दभ होऊन राहिला आहे.' त्यावर इंद्र म्हणाला,– 'कमलोद्भवा, तो गर्दभ मला भेटल्यास मी त्याला मारूं कीं नको ?' तेव्हां ब्रह्मदेव म्हणालें, –'इंद्रा, ती वधावयास योग्य नव्हे, तरी त्याचीं भेट झाल्यास त्याला तूं न्यायानें प्रश्न कर.' हे ब्रह्मदेवाचें भाषण ऐकून, इंद्र ऐरावतावर बसून पृथ्वीवर आला, तेथे ब्रह्मदेवानें सांगितलेल्या ठिकाणी त्यालां बलिराजा, गर्दभाच्या रूपानें दृष्टींस पडला. त्याला पाहून इंद्र म्हणाला –'हे बली! ही अधम योनी तुला कशी प्राप्त झाली? तूं सर्वांना तृप्त करीत होतास तुझ्या घरी गंधर्वादिकरून सर्व नाचत होतें; ते तुझें ऐश्वर्य काय झालें? व तूं आता शत्रूला वश करून या कंगाल स्थितीत कोंडा भक्षून राहातोस, हे कसे?' बलीनें उत्तर केलें, 'इंद्रा, सर्व गोष्टी काळाच्या स्वाधीन आहेत: काळ येईल तेव्हां माझी समृद्धीं पुनः दिसेल,' त्यावर इंद्र म्हणाला, 'तें खरें, परंतु या स्थितीत तुला दुःख कां होत नाही? 'तेव्हां बली म्हणाला 'इंद्रा, देह हा नाशवंत आहे, त्याचा शोक करुन काय फळ? कर्तुत्वाचा अभिमान बाळगणारा पुरुष मुर्ख होय, कर्ता दुसराच आहे, हे मी जाणतो. शिवाय प्रतिक्षणी काळ भूतांचा संहार करितो, हे प्रत्यक्ष दिसत आहे. ते दिसत नसते तर शोक केला असतां. सर्वाला कारण काळ आहे. हीन व श्रेष्ठ रूप त्याच्याचमुळे प्राप्त होतें. इंद्रा, तूच पहा बरे. तुझ्या बालपणांत जी वृद्धी होती, ती आता आहे काय? कालाच्या योगानें असे विलक्षण फेरफार होत, असतात' 'इतके दोघे बोलत आहेत, तो बलीच्या शरिरांतून लक्ष्मी निघाली तिला पाहून इंद्राला आश्चर्य वाटून तो म्हणाला,–'हे लक्ष्मी! या महान् धर्मात्मा बलीचा तूं त्याग कां केलास?' लक्ष्मीनें उत्तर दिले 'मीं कोणापाशी रहावें किंवा न रहावे हे जरी दैवाधिन आहे. तथापि सत्य, दान, आणि

तप, ही जेथे आहेत. तेथें माझा वास नसतो, या बलीनें ब्राह्मणाची निंदा केली, व उच्छिष्ट घृताला स्पर्श केला; म्हणून मी याला सोडून चालले त्यावर इंद्र म्हणाला,–'हें लक्ष्मी! तूं स्थिरपणें कोठे रहातेस? तेव्हां लक्ष्मी म्हणाली,–'जो ब्रह्मद्वेष करीत नाही, त्याच्याकडे मी निरंतर रहातें''असें बोलून लक्ष्मी गुप्त झाली; आणि इंद्रही स्थानी निघून गेला. धर्मा, हा संवाद लक्षांत घेऊन कालकृत गोष्टीबद्दल खेद मानू नये. मोक्षसंबंधी इंद्र–लक्ष्मीचा आणखी एक अपूर्व संवाद आहे तो तुला सांगतो.

## इंद्र व लक्ष्मी यांचा संवाद

एका शुभप्रसंगीं नारदमुनि व इंद्र गंगेवर स्नान करून व संध्यादि कर्में आटोपून बसले असतां, सूर्यमंडळाजवळ दैदीप्यमान अशी लक्ष्मी त्यांच्या दृष्टीस पडली. तिला इंद्रानें हात जोडून–' तूं कोण व कोठून आलीस '–म्हणून विचारिलें. लक्ष्मी म्हणाली,–' माझी सर्व प्राणी इच्छा करीत असून माझा जन्म कमलांत झाला. पद्मा, श्री, भूति, पद्ममानिनी, लक्ष्मी, इत्यादि माझी अनंत नामें असून, राज्य, पराक्रम, सैन्याचा अग्रभाग, ध्वज आणि धर्म, या पांच ठिकाणीं माझा वास असतो. तसेंच जे विषयपराङमुख, सत्यवादी, बुद्धिमान, दानशूर आणि ब्राह्मण्ययुक्त त्यांच्याही घरीं मी अखंड असतें. ' तेव्हां–इंद्र–म्हणाला,–' असें आहे, तर दैत्यांकडे तूं कशी रहातेस ?' त्यावर लक्ष्मी त्याला म्हणाली,–' ते स्वधर्मरक्षक असतात म्हणून. याशिवाय यज्ञ, दान, अध्ययन करणारे, गुरु आणि देव यांची पूजा करणारे, जितेंद्रिय, समाधानी, कृतघ्न, विहित कर्में करणारे, उद्योगी, दुःखितांचें पालन करणारे, ब्राह्मणांच्या वृत्तीचा उच्छेद न करणारे, सर्व भूतांवर दया करणारे, यांच्याही घरीं माझा वास असतो.' असें बोलून लक्ष्मी अंतर्धान पावली, आणि इंद्र व नारद स्वर्गलोकी निघून गेले.

---

# अध्याय १३ वा.



## देवल व जैगीष यांचा संवाद

इंद्र–लक्ष्मीसंवाद सांगितल्यावर वैशंपायन पुढील कथा सांगू लागले.

ते म्हणाले,–' राजा, ब्रह्मस्थान कोणत्या उपायानें प्राप्त होतें.' असा धर्मानें प्रश्न केला असतां भीष्म म्हणाले,–' ब्रह्मस्थान प्राप्त करून घ्यावयास मोक्षधर्माचें ज्ञान अवश्य आहे. आहारादि स्वाधीन ठेवून इंद्रियें जिंकणारा पुरुष मोक्षाचा अधिकारी होतो. याविषयीं देवल व जैगीष यांचा संवाद प्रसिद्ध आहे, तो तुला सांगतों. एकदां देवल यानें जैगीष यास प्रश्न केला कीं, ' हे जैगीष, तुला कोणी वंदन केलें असतां हर्ष होत नाहीं, निंदिले असतां दुःख होत नाहीं, याचें कारण काय ?' जैगीष म्हणाला,–' आपल्याला अपकार करणारांना मारण्याची इच्छा न करणारे, भूत व भविष्य गोष्टीबद्दल शोक न करणारे, पूज्य पुरुषांची पूजा करून यथाशक्ति दान देणारे, इंद्रियदमन करून कायावाचामनें करून विहित कर्में करणारे, कोणाशीं द्वेष न धरणारे, कोणाचे मित्रहि नाहींत व शत्रूही नाहींत, असे पुरुषच मुक्त होत. धर्मा, हा पवित्र संवाद पूर्वीं कृष्ण व वासुदेव यांमध्यें झाला आहे. हें भीष्मवाक्य ऐकून धर्मानें पुढें विनंति केली.–' प्राणिमात्रांचें उत्पत्तिस्थान शेवट, काळाचे प्रमाण, व प्राण्यांचें प्रतियुगांतील आयुष्य, या विषयीं मला कांहीं सांगा ?' तेव्हां भीष्म, शुक व व्यास यांचा संवाद सांगू लागले,––

## शुक व व्यास यांचा संवाद

एकदां शुक व्यासांना म्हणाला,––' हे पितः ! या भूतग्रामाचा कर्ता कोण आणि ब्राह्मणाचें कर्तव्य कोणतें, ते मला सांगा.' तेव्हां व्यासांनीं सांगितलें कीं,–' आदि, अंत, यांना रहित, अजर, अव्यय, अप्रतर्क्य, असें जें ब्रह्म तेच सृष्टीपूर्वी होतें. त्यापासून सर्व पंचमहाभूतात्मक सृष्टि उत्पन्न झाली. कालज्ञानानें परिमित अशा ब्रह्मालाच पुनः जीवीत्व प्राप्त झालें. त्या कालाचें मान असेः––तीस काष्ठा म्हणजे एक कला व तीस कला म्हणजे एक मुहूर्त आणि असे तीस मुहूर्त म्हणजे एक अहोरात्र होतें. तीस अहोरात्र मिळून मास, दोन मासांचा ऋतु आणि सहा मासांचें एक अयन होतें. उत्तरायण आणि दक्षिणायन अशीं दोन अयनें मिळून संवत्सर होतो. एक मास म्हणजे पितरांचा एक दिवस व एक संवत्सर म्हणजे देवांचा एक दिवस होतो. ( कलिपरिमाणाचा विचार प्रथम स्तबकांत झालेला आहे. ) कृतादि युगांत मनुष्यांचें आयुष्य लक्ष वर्षांचें असून उत्तरोत्तर युगांत कमाच्या

ह्रिस्यानें कमी होऊन कलियुगांत शंभर वर्षे झाली. धर्माचीही अवस्था अशीच आहे. त्याचा एक एक पाय कमी होऊन, कलियुगांत एकच उरला आहे. कृतयुगांस तप आणि ध्यान याचें प्राधान्य असून, त्रेतायुगांत भक्ति व ज्ञान यांचें होतें. द्वापारांत यज्ञ व ईश्वर पूजन आणि कलियुगांत दान आणि कितंन, यांचें महत्व आहे. .देवांची दोन हजार वर्षे म्हणजे ब्रह्मदेवाचें एक अहोरात्र होतें. आपल्या दिवसांत ब्रह्मदेव सृष्टि उत्पन्न करतो, त्या सृष्टीचा क्रम पहिल्या व सातव्या स्तबकांत सांगितलाच आहे. ब्रह्मदेव मायेच्या योगें करून सृष्टि उत्पन्न करितो. त्यांत कित्येकजण कर्माला प्राधान्य देतात; कोणी दैवाला देतात व कित्येकजण स्वभावतःच सर्व होतें, असें म्हणतात. सत्व, रज आणि तम अशा तीन गुणांनीं युक्त अशीं तीन प्रकारचीं भूतें आहेत. त्यांत सात्विक आहेत, ती तपानें शमदमाचें साधन करून मुक्त होतात. ब्रह्माची स्वरूपें शद्वब्रह्म आणि परब्रह्म, अशीं दोन असून शद्वब्रह्म जे वेद, त्यांच्या ध्यानानें परब्रह्माची प्राप्ति होतें. ही स्थावर जंगम भूतें मृत होऊन भूमिगत झालीं म्हणजे पृथ्वी कर्माच्या पृष्ठासारखीं सपाट होईल. मग तिचा गंध-गुण, उदक आकर्षून घेईल व ती नाश पावेल. त्याचप्रमाणें उदकाचा रस-गुण तेजांत जाऊन उदकाचा नाश होईल. याच क्रमानें तेजाचा रूप-गुण वायूंत आणि वायूचा स्पर्श-गुण आकाशांत जाऊन त्यांचाही नाश होतो. पुढें आकाशाचा मनांत लय होऊन सर्व सृष्टि परब्रह्मांत लय पावते.

असो, आतां ब्राह्मणाचें कर्तव्य तुला सांगतों. ब्राह्मणानें प्रथम ब्रह्मचर्यानें वेदाध्ययन करून मग गृहस्थाश्रमाचा स्वीकार करावा. त्यांत अग्निहोत्रादि कर्मे आणि प्रजोत्पादन करून शेवटीं मोक्ष-प्राप्तीचा प्रयत्न करण्यासाठीं संन्यास घ्यावा. या स्थितींत संपूर्ण वस्तूंचा त्याग करून क्षमा व शांति धरावी. आणि ज्ञान संपादन करावें. म्हणजे तें मोक्षाला कारणीभूत होईल. यावर शुकानें विचारलें,--' ज्ञान व विज्ञान हीं काय आहेत तें सांगा.'–व्यासानें उत्तर केलें,–' शुका, सर्व विश्व आपल्यासमान आहे हें ज्ञान तें मोक्षाचें कारण आहे. आतां विज्ञान सांगतों. बुद्धिमान् पुरुष बुद्धीच्या जोरावर पुरुषार्थाची प्राप्ति करून घेतो, व आपलें कल्याण करितो बुद्धीच्या जोरावरच राजे राज्य करतात. उत्तम व अधम वस्तूंचें ज्ञानही बुद्धीनेंच होतें. परंतु सत्यसंकल्प होऊन ईश्वराचें ज्ञान करून ब्रह्मप्राप्ति

करणें याला विज्ञान म्हणतात. शुका अध्यात्माचें ध्यान करणारा व दोष टाकून योग साधणारा पुरुष, संसारांतून मुक्त होतो. याकरितां कामक्रोधादि टाकून आणि शमदमांनी युक्त होऊन ध्यान करावें.

## तुलाधर उदम्याची गोष्ट

आतां कर्माची गति सांगतों ती ऐक. प्रवृत्ति आणि निवृत्ति असें दोन जगप्रसिद्ध मार्ग आहेत. त्यांस प्रवृत्तिपर कर्में करणारे ते बद्ध होतात. आणि पुनः पुनः त्यांना शरीर प्राप्त होतें, परंतु विद्येने मात्र शरीरबंध सुटून प्राणी मोकळा होतो.'–हा शुक–व्यास संवाद ऐकून धर्मानें विचारलें –' आजोबा, प्राणिमात्राविषयीं द्वेश टाकून देऊन, कोणी मुनि उत्तम सिद्धी पावलेला आपल्यास माहित आहे काय ?'–तेव्हां भीष्म म्हणाले,––' होय, जाजलि नामक एक महातपस्वी ऋषी, पर्जन्यकालीं ध्यानस्थ बसला होता. त्याच्या जटांत पक्ष्यांनीं घरटीं केलीं होतीं. ऋषीचें ध्यान संपल्यावर तो पहातो, तो त्याला डोक्यांत पक्ष्यांचें घरटें आढळलें. तें पाहून पक्ष्यांना दुःख होईल, पुढें काय करावें,' या विचारांत तो पडला; आणि पक्ष्यांच्या दुःखा-मुळें ऋषी तसाच निश्चल राहिला. परंतु त्याला अभिमान झाला कीं, 'मजहून थोर व दयाळू कोण आहे ?' इतक्यांत आकाशवाणी झालीं कीं,–' काशीक्षेत्रीं तुलाधर नांवाचा उदमी आहे, तो तुजहूनही थोर आहे.'– हें ऐकून जाजलि काशीस गेला, व त्यानें तुलाधराची गांठ घेतली. तुलाधरानें त्याचें स्वागत करून त्याला त्याच्या येण्याचें कारण आपणच सांगितलें व त्याचा पूर्व वृत्तांतही त्याला कथन केला. तो ऐकून जाजलि आश्चर्यचकित होऊन म्हणाला,–' तुला हा प्रसाद कोणापासून मिळाला ?' तेव्हां तुलाधरानें उत्तर केले,–'मी कोणाचा द्रोह करीत नाहीं, सर्वांच्या हितासाठीं झटतों, व कोणाची निंदा करीत नाहीं. आकाशाप्रमाणें मी सर्वसाक्षी असून अलिप्त आहें. माझ्या पासून कोणाला भय नाहीं व मलाही कोणाचें भय नाहीं. माती व सोनें मला सारखींच वाटतात.' हा वृत्तांत ऐकून जाजलीला फार आनंद झाला. एवढें सांगून भीष्मानीं आपल्या मातेची स्तुति करून म्हटलें,–' जिच्या योगानें मला सद्‌गुरुप्राप्ति होऊ सद्‌बुद्धि झाली, ती गंगामाता धन्य आहे. असें म्हणून त्यांनीं गृहस्थ आणि संन्यास हे आश्रम सर्वांत श्रेष्ठ असून आचरण्यास

मात्र फार कठीण आहेत; हा सिद्धांत धर्माला पटविण्यासाठीं गाय आणि कपिऋषि यांचा संवाद सांगितला.

## गो–कपिल संवाद

'पूर्वी नघुकराजानें+ यज्ञामध्यें विश्वकर्म्याच्या गाईचा वध केला. कपिलमुनीनें तें पाहिलें, तेव्हां त्याला उद्वेग उत्पन्न होऊन तो वेदोक्त कर्म मानीनासा झाला. हा प्रकार पाहून श्यूमरश्मि+ नांवाच्या ऋषीनें त्या गाईच्या शरीरांत योगसाधनानें प्रवेश केला, आणि तो कपिलाशीं बोलूं लागला.

गोरूप श्यूमरश्मि म्हणाला,–' कपिला, जर तुला वेदोक्तधर्म मानवत नाहीं, तर तुला कोणता धर्म प्रमाण वाटतो, तो तरी सांग. तूं सर्व कर्माचा त्याग करून वैराग्यशील झाला आहेस काय 'कपिल मी कांहीं वेदांची निंदा करीत नाहीं. मला एवढेंच वाटतें कीं, सर्व आश्रमांतील कर्मे सारख्याच योग्यतेचीं असून, सर्वांनाही एकच अर्थ साधतो; परंतु हिंसाप्रधान कर्मे करावीं किंवा न करावीं, हें स्पष्ट नसल्यामुळें याविषयीं शास्त्राचें बलाबलत्व ठरविणें कठीण आहे.' श्यूमरश्मि–' कपिला, औषधि, पशु, आज्य, (तूप) पय (दूध) दधि (दहीं), हवि, भूमि, दिशा, श्रद्धा, काल, ऋक्, यजु, साम, अग्नि, गृहपति, आणि यजमान हीं यज्ञाचीं सतरा अंगें सांगितलीं आहेत. आज्य, पय, दधि, शेण, काळिज, त्वचा, केश, शृंग आणि चरण, इतके भाग संपादन करून, गोयाग ( गलालंभ ) करावा असें शास्त्रवचन आहे. यासाठीं यज्ञ हा केलाच पाहिजे. त्याच्यायोगानें इहलोकीं कीर्ति आणि अंती स्वर्ग हीं प्राप्त होतात.' यावर कपिल बोलला, 'सर्व कर्माचा त्याग करून जे ब्रह्मीभूत झाले, त्यांना गृहस्थाश्रमाचें प्रयोजन काय ?' श्यूमरश्मीनें उत्तर केलें;– गृहस्थाश्रमाशिवाय इतर आश्रम चालावयाचे नाहींत; आणि शिवाय देवऋण पितृऋण आणि मनुष्यऋण, हीं ऋणें फेडल्याशिवाय मोक्षप्राप्ति व्हावयाची नाहीं. हीं ऋणें फेडणें गृहस्थाश्रमांतच शक्य असल्यामुळें, त्याचा स्वीकार करून वेदोक्त कर्म केलेंच पाहिजे.' यावर कपिल म्हणाला,–' दर्शेष्टि, पौर्णिमासेष्टि, आग्निहोत्र, चातुर्मास्ययाग यांनींही सनातन धर्माचें आचरण होतें. त्याला पशुवधादि हिंस्र कर्मेच कशाला पाहिजेत ? गृहस्थाश्रम तेवढा उत्तम आणि संन्यास आळशी लोकांनीं कल्पिलेला आहे, असे नाहीं. सर्व

नहुष असें नांव भारतांत आहे. + + श्यूमरश्मि–भारत.

कर्माचा संन्यास करण्याला वाणी, हस्त, पाद, उदर, आणि उपस्थ हीं द्वारें गुप्त ठेवावीं लागतात. असत्य भाषण, परनिंदा, इत्यादि न करणें यानें वाग्द्वार गुप्त रहातें. द्यूत, चौर्य इत्यादि न करणें व कोणाला न दुखविणें यानें हस्तपाद गुप्त रहातात. उपाशीं रहाणें किंवा खाणें, हीं वर्ज्य केल्यानें उदर गुप्त रहातें; आणि परस्त्रीविमुख होऊन आत्मनिष्ट झाल्यानें उपस्थ-द्वार गुप्त रहातें. ज्यांचीं हीं द्वारें गुप्त रहात नाहीत, त्यांचीं सर्व कर्में व्यर्थ होतात. यासाठीं ज्ञानयोगानें संन्यासाश्रमांत राहिल्यास मोक्षप्राप्ति होते.' असा उपदेश करून कपिल उगा राहिला आणि नहुषाचा यज्ञही समाप्त झाला.

---

# अध्याय १४ वा



## प्राणी मोक्षमार्गाकडें कसा वळतो

कपिलगीता ऐकून धर्मानें पुनः विचारिलें,–' प्राणी पापात्मा कसा होतो, व त्याला वैराग्य उत्पन्न होऊन तो मोक्षमार्गाकडे कसा वळतो ? तेव्हां भीष्म म्हणाले,–' धर्मा, रूप, रस आदिकरून पांच विषयांत पुरुष लुब्ध झाला म्हणजे त्याच्या राग–द्वेषांचा प्रादुर्भाव होऊन तो दुष्ट कृत्यें करूं लागतो. तेणेंकरून त्याची धर्मबुद्धि जागृत होते. विषय वासना सुटल्या वर सहजच धर्माच्या फलाविषयीं वैराग्य उत्पन्न होऊन पुरुषाला शांति सुखाची प्राप्ति होते. क्षमेच्या योगानें क्रोध नष्ट करावा, संकल्पाच्या त्यागानें कामाचा उच्छेद करावा, सात्विकवृत्ती स्वीकारून आळस नाहींसा करावा सदा सावध राहून भयाचा नाश करावा, धैर्यानें द्वेष व संतोषानें लोभ आणि मोह जिंकावे. तत्वज्ञानाचें विषय जिंकून, दयेनें अधर्म आणि सर्व अनित्य आहे अशा अज्ञानानें विषयाविषयींचा अनुराग जिंकावा, योगसाधनानें क्षुधाजय होतो. आणि आत्मज्ञानानें समाधिसुख मिळते. कामक्रोधादि हे योगमार्गातील दोष असून,ध्यान, सत्य,नम्रपणा,क्षमा, आहारशुद्धी व इंद्रीयाचे संयमन, ही योगाला सहायक आहेत, यांच्या सेवनानें पापनाश होऊन मोक्ष

प्राप्त होतो, हा मार्ग अत्यंत श्रेष्ठ असून अन्य मार्ग कुमार्ग होत.' याप्रमाणें योगाचे विवेचन ऐकल्यावर धर्मानें प्रश्न केला, 'भीष्म देवा, हें विश्व उत्पन्न कसें होते, आणि प्रलयाच्या वेळीं कोठे रहातें? 'तेव्हां भीष्म म्हणालें,-'धर्मा, या प्रकरणी नारद देवल आणि असित याचा संवाद आहें तो ऐक.'

## नारद देवल आणि असित यांचा संवाद.

आकाश, वायु, तेज, जल, पृथ्वी, काल, भाव आणि अभाव ही आठ भूते; यापासून प्राण्याची उत्पत्ति व त्यांतच पुन: त्यांचा लय होतो, स्थल, देह पृथ्वीपासून उत्पन्न होतो. नंतर आकाश, सूर्यतेज वायु आणि उदक यांच्या पासून अनुक्रमे कर्ण, नेत्र, घ्राण व रक्त यांची उत्पत्ती होतें. पांच इंद्रिये व त्यांचे विषय यांच्या पलीकडे चित्त, मन, आणि बुद्धी, अशी अनुक्रमे असून बुद्धीच्या पलिकडे प्रत्यक्ष परमात्माचा अंश असा जीव असघो., त्याला क्षेत्रज म्हणतात. कर्ण, त्वक्, चक्षु, जिव्हा, घ्राण, चित्त, मन आणि बुद्धी ही आठ ज्ञानेंद्रिये आणि हस्त, पाद, शिश्न, गुद आणि वाक ही मुख्य कर्मेंद्रिये होत शब्द, स्पर्श, रूप, रस, आणि गंध हे ज्ञानेंद्रियाचे विषय असून, कर्म, चलन मलमूत्रोत्सर्ग आणि विषयभोग इत्यादि कर्मेंद्रियांचे विषय होत. आपआपल्या कर्मापासून इंद्रीयांची जी निवृत्ति निद्रा म्हणतात. व तींच स्वाभाविक अवस्था होय. याप्रमाणें शरिर वायुसंयोगानें भूतसमूद्राला धारण करुन शेवटी त्यातच लय पावते. या पंचमहाभूतात्मक शरिरांत राहून सुखदु:खाचा अनुभव घेणारा क्षेत्रज होय. मनुष्ये जशी एका घरातून दुसऱ्या घरात जातात त्याप्रमाणें देह जीर्ण झाला म्हणजे जीव दुसऱ्या देहात प्रवेश करतो. हें ज्ञान ज्याला आहे, त्याला शोक मोह होत नाही, ज्ञानेकरून पुण्यपापाचा क्षय झाला म्हणजे जीव ब्रह्मरुप होतो.

एवढे ऐकल्यावर धर्मानें विचारलें, 'अर्थतृष्णा धरून आम्ही ज्ञातीवध केला आणि अधर्म जोडला, तरी आमची ही तृष्णा नाहिशी कशीं होईल?' त्यावर भीष्मानें उत्तर दिले,-'धर्मा, ज्याप्रमाणें गाय वाढत असतां तिची तीक्ष्ण शिंगेही वाढत असतात, त्याप्रमाणें मनुष्याचे ऐश्वर्य वाढले कीं, तृष्णा वाढत जातें. यासाठीं विवेकी पुरुषानें सदा असमृद्धच रहावे. मूर्खांना ग्राम्य-

सुख मोह पाडते; परंतू तृष्णाक्षय झाल्याशिवाय दिव्यसुखाचा अंशही कोणाला प्राप्त व्हावयाचा नाही. प्राप्तवस्तुनें संतोष मानून शुद्धान्तःकरण झाल्यानें मनुष्याला अंती शास्वत सुख प्राप्त होते. जो सहनशील असुन दुष्ट शब्द वाचेंनें कधी उच्चारत नाही. सर्वांशी प्रिय बोलून व सिरभिमानी राहून जपध्यानांत मग्न असतो. भूतांचें उत्पत्तीनाश शांत दृष्टीनें पहात असून आत्मज्ञानात लीन होतो. तोच मोक्षाचा धनी होतो. 'ही हरितगीता भीष्मानें सांगितल्यावर धर्म म्हणाला, –अज्ञानापासून उत्पन्न झालेल्या तमोगुणाचा नाश होईल. असा उपाय काय आहे तें सांगा. तेव्हां भीष्म म्हणाला, उत्तम ज्ञानाच्या योगानें तन नाश होऊन ब्रह्माचा प्रकाश पडतो. वृत्रासुर राज्यभ्रष्ट झाला असतां त्यानें विचार केला कीं मी घोर तप करून ऐश्वर्य मिळविलें व आता पूर्वकर्मीरोधानें राज्यभ्रष्ट झालो. याकरिता त्याना शोक करण्याचे कारण नाही. परंतु तपोबलाच्या जोरावर इंद्राशी युद्ध करीत असतां अकस्मात नारायणाचें दर्शन हें कोणत्या तपाचें फल व कर्मास्तव माझ्या ऐश्वर्याचा नाश झाला, हे मात्र समजत नाहीं. असा विचार करून आपला संशय फेडण्यासाठीं त्याने शुक्राचार्यांना प्रश्न केला.–जीवाची उत्पत्ती कोठून होते आणि कोणत्या कर्मास्तव तो पुनः निश्चल होतो, ते सांगा हा प्रश्न ऐकून शुक्र त्याला श्रीविष्णूंचा महिमा सांगू लागला त्यावेळीं तेथे सन्त्कुमार प्राप्त झाले. त्याची यथोचित पूजा करून वृत्तानें त्यांना उत्तम स्थानावर बसविले, व तें शुक्राच्या सांगण्यावरून वृत्ताच्या प्रश्नाचे उत्तर देऊ लागलें ते म्हणाले,–'या सर्व चराचर सृष्टीचा कर्ता एकटां विष्णू असून त्याच्याकडून पूनः सर्वांचा लय होतो. इंद्रीयाचें संयमन केल्यानें त्यांची प्राप्ति होते. सर्व दोषाची निवृत्ति झाली कीं विष्णूचें दर्शन होते अशी ही विष्णुभक्ती आहें.

## वत्रासुराची कथा.

भीष्म म्हणतात,–'धर्मा, एकदां इंद्र सर्व देवगणासह मार्गानें जात असतां त्याला विशाळ शरिरांचा वृत्रासुर वाटेत आढळला. त्यांची अक्राळ विक्राळ मुद्रा पाहून सर्व देव स्तब्ध उभे राहिले, मग कांही वेळाने इंद्रानें धैर्य धरून वृत्राशी युद्ध करण्यास सुरवात केली. युद्ध पहावयास आकाशांत

देवांची विमानें दाटी करूं लागलीं. वृत्रानें कपट युद्धाला सुरवात करून इंद्राला मोहीत केले. त्याचा मोह दूर करण्यासाठीं वसिष्ठऋषि त्याच्याजवळ गेला. इंद्राचा भ्रम नाहींसा झाल्याबरोबर तो वेगानें पुनः वृत्राच्या अंगावर धावून गेला. इकडे शंकराला इंद्राविषयीं काळजी उत्पन्न होऊन त्यानें वृत्राच्या शरीरांत ज्वररूपानें प्रवेश केला. विष्णूनेंही इंद्राच्या साह्यासाठीं त्याच्या वज्रांत प्रवेश केला. याप्रमाणें तयारी झाल्यावर बृहस्पति, वसिष्ठ, आदिकरून ऋषीनी इंद्राला वृत्राशीं निकरानें युद्ध करावयास सांगितलें. वृत्राच्या अंगांत ज्वर शिरल्यामुळें तो फिकट पडून मरणोन्मुख झाला. तेव्हां हा आतां मरणार, असें मानून गृध्रादिपक्षी त्याच्या डोक्यावर घिरट्या घालूं लागलें. मग ज्वराच्या जावेशांत आरोळ्या देत वृत्र समरांगणावर आला असतां इंद्रानें त्यावर वज्र हाणून त्याचा वध केला. हे पाहुन विष्णू, देव आणि ऋषि आनंदित होऊन आपापल्या स्थानीं निघून गेले.

इकडे वृत्र भूमीवर पडल्यावर, त्याच्या शरीरांतून विक्राळस्वरुपाची ब्रह्महत्या निघाली व इंद्राला शोधीत तीं इकडे तिकडे धांवूं लागली. इंद्रानें तिला पहातांच तो मानस सरोवरावर जाऊन, तेथील कमळाच्या तंतूंत दहा हजार वर्षें राहिला; पण हत्या तेथून हलेना, शेवटी तो कंटाळला व बाहेर आला. ब्रह्महत्या तेथें होतीच. ती पुनः त्याच्यामागें लागली. तेव्हां तो तिच्या निवारणार्थ ब्रह्मदेवाकडे गेला ब्रह्मदेवानें मधुर शब्दानें इंद्राला सोडण्याविषयीं ब्रह्महत्येची प्रार्थना केली. तिनें उत्तर केले, ‘ अरे, तूं त्रैलोक्याचा पितामह आहेस; तेव्हां मला कोठें तरी स्थान दे, म्हणजे मी याला सोडीन.’ हें ऐकून ब्रह्मदेवानें त्या हत्येचे चार भाग करून, त्यांतील एक अग्नीला दिला. तेव्हां अग्नि खिन्न झाला. तें पाहून ब्रह्मदेव अग्नीला म्हणाला, ‘अग्ने, तू काळजी करू नकोस. जे कोणी धुम्रयुक्त अग्नींत होम देतील, त्यांच्यांत ही हत्या जाऊन राहील.’ असें अग्नीला सांगून ब्रह्मदेवानें दुसरा भाग वृक्ष आणि गवत यांना दिला. तेव्हा आपला छेद होईल, अशा भीतीनें त्यांनाही दुःख झालें. परंतु ब्रह्मदेवानें त्याना सागितलें कीं, ‘ जे कोणी पर्वणीच्या वेळी तुम्हांला तोडतील, त्यांच्यांत हा हत्येचा भाग प्रवेश करील.’

मग ब्रह्मदेवानें तिसरा भाग अप्सरादि स्त्रियांना दिला. त्याबरोबर त्याही दुःखानें कोमेजून गेल्या. तेव्हां ब्रह्मदेव त्यांना म्हणाला, ‘ रजस्वलेशीं

संग करील, त्याला हें दारुण पातक लागेल.' असें त्यांना सांगून, ब्रह्मदेवानें शेवटचा हिस्सा उदकाला दिला; आणि म्हटलें,–' जो उदकांत मूत्र, मल इत्याहि टाकील, त्याला हें पाप लागेल.' याप्रमाणें ब्रह्महत्येला स्थानें मिळाल्यावर ती त्यांत गेली, व पापनिरसनार्थं इंद्रानें तत्काल अश्वमेध केला. अशी ही वृत्रासुराची कथा पुराणांतरीत सांगितली आहे. ती कथा अन्य प्रकारानें दुसऱ्या स्तबकांतही आलेली आहे.

## ज्वरोत्पत्तीची दुसरी कथा

भीष्म म्हणाला,'धर्मा, पूर्वीं महामेरूच्या ज्योतिष्क नामक शिखरावर सर्व ऋषिगणांसह शंकर राहिला होता. त्यावेळीं एकदां दक्षप्रजापतीनें यज्ञ आरंभिला असतां, त्याच्यासाठीं इंद्रादि देव ऋषि जाऊं लागले. त्यांना पाहून पार्वती शंकराला म्हणाली, 'तुम्हीं कां बरें यज्ञाला जात नाहीं ? तुम्ही सर्व गणांचे अधिपति असतां तेथें जात नाहीं हें पाहून मला फार दुःख होतें.' हें ऐकून शिवाला राग आला, आणि त्यानें नंदीला पाठवून दक्ष–यज्ञाचा नाश केला. तेव्हां यज्ञाला आलेली मंडळी भयभीत होऊन पळूं लागलीं. यज्ञही मृगरूप घेऊन पळूं लागला. तेव्हां शंकर धनुष्यबाण घेऊन त्याच्यामागें लागला, यज्ञाचा पाठलाग करीत असतां, शंकराला घाम आला व त्याचा एक बिंदु जमिनीवर पडून त्यापासून प्रलयकालच्या अग्नीसारखा एक भयंकर पुरुष उत्पन्न झाला, तोच ज्वर असून त्रैलोक्याला पीडा करितो आहे. असो; मग ब्रह्मदेवानें शंकराची स्तुति करून त्याला यज्ञाचा भाग देवविला. यज्ञभाग मिळाल्यावर शंकरानें ज्वराचे भाग करून एक हत्तीच्या मस्तकावर, एक पर्वतावर (शिलाजित नामक द्रव त्यापासून पर्वतावर उत्पन्न होतो.) एक पाण्यांत ( नील रूपानें ) एक सर्पावर (कांतिरूपानें) एक पशूंवर (पायलाग म्हणून गुरांचा एक रोग आहे तो.) एक जमिनीवर (खाजणाची जागा) एक मयूरावर (याच्यामुळें मोराची शेंडी गळून पडते.) एक शुकावर (हिक्का नांवाचा रोग.) एक व्याघ्रावर (भ्रम रूपानें ) आणि एक मनुष्यावर (ताप रूपानें.) अशी त्याची स्थापना केली. अशी ही ज्वरोत्पत्तीची कथा पुराणांतरी सांगितली आहे.

## वीरभद्राची उत्पत्ति

वैवस्वत मन्वंतरांत हिमालयावर गंगाद्वारी दक्षप्रजापति राज्य करीत असतां त्यानें एकदां यज्ञ आरंभून सर्व पक्ष, सिद्ध देव, गंधर्व इत्यादिकांना आमंत्रण केलें. त्यावेळीं त्याचा उपाध्याय जो दधिचि ऋषि त्याच्या दृष्टीस तेथें रुद्र न पडल्यामुळें तो म्हणाला,– 'अहो रुद्राशिवाय यज्ञ व्यर्थ आहे.' हें त्याचें भाषण ऐकून नारदानें शिवाकडे जाऊन त्याला झालेली सर्व हकीकत सांगितलीं. ती ऐकून रुद्राला कोप आला आणि तो जोरानें श्वास टाकूं लागला; तेव्हां त्याच्या श्वासापासून वीरभद्र नांवाचा पुरुष उत्पन्न झाला. पुढें वीरभद्रानें आपल्या केशांपासून भूतगण निर्माण करून दक्षयज्ञाचा विध्वंस केला. तेव्हां देव–ऋषी त्याची विनवणी करून–'आतां आम्हीं काय करावें.'–असें त्याला विचारूं लागले. तेव्हां त्यानें सांगितलें,—'मला शिवाची आज्ञा आहे, तरी तुम्हीं त्याला शरण जा.' त्याप्रमाणें दक्षानें शकराला शरण जाऊन त्याची अष्टोत्तरशत नामांनीं स्तुति केली. तेव्हां अग्निकुंडांतून महादेव प्रकट होऊन त्यानें दक्षाचें विघ्न नाहीसें केलें. अशी ही एक कथा पुरणांतरी आलेली आहे.

---

# अध्याय १३ वा



## अध्यात्म–स्वरूप

भीष्म धर्माच्या प्रश्नाला उत्तर देतांना म्हणाले,—'ब्रह्मापासून पंच-महाभूतें झालीं, हें पूर्वीं सांगितलेंच आहे. त्या पंचमहाभूतांपासून नानाविध स्थावर जंगम सृष्टि उत्पन्नहोतें, आणि पुनः ती त्यांतच लय पावतें. कासव आपलें अंग पसरतो व पुन: आवरून घेतो, त्याचप्रमाणेंच ईश्वर स्वेच्छेकरून उत्पत्ति व प्रलय करितो, असो. पचमहाभूतांपैकीं आकाशाचा गुण शद्व आहे. जलाचे रथ व स्नेह हे गुण; रूप, पचनशक्ति हे तेजाचे गुण, पृथ्वीचा गुण गंध; व प्राण, गति आणि स्पर्श हें वायूचे गुण होत. सत्व, रज, तम, काल,

कर्म, बुद्धि यांचीं त्या पंचमहाभूतांत ईश्वरानें स्थापना केली. पंचेंद्रियें, मन बुद्धि आणि क्षेत्रज्ञ इतकीं मिळून पुरुष होतो. क्षेत्रज्ञ बुद्धीपासून इंद्रियांची विषयांच्या ठिकाणीं प्रवृत्ति करितो. सत्त्व, रज आणि तम यांनाही बुद्धीच प्रवृत्त करते. हर्ष, प्रीति, आनंद सुख आणि शांति, हे सात्त्विक गुण होत. चट्टा, शोक, संताप, ही रजोगुणाची लक्षणें असून अज्ञान, रोग, मोह, अधर्म, मद आणि आळस ही तमोगुणापासून उत्पन्न होतात. या सर्व बुद्धीच्या गति असून त्यांचा साक्षी आत्मा आहे. हें अध्यात्म ज्ञान ज्याला होते तो पुरुष हें पंचभूतात्मक शरीर जाणणारा होतो.

धर्मा, आतां ज्याच्या योगानें शोक व मृत्यु यांपासून भय प्राप्त होत नाहीं, तो प्रकार तुला सांगतों. याविषयीं पूर्वीं नारदानें संगम ऋषीला प्रश्न केला. होता. तेव्हां संगम म्हणाला,—' मी भूत, भविष्य व वर्तमान जाणतो कर्म करीत नाहीं. कर्मफळाची इच्छाही धरीत नाहीं, आणि सर्वांना सम-दृष्टीनें पहातों. अर्थ व काम यांचा मी त्याग केला आहे. त्यामुळें मला मृत्युचें भय वाटत नाहीं. मीं नेहमीं तृप्त असतों; त्यामुळें मला शोकही होत नाहीं.'

शास्त्रतत्त्व न जाणणारा व संशयी अशा पुरुषाला मोक्ष कोणत्या प्रकारे मिळतो, ते आतां ऐक या विषयी गालव ऋषीपाशीं नारदानें विवेचन केलें, तें असें;—पापकर्मापासून निवृत्त होऊन व पुण्यकर्माविषयीं प्रीति ठेऊन सर्व भूतांशीं सरळपणानें वागावें, अहंकाराचा त्याग करावा, मधुरवाणी, सावधपणा, संतोष, सुविचार, विषयांपासून अलिप्तपणा, निश्चय, वेदार्थ जाणण्याची इच्छा, तपाचे आचरण, या गुणांनीं पुरुषाला मोक्षप्राप्ति होते. असा प्रश्न पूर्वीं अरिष्टनेमीला सगरानें केला होता. तेव्हां अरिष्टनेमी म्हणाला,—' पुत्र, पशु इत्यादिकांच्या ठिकाणीं असलेली आसक्ति सोडून स्नेहपाशींनीं जो बद्ध होत नाहीं, त्याला मोक्षप्राप्ति होते. आपला पुत्र आपलें पोषण करण्यास समर्थ झाला, असें पाहून जो विरक्त होतो, व लाभ आणि हानि ही समान लेखतो, तोच मोक्षाचा धनी होतो.' हें ऐकून व मनांत ठसवून सगरराजा मोक्षगुणांचा आश्रय करून मुक्त झाला.

## उशना ऋषि शुक्र कसा झाला

शुक्र हें नांव उशना ऋषीला कसें मिळालें, असा धर्माचा प्रश्न ऐकून भीष्म म्हणाला;—' उशना, हा भृगुऋषीचा पुत्र असून त्यानें एकदां योग-बलानें कुबेरावर स्वारी करून त्याचे धन हरण केलें. तेव्हां कुबेरानें महादेवा कडे जाऊन त्याला दीनवाणीनें सांगितलें कीं,–उशना ऋषीनें माझ्या अलका नगरींत प्रवेश करून माझें धन हरून नेलें. हें ऐकून महादेवाला राग आला, व तो त्रिशूल घेऊन उशनाला मारावयास धांवला. तें पाहून उशनानें तपो-बलानें त्याच्या त्रिशूलाच्या आग्रावर आसन घातलें. मग शिवानें तेथून त्याला उचलून हळूच आपल्या उदरांत टाकिलें. तेथे तो उशना दहा हजार वर्षे तप करीत राहिला. शेवटीं कंटाळून त्यानें महादेवाची प्रार्थना करून त्याच्याजवळ बाहेर यावयास वाट मागितली. तेव्हां शिवानें त्याला आपल्या शिश्नाच्या द्वारें वाट दिली. तो शुक्रद्वारानें बाहेर आल्यामुळें त्याला शुक्र हें नांव मिळालें, व त्या लज्जेमुळें तो अद्यापिही आकाशाच्या मध्यभागीं कधीं येत नाही. असो; तो बाहेर निघाला, त्यावेळी अग्नीसारखा तप्त होऊन येऊं लागला. तेव्हां शंकराला राग येऊन तो त्रिशूलानें त्याचा वध करणार होता; परंतु पार्वतीनें हा आपला पुत्र आहे. याला मारणे उचित नाही, असे सांगितल्यावरून शंकरानें त्याचें रक्षण केले, पुढें तो शुक्र संजीविनी विद्येच्या योगानें दैत्यांचा गुरु झाला.'

## इह-परलोक साधनाचा उपाय

भीष्म म्हणाले, धर्मा, आतां इहपरलोक साधनाचा उपाय सांगतों, तो ऐक. हा प्रश्न पूर्वीं जनकानें पराशर ऋषीला केला होता. तेव्हां पराशर ऋषि म्हणाला, ' राजा धर्माच्या योगानें प्राण्याला इहपरलोक साधतां येतात. दया, क्षमा, धृति, तेज, संतोष, सत्य, लज्जा, अहिंसा आणि सावधानता ह्यांच्या योगानें सुख होतें. हाच उत्तम धर्म होय. मनोरूपी रथाला जोडलेले विषयरूपी घोडे,जो ज्ञानरूप लगामानें आवरून धरतो तोच खरा बुद्धिमान् होय.त्याला पुण्यकर्माच्या योगानें उत्तम वर्ण प्राप्त होतो.धर्मशील, दयाळु, सर्व भूतांना आपल्याप्रमाणें समजणारा व पूजार्हाची पूजा करणारा सुखी होतो. पुत्र, फूल, फळें जें कांहीं असेल त्यानें अतिथि पूजन करावें, व

मातापितरांचें नीट संगोपन करावें. प्रथम वेदाध्ययन करून ऋषींचें ऋण फेडावें आणि मग गृहस्थाश्रम स्वीकारून यज्ञ आणि श्राद्धदान यांच्या योगानें देव आणि पितर यांच्या ऋणांतून मुक्त व्हावें. ब्राह्मणाला वेदाध्ययनानें सुख मिळतें. प्रजेचें योग्य प्रतिपालन करून क्षत्रिय सुखी होतो. धनप्राप्ति हें वैश्याला सुखाचें साधन आहे, आणि तिन्ही वर्णांची सेवा केल्यानें शूद्रांना सुख प्राप्त होते. आतां दान देण्याचा प्रकार ऐक. सुपात्रीं दिलेलें दान उत्तम होय. याचना केल्यावर दिलेलें तें मध्यम व अश्रद्धेनें आणि अपमान करून दिलेलें दान अधम होय. ब्राह्मणांना दमानें महत्त्व मिळतें, क्षत्रियाला विजयानें मिळते, वैश्य धनानें शोभतो आणि दाक्षिण्य हे शूद्रांचे भूषण होय.

धर्मा, पूर्वी सर्व लोक धर्मानें वागत होतें. ही धर्मवृद्धि असुर व दैत्य यांना सहन न होऊन त्यांनीं गर्वानें अधर्माची प्रवृत्ति केली. त्यामुळें क्रमशः क्रोध, निर्लज्जपणा व मोह, असे प्राप्त होऊन सर्वांचा नाश झाला. तेव्हां देव भयभीत होऊन शंकराकडे गेले आणि मग शंकरानें दैत्यांना मारून सर्व लोकांची पुनः योग्यमार्गी स्थापना केली. तेव्हां वेदशास्त्रांची पूर्वीप्रमाणें प्रवृत्ति झाली व इंद्राला देवलोकांचें राज्य मिळालें. तात्पर्य, हिंसाकर्म टाकल्याशिवाय पुरुषांना कल्याण प्राप्त होत होत नाहीं. सर्व सिद्धि तपाच्या योगानें मिळतात, ज्याप्रमाणें सर्व नद्या समुद्राला येऊन मिळतात, त्याप्रमाणें सर्व आश्रमांचा गृहस्थाश्रमांत अंतर्भाव होतो.

धर्मा, पूर्वीच्या ऋषींना तपानेंच प्रतिष्ठा मिळाली, आतां तुला वर्ण-धर्म सांगतों. यजन, याजन, अध्ययन, अध्यापन दान आणि प्रतिग्रह हे ब्राह्मणांचे सहा धर्म आहेत. दान, यज्ञ करणें, अध्ययन आणि ब्राह्मण-संरक्षण, हे क्षत्रिय धर्म होत. शेतकी, व्यापार, पशूंचें पालन करणें हे वैश्यांचे आणि विप्रादि चारी वर्णांची शुश्रूषा करणें हा शूद्रांचा धर्म आहे. अहिंसा, अतिथिसत्कार, सत्य, शम, श्रद्धा विहितकर्माचें आचरण, क्षमाशीलपणा, स्वस्त्रीच्या ठायीं प्रेम, परोत्कर्षसहिष्णुता, सहनशीलता आणि आत्मप्राप्तीचा उद्योग, हे गुण सर्वांना सारखेच पाहिजेत. अज्ञानाहून दुसरा मोठा शत्रु नाहीं. ज्ञानदृष्टीनें पाहिल्यास मर्त्यलोक केळीच्या गाभ्यासारखा निस्सार दिसतो. ज्या पुरुषाला ज्ञानमार्ग कळला नाहीं, तो संसारांत खितपत पडतो, अशी ही पराशर गीता आहे.

## मोक्षप्राप्तीचा उपाय

एका साध्य कोटीतील देवानें गरुडाचें रूप घेऊन हंसाला मोक्षप्राप्तीचा उपाय विचारला तेव्हां हंस म्हणाला,–' चारी वेदांचें सार सत्य हें होय, असें उपनिषद्वाक्य आहे. त्या सत्याचें सार दम आणि दमाचें सार मोक्ष होय. क्रोधादिकांचा उच्छेद झाला म्हणजे परमपदाची प्राप्ति होते. ज्याप्रमाणें बलवान् हरिण जाळें तोडून पळतात, त्याप्रमाणें लोभाचें बंधन योगबलानें तोडून टाकावें. सावधान चित्ताचा धनुर्धर ज्याप्रमाणें लक्ष्याचा त्वरित वेध करितो, त्याप्रमाणें योगोही निश्चलपणें मोक्ष प्राप्त करून घेतो. जसा उत्तम नावाडी सावधपणें महासागर उल्लंघून सुखरूप परतीराला जातो, त्याप्रमाणें योगी आत्मतृप्तेच्या योगानें ब्रह्मपदाला जाऊन पोचतो. त्या योगाचें विशेष विवेचन भीष्मपर्वात आलेले आहे. नाभि, कंठ, मस्तक आणि वक्षस्थळ, यांना स्पर्श करून व त्याचें निश्चल दमन करून मन घ्राणेंद्रियांत लाविल्यानें योगी मोक्षपद पावतो. तो कणमात्र भक्षण करतो व घृतादि रसांचा त्याग करतो. जो योगी एक पक्ष किंवा महिन्यापर्यंत दुग्धमिश्रित जलपान करतो तो निःसंशय महाबलवान् होतो. ज्याप्रमाणें व्याघ्रादिकांनी व्याप्त असलेले अरण्य युक्तिप्रयुक्तीनें ओलांडून ज्ञाता पुरुष पलीकडच्या स्थळीं जातो, त्याप्रमाणें योगी अनेक दोष टाकून निर्वाणपदवी प्राप्त करून घेतो. योगधारणा केल्यानें पुरुष जन्ममरणाच्या दुःखापासून मुक्त होतो.

## सांख्ययोग–विवेचन

आतां सांख्ययोग सक्षेपानें सांगतो. त्याच्यायोगें भ्रमादि दोष नाहीसे होतात. त्याचें ज्ञान झाल्यानें सर्व विषय दोषयुक्त आणि नाशिवंत आहेत, असें पुरुष ज्ञानविज्ञान संपन्न होतो व शेवटीं मुक्त होतो. काम, क्रोध, निद्रा, भय आणि श्वासोच्छ्वास-क्रिया, हे गुण सर्व देहांत असतात. त्यांचा जय केला पाहिजे. क्षमेनें क्रोध जिकता येतो, संकल्पत्यागानें कामावा, सत्त्वयुक्त अध्ययनानें निद्रेचा, सावधपणानें भयाचा आणि अल्प आहारानें श्वासाचा जय करितां येतो. चितारूप महासरोवरांत दुःखरूप जल भरलेलें असून त्यांत मृत्यु आदिकरून मगर आहेत. या भयंकर समूद्रांत तमोगुणरूप क्षुद्र मत्स्य,

रजोरूप मोठमोठे कासव आणि स्नेहरूप कंकपक्षी आंहेत. त्यांत सत्य हें महा-तीर्थ होय. योगरूप नावेनें हा समुद्र तरून गेल्यास उत्तम पद प्राप्त होते.

## क्षराक्षर—विवेक

धर्मा, क्षराक्षर–विवेक या विषयावर जनक आणि वसिष्ठ यांचा संवाद आहे. वसिष्ट ऋषि जनकाला म्हणाला,–' राजा बारा हजार वर्षे म्हणजे एक महायुग होतें. अशा चार युगांना कल्प म्हणतात. सहस्र कल्प म्हणजे ब्रह्मदेवाचा एक दिवस होतो, व तेवढ्याच अवधीची त्याची रात्र असते. या रात्रीच्या अंतीं हिरण्यगर्भ जागा होतो व स्वतः विकृत होऊन तो आपल्यालाच पुनः उत्पन्न करितो. या पहिल्या सर्गाला विद्यासर्ग म्हणतात पुढें तो महत्त्वाला उत्पन्न करितो. हा दुसरा अविद्यासर्ग होय. या महत्तत्व-रूप सात्विक अहंकारापासून पंचमहाभुतें झालीं. हा वैकारिक नांवाचा तिसरा सर्ग या वैकारिकापासून पंचेंद्रियें व त्यांचे पांच विषय झाले, हा चवथा सर्ग पुढें पांच कर्मेंद्रियें झालीं, हा पांचवा सर्ग, हीं सर्व इंद्रियें, बुद्धि व मन मिळून चोवीस तत्वात्मक प्रकृति आहे. देह मात्र या प्रकृतीचेंच स्वरूप होय देहाचीं–भूमि, जल आणि आकाश, अशीं तीन स्थानें आहेत. ह्या सर्व प्रकृतीला क्षर म्हणतात. तिच्या बाहेरचा पंचविसावा जो विकाररहित पुरुष तो अक्षर होय.'

हें ऐकून जनकानें विचारलें. ' क्षराक्षरसंबंधानें जशी सृष्टि आहे, तशीच स्त्रीपुरुषासंबंधानें आहे कीं काय? उत्पन्न होणाऱ्या प्राण्याच्या अंगांत मातेचे तसेंच पित्याचेही गुण असतात. त्वक्, मांस, रक्त हे मातेचे मुख्य गुण आणि अस्थि, मज्जा, स्नायु हे पित्याचे गुण प्राणी घेतो. स्त्रीपुरुषां-संबंधानें अशी रचना दिसते, तरी याचा मला स्पष्ट विचार सांगा.' वसि-ष्टानें उत्तर दिलें, ' अरे गुणी असेल त्याच्याच ठिकाणीं गुणाची कल्पना करितां येते. निर्गुणाला गुण कसा असेल ? चोवीस तत्वात्मक प्रकृति गुण-युक्त असून, पंचविसावा पुरुष निर्गुण आहे. त्याचें ज्ञान मोक्षाचें साधन आहे. त्याचा तुला थोडक्यांत विचार सांगतों. योगशास्त्रांत ध्यान मुख्य आहे. त्या ज्ञानाचे सगुण आणि निर्गुण असे भेद आहेत. त्या दोघांनांही प्राणायामाचें साहाय्य लागतें. प्राणायामही सगुण व निर्गुण असा द्विविध आहे. या प्राणायामानें नाड्या शुद्ध करून चित्त आत्मनिष्ठ करावें. सर्व

इंद्रियांना वश करून स्तंभाप्रमाणें निष्कंप व्हावें. समुद्राप्रमाणें गंभीर राहून अल्पाहारी व निःसंग होऊन निर्जन वनांत जावें आणि आत्मनिष्ठ व्हावें. कान असून ऐकू नये, दृष्टि असून पाहू नये, नासिका असून वास घेऊं नये, अशा वृत्तीनें रहाणारा व वासनांचा त्याग करणारा योगी खरा आत्मनिष्ठ होय. उत्पत्तिप्रलय यांना अविद्या म्हणतात. त्यांपासून मुक्त होणें म्हणजे विद्या होय. ही विद्या प्रकृतीच्या बाहेरचें पंचविसावें तत्त्व होय. मूळ अव्यक्तच सृष्टीसाठी गुणविकार पावतो गुणांची उत्पत्ति होऊन त्यांचे पुनः विकार उत्पन्न झाल्यावर क्षेत्र म्हणजे हे शरीर उत्पन्न होतें, प्रलयकालीं पुनः ही सर्व क्षर प्रकृति अव्यक्त अशा पुरुषांत लीन होते. तेव्हां आत्म स्वतःला निर्गुणत्वानें जाणू लागतो, व प्रकृतीपासून उत्पन्न झालेल्या गुणसमूहाला निंदून ज्ञेयतत्त्वाला वाहूं लागतो. मग पूर्वींच्या अज्ञानदशेबद्दल त्याला पश्चात्ताप होऊन या अशुद्ध प्रकृतीच्या संगानें मीं स्वतः शुद्ध असून यातना भोगल्या, असें त्याला वाटू लागतें.' धर्मा, हा क्षराक्षरविवेक जो जाणतो, तो संसार–तापापासून अलिप्त रहातो. हा विवेक प्रथम हिरण्यगर्भानें वसिष्ठाला सांगितला. वसिष्ठानें नारदाला सांगितला व नारदानें मला सांगितला. याचें ज्ञान जो करून घेत नाहीं, तो संसारांत खितपत पडतो.

पूर्वी जनकाचा पुत्र सुमना अरण्यांत शिकारीस गेला असतां, त्याला तेथें भृगुवंशांतील एक ऋषि भेटला. त्याला सुमनानें विचारलें 'प्राण्यांना शुभाशुभ काय ? तें कृपा करून सांगा,' तेव्हां ऋषि म्हणाला, 'जें स्वतःला वाईट वाटतें व ज्याच्या योगानें परक्याला पीडा होईल, तें करूं नये, आणि शास्त्रानें विहित जीं स्नान–संध्यादि कर्मे ती करून यथाशक्ति दान करावें, आणि शुद्धमनानें वैराग्याचा अवलंब करावा, व आत्मनिष्ठ व्हावें.'

---

# अध्याय १६ वा

## देवरात व याज्ञवल्क्य यांचा संवाद.

जनकाच्या कुलांत जन्मलेल्या देवरात नामक राजानें याज्ञवल्क्याला

विचारले कीं पर आणि अपर म्हणजे काय, ते सांगा. तेव्हां याज्ञवल्क्य म्हणाला,–राजा, महत्तम, अहंकार अव्यक्त, पंचतत्रे दहा इंद्रिये पंचविषय आणि मन मिळून चोवीस विकारात्मक असलेली प्रकृती ब्रह्मदेवाचा दिवस समाप्त होऊन रात्र सुरू झाली कीं ती पुरूषांना प्रेरणा करितें. तेव्हां सूर्यनारायण आपल्या बाराही कालानी प्रकाशून सर्व रसाचें शोषण करितो. मग संवर्तक नावाचे प्रलयकालीन मेघ मुसळधारानी वर्षाव करून जिकडे तिकडे जलमय करुन सोडतात. नंतर कालरूपी अग्नि त्या सर्व उदकाला शोषून सर्व वस्तूंचे भस्म करून टाकतो; आणि अग्निला मारुत(वायु) शोषून टाकितो, त्या वायूला गगन नाहिसे करितें. या क्रमानें पुढे आकाशांचा मनांत, मनाचा महत्तत्त्वाव आणि महत्तत्त्वाचा अव्यक्तांत लय होतो. तेव्हां ब्रह्म हे एकटेच उरतें. अर्थात तें मात्र पर असून अपर होय. आता अध्यात्म अधिभूत, आणि अधिदैव याविषयीं सांगतो तें ऐक. गुद अध्यात्म, अधिभूत अधिदैवत प्रजापति होय. हस्त अघ्यात्म व्यापार अधिभूत आणि इंद्र अधि-दैवत, श्रोत्र अध्यात्म, व्यक्ताव्यक्त अधिभूत आणि दिशा अधिदैवत. जिव्हा अध्यात्म, रस अधिभूत व वरूण अधिदैवत. मन अध्यात्म, मंत्रव्य वस्तु अधिभूत अधिदैवत चंद्र होय, अहंकार अध्यात्म, अहंकारच अधिभूत व त्याचें रुद्र किंवा ब्रम्हा अधिदैवत. त्याचप्रमाणें बुद्धी, अध्यात्म, बोद्धव्य वस्तु अधिभूत आणि क्षेत्रज्ञ अधिदैवत जाणावा. आता गुणाचें विकार सांगतो. आनंद, संतोष, स्थैर्य, श्रद्धा, धैर्य, क्षमा, दया, औदार्य, सत्य, आर्जव, शौच मार्दव, अलोभ हे सत्त्वगुणाचें विकार होत. सुख, सेवा, कीर्तीची अपेक्षा, पश्चाताप, काठिन्य, काम, क्रोध, द्वेष, मद, दर्प, हे रजोगुणाचे विकार आहेत. सात्विकवृत्तीनें उत्तम पदवी प्राप्त होतें. रजोगुणानें मध्यम आणि तमोगुणानें अधम गति मिळतें. पुण्य व पाप या दोघा विरहित असें जे ज्ञान तेंच अक्षर अव्यय व निर्गुण असून त्यालाच रामकृष्णाचे किंवा शंभूचें स्थान म्हणतात. आतां अष्टांगयोग साधणाराचें कोणत्याप्रकारें प्राणोत्क्रमण झाले असतां, त्याला कोणती गति मिळते, ती ऐक, चरणाकडून त्याचें उत्क्रमण झाल्यास त्याला विष्णुलोक प्राप्त होतो. जंघेंतून झाल्यास वसुलोक प्राप्त होतो. गुढग्यांतून झाल्यास सांख्यलोक आणि कुशींतून झाल्यास शिवलोक प्राप्त होतो. प्राणांचें उत्क्रमण मुखांतून झाल्यास योगी विश्वेदेवांच्या लोकीं

जातो, व घ्राणांतून झाल्यास नारायण लोकास जातो. राजा, आतां अरिष्ट-ज्ञान सांगतों तें लक्षांत ठेवून मरणकाल समजावा व सावध रहावें.

अरुंधती ध्रुवं चैव विष्णोस्त्रीणि पदानि च।
आयुर्हीना न पश्यन्ति चतुर्थं मातृमंडलम् ॥
अरुंधती भवेज्जिव्हा ध्रुवो नासाग्रमुच्यते।
त्रिपदा च भ्रुवोर्मध्ये नेत्रयोर्मातृमंडलम् ॥

ज्याला अरुंधती ( जिभेचें टोंक ), ध्रुव ( नाकाचें टोंक ), विष्णूची तीन पदें ( भुवयांच्या मधली जागा ) व मातृमंडल ( डोळ्यांच्या मधला भाग ) दिसत नाही, तो एक वर्षाने मरणार असें समजावें. दुसऱ्याच्या डोळ्याच्या बाहुलींत ज्याला आपली प्रतिमा दिसत नाहीं, अथवा जो ज्ञानी असून एकाएकी अगदी मतिमंद होतो, किंवा सतेजाचा निस्तेज व निस्तेजाचा सतेज एकाएकी होतो, तो सहा महिन्यांनीं मरणार असें जाणावें. कुलदेवतेची निंदा करणारा, व ब्राह्मणाचा द्वेषी, सहा महिन्यांनीं मरण पावतो. तसेंच ज्याला चंद्र किंवा सूर्य सच्छिद्र दिसतात, तो सात दिवसांनीं व ज्याला विनाकारण प्रेताची घाण येते तो सहा दिवसांनीं मरणार असे निश्चित धरावें. ज्याचे कान, नाक, अगदीं निर्जीव होतात, व डोळे आणि दांत विलक्षण दिसतात, ज्याच्या अंगावर पाल पडते, व ज्याच्या अंगात मुळींच उष्मा नसतो, तो लवकर यमलोकास जातो. ज्याला आकाशांत एकाएकीं गंधर्वनगरें दिसतात, व डाव्या डोळ्यांतून एकसारखा अश्रुप्रवाह सुरू होऊन कांहीं केल्या थांबत नाहीं, तो तर तत्काल मृत्यु पावणार असें समजावें. हीं अरिष्टें गुरूपासून समजून घेऊन आपला मृत्युकाल जाणावा.

याज्ञवल्क्य आणखी म्हणतात. 'राजा, मी सूर्यनारायणाची तपश्चर्या करून त्याला प्रसन्न करून घेतलें. तेव्हां तो वरदान माग, म्हणून मला सांगूं लागला व म्हणाला, तुला दुर्लभ असेल तेंही देईन. मग त्याला नमस्कार करून मीं मागितलें कीं, माझी यजुस् आणि साम, असे दोन्ही वेद जाण्याची इच्छा आहे. तेव्हां सूर्यानें सांगितलें कीं, 'तुझ्या मुखांत सरस्वती प्रवेश करील, तू मुख उघड.' त्याप्रमाणें मीं मुख उघडतांच वाणीरूप शारदा माझ्या मुखांत प्रविष्ट झाली. परंतु तिच्या तेजानें व सुर्याच्या किरणानी मीं पोळून गेल्यामुळें पीडित होऊन कांही वेळ शदकांत पडलों. परतु सूर्यानें दोन घटिकानीं शांत

होशील, असें सांगून मला म्हटलें,--'अरे आतां सहाही अंगांसहित वेद तुझ्या ठायीं राहून तूं शतपथाचा प्रवर्तक होशील. एवढें झाल्यावर तुझी बुद्धि मोक्षार्थी होऊन तूं सत्यपदाला जाऊन पोंचशील.'-असें सांगून सूर्य अंतर्धान पावला, व मीही आपल्या आश्रमांत आलों. नंतर वरप्रदानाप्रमाणें मीं शिष्यांना शतपथाचें रहस्य पढविलें, व ते कृतार्थ होऊन गेले. तेव्हां मला आनंद होऊन सूर्यानें उपदेशिलेल्या पंधरा शाखांच्या आधारानें ज्ञेय वस्तूंचे मीं चिंतन करूं लागलों. इतक्यांत विश्वावसु गंधर्वानें मजजवळ येऊन मला नमस्कार केला, आणि वेदसंबंधीं प्रश्न विचारिला. तो म्हणाला, माझे चोवीस प्रश्न आहेत, त्यांची तूं नीट उत्तरें दे. विश्व अविश्व, ख्याती अख्याती, पुरुष प्रकृती, मित्र वरुण, ज्ञान ज्ञेय, ज्ञ आणि अज्ञ, तपा अतपा, सूर्य आणि सर्याद, विद्या अविद्या, वेद अवेद्य, चल अचल, अज अक्षय, यांचें निरूपण करा,-हें प्रश्न ऐकून, हे राजा, मी क्षणमात्र विचार केला आणि सूर्य व शारदा यांना वंदन करून व उपनिषदांचें सार काढून त्याला उत्तर दिलें. तें असें; सत्त्व रज तमात्मक त्रिगुण जें अव्यक्त तें विश्व व निर्मल आणि निर्गुण तें अविश्व होय. नामरूप ही ख्याति व केवलब्रह्म ती अख्याति अव्यक्त व निर्गुण तो पुरुष आणि चोवीस विकारात्मक व्यक्त ती प्रकृति. पुरुषच मित्र आणि प्रकृतिविशेष तो वरुण समजावा. ज्ञान म्हणजे प्रकृति आणि निष्कलंक ब्रह्म म्हणझे ज्ञेय होय. ज्ञ शद्बानें पुरुष समजावयाचा, व अज्ञ शद्बाने प्रकृति. त्या प्रकृतीलाच तपा आणि निष्फल व्रताला अतपा म्हणतात. सूर्य शद्बानें प्रकृतीचा बोध करावयाचा व सर्याद शद्बावरून ईश्वराचा करावा. याप्रमाणें इतर शद्बही योग्यतेनुरूप प्रकृति आणि पुरुष यांचेच वाचक समजावयाचें. या वेदांतील सारभूत ज्ञानाला जे जाणत नाहींत, ते पुनः पुनः संसार चक्रांत फिरत राहातात. यास्तव हे राजा, प्रकृति पुरुषाचें ज्ञान करून घेऊन जन्ममरणापासून सुटून जावें.' एवढें ऐकून विश्वावसु म्हणाला; मुने, ऋषिमुखानें पंचविसावें तत्व ऐकिलें आहे. असित, जैगीष, देवल, पराशर, ब्रह्मर्षि, पंचलिख, आर्ष्टिषेण, कपिल, शुक, गौतम, गर्ग, नारद, आसुरि, पुलह, पुलस्त्य, सनत्कुमार, शुक्र, देवरात, कश्यप, आणि माझा पिता येवढ्यापासून तें तत्व ऐकिलें आहे. परंतु पुनः तुजकडूनही तें ऐकावे अशी इच्छा आहे.' तेव्हां याज्ञवल्क्यानें उत्तर दिलें,--'विश्ववसो, प्रकृतीला पुरुष जाणतो, परंतु पुरुषाला प्रकृती जाणत नाहीं. चोवीस

विकारात्मक प्रकृतीला जाणणारा जो पुरुष तो पंचविसावे तत्व होय. आणि प्रकृति व पुरुष या दोघीनांही जाणणारा ,सिद्ध, तो क्षर आणि अक्षर यांच्या पलीकडे सव्विसावा होय.' अशा प्रकारें वेदाचा सारांश ऐकून विश्वावसूला संतोष झाला व याज्ञवल्क्याला नमस्कार करून तो आपल्या स्थानीं निघून गेला. राजा, यास्तव ब्रह्मप्राप्तीला सांख्य ज्ञानावांचून दुसरे साधन नाहीं. या ज्ञानावांचन मोक्ष कधींही व्हावयाचा नाहीं.' हें याज्ञवल्क्याचें भाषण ऐकून देवरातानें त्याचा दान–मानानें संतोष करून आपल्या आश्रमी पाठविलें आणि ब्राह्मणांना नानाविध दानें देऊन आणि पुत्राला राज्यावर बसवून तो स्वतः मोक्षमार्गाला लागला.' भीष्म धर्माला म्हणाला,—' धर्मा, तुम्हीं ज्ञानाचा अभ्यास करा, म्हणजे सर्वांना वंद्य व्हाल.'

---

# अध्याय १७ वा



## देहाला, जरा व मरण येणार नाहीं, असा उपाय कोणता ?

वैशंपायन जनमेजयाला म्हणाले,—याज्ञवल्क्यानें जनकाला केलेला बोध ऐकून धर्मराजानें पुनः प्रश्न केला कीं, —' या देहाला जरा व मरण यणार नाहीं, असा कांहीं उपाय आहे काय ?' हा प्रश्न ऐकून भीष्मांनीं त्याला पंचशिख भिक्षुक आणि जनक यांचा संवाद सांगितला. जनकाचा प्रश्नही हाच होता. त्यास पंचशिखानें उत्तर दिलें कीं, जरा व मरण कोणत्याही उपायानें टाळतां येणार नाहीं. या कालप्रवाहांत सर्व प्राणी अखंड दुःख भोगीत रहात जाऊन अनेक देह धारण करिताता. त्यांत पुत्र, कलत्र इत्यादि रूपानें प्रसंगानें कित्येकांच्या गांठी पडतात. तेथें वास्तविक कोणी कोणाचें नसते. त्यामुळें एकाच्या दुःखानें दुसऱ्याला दुःख किंवा सुख कसें होईल ? या स्थितींत एक वैराग्ययुक्त ज्ञान असेल, तर मात्र रक्षण होण्याचा कांहीं उपाय असतो एरवीं कांहीं नाहीं.

## सुलभा–जनक संवाद

नंतर धर्मानें पुनः विचारिलें कीं,––‘ गृहस्थाश्रमाचा त्याग न करितां केवळ ज्ञानाच्या जोरावर कोणाला जय मिळाला आहे काय?’ तेव्हां भीष्मानें त्याला सुलभा व जनक यांचा एतद्विषयक संवाद सांगितला,––मिथिला नगरींत जनक राजा राज्य करीत होता. तो वेद, वेदांगें व धर्मशास्त्र उत्तम प्रकारें जाणत असून पुराणें, स्तुति, कल्पसूत्रें व सांख्ययोगादि शास्त्रें, यांचेही त्यानें चांगलें अध्ययन केलें होतें. त्याची उत्तम राजा व उत्तम योगी, अशी सर्वत्र ख्याति झाली होती. ती ऐकून सुलभा नांवाच्या योगिनीला त्याविषयीं संशय उत्पन्न झाला व ती त्याची परीक्षा पहाण्यासाठीं सुंदर स्त्रीचें रूप घेऊन त्याच वेषानें भिक्षा मागत मागत जनकाकडे आली. तिचें रूप व वृत्ति पाहून जनकाला आश्चर्य वाटलें, आणि त्यानें तिचें स्वागत करून अन्नादिकांनीं तिला संतुष्ट केलें. भोजन झाल्यावर ती तृप्त होऊन जनक सभेंत बसला होता तेथें गेली. तेथें गेल्यावर जनक हा खरोखर जीवन्मुक्त आहे कीं नाहीं, हें जाणण्याकरितां तिनें आपल्या सात्विक भावानें जनकाच्या शरीरांत योगसामर्थ्यानें प्रवेश केला, व त्यांच्या नेत्रांचें व आपल्या नेत्रांचें संमेलन केलें. त्यावेळीं तिचा सर्व भाव जाणून जनक तिला म्हणूं लागला, ‘तूं ही विद्या कोठून संपादन केलीस ? तूं आलीस कोठून व जावयाची कोठें तें सांग ? तुझें शास्त्राध्ययन वय व जाति यांविषयीं चांगलेपणा दिसत नाहीं. मी तर छत्रचामरादि राजसाधनें असतांही मुक्त आहें. तुझ्याबद्दल माझ्या मनांत आदरबुद्धि उत्पन्न झाली आहे. मला मोक्षाचे उत्तम ज्ञान आहें. जें मोक्षज्ञान फार दुर्लभ तेंही मला मिळालें आहे. पराशर गोत्रज जो पंचशिख ब्राह्मण त्याचा मीं शिष्य असून त्याच्यापासून सांख्य व योगशास्त्रांत मी प्राविण्य मिळविलें आहे. मी राजनीति–निपुण, ज्ञानी, मोक्षमार्गात प्रविण असा असतांही राज्यापासून ढळलों नाहीं. गुर्वाज्ञेनें मी राज्याचा त्याग न करितां, त्याचें पालनच करीत आहे. मोक्षमार्गाची पहिली पायरी म्हणजे वैराग्य होय. वैराग्याचें ज्ञान उत्पन्न होऊन, ज्ञानानें पुरुष मोक्षाच्या प्रयत्नास लागतो. याप्रमाणें मोक्षमार्गाला लागल्यावर सुखदुःखादि द्वंद्वांचा नाश होऊन चित्त स्थिर होतें. राज्यपालन करीत असूनही मी मुक्तसंग आणि ज्ञानयुक्त होऊन कर्में करणारा आहें. कारण हीं दोन्हीही मोक्षाचीं साधनें आहेत.

याशिवाय गुरूनें यमनियमांचे आचरण हा तिसरा मोक्षप्राप्तीचा उपाय सांगितला आहे. गृहस्थ काय व संन्याशी काय, ज्ञान झाल्यावर दोघांनाहीं सारखाच मोक्ष मिळणार. राजा असो कीं, त्रिदंडी असो, प्रसंगीं अपेक्षा असेल तोच पदार्थ तो घेतो. राजा छत्रचामरे घेतो, आणि संन्यासी कमंडलु घेतो. यास्तव दोघांनाही सारखेच ज्ञान झाल्यास मोक्ष कां बरें मिळणार नाहीं ? गृहस्थाश्रमांत दोष काढून संन्यासाश्रमाचा स्वीकार केल्यानें, पुरुष पुन: संगाचा दोषी होत नाहीं काय ? राजाच्या हातीं सत्ता असतें, व संन्यासी पुरुषाजवळ समदृष्टि असतें. एकंदरीत निग्रह किंवा अनुग्रह करण्यांत दोघेही सारखेच. मग संन्यासी तेवढे मुक्त होणार व राजे होणार नाहींत, असें कसें म्हणतां येईल ? ज्ञानापासून जर मुक्ति आहे, तर राजाचा त्याला अपवाद कसा होईल ? तेव्हां भगवीं वस्त्रें आणि कमंडलुधारण व मुंडन हीं कांहीं मोक्षाचीं साधनें किंवा चिन्हें नव्हत. कारण हीं चिन्हें असूनही ज्ञानच मोक्षाला कारण होतें; किंवा वैराग्यानेंही तो प्राप्त होतो. भगवीं वस्त्रें जर मोक्षाचें चिन्ह असेल, तर छत्रचामरेंही तशींच आहेत.'

'आतां तूं म्हणशील कीं, अकिंचनत्व हें मोक्षाचें कारण असून, वैभव हें बंधनदायक आहे, तरी तसेंही दिसत नाहीं. अगदीं दरिद्री असून अज्ञ असे अनेक लोक आहेत, ते सर्व तसेच मुक्त होणार कीं काय ? खरें पाहिलें तर, धर्म, अर्थ, काम आणि मोह, हीच बंधनांचीं कारणे आहेत. मी त्या सर्वांच्या पलीकडे गेलेला असल्यामुळें, मी केवळ मोक्षमार्गांत राहिलो आहे. राज्यैश्वर्यामध्यें पुत्र मित्रादिकांविषयी स्नेह, हेच बंधन असते; परंतु ते तर मी मोक्षरूप पाषाणावर ठेवून वैराग्यरूप खड्गानें छेदून टाकिलें आहे. पुत्र, मित्र, कलत्र, इत्यादिकांमध्यें निरंतर वावरत असूनही मी त्यांच्याविषयीं आसक्ति बाळगीत नाहीं, व सदैव आत्मनिष्ठ असतों. अशा तऱ्हेनें मी केवळ मुक्त आहे. आतां तुझा वर्ण कोणता तुझें वय असें कोमल असून यमनियमांचें आचरण करण्याचा हेतु काय ! तें ऐकण्याची मला इच्छा आहे. वास्तविक तुझा वेष मला कपटी वाटत असून, माझी परीक्षा पहाण्यासाठीं तो तूं घेतला आहेस. मी कांहीं संन्यासवेषधारी नाहीं. तूं आपली दृष्टि माझ्या दृष्टींत युक्त करून बुद्धिमार्गानें माझ्या हृदयांत प्रवेश केलास, अशी तूं धूर्त कपटी माझ्या राज्यांत कशी आलीस ? तूं कांहीं योग्यायोग्यतेचा विचार केलास काय ? तू ब्राह्मण जातीची असून मी क्षत्रिय आहे. ब्राह्मण

क्षत्रियांचे ऐक्य करून माझ्या शरीरांत प्रवेश केल्यानें तूं वर्ण-संकराची दोषी झाली आहेस. बाह्यात्कारी तूं मोक्षधर्मिणी निःसंगयोगिनी म्हणवीत असून, मज गृहस्थाश्रमाच्या शरीरांत प्रवेशून तूं दुसरा वर्णसंकार केलास. शिवाय मी गोत्रज की अन्यगोत्री हेही न जाणतां मजमध्यें प्रवेश केलास व क्षत्रियकुलांत संकर करून तिसऱ्या दोषाची अधिकारी झालीस. त्यापेक्षां तूं मूर्ख तरी असावीस, किंवा तुझें ज्ञान तरी मिथ्या असावें. कावीळ झाली कीं, ज्याप्रमाणें शुभ्र वस्तूही पिवळी दिसतें, त्याप्रमाणें तुलाही सर्व मोक्षाधिकाऱ्यां-विषयीं संशय वाटतो आहे. यास्तव तुझें शास्त्रध्ययन सर्व व्यर्थ गेले, असें म्हटले पाहिजे. दुसरें तूं माझ्या हृदयाला बुद्धिमार्गानें स्पर्श केल्यामुळें तुझ्या गुह्य वृत्तीचा स्फोट झाला आहे. तसेंच तुझ्यांत परोत्कर्षासहिष्णुताही दिसून येते. कारण कीं, तूं माझा व या माझ्या सभेचा पराभव करूं पहात आहेस. तुला क्रोध व बुद्धिभ्रंश यांची पीडा झाली असून, त्यांना योगाचें सहाय्य मिळाल्यामुळें, जणु तुझ्यांत विष व अमृत यांचें मिश्रण झालें आहे, असें वाटतें. अन्न किंवा पाणी हीं मनुष्याला आवश्यक असतील, तेव्हांच ती अमृतमय होतात. एरवीं विषमय होतात. त्यामुळें ही तुझी कृतीही अना-वश्यक अतएव विषासारखीं त्याज्य झाली आहे. माझी परिक्षा पहाण्या-साठीं तूं आपले खरें स्वरूप लपविलेंस, अथवा न जाणो, माझ्या राज्यांतील बारीक वृत्तांत जाणण्यासाठीं तुला कोणीं गुप्तवेषानें पाठविलेंही असेल. एकंदरींत तुझें कृत्य अनीतीचें आहे. कारण राजे लोक ब्राह्मणांसह सभेंत एकांत विचार करीत बसले असतां, एखाद्या स्त्रीनें त्यांतही विशेषतः बुद्धि मान् व सुज्ञ स्त्रीनें जाणें, हें अगदीं अनुचित आहे, असें वृद्धांचें वाक्य आहे. राजा, ब्राह्मण व अनोळखी स्त्री, यांजकडे अपरिचितानें एकाएकीं जाऊं नये, असें नीतीवचन आहे. तरी तुझा एखंदर अभिप्राय आणि तुला येथें येण्याचें कारण काय, तें आतां तूं सांग.'

या प्रमाणें जनकानें सुलभेची नानाप्रकारें निर्भर्त्सना केली असतां, ती वेदांच्या आधारानें त्याला उत्तर देण्यास तयार झाली. ती म्हणाली,— ' राजा, तूं जें एवढा वेळपर्यंत भाषण केलेल, तें विचारपूर्वक पाहिल्यास अगदींच अयोग्य दिसतें. पहा बरें ! जें वाक्य बोलावयाचें तें सौक्ष्म्य, सौख्य, क्रम, निर्णय आणि प्रयोजन, इतक्या पांच अर्थांनीं युक्त असलें पाहिजे, असें शास्त्र सांगतें. आतां या पांचांचीं लक्षणें ऐक, सौक्ष्म्य म्हणजे विषयांचें

काठिन्य, अगदीं सर्वास प्रत्यक्ष असणाऱ्या विषयावर बोलण्यानें मनुष्य उपहासास पात्र होतो. यासाठीं वाक्य विषय थोडा तरी अज्ञात पाहिजे. सांख्य म्हणजे त्या विषयांचे गुणदोष विवेचन विषय सांगताना जो मुद्दा प्रथम बोलावयाचा तो प्रथम व त्या मागून यथानुक्रम समजूत पडेल अशा रीतीनें दुसरें मुद्दे सांगणें, याला क्रम म्हणतात. त्या विषयाचें उद्घाटन करण्याचें जें कारण त्याला प्रयोजन म्हणतात आणि उद्घाटन करून जो सिद्धांत काढावयाचा त्याला निर्णय म्हणतात. या पांच अर्थांनीं युक्त असलेलें वाक्यच वक्त्यानें बोलावें. आतां वाक्याचे अठरा गुण सांगतें तें ऐक. अर्थ स्पष्ट असणें ( उयतार्थं ), अनेक अर्थ न संभवणें ( अभिन्नार्थ ), योग्य शब्द योयणें ( न्यायवृत्त ), थोडक्यांत सांगणें ( संक्षिप्त ), श्लेषादि गुणांनीं युक्त असणें ( श्लक्ष्ण ), संशयरहित असणें ( असंदिग्ध ), हे वाक्याचे सहा गुण होत. तसेंच जोडाक्षर असणें, ग्राम्य पदें न मोजणें, उलट अर्थ भासेल असे न बोलणें, सत्य, धर्म व शास्त्र यांच्या विरुद्ध वाक्य न बोलणें बोलतांना क्रोध, लाज किंवा अभिमान न बाळगणें, शिवाय वक्ता, श्रोत आणि व्याख्यानविषय हे तिन्ही जेव्हां सारखे असतील, तेव्हांच अर्थप्रकाश नीट होतो. हे लक्ष्यांत घे; आणि आतां माझें बोलणें राजा सावधपणें ऐक.

सुलभा म्हणाली,—मी कोणाची कोण म्हणून तू विचारलेस, त्याचें आतां मी उत्तर सांगतें. तृण, काष्ठ, पृथ्वी यांचा अणु आणि उदक यांचा जसा संयोग तसा हा प्राण्यांचा संसार आहे. शब्द स्पर्श, रूप, रस, गंध हें पांच विषय आणि श्रोत्र, त्वक्, चक्षु. जिव्हा आणि घ्राण ही पांच ज्ञानेंद्रियें एके ठिकाणीं असून, ज्या प्रमाणें हे शरीर बनविलेलें आहे. त्यांत अकरावें मन आल्यामुळें त्याचा व इंद्रियांचा संबंध होऊन विषयांचा उपभोग सुरू होतो, व आपण उपभोग घेतो अशा प्रकारची बुद्धि त्यांत नंतर उत्पन्न होते, हा बारावा गुण. पुढें सत्व हा तेरावा गुण येतो. त्याच्या योगानें पुरुष अल्पसत्त्व कीं महसत्त्व आहे हें समजतें. हें सर्व माझे असें हे म्हणणारा जो क्षेत्रज्ञ जीव तो चवदा गुण. या सर्वांचे ऐक्य आणि वृद्धि करणारा तो समग्र्य नांवाचा पंधरावा गुण होय. या सर्वांना—पटांत तंतु असतात, त्या प्रमाणें एकत्र ओवणारा जो संघात तो सोळावा गुण. आकृति हा सतरावा व पिंड बनलेला हा जड देह तो अठरावा गुण होय. त्यांत सुखदुःख, शीतोष्ण

इत्यादि जोड्यांचा समुदाय एकोणीसावा गुण आहे. सर्वांचा परिणाम करणारा काल हा विसावा गुण होय. पंचमहाभूतें, उद्योग, असद्योग, दैव शुक्र आणि बल असें दहा गुण त्या वीस गुणांशीं मिळून तीस गुणांच्या संघातानें हा जड देहाचा पिंड तयार होतो. अशाच प्रकारानें हा माझा स्त्रीरूप देह तयार झालेला आहे पुरुष देहही याच प्रमाणानें तयार होतो. यास्तव मीं कोण, म्हणून जो तूं प्रश्न केलास तो कोणाला ? स्त्री-पुरुष संयोग होऊन त्यांच्या रजोरुधिरांपासून कलल उत्पन्न होतें. पुढें कललापासून पेशी व पेशींचा पिंड तयार होतो. त्या पिंडाला नंतर रोम (केल) आणि नखें येऊन नऊ महिनें पूर्ण झाल्यावर दहाव्या महिन्यांत स्त्री किंवा पुरुष असें चिन्ह घेऊन देही जन्मास येतो. नंतर त्याचें जातकर्म व नामकरण झाल्यावर, क्रमानें बालपण, कौमार, यौवन, आणि वार्धक्य अशा अवस्था त्याला प्राप्त होतात. या प्रमाणें उत्तरोत्तर वय वाढत असतां एक एक कलेचा ऱ्हास होत असतो; परंतु तो अत्यंत सूक्ष्म असल्यामुळें लक्षांत येत नाहीं ज्याप्रमाणें दिव्याची ज्योति प्रतिक्षणी निराळी असुनही तिचें भिन्नत्वानें निरूपण करितां येत नाहीं, तसेच शरीरही प्रतिक्षणीं सूक्ष्मपणें भिन्न होत असल्यामुळें, त्याचें ऐक्य तर नाहींच; पण भिन्नत्वही स्पष्ट दाखवितां येत नाहीं. ज्याप्रमाणें सूर्यकान्तापासून अग्नि उत्पन्न होतो, त्याप्रमाणें कलासमुहापासून प्राणी निर्माण होतो, असें असतां तूं आपल्या देहाप्रमाणेंच इतरही देहाकडे कां पहात नाहींस ? यास्तव तुझा पहिला प्रश्न व्यर्थ होय. पुढें तूं कोणाची कोण म्हणून मला विचारलेस, पण हाही प्रश्न फुकट आहे. तूं आपल्याला द्वंद्वहीन म्हणवितोस, तर अशा प्रश्नाचा काय उपयोग ? ज्याला मित्र, वैरी व उदासीन हा भेद आहे, तो मुक्त कसा म्हणावा ? ज्याचा स्व-पराभाव मुळींच निघाला नाहीं, त्याला मित्र, वैरी इत्यादि दिसतात. जो समुद्रवलयांकित पृथ्वीचें राज्य करितो तो राजा एका नगरांतच रहातो. नगरांतही पुनः तो एका राजवाड्यांतच रहातो, आणि त्यांतील एक भागांत एका पलंगाच्या अर्ध्यावरच काय तो निद्रा घेतो. असें असूनही केवढी अन्नवस्त्राची चिंता तूं करतोस पहा. अपराध्यांस दंड करणें, दुःखितांस आश्वासन देणें, संधिविग्रह करणें, राज्यव्यवस्था पहाणें, यांच्यायोगानें तू अपदीं पराधीन आहेस. शिवाय कुटुंबाला योग्य वर्तनाविषयीं आज्ञा करणें, याचकांना योग्यतेप्रमाणें

दान देणें इत्यादि निग्रहानुग्रह इतर गृहस्थांना आहेत, तसेच तुलाही आहेत, तेही जापापल्या घरचे राजेच आहेत. तेव्हां त्यांनाही तुझ्यासारखेच मुक्त कां म्हणूं नये ? तात्पर्य तुझें बोलणें तृणाग्नि किंवा जलफेन याप्रमाणें क्षणभर मात्र टिकणारें आहे. साम्राज्याची व्यवस्था करतां करतां मन ममतेनें व्याप्त होऊन शांति मिळणें दुर्घट आहे, अश्व, रथ, सैन्य, प्रधान, कोश, इत्यादि माझें माझें असें तूं म्हणत आहेस, त्या तुला उपशम कसा प्राप्त होणार ? याप्रमाणें एकीकडे राज्य करीत असून, एकीकडे संन्याशाप्रमाणें तूं वागत असल्यामुळें तुझ्या हातून एकादी गोष्ट नीटपणें होत नाहीं. सर्व पृथ्वीचें राज्य करणाऱ्या राजानें अश्वमेध करून ब्राह्मणाला पृथ्वीदान द्यावें असे आहे, हेंही तुला माहीत आहे. तसें न केल्यास अनेक आधि व्याधि प्राप्त होऊन अनंत–कोटि दुःखें भोगावी लागतात, त्यांचा मला उच्चारही करवत नाहीं. ही दुःखें तुला होत नाहींत, असें तूं कशावरून म्हणतोस ? पंचशिखाच्या मुखानें जें मोक्ष ज्ञान तूं शिकलास त्याचे अनेक भेदबुद्धि हेंच फल काय ? अरे. आशा, मनाशा, तोडावयाला निःसंग झालें पाहिजे. तूं वेदशास्त्रज्ञ म्हणवीत असून राज्यच्छत्रादिकांशीं एवढा संग कां बरें करतोस ? तूं हें सर्व थोतांड आरंभिलें आहेस. राजा, तुझे हे सर्व विचार एक कौटालच नव्हे काय ?

आतां तूं म्हणतोस, तूं माझ्याठायीं प्रवेश करून शास्त्राविरुद्ध वर्णसंकर केलास; पण मी तुझ्या शरीरांत केवळ सत्वगुणानें प्रविष्ट झालें, त्यांत काय बिघडलें ? तू आपल्याला मुक्तसंग म्हणवीत आहेस, तेव्हां तुझें शरीर म्हणजे शून्य स्थल समजून मी तें वसविलें, त्यांत कोणाचें काय वाईट केलें ? जर कां हस्तपादादि अवयवांनीं मी तुला स्पर्श केला असता तर हें तुझें बोलणें साजलें असतें. तू थोर कुलांत उत्पन्न होऊन व बुद्धिमान आणि दूरदर्शी असून, या नीतिपूर्ण महापंडितांच्या समोर मी संकर केला असें म्हणतोस, याची तुला लज्जा कशी वाटली नाही ? सभासदांसमोर असें असभ्य शब्द बोलणें मुक्तसंग योग्याला शोभतें काय ? ज्याप्रमाणें कमलपात्रांत जलबिंदु अलिप्तपणें रहातो, त्याप्रमाणें मीही तुझ्या शरीरांत अलिप्तपणें राहिलें. तेव्हां मी तुला स्पर्श केला, असें कसें होईल ? तुझ्या गुरूनें तुला विद्या सांगून तुझे ज्ञान मन निर्बीज तरी कुठें गेलें ? गार्हस्थ्यापासूनही तूं च्युत झालास, व इकडे तुला मोक्षज्ञानाचा खरोखर गंधही

समजला नाहीं. एक उत्तम दुसरे नीच यांचा संबंध होईल, तर त्याला वर्णसंकर म्हणतात. मुक्तमुक्तांच्या संबंधाला वर्णसंकर म्हणतां येईल काय? पहा बरे, हातांत भांडे आहे, व त्या भांडयांत दूध असून त्यांत एक माशी पडली आहे. यांत एकमेक एकमेकांची आश्रित आहेत खरी; पण ती ही सर्व एकत्र असून ज्याप्रमाणें ती एकमेकांत खिचडीप्रमाणें मिसळत नाहींत, त्याप्रमाणें वर्णही वेगळाले असतां त्यांचा संकर कसा होईल ? पुनः मी ज्ञातीनेंही तुझ्या बरोबरीची आहे. मी वैश्य किंवा ब्राह्मण नसून, प्रधान्य नामक राजर्षीची सुलभा नावाची कन्या आहे. मनासारखा भर्ता मला न मिळाल्याकारणानें मी तपस्विनी होऊन ऋषिचर्येनें रहात आहे. माझ्या मनांत कोणतीच गुप्त मसलत किंवा अभिमान नसून, मी अज्ञानानें, अविचारानें किंवा भोळसटपणानें कांहीं बोलत नाहीं. तुझी बुद्धि मोक्ष-मार्गात आहे, हें ऐकूनच मी येथें आले. मला माझा अभिमान नाहीं व दुसऱ्या कोणाचा द्वेषही करावयाचा नाहीं. भिक्षूनें शून्यगृहांत रहावें, असें शास्त्र असल्यामुळें मी तुझ्या शुन्य देहांत रात्रभर रहाण्याचा विचार केला. तूं अर्घ्यपाद्यांनीं माझी पुजा करून मला संतुष्ट केलेस, तरी मी एवढी रात्र येथें आनंदानें राहून उद्यां दुसरीकडे निघून जाईन."

---

# अध्याय १८ वा



## जनक-योगिनी-संवाद, दुसरा प्रकार

वैशंपायन जनमेजयाला म्हणाले,—' राजा, या योगिनीची कथा पद्म पुराणांत निराळ्या प्रकारे दिली आहे. ती अशी :-' एकदां श्रीकृष्ण पर-मात्मा मिथिलेस गेला असता, सभेमध्यें त्यानें जनकाची भेट घेतली. तेव्हां जनकानें त्याची षोडशोपचारें पूजा करून स्वागत केल्यावर श्रीकृष्णानें त्याचा भाव ओळखून त्याला म्हटलें, राजा, तूं संसारांत धन्य आहेस. तुझा एक पाय स्त्रिया स्तनांनीं रगडीत आहेत व दुसरा अग्नींत जळत आहे, तरी

दोन्हीही तुला समानच वाटतात. तूं विदेही खरा. तुझ्या योग्यतेचा पुरुष दुसरा त्रैलोक्यांत कोठें आढळणार नाहीं. कर्मानेंच तूं ही पदवी पावला आहेस. तुझें कुशल वृत्त जाणून आम्हांला फार आनंद वाटतो. अशा रीतीने अनेक प्रकारची कृष्णानें स्तुति केली असतां, जनकाच्या मनांत अभिमान उत्पन्न झाला; आणि नम्रत्वाचा आव आणून त्यानें कृष्णाला त्या वेळीं काहींच उत्तर दिलें. नाहीं. हा प्रकार पाहून कृष्णानें त्याची मौज करण्याकरितां एक योगिनी उत्पन्न केली. व ती दोघांच्या मध्यें येऊन बसली. तिला पाहून सर्व सभा चकित होऊन गेली. नंतर तिनें नेत्रद्वारा जनकाच्या शरीरांत प्रवेश केला, व मग मागील अध्यायांत सांगितल्याप्रमाणें त्यांचा संवाद झाला. परंतु जनकाचा गर्व हरण करण्यासाठीं ती पुढें म्हणाली; राजा, तूं माझें कुल काय म्हणून विचारिलेस? तुला मी खचित सांगते कीं कुल सांगण्यांत प्रत्यक्ष ब्रह्मदेवही पुरा पडणार नाहीं. तेथें तुझी काय कथा? मोक्ष-धर्माचा विचार करूं गेल्यास कुठलें कुल कुठलें गोत्र.कुलगोत्र घेऊन बसल्यास संसाराची भ्रांति कधींही फिटावयाची नाहीं. मी वर्णसंकर केला म्हणून तूं म्हणत आहेस, तरी त्याविषयीं तुला मी एक गोष्ट सांगतें, ती ऐक.

## वेश्येची कथा

पद्मपुर नामक नगरांत एक सुंदर वेश्या रहात असे. ती तारुण्यांत आली तेव्हां तिला पाहून रतीनेंहीं खालीं मान घातली. कांहीं दिवसांनीं तिला एक पुत्र आणि कन्या अशीं दोन जुळीं मुलें झालीं. त्यांना पाहून वेश्येने विचार केला कीं, या कन्यापुत्रांना जवळ ठेविल्यास त्यांच्या काळजीनें माझ्या तारुण्याची हानि होईल,तिनें तीं दोन्हीं मुलें बाहेर एका उकीरड्या-वर नेऊन ठेविली ती तेथून निघून गेल्यावर त्या मार्गानें एक धनिक व्यापारी येत होता. त्याला पुत्र नव्हता. ही सुंदर मुलें पाहून त्यांतील मुलाला त्यानें उचलले आणि घरीं जाऊन आपल्या स्त्री जवळ दिले. स्त्रीलाही आनंद होऊन तिनें प्रेमानें त्या मुलाचा सांभाळ केला.थोड्याच वेळानें त्या वाटेनें दुसरा एक व्यापारी जात होता. त्याला कन्या नसल्यामुळें त्यानेंही त्या मुलीला उचलून घरी नेले, व देवानें आपल्याला ही कन्या दिली आहे, असें आपल्या स्त्रीला सांगितलें. कांहीं वर्षांनीं तीं दोन्हीं मुलें मोठीं होऊन उपवर झालीं; परंतु तीं सांपडलेलीं असल्यामुळें कोणीही त्याशीं संबंध करण्यास

तयार होईना. त्यांच्या मातांना तर त्यांच्या विवाहाची मोठी काळजी लागून राहिली. अशा रीतीनें कांहीं दिवस गेले असतां, कर्मधर्मसंयोगानें त्या मुलांमुलींचाच विवाह झाला, व ती आनंदानें संसार करूं लागली. यांची मातापितरें मरून गेल्यावर कांहीं कालानें एके दिवशीं ती सुखशय-नावर एकांतांत निद्रा करीत असतां, त्यांच्या घराशीं एक योगिनी आली व भिक्षा मागू लागली. थोड्या वेळानें त्या स्त्रीपुरुषांचा पूर्व संबंध त्या योगि-नीच्या लक्षांत आला, व ती हसू लागली. तिचा हास्यध्वनि ऐकून ती स्त्री बाहेर आली, व हंसण्याचें कारण योगिनीला विचारूं लागली. परंतु योगिनी तिला म्हणाली, मी जर तुला हें कारण सांगितलें, तर मोठा अनर्थ होईल, आणि तूं मग आपलें काम सोडून चिंतेंत पडशील. स्त्रीनें उत्तर केलें 'काय असेल तें सांग तूं माझी गुरुच आज मला भेटलीस ?' हें ऐकून योगिनी म्हणाली, 'बाई, हा तुझा पति पुर्वींचा बंधु असून तुम्ही दोघें एका वेश्येचीं जुळीं मुलें आहांत. तुम्हांला दोन व्यापाऱ्यांनीं उचलून नेऊन निरनिराळ्या ठिकाणीं वाढविल्यामुळें तुमचा पतिपत्नीचा संबंध घडून आला आहे. आतां तूं मला झटकन भिक्षा घाल आणि मग वाटेल ते कर.' हें ऐकून ती स्त्री योगिनीला क्षणभर थांबण्यास सांगून आपण घरांत पतीजवळ गेली, आणि त्याला सर्व हकीकत सांगून मी या पापाच्या प्रायश्चितासाठीं तप करणार असें त्याला म्हणाली, व ती त्या योगिनीबरोबर निघून गेली. इकडे तो वणि-क्पुत्र स्त्री—विरहामुळें दुःखी झाला, आणि उद्योगधंदा करण्याच्या मिषानें तो बाहेर पडला. देशोदेशी फिरत फिरत तो पद्मपुर नगरास आला. तेथें नगराबाहेर वेश्यांची आळी होती. त्याची माता वेश्या अद्यापि तरुण असून तेथेंच होती. तिला न ओळखून तो तिच्याशींच रममाण झाला. पुढें त्या दोघांची प्रीति जमून तो तिजकडे पांच वर्षें राहिला; व ती गरोदर आहे असें पाहून, तो आपल्या उद्योगासाठीं पुढें निघून गेला. तो गेल्यावर त्या वेश्येला पुत्र झाला, व त्या आळींत ती श्रीमंत असल्यामुळें तेथें सर्वत्र आनंद झाला. तो पुत्र चार महिन्यांचा झाला असतां, एके दिवशीं त्या वेश्येची योगिनी झालेली कन्या फिरत फिरत तिच्या घरीं आली. ती कोण तपस्विनी आहे, असें समजून वेश्येनें तिची पूजा केली, व कडेवरचा पुत्र खालीं ठेवून तिला भिक्षा आण-ण्यासाठीं ती घरांत गेली. योगिनीनें त्या मुलाला पाहतांच सर्व प्रकार तिच्या

लक्षांत आला. मुलाला जवळ घेऊन ती म्हणाली ' अरे बाळा, तूं आमचा आठ प्रकारचा संबंधीं आहेस. ' असें म्हणून तिनें ते आठही प्रकार स्पष्ट करून सांगितले. ती म्हणाली तुझें पहिलें नातें सख्या भावाचें, दुसरें पुत्राचें, तिसरें दिराचें, चवथें भ्रताराचें, पांचवें भाच्याचें, सहावें चुलत्याचें, सातवें मामाचें आणि आठवे नातवाचें नातें आहे, ' हे शब्द ऐकून वेश्या त्वरित बाहेर आली, आणि हीं नातीं कशी म्हणून तिला विचारूं लागली. योगिनीनें उत्तर केलें, ' अगे, मी सांगतें तें ऐक. तूं माझी माता असल्यामुळें हा माझा सहोदर बंधु आहे. दुसरें हा तुला माझ्या पतीपासून झालेला असल्यामुळें मला पुत्रासारखा आहे. तिसरें माझा पतीही तुझाच पुत्र असल्यामुळें त्याचा हा धाकटा बंधु होय. अर्थात् माझा दीर होतो. चौथें शास्त्रदृष्टचा विचार करितां दिराला पतीप्रमाणें मानून पतीच्या अभावीं त्याच्यापासून कुल-स्त्रियांनींही पुत्रोत्पत्ति करून घ्यावी असें आहे. शिवाय मी तुझी कन्या असल्यामुळें माझ्या पतीची तूं सासू आहेस. तुझ्या शरीरापासून माझी उत्पत्ति असल्यामुळें तुझें माझें अंग एकत्र होय, अर्थात तुझ्या संबंधानें हा माझा पति झाला. पांचवें असें, हा माझ्या भावाचा मुलगा असल्यामुळें माझा भाचा आहे. सहावें मी तुझी मुलगी व याचा पिता तो तुझा पति असल्या-मुळें माझाही तो पिता आहे. त्याचा हा धाकटा भाऊ असल्यामुळें हा माझा चुलता होतो. सातवे असें कीं, मी व तूं दोघी एकाच्या पत्न्या आहों, व हा माझा सहोदर बंधु आहे, त्याअर्थी तुझाही आहे. अर्थात् मी तुझी कन्या असल्यामुळें हा माझा मामा झाला. आठवे नातें कसें तें आतां पहा. आपण दोघी सवती आहों, आपला पति तो तुझा पुत्र आहे. अर्थात् तुझ्या संबंधानें तो माझाही पुत्र झाला. त्याचा हा पुत्र म्हणून माझा नातू होय. या सर्व पापाला तूं कारण आहेस ' हें भाषण ऐकून वेश्या खिन्न झाली व मुलगा कडेवर घेऊन घरांत गेली.

अशी कथा सांगून योगिनी जनकाला म्हणाली, ' राजा, अशी हीं संसाराची स्थिति आहे. यांत कुलधर्म आणि वर्णसंकर किती शोधावयाचा ? याची चिकित्सा न करणें चांगलें. याविषयीं एक ब्राह्मणाची गोष्ट सांगतें, ती ऐक.

## चिकित्सक ब्राह्मणाची कथा

एक ब्राह्मण मोठा चिकित्सक होता. तो नेहमीं गुरुला नाना प्रकारचे प्रश्न विचारून कंटाळा आणीत असे. अशा प्रकारें भलभलते संशय काढून प्रश्न विचारण्याचा दुर्गुण टाकून देण्याविषयीं गुरूनें त्याला अनेक प्रकारें सांगितलें; परंतु तें सर्व व्यर्थ गेलें. एके दिवशीं या ब्राह्मणानें तुरी खाल्ल्या असतां एक टरफल त्याच्या दातांस अडकलें. तें नखानें त्यानें काढून पाहिलें, तों त्याला त्यांत उष्टें आढळलें. म्हणून मनांत शंका घेऊन तो तोंड धुण्याकरितां नदीवर गेला. तेथें चूळ भरतांना त्याच्या तोंडांत शीत गेलें, तें त्यानें थुंकले, तों ते शीत आहे, असें आढळलें ! तेव्हां त्याला खंति उत्पन्न झाली; व आपल्या चिकित्सक स्वभावाला अनुसरून, तो ब्राह्मण ते शीत कोठून आलें असावें, हें पहाण्यासाठीं नदीच्या उलट दिशेनें चालला. थोड्या वेळानें त्याला एका रजकाची स्त्री वस्त्रांना खळ देत असलेली त्याच्या दृष्टीस पडली. तिला पाहतांच तें शीत तिच्या खळीचें असावे असें कळून येतांच. तो फारच कष्टी झाला. पुढें भुकेनें व्याकुळ झाल्यामुळें तो जवळच्या गावांत शिरला, तेथे एका ब्राह्मणाच्या घरीं तो गेला असतां, यजमान घरीं नसून त्याची स्त्री मात्र तेथें असलेली त्याला दिसली. तिनें त्याचा सत्कार करून त्याला भोजन दिलें; आणि भोजनानंतर मुखशुद्धि करण्यासाठीं एक संबंध सुपारी दिली. ती सुपारी फार कडक असल्यामुळें त्याला फुटेना, म्हणून त्यानें 'ती सुपारी कोठली आहे,' म्हणून विचारलें. तिनें उत्तर दिलें, 'अहो ! आम्ही गरीब ब्राह्मण असून, आम्हाला सात मुलें झालीं. त्या सर्वांना ही सुपारी खेळणें म्हणून चघळली आहे. याशिवाय पति व पुत्रांचें भोजन झाल्यावर अजूनही ही आम्ही चघळीत असतों. अशा रीतीनें अनेक वर्षें ही सुपारी आमच्याजवळ आहे. आम्ही गरीब, परंतु आमचें थोर भाग्य म्हणून आमच्याकडून आज तुमचें अतिथ्य झाले. हें ऐकून, ब्राह्मणाला तर ओकारीच आली. तेव्हां ती आणखी म्हणाली,–' महाराज, दारिद्र्य कोणाला नसावें. आज मीं जे तुम्हाला भोजन दिलें, तेही दैवयोगाने प्राप्त झालें, सकाळीं एक कुत्रा कोठूनसा कणकेचा गोळा घेऊन जात होता, त्याला अडवून ती कणीक मी काढून घेतली, पुढें आमच्या जवळ भाकर भाजायास भांडेही नाहीं. एक फुटकी लांकडाची काथवट मात्र आहे. ती

चामड्याच्या दोरांनीं बांधून त्यांत भाकर तयार केली, आणि स्मशानांतील लांकडें आणून त्यांवर ती भाजून, महाराज, आपल्याला भोजन दिले. सर्व जन्मांत आमच्या हातून एवढेंच काय तें पुण्यकर्म घडलें. अशीं आम्हीं हतभागी आहोंत.'–यांचा हा संवाद चालला आहे, तो तिचा पति स्मशानांतील उरलेलें अन्न घेऊन घरी आला, व खेळावयास गेलेलीं मुलेंही परत येऊन सर्वांनीं भोजन केलें. या ब्राह्मणाला हा सर्व प्रकार पाहून, जी किळस आली ती किती वर्णावी ? तो दुखानें विव्हल होऊन म्हणाला,—' जळो माझा संसार ? यांत दुःखाशिवाय दुसरें कांहींच नाहीं. मला गुरुनें निवारिलें असतांही मी ऐकिलें नाहीं, हा माझा केवढा मूर्खपणा !' असें म्हणून तो गुरुकडे परत आला, व त्यानें त्याला सर्व हकीकत सांगितली. ती ऐकून गुरु म्हणाला,—' आतां ठीक झालें. तुझा सर्व संशय फिटला. यापुढें तरी वेड्यासारखे प्रश्न विचारूं नकोस.' हें गुरूचें वचन ऐकून तो ब्राह्मण सर्वसंग परित्याग करून योगी बनला.

ही गोष्ट सांगून सुलभा जनकाला म्हणाली,–' राजा, जो जो विचार अधिक करावा तो तो तुझ्या विदेहीपणाचें मला आश्चर्य वाटतें. बरें, शमदमादि साधनांनीं स्थूलदेहाचें निरसन करितां येईल, परंतु लिंगदेह सुटावयास काय उपाय? त्याचप्रमाणें कारणदेह आणि महाकारणदेह यांचें निरसन कसें होतें ? यास्तव तुझें विदेहत्व मला अप्रमाण वाटतें. अरे, चारी देहांचें निरसन करणारा असा विदेही श्रीकृष्णच होय याची लीला मोठमोठ्यांना कळली नाहीं. योगिनीचें निरूपण ऐकून जनक व त्याची सभा अगदीं तटस्थ झाली. मग योगिनी अदृश्य होऊन, श्रीकृष्णाच्या शरीरांत मिळून गेली. हें पाहून जनकही मनांत समजला आणि सर्व अभिमान टाकून श्रीकृष्णाच्या चरणीं लागला, व म्हणाला,—' देवा, तुझी थोरवी कोणाला समजणार आहे ? तूंच सर्वांचें तारण करणारा आहेस.' मग कृष्णानें त्याला ब्रह्मज्ञानाचा उपदेश केला, त्यामुळें तो निःसंदेह होऊन त्याला परमात्म भाव कळून आला आणि त्या श्रीकृष्णाची मनोभावानें स्तुती केली. याप्रमाणें जनकावर अनुग्रह करून कृष्ण द्वारकेस निघून गेला अशी ही पद्मपुराणांत कथा आहे.

# अध्याय १९ वा



## शुकोत्पत्तीची कथा

वैशंपायन म्हणाले,—' राजा, मागील अध्यायांत सांगितलेली कथा ऐकून धर्मानें भीष्माला विचारिलें कीं,-व्यासाचा पुत्र शुक हा लहानपणापासूनच योगीश्वर कसा झाला, व त्याची माता कोण ? इत्यादि हकीकत मला सांगा.'-तेव्हां भीष्म म्हणाला,—' पूर्वी मेरुपर्वताच्या शिखरावर वेदव्यासानें शंभर वर्षे वायु भक्षण करून उग्र तप केलें, तेव्हां शंकर प्रसन्न होऊन इच्छित वर माग, म्हणून त्याला म्हणाले. आपल्याला उत्तम पुत्र व्हावा, अशी इच्छा असल्यामुळें त्यानें तसा वर मागितला. शंकरानें ' ठीक आहे ' म्हणून सांगितलें. कांहीं दिवसांनीं व्यास गृह्याग्नि तयार करण्यासाठीं अरणीचें घर्षण करीत असतां, धृताची नांवाची अप्सरा त्यांच्या दृष्टीस पडली तिचें लावण्य पाहून तो काममोहित झाला. त्याबरोबर अप्सरा शुकीचें रूप घेऊन जवळ आली. व्यासाची कामबुद्धि, तिला ओळखल्यावर अधिक प्रज्वलित झाला. परंतु ती आवरून तो अरणिमंथन करीत असतां, श्रमानें त्याचें वीर्य स्खलन पावलें. ते त्यानें अरणींत सांठविलें. तों त्यांत अग्निप्रमाणें देदीप्यमान पुत्राचा जन्म झाला. त्याचें नांव त्यानें शुक असे ठेविलें. तो जन्मल्याबरोबर भागीरथीनें येऊन त्याला स्नान घातलें, आणि दंड व कृष्णाजिन ही त्याच्यापुढें आपोआप येऊन पडलीं. शुक जन्मला, पाहून देवानांही आनंद झाला व ते दुंदुभि वाजवूं लागले. चारी वेद त्याच्यापुढें येऊन उभे राहिले. मग ब्रह्मदेवानें येऊन शुकाचें मौजीबंधन केले व शंकरानें त्याला वेद-शास्त्राचा उपदेश केला. याप्रमाणें त्याचे वेदव्रत पूर्ण झालें, तरी त्याच्या मनाला आश्रमांत राहून स्वस्थता वाटेना. तेव्हां आपला पिता जो व्यास त्याला त्यानें मोक्षधर्माचा उपदेश करावयास सांगितलें. तें ऐकून व्यासानें त्याला कपिलोक्त सांख्य-शास्त्र इत्यादि शास्त्रांचें पूर्णपणें निरूपण केले. तेव्हां शुकाचें मन मोक्षधर्मात स्थिर झालें. नंतर व्यासानें त्याला जनकाकडे जाऊन भेटावयास सांगितलें, तो म्हणाला,

–' शुका तेथें गेल्यावर त्याच्यापाशीं कोणताही अभिमान न धरितां त्याच्या स्वाधीन होऊन तुला राहिलें पाहिजे.'–पित्याच्या आज्ञेप्रमाणें शुक तेथून त्वरित निघाला व अनेक नद्या व पर्वत ओलांडित व वाटेंत तीर्थें करीत जनकाच्या नगरींत आला. तेथें आल्यावर राजद्वाराशीं द्वारपालानें अडविलें; म्हणून तो द्वाराशींच उभा राहिला. मध्यान्हीच्या सुमारास प्रधानांनीं त्याला तेथें पाहून त्याची अर्घ्यादिपूजा करून त्याला अन्न–दान दिले. नंतर ती रात्र तेथील पहारेकऱ्याजवळ त्यानें काढिली, व दुसऱ्या दिवशीं स्नान–संध्या उरकून पुनः तो तेथेच बसला. पहारेकरी, हा कोण असावा, म्हणून आपल्याशींच तर्क करीत, आणि त्याच्याकडे टकमक पहात होते. दुसऱ्या दिवशीं जनकाला त्याची हकीकत समजली, तेव्हां त्यानें त्याला आंत नेऊन रत्नासनावर बसविलें, व आपण कोणत्या हेतूनें इकडे आगमन केले, असा त्याला प्रश्न केला. शुकानें उत्तर दिलें,–' मीं आपला पिता जो व्यास, त्याला मोक्ष–धर्म विचारला असतां, त्यानें मला आपल्याकडे पाठविलें आहे. तरी आतां मला एवढी ज्ञान–भिक्षा द्यावी.' हें ऐकून जनक म्हणाला,–' ऋषे तुझ्या ठिकाणीं मोक्ष–धर्म मूर्तिमंत वास करीत आहे, तरी पण कांहीं एक विशेष तुला सांगतों.' असें म्हणून राजानें त्याला विशिष्ट मोक्ष–धर्माचा उपदेश केला. तो ऐकून शुक संतुष्ट झाला, व हिमालयावर योगाभ्यासासाठीं निघून गेला. त्या हिमालयाच्या पूर्वेकडील एका शिखरावर, व्यास आपल्या सुमंतु, जैमिनी, वैशंपायन आणि पैल, या चार प्रमुख शिष्यांसह वेदाध्ययन करीत होता. तेथें शुकानें जाऊन पित्याला नमस्कार केला, आणि जनकानें निरूपण केलेला मोक्ष–धर्म त्याला सांगितला. तो ऐकून व्यासाचे चारी शिष्य म्हणाले, ' गुरो, शुकदेवालाही आमच्या बरोबर राहून घ्या. जसे आम्ही तसाच हा होवो. आमच्या पांचासारखा कोणी न व्हावा.' तेव्हां व्यासानें त्यांना सांगितलें कीं, ' तुम्ही आतां ज्या लोकांना कर्माची आवड आणि ब्रह्मलोकप्राप्तीची इच्छा असेल त्यांच्यामध्यें वेदाचा प्रचार करा. मात्र कृतघ्न, नष्ट आणि अशुद्ध लोकांना ते सांगू नका.' या आज्ञेप्रमाणें ते शिष्य भरतखंडांत उतरले आणि त्यांनीं तेथे अनेक शिष्य केले.

इकडे व्यास शुकासह आश्रमांत राहत असतां, एक दिवस नारद अकस्मात् तेथें आला, आणि व्यासाला म्हणाला,–' अहो ! येथें पूर्वी ब्रह्म-

घोष चालत असे, असें असून आतां अगदीं शून्य कां ?' हें ऐकून व्यासानें शुकासह वेदघोष सुरू केला; पण इतक्यांत वायूचा अद्‌भूत शब्द होऊं लागल्यामुळें त्यानें शुकाला वेदघोष बंद करण्यास सांगितलें. तेव्हां या अनध्यायाचें (अभ्यास थांबविण्याचें) कारण काय ? म्हणून शुकानें विचारलें. तेव्हां व्यासानें उत्तर केलें, 'साध्य नामक एक देवगण आहे, त्यापासून समान वायु उत्पन्न झाला, समानापासून उदान, त्यापासून व्यान, व्यानापासून अपान आणि अपानापासून प्राण, असे वायु उत्पन्न झाले. या शेवटच्या प्राणवायूच्या योगानें मनुष्याला श्वासोच्छ्वास करितां येतो. या श्वासाला 'प्रवह,' असेही म्हणतात. दुसरा विद्युल्लतेच्या प्रदेशीं असतो, तो 'आहव' होय. हा चंद्रादि नक्षत्रगणाला आकाशांत उदयास आणितो. तिसरा समुद्राचें जल मेघमंडलांत घेऊन जाणारा तो 'उद्वह' वायु होय. ज्याच्या योगाने आकाशांत विमानें तरतात, तो 'संवह' नामक चवथा वायु. जो वेगानें पर्वतावरील वृक्ष मोडून पाडतो, तो पांचवा वायु 'निवह' नांवाचा आहे. सहावा जो 'परिवह' वायु तो आकाश-गंगेला अडवून सूर्यालाही थांबवितो. आणि चंद्रकलांचें प्राशन करितो. सातवा वायु 'परा-वह' हा अंतःकाली जीवाचा प्राण ओढून घेतो. हा वायु वहात असतां, वेदाध्ययन कधीं करूं नये, असे शुकाला सांगून व्यास गंगेवर गेला व शुकही स्तब्ध बसला. इतक्यांत नारद तेथें येऊन त्याला म्हणाला,-'तुला आनंद व सुख होईल असें कांहीं सांगतों. पूर्वी एकदां ऋषींना तत्त्व जाणण्याची उत्कट इच्छा उत्पन्न झाली. तेव्हां सनतकुमारानें त्यांना सांगितलें कीं, 'विद्येसारखा निर्मल नेत्र नाहीं, सत्यासारखें तप नाहीं, आसक्तीसारखें दुःख नाहीं आणि त्यागासारखें सुख नाहीं.' अशा प्रकारें अनेक कथा नारदानें सांगितल्यावर शुकानें तप करून जीवन्मुक्त पदवी मिळविली.

## शुकोत्पत्तीची दुसरी कथा

वैशंपायन जनमेजयाला म्हणाले, 'राजा, शुकोत्पत्तीची दुसरी एक कथा पुराणांतरी आली आहे ती आतां सांगतों, ऐक. एकदां व्यासानें यज्ञ सुरू केला. त्यासाठीं मोठमोठें अनेक ऋषी जमले होते. मार्कंडेय, पुलस्ती, विभांडक, शृंगऋषी, शतानीक, कौण्डिन्य, वसिष्ट, उद्दालक, दुर्वास, कश्यप,

असे ऋषि मिळून त्यांनीं व्यासाच्या हातांत यज्ञ-कंकण बांधिलें. परंतु व्यास ब्रह्मचारी असल्यामुळें, दधीची ऋषि म्हणाले कीं, पत्नीशिवाय दिलेली आहुति अग्नि स्वीकारणार नाहीं; म्हणून हा यज्ञाचा शास्त्रोक्त मार्ग नव्हे.' दधीची ऋषीनें याप्रमाणें सांगितलें असतां, वसिष्ठानेंही त्याच्या म्हणण्याला अनुमोदन दिलें. दुर्वासही तसेंच म्हणूं लागला. तेव्हा भूर्णपिच्छ ऋषि त्यांना म्हणाला, 'मीं व्यासाला आपली कन्या देतो म्हणजे झालें. तें सर्वांना पसंत पडलें, व व्यासाचा भूर्णपिच्छाच्या कन्येशीं विवाह केला. अशा सपत्नीक व्यासाच्या हातून अग्नींत आहुति पडणार, असें पाहून सर्वांना मोठा आनंद झाला. विवाह झाल्यावर दुर्वासांच्या सूचनेवरून सर्वजण वरात घेऊन यज्ञमंडपांत आले. नंतर व्यासाच्या-लग्न-कंकणावर पुनः यज्ञ-कंकण ऋषींनीं बांधिलें, व व्यासानें स्त्रीसहित यज्ञाची दीक्षा घेतली. दूर्वासाला त्यानें अध्वर्यु केले, ब्रह्मदेवाला ब्रह्मा केलें, आणि इतर यथायोग्य ऋत्विज नेमून त्यांनीं सात वर्षें यज्ञ करून सर्व देवांना संतोषित केलें. त्या वेळीं नारायण लक्ष्मीसह तेथें येऊन व्यासाला वरदान मागावयास सांगूं लागला. तेव्हां व्यासानें म्हटलें कीं, जो कोणी यज्ञ करील त्याला तूं प्रसन्न व्हावें, असें म्हणून त्यानें स्वतःसाठीं पुत्र मागितला. आणि उत्तम ऋषीनें माझ्या उदरीं जन्म घ्यावें, अशी त्यानें इच्छा प्रगट केली; परंतु त्याला कोणीही ऋषि कबूल होईना. तेव्हां शुक्र पुढें होऊन व्यासाचा पुत्र होण्यास तयार झाला. हें पाहून नारायण शुक्रावर प्रसन्न होऊन त्यालाही वर मागावयास सांगू लागलें. तेव्हां शुक्रानें त्याच्यापासून संजीविनी विद्या मागून घेतली, व तो म्हणाला 'मी बारा वर्षें उदरांत राहून मग व्यासाचें अपुत्रपण फेडीन आणि नंतर स्वस्थानी जाईन.' नारायणानें 'तथास्तु' म्हटलें व सर्वजण आनंदित होऊन स्वस्थानीं गेले.

---

## अध्याय २० वा.



## शुकोत्पत्तीची दुसरी कथा-पुढें चालू.

वैशंपायन म्हणाले,-' राजा, व्यासाचा यज्ञ परिपूर्ण झाल्यावर थोड्याच वेळानें व्यासपत्नी सुलजा गरोदर राहिली. पुढें तिला नवमास पूर्ण

झाले, तरी ती प्रसूत होईना. तेव्हां तिला काळजी उत्पन्न झाली. दहा, बारा महिने होऊन गेले, अडीच वर्षे निघून गेलीं, तरीही प्रसूति होईना. असें चाललें आसतां एकदां सात दिवस सारखा पर्जन्य पडून व्यासाला फार कष्ट झालें. तेव्हां त्यानें शिवलिंग पाडुन मनोभावानें पूजा केली. त्याच्या योगानें शिव प्रसन्न होऊन त्याला वर मागावयास सांगू लागला. कित्येक पुराणांत व्यासाला श्रीकृष्ण प्रसन्न झाला असें वर्णन आहे. मग श्रीकृष्ण गर्भस्थ शुकाला म्हणाला, 'अरे शुका तूं उदरांत काय म्हणून राहिला. संसाराला भितोस कीं काय ? माझ्या मागें सोळा सहस्त्र स्त्रिया आणि साठ लक्ष मुलें इत्यादि परिवार असूनही मी कंटाळलो नाहीं' तेव्हा शुकानें पोटातून उत्तर दिलें, 'कृष्णा, मला माझ्या स्थानीं जावयाचें आहे. म्हणून मी बाहेर येत नाहीं. येथून झालेलें तुझें दर्शन मला पुरें आहे.' यावर कृष्ण म्हणाला, 'शुका, पंच-इंद्रियाच्या-आशा आणि मोह-ही सोडून काम क्रोधांना आपल्या स्वाधीन करावें व अशा रीतीनें अहंकार व प्रपंच यांचा संहार करून मोक्षपद मिळ-वावें.' हा उपदेश ऐकून व कृष्णाच्या सांगण्यावरून शुक बाहेर यावयास तयार झाला. परंतु बारा वर्षेपर्यंत मातेच्या उदरांत राहिल्यामुळें, त्याला नग्नावस्थेंत बाहेर यावयाची लाज वाटली, व म्हणून त्यानें कृष्णापाशीं स्वयंभू कासोटा मागितला. त्याप्रमाणें कृष्णानें तो त्याला दिल्यावर शुक बालरूपानें हात जोडून जन्मास आला; परंतु तो स्वभावतःच पूर्ण वैराग्यशील असल्या-मुळें मागें न पहातां पुढें चालूं लागला. तेव्हां व्यास त्याच्या मागोमाग जाऊन त्याला एकदां तरी मागें वळून पहाण्याविषयीं विनवूं लागला. व्यास म्हणाला;—'बाळा, अरे माता-पितरांचा त्याग करून वनांत जाणें हा श्रेष्ठपणा नव्हे. हा उपदेश तुला कोणी दिला, ? तूं आपल्याला सुपुत्र म्हण-वीत असून, माझी आज्ञा मानीत नाहींस, हें युक्त नव्हे.' परंतु व्यासाच्या या विनवणीकडे लक्ष न देतां शुक तसाच पुढें चालूं लागला व सिद्धसरो-वरापाशीं आला. तेथें एका स्वयंभू गुंफेत त्यानें आसन घातलें; आणि सर्वांगीं भस्म चर्चून आणि सूर्यनारायण व पृथ्वी यांना वंदन करून, त्यानें समाधि लाविली.

याप्रमाणें व्यासाची निराशा झाल्यावर तो हें वर्तमान सांगण्यासाठीं सत्यलोकीं ब्रह्मदेवाकडे गेला. तेथे सावित्रीसह ब्रह्मदेवाला नमस्कार करून तो मोठ्या कळवळ्यानें शुकाला तपश्चर्येपासून निवृत्त करण्याविषयीं त्याची

विनवणी करूं लागला. तेव्हां ब्रह्मदेव त्याला घेऊन क्षीरसागरीं विष्णुकडे व विष्णूहि कैलासावर येऊन शंकराला भेटले. तेव्हां तिनही देवांनीं विचार करून इंद्राला बोलाविलें आणि शुकाकडे रंभेला पाठविण्याविषयीं त्याला आज्ञा केली. मग केवल लावण्याची खाणच अशा रंभेला इंद्रानें बोलावून शुकाचा तपोभंग करण्याविषयीं तिला आज्ञा केली. आज्ञेप्रमाणें रंभा उत्कृष्ट शृंगार करून शुकाकडे जावयास निघाली. त्यावेळीं तिच्या मुखाची शोभा पाहून चंद्राचासुद्धां अभिमान नाहीसा झाला. ऐन तारुण्याचा बहर आणून त्याच्या भरांत ती आपल्या मधुर स्वरानें कर्ण-मधूर आलाप घेत व पायां-तील नुपुरांचा रुणझुण ध्वनि करीत, हंसासारख्या मंदगतीनें रमत रमत पावलें टाकीत शुकाजवळ आली. तिचा त्यावेळचा थाट पाहून सर्व देवांना वाटले, ही आतां शुकाला खास तपोभ्रष्ट करील. वाटेंत, तिचे सौंदर्य पाहून हजारों वर्षें समाधि लावून बसलेल्या ऋषींचीही त्रेधा उडाली, आणि कित्येक तर तप सोडून तिच्या मागून धावूं लागले व तिची प्रार्थना करूं लागलें. परंतु शुकदेव मात्र ध्यानस्थ होता:तसाच होता. त्याच्यांत केंसभरही फरक झाला नाहीं. त्याचें शरीर केवल प्रेतवत् होऊन तो ब्रह्मचिंतनांत मग्न झाला होता. त्याला पाहून रंभा म्हणाली,—' याचा प्राण जर कुडींत परत येईल, तरच कांहीं उपाय चालेल.'–असें म्हणून ती त्याच्या अगदीं जवळ आली. त्या वेळीं वसंतानें बहार केल्यामुळें त्या तपोवनांत केळी, नारळी, केतकी, फणस-दवणा, मोगरा, शेवंती, बोरी, द्राक्षें इत्यादि फलवृक्ष, पुष्पवृक्ष, व लता यांची समृद्धि होऊन गेली व त्या तपोबलाचें रमणमय उपवन बनलें. अशा थाटांत रभा शुकाच्या जवळ जाऊन त्याला चेतना आणण्यासाठीं मधुर स्वरानें मंजुळ गीत गाऊं लागली. त्या गायनानें शुकाला चैतन्य येऊन तो बोलूं लागला. तो म्हणाला, ' हे माये, तुझ्या मनांत काय आहें ?' तिनें उत्तर दिलें, ' हे सुंदर पुरुषा, तुझें अनुपम रूप पाहून माझें मन चंचल झालें आहे. मी स्वर्गीची अप्सरा असून सहज या वनांत आले होते. तो तुझे हे कष्ट पाहून मला खेद वाटला, व मनांत विचार आला की, याला आपल्या घरीं न्यावे व सुखी करावें. तरी तूं माझ्या बरोबर चल. मी तुला उत्तम वस्त्र लेववीन, तुझ्यां अंगाला सुवासिक अत्तरें चर्चीन, तुला सुखशय्येवर निजवून तुझी सेवा करीन. तूं तपश्चर्येचें कष्ट सोडून गृहस्थाश्रमी हो.'

शुक–' हे स्त्रिये तुला काय सांगू ? परंतु ज्या हेतूनें तूं येथवर आलीस तो तुझा हेतू तडीस जाणें शक्य नाहीं. स्त्री–पुरुष भोगाला तूं वाखाणत असशील; परंतु जन्मजन्मांतरी तो भोगून मी कंटाळलों, व त्याचा त्याग करून येथें बसलों आहे. तुला उत्तम वस्त्रें लेववीन असें तूं म्हणत असशील, तर मला त्यांची सुद्धां मुळींच जरूर नाहीं. मी तर हें स्वयंभू कौपीन नेसलों आहे. जीवनकलेच्या सुखशय्येवर मी आनंदोपभोग घेत आहे. तुझें संसारसुख मला नको.'

रंभा–' महाराज, महातपश्चर्या करून जे राज्यादि भोग भोगावयाचे, ते अनायासानेंच जर मिळाले, तर वाईट काय झालें ?'

शुक–' राज्य करून तरी उत्तम पद प्राप्त करून घ्यावयास सुकृताचें आचरण करून दानधर्म केलाच पाहिजे. पहा बरे, भर्तृहरि राजकुलांतच उत्पन्न झाला होताना, पण तो तरी राज्यसुखांत स्थिर झाला होता काय ? द्रव्यादि भोग हे भांडणाचें व दुःखाचें मूल आहे. या मायाजाळांत सांपड-ल्यास मोक्षपद फार दूर रहातें. गृहस्थाश्रमानें धर्माचा नाश होऊन शेवटीं मृत्युवश व्हावें लागतें. नारदाकडे पहा. त्यानें मदनाचा त्याग केल्यामुळें तो त्रिभुवनाला वंद्य असा योगी झाला आहे. मदनाच्या भीतीनेंच स्त्रीचें रूप पहाण्याचें षडाननानें वर्ज्य केलें. रंभे, तूं विषयसुखाला वाखाणतेस, परंतु यानें तूं मोक्षाला अंतरत आहेस ?'

रंभा–' महाराज, असें कसे होईल ? मोठमोठे ऋषि तरी स्त्रिशिवाय राहिले आहेत काय ? पहा अनसूयेच्या पोटीं देवांना जन्म घ्यावा लागला. श्रियाळचांगुणांना प्रत्यक्ष शंकराचें दर्शन झालें. असा गृहस्थाश्रमाचा महिमा आहे. यानेंच ईश्वरप्राप्ति होऊन संसाराची येरझार चुकते.'

शुक–' तुझें म्हणणें खरे आहे; पण सहस्रार्जुन व वाली हे स्त्रीच्या योगानेंच प्राणास मुकले, भस्मासुर व कीचक यांच्या नाशास स्त्रियाच कारणीभूत झाल्या ना ?'

रंभा–' अहो ! स्त्रियांची व्यर्थ निंदा कां करितां ? पति गतप्राण झाला असतां अग्निप्रवेश करून त्या प्राणत्याग करितात. रावणाची सून सुलोचना, जालंधराची पत्नी वृंदा, तशीच सुदाम्याची स्त्री, यांनी पतीबरो-बर सहगमन केले, हें तुम्हांला माहीत असेलच. अहो ! माझें लावण्य तरी पहा. मजकडे पाहून त्रिभुवनालाही मोह पडतो. तुम्हीच एवढें शहाणपण

घेऊन कोठले बसला ? तुम्हाला पारख नाहीं असे दिसते ! धनगराला रत्न द्यावें, किंवा एकाद्या भिकाऱ्याला चंदन सांपडून त्यानें तें सर्पण म्हणून बाजारांत विकावें, अथवा एकाद्या वेड्याला हिरा मिळून त्यानें त्याला सैंधव म्हणावें, तशी तुमची अवस्था दिसत आहे. तुम्ही एवढें तप केलें, त्याचें फल देण्याकरितां मी स्वर्गीची अप्सरा तुम्हांकडे आले. माझा स्वीकार करून संसारांत धन्यता संपादावयाची. ती सोडून उलट मलाच ब्रह्मज्ञानाच्या गोष्टी सांगतां याला काय म्हणावें !'

शुक–' रंभे, तूं सुज्ञ तर आहेसच; पण एक गोष्ट ऐक. हें नवद्वार-युक्त शरीर दुर्गंधीनें युक्त असून केवळ अलंकारानें मात्र याला थोडेंसें रूप आणिलेलें असतें. या अस्थिमांसाच्या व मलमूत्राच्या गोळ्याचा कंटाळा कसा येणार नाहीं ? तूंच सांग बरें तूं ज्या मुखानें ह्या विषयांची स्तुति करीत आहेस, तेंच तुझें मुख तर लाळ व पित्त यांनीं भरलेलें आहे !'

हें ऐकून आतां पुढें काय बोलावें, असा रंभेला विचार पडला. परंतु थोडा वेळ विचार करून ती मनांत म्हणाली,—' असला अपमान सहन करुन जिवंत रहाण्यापेक्षां देहविदारण करणें बरें '–असें म्हणून नखांनीं तिनें आपलें पोट फाडलें. तों आंत दुर्गंधयुक्त असा कोणताच पदार्थ नसून कर्पूर, कस्तूरी, इत्यादि परिमल द्रव्यें मात्र होतीं. हा चमत्कार पाहून शुक म्हणाला,—' हे सुंदरि ! मी आपल्या मातेच्या उदरांत मलमूत्रांचा दुर्गंध सहन करीत बारा वर्षें राहिलों, त्यामुळें मला फार कष्ट झालें. तुझ्या उदरासारखें पवित्र मला माहीत असतें तर त्यांतच मीं जन्म घेतला असता. ईश्वरानें मला तुझ्याच उदरांत कां बरें ठाव दिला नाहीं ? हे शुकाचें शब्द ऐकून रंभेचें सर्व धैर्य खचलें. ती मनांत म्हणाली,—' आतां याच्याशीं फार आग्रह केल्यास हा कोपून माझें भस्म करून टाकील. मग व्यास व देव सर्व एकीकडे राहतील, मीं मात्र शापाची धनीण होईन.' असा विचार करून व शुकाला नमस्कार करून ती झटकन उठली, व विमानांत बसून परत इंद्राकडे आली, आणि त्याला म्हणाली,–'महाराज,मी नाना उपाय केले व कापुराची रासही प्रत्यक्ष झाले; परंतु तो योगी कांहीं आपल्या निश्चयापासून ढळला नाहीं, ' हें ऐकून इंद्रासहित सर्व देवांनीं शुकाची स्तुति करून त्याच्यावर पुष्पवृष्टि केली. अशा प्रकारें शुकानें मद-

नाला पायांखालीं घालून थोर कीर्ति मिळविली, अशी भविष्योत्तर पुराणांत कथा आहे.

## शुक्र एकनयन कसा झाला

बली, वामनाला त्रिपाद भूमि दान देत असतां शुक्र झारीच्या तोंडाशीं बसून उदक खालीं पडूं देईना, उदक पडेना म्हणून वामनानें झारींत दर्भाची काडी घातली, त्यामुळें शुक्राचा एक डोळा फुटला, अशी कथा ब्रह्मपुराणांत आहे. परंतु याविषयीं दुसरीही एक कथा आहे. ती अशी :—

एकदां सावित्रीसह ब्रह्मदेव एकांतांत क्रीडा करीत असतांना शुक्र त्यांचें दर्शन घेण्यासाठीं तेथें गेला. आपला काम संपूर्ण न झाल्यामुळें सावित्रीला क्रोध आला व तिनें शुक्राला अंध व बहिरा हो, असा शाप दिला त्याबरोबर शुक्र अंध व बहिरा झाला. तेव्हां दुःखित होऊन करुणस्वरानें तो विष्णूची प्रार्थना करूं लागला. त्याचा धांवा ऐकून विष्णु तेथें आला व शुक्राला घेऊन शंकराकडे गेला, त्यानें त्याला सर्व हकीकत सांगितली. तेव्हां शंकर म्हणाला–'हा शाप ब्रह्मदेवाचा असता तर मीं मोडला असता, परंतु सावित्रीचे शब्द अन्यथा होणार नाहींत.' तेव्हां ते सर्वजण पुनः ब्रह्मलोकीं येऊन शुक्राला शापमुक्त करण्याविषयीं सावित्रीची प्रार्थना करूं लागले, तेव्हां सावित्री म्हणाली, माझें भाषण कधीं खोटें व्हावयाचें नाही. तथापि हा एकाक्ष व एककर्ण मात्र होईल, हें ऐकून शुक्रानें डोळे उघडले तों आपण एकनेत्र व एककर्ण आहों, असें त्याला आढळून आलें. तेव्हांपासून शुक्राला एकनयन असें नांव प्राप्त झालें.

---

# अध्याय २१ वा

## नारायणऋषि व नारद यांचा संवाद

शुक्रकथा ऐकिल्यावर धर्मानें भीष्माला प्रश्न केला कीं ब्रह्मचर्यादि चारी आश्रमांतील पुरुषांना आपआपल्या आश्रमांत राहून सिद्धि मिळेल

असा उपाय कोणता आहे बरें ?' तेव्हां भीम म्हणाला,-'धर्मा, याविषयीं नारायणऋषि आणि नारद यांच्यांत झालेला संवाद सांगतो, तो ऐक. पूर्वी सनातनधर्माची स्त्री जी दशकन्या ती प्रसूत होऊन तिला चार पुत्र झाले. नर, नारायण, हरि आणि श्रीकृष्ण, अशा तिच्या त्या चार पुत्रांपैकीं, नारायण आणि नर हे मोठे तपस्वी निघाले व ते बदरिकाश्रमांत जाऊन राहिले. एके दिवशीं नारद त्यांना भेटण्यासाठीं म्हणून त्यांच्याकडे गेला असतां मध्याऱ्हाच्या सुमारास त्याना देव, पितर त्या आश्रमांत दृष्टीस पडले, नरनारायणांची ही अपूर्व निष्ठा पाहून नारदाला आश्चर्य वाटलें, आणि तो म्हणाला-'नारायणा, वेदपुराणांत सर्व तुला आदिदेव म्हणत असून तूं कोणत्या पितराची पूजा करितोस ? हें मला कांहीं समजत नाहीं.' तेव्हां नारायण म्हणाले, 'नारदा, इंद्रियें व त्यांचे विषय यांच्या पलीकडचा त्रिगुणरहित असा जो पुरुष नामक अंतरात्मा त्यांच्यापासून अव्यक्त असें महत्तत्व उत्पन्न झालें, तो परमात्मा सर्वांचें मूल कारण असून त्याचीच आम्ही देव पितृ-भावानें पूजा करीत असतों, ब्रह्मदेवादि प्रजापति देखील त्याच्याच पूजनानें इष्टगति पावत आहेत.' हें ऐकून नारदाला आनंद होऊन तो म्हणाला 'अहो ! मी सर्व वेदांचें अध्ययन व मोठी तपश्चर्या केली. त्याच्या पुण्यामुळेंच आज तुमचे दर्शन मला झालें आता तुम्ही आज्ञा द्याल, तर तुमचें तें परमात्मस्वरूप मूलस्वरूप पाहण्यासाठीं त्वरित जाण्याचें मी करीन,' मग नारायणानें आज्ञा दिल्यावर नारद मेरुच्या शिखरावर जाऊन तेथे ध्यानस्त बसला. तेव्हां त्या पर्वताच्या वायव्यभागी क्षीरसागराच्या उत्तरेस त्याला एक श्वेतदीप दिसून आले.त्यात एक श्वेतवर्ण निर्विकल्प आणि निश्चल व पाप्यांना अदृश्य, असा पुरुष त्याच्या दृष्टीस पडला, त्याचा देह दिव्य असून त्याला साठ दंत आणि साठ दाढी आणि साठ जिव्हा होत्या.' एवढें ऐकून धर्मानें मध्येंच विचारलें कीं, हा अतिंद्रिय असून पुरुष रूप कसा झाला बरे! तेव्हां भीष्म म्हणाले, 'धर्मा,उपरिचर नांवाचा एक महापुण्यवान् राजा होऊन गेला तो मोठा धार्मिक आणि नारायणाचा मोठा भक्त होता. इंद्र त्याला आपल्या बरोबरीचा समजून आपल्या आसनावर बसवीत असे. तो राज्य करीत असतां असत्य कधींही बोलला नाहीं. बृहस्पतीपाशीं त्यानें संपुर्ण नीतीशास्त्राचें अध्ययन केलें होते. एकदां त्यानें सोळा ऋत्विज् जमवून अश्वमेधास सुरुवात केली, मुख्य आचार्य बृहस्पतीला करून त्यात एकत, द्विज आणि त्रित यांना वादस्य केलें होतें या यज्ञामध्यें पशुघात मुळींच झाला नाहीं, या यज्ञाचा भाग

ग्रहण करण्यासाठीं यज्ञभोक्ते देव प्रत्यक्ष यज्ञमंडपांत आले. नंतर प्रत्येकानें आपला भाग विधीप्रमाणें घेतला; परंतु विष्णूनें मात्र आपला भाग गुप्त-रूपानें घेतला, त्यामुळें बृहस्पतीला राग येऊन त्याने विष्णूवर हवन करावयाचा लांकडी पळा उगारिला, तेव्हां उपरिचरानें त्याची प्रार्थना करून त्याला आवरिलें. त्या वेळीं एकत, द्वित आणि त्रित म्हणाले,—अहो, आम्हांला मोक्षाची इच्छा उत्पन्न झाल्यामुळें, आम्ही मेरुवर जाऊन तेथें एका पायावर उभे राहून चार सहस्त्र वर्षेपर्यंत नारायणाची भेट व्हावी म्हणून उग्र तपश्चर्या केली. तेव्हां तपश्चर्येच्या अंतीं आकाशवाणी झाली कीं,—' हे ऋषि हो, तुम्हीं थोर तप केलेत तरी आतां क्षीरसागराच्या उत्तरेस श्वेतद्वीप आहे, तेथें अतींद्रिय असा सुगंधि पुरुष आहे, तो माझा आत्मा आहे. त्याचें दर्शन तुम्हीं घ्या ' ही वाणी ऐकून आम्हीं सद्भावानें तेथें गेलो व तो सुगंधि पुरुष सूर्याप्रमाणें तेजस्वी असलेला असा आमच्या दृष्टीस पडला. सर्व देव हात जोडून त्याच्या पुढे उभे होते. नंतर आम्ही विचार केला की, या पुरुषाची आम्ही पुजा केल्यास आम्हांला अनंताचे प्रत्यक्ष दर्शन कां बरें होणार नाहीं ? असा विचार आमच्या मनांत येत आहे, तोच आकाशवाणी झाली कीं,—' ज्या पुरुषाला तुम्हीं येथें पाहिलें तो देवच होय, तरी आतां तुम्हीं आपल्या आश्रमांत परत जा; व अशीच अनंताची भक्ति करीत रहा म्हणजे वैवस्वत मन्वंतरांत त्रेतायुगांत तुम्हांला अनंताचें दर्शन होईल.' नंतर आम्हीं परत आलों व आजवर एवढें कष्ट करीत आहों, तरी त्याचें दर्शन होत नाही. तरी हे बृहस्पते, तू त्या विष्णुला पहाण्याची इच्छा कशाला करतोस ? हें ऐकून बृहस्पति उगाच राहिला. पुढें उपरिचराचा यज्ञ समाप्त झाला; परंतु कालांतरानें त्याला पाताळांत जावे लागले तेथेहि त्यानें नारायणाचें स्मरण न सोडल्यामुळें, त्या पुण्याने तो पुनः उत्तम गति पावला.

## उपरिचर पाताळांत कां पडला ?

भीष्म धर्माला म्हणाला,—' पूर्वी एकदां ऋषि आणि देव दोघे मिळून यज्ञ करूं लागले; त्यावेळीं ऋषि म्हणाले,—औषधी जमवून यज्ञ करावा, पशुघात करूं नये. परंतु अज मिळवून यज्ञ करावा, असें देवांचें मत

असल्यामुळें दोघांत कलह उत्पन्न झाला. तेव्हां उपरिचर राजा विमानांत बसून होता, त्याला दोघांत मध्यस्थी करावयास सांगितले, मग उपरिचरानें दोघांचेंही म्हणणें ऐकून घेऊन देवांना अनुकूल असा निर्णय केला. तेव्हां ऋषींनीं रागावून त्याला 'तुझी पुन: विमानांतून गति व्हावयाची नाहीं, तूं पाताळांत पड,' असा शाप दिला. शाप ऐकून देवांना खेद उत्पन्न झाला व आपल्यासाठीं राजाला व्यर्थ यातना होणार, म्हणून त्यांनीं उपाय सांगितला कीं,–' राजा, पाताळांतहि तूं ईश्वर भजन टाकूं नकोस, म्हणजे आपोआपच तुला शेवटीं मोक्षपद प्राप्त होईल. भूमीवर याज्ञिक जेव्हां यज्ञ करतील, तेव्हां त्यांतील हविर्भाग तुला मिळून तुझ्या क्षुधा–तृषांचें निवारण होईल.' असें सांगून देव आपापल्या स्थानीं निघून गेले, आणि शापवाणीनें उपरिचर लगेच पाताळांत पडला. परंतु त्यानें ईश्वर भजन न सोडल्यामुळें, पुढें गरुडानें त्याला वैकुंठीं नेलें. असो, आतां मूळकथा पुढे सांगतों. नारदानें श्वेतद्वीपांत गेल्यावर तेथें त्या सुगंधयुक्त पुरुषाची स्तुति केली. तेव्हां तो परमेश्वर स्वरूपी पुरूष नारदावर प्रसन्न होऊन त्याला म्हणाला,–' नारदा, एकत, द्वित आणि त्रित हे ऋषिहि महत्तप करून माझें दर्शन घेऊं शकले नाहींत; परंतु तूं माझा एकांत भक्त असल्यामुळें आज माझ्या दर्शनाचा लाभ तुला झाला आहे. असो. आतां पुढें कांहीं कालानें धर्माच्या घरीं चौघे पुत्र माझ्या स्वरूपांशापासूत जन्माला येतील; त्यांची तूं आराधना कर.'–असे असें बोलून त्या दिव्य पुरुषानें नारदाला सृष्टि रचनेचें रहस्य आणि वराह, वामन, इत्यादि अवतारांच्या कथा सांगितल्या, व तो गुप्त झाला.

मग नारद नर–नारायणांना भेटण्यासाठीं पुन: बदरिकाश्रमास आला, तेथें एकमेकांच्या सुखगोष्टी झाल्यावर नारायण नारदास म्हणाला, 'नारदा श्वेतद्वीपांत परमेश्वराचें तुला जे दर्शन झाले, ते नाना तपेकरूव देवादिकांनांही होत नाहीं, खरोखर तूं महाभाग्यवान् आहेस.' याप्रमाणें गोष्टी करीत नारद त्या आश्रमांत एक लक्षवर्षें राहिला. तेथें असतांना एकदां त्याला शंका येऊन तो ऋषींना म्हणाला;—' पितरांना पिंड हें नांव कां मिळालें ?' तेव्हां नरनारायण म्हणाले,' पूर्वीं दैत्यांच्या भारामुळें पृथ्वी रसातळास जात असतां, भगवानानें वराहरूप धरून तिला दंतांनीं वर काढिली, व योग्य ठिकाणीं तिची पुन: स्थापना केली. त्या वेळीं त्याच्या दंतांना जो चिखल लागला, त्याचें त्यानें तीन पिंड केलें व आपल्या शरीराच्या उष्णते-

पासून तीळ उत्पन्न करून त्यांवर ते ठेविले. तेच पितर होत. त्यांची नांवें वसु, रुद्र आणि आदित्य, अशीं आहेत.

## हयग्रीवाची दुसरी कथा

मग नरनारायण नारदाला दुसरी कथा सांगू लागले ते म्हणाले,–पूर्वी महाप्रलय झाल्यावर सर्व भूतांचा क्षय झाला असतां कांहीं कालानें परमेश्वराला सृष्टी उत्पन्न करण्याची पुनः इच्छा होऊन त्यानें महत्तत्त्वादि सर्व प्रपंच निर्माण केला. मग त्याच्या नाभिकमलापासून ब्रह्मदेव उत्पन्न होऊन, त्यानें मानसपुत्र निर्माण करून, सर्व सृष्टिरचना केली. तेव्हां पाण्यांत काळा व तांबडा असे दोन बिन्दु उत्पन्न होऊन त्याचे मधु आणि कैटभ नांवाचे दैत्य बनले. हे दैत्य विष्णूच्या कर्णांतून निघाले. असेंही पुराणांतरीं सांगितलें आहे; परंतु भारतात तसें नाहीं. हे दैत्य उपजतांच गदा उगारून ब्रह्मदेवाच्या पाठीस लागले. तेव्हां तो पळूं लागला असतां त्याच्या मुखांतून चारी वेद पडले. ते दैत्यांनी चोरून नेऊन पृथ्वीच्या तळीं ठेविले. त्यामुळें ब्रह्मदेवाला अंधासारखें होऊन, धर्म, अधर्म कांहीच समजेनासे झालें. मग त्यानें दुःखित होऊन विष्णूचें स्मरण केलें व दैत्यानी वेद हरण केल्याचें सांगितलें. तें ऐकून विष्णूनें हयग्रीवरूप धरून महाशब्द केला. तो ऐकल्याबरोबर मधु व कैटभ वेदांना पाताळांत ठेवून वर धांवत आले. तेव्हां विष्णूनें पाताळांत जाऊन वेद परत आणिले; आणि ते क्षीरसागराच्या उत्तरभागीं ठेवून, आपण आपलें पूर्व–रूप धारण केले. इकडे दैत्य पुनः पाताळांत जाऊन पहातात तो वेद तेथें नाहींत, तेव्हां त्यांना मोठा क्रोध येऊन ते क्षीरसागरीं गेले व विष्णू निद्रित होता, त्याला उठवून त्याच्याशीं ते लढूं लागले. मग विष्णूनें त्यांशीं युद्ध करून त्यांचा वध केला. ब्रह्मदेवाला त्यायोगें संतोष होऊन त्यानें ब्रह्मांडाची रचना केली. ही कथा प्रथम स्तबकांत संक्षेपानें आलीच आहे. असो; याप्रमाणें विष्णूनें वेदांचा उद्धार केल्यावर ब्राह्मण वेदमार्गानें चालून निग्रहानुग्रही व समर्थ झाले.

## निग्रहाचें लक्षण

हें सर्व विश्व परमेश्वरानें अग्नीषोमरूप निर्माण केलें. अग्नि हा

ब्राह्मण आणि सोम म्हणजे क्षत्रिय होय. हे परस्परांचे आश्रय आहेत. याविषयीं एक प्राचीन इतिहास आहे. त्वष्टयाचा पुत्र विश्वरूप हा दैत्यांचा भाचा असून इंद्राचा विद्यादाता गुरु होता. तो यज्ञांत देवांना प्रत्यक्ष भाग देई; परंतु दैत्यांना मात्र देत नसे. ते म्हणून दैत्य आपल्या बहिणीस म्हणाले, 'अगे, तूं आपल्या पुत्राला सांगून आम्हांला यज्ञभाग देवीव, म्हणजे आम्हां दैत्यांची वृद्धी होईल' हें ऐकून ती नंदनवनांत विश्वरूपाला भेटली, व त्याची कानउघडणी करून ती म्हणाली, 'अरे, तूं आपल्या मामांचा क्षय करितोस हें निंद्य होय.' मातेचे शब्द ऐकून विश्वरूप मातृवंशाची वृद्धि व्हावी म्हणून तप करूं लागला. हें वर्तमान इंद्राला कळलें तेव्हां त्याच्या तपाला विघ्न करण्यासाठीं इंद्रानें अप्सरा पाठविल्या. विश्वरूप त्यांना पाहून मोहित झाला. त्या अप्सरा जेव्हां तेथून निघाल्या; तेव्हां त्यांना हाका मारून विश्वरूप वर मागावयास सांगूं लागला. त्यांनीं उत्तर दिले की, आम्हांला इंद्रावांचून दुसरा कोणताच वर इष्ट नाहीं. हें उत्तर ऐकून विश्वरूपाला संताप आला आणि इंद्राच्या बलाचा क्षय करण्यासाठीं तो जप करूं लागला. त्या वेदमंत्राच्या जपाच्या प्रभावानें तो तीन शिरांचा-त्रिशिरस-होऊन यज्ञांतील सोमाचे हविर्भाव आपणच घेऊं लागला. त्यामुळें इंद्रादि देव क्षीण होऊन ब्रह्मदेवास शरण गेले. ब्रह्मदेवानें त्यांना सांगितलें कीं, पृथ्वीवर दधीचि ऋषि तपश्चर्या करीत आहे, त्याच्या अस्थींचें वज्र केले असतां तुमचा कार्यभाग होईल. त्याप्रमाणें त्यानीं दधीची ऋषीजवळून त्याची अस्थि मागून घेतली, व त्याचें वज्र करून इंद्रानें त्रिशिराचा वध केला. मग दैत्यांनीं त्याच्या प्रेताचे मंथन करून त्यापासून वृत्रासुराला निर्माण केले. त्यालाही इद्रानें वज्रप्रहार करून ठार केलें. परंतु या ब्रह्महत्त्येच्या भीतीनें इंद्र पळून जाऊन मानससरोवरांत कमलाच्या तंतूत लपून बसला. तेव्हां त्रैलोक्य धर्मभ्रष्ट होऊं लागलें म्हणून देवांनीं नहूष राजाची कांहीं कालपर्यंत इंद्रपदावर योजना केली. मग पुनः जगाचीं व्यवस्था सुरळीत चालू लागली. असे चालले असतां एकदा नहुषाच्या मनांत आलें कीं, आपण इंद्राचें सर्व भोग भोगिले; परंतु इंद्राणीचा मात्र भोग प्राप्त झाला नाही. असा विचार करून त्यानें इंद्राणीला आपला मनोरथ कळविला. तेव्हां तिला दुःख होऊन ती बृहस्पतीला शरण गेली व त्याला नहुषापासून मुक्त होण्याचा उपाय विचारूं लागली. बृहस्पतीनें तिला उपश्रुति नामक देवतेची

आराधना करावयास सांगितलें. इंद्राणीनें त्याप्रमाणें केलें असतां उपश्रुति प्रसन्न होऊन तिनें इंद्राणीला वर मागावयास सांगितलें. तिनें इंद्राची भेट व्हावी असा वर मागितला. तेव्हां देवतेनें कमल-तंतूंत वसलेला इंद्र तिला दाखवून दिला. दोघांची भेट झाल्यावर इंद्राणीची ती कृश स्थिति पाहून इंद्रानें असें होण्याचें कारण तिला विचारलें. तिने नहुषाचा सर्व वृत्तांत त्याला सांगितल्यावर इंद्र म्हणाला, ' तूं काळजी करूं नको. नहुषाला तूं असें सांग कीं, इंद्र ज्या वाहनावर कधीं बसला नाहीं, अशा वाहनावरून तूं मजकडे ये. म्हणजे मीं तुझी इच्छा पूर्ण करीन.' त्याप्रमाणें इंद्राणीनें नहुषाला सांगितले. तेव्हां नहुषानें ऋषींच्या खांद्यावर पालखी ठेवून तीतून तो इंद्राणीकडे जावयास निघाला: वाटेंत त्वरेनें जाण्यासाठीं तो त्या ऋषींना लाथा मारू लागला, तेव्हां वसिष्ठानीं त्याला तात्काळ शाप दिला कीं, ' तूं सर्प होऊन बहूत काल पृथ्वीवर रहाशील,' त्याप्रमाणें तो सर्प होवून पडल्यावर देवांनी पुनः इंद्राची स्वर्गाच्या राज्यावर स्थापना केली. असें ब्राह्मणाच्या अनुष्ठानाचें फल आहे. म्हणून क्षत्रियानी त्याचे पालन करावे, आणि ब्राह्मणांनी क्षत्रियाचें अभिष्ट चिंतावे. अशी ही कथा नारायणानें नारदास सांगितली

---

# अध्याय २२ वा.



## उत्तम मोक्ष धर्माचे निरूपण

धर्म भीष्माला प्रश्न करितो,-आजोबा, मी आतां आपण सांगितलेलें अनेक मोक्षधर्म ऐकिले; तरी त्यांत उत्तम कोणता, तें सांगा, 'तेव्हां भीष्म म्हणालें-'-धर्मा, याविषयीं मीं तुला प्राचीन कथा सांगतो तीं ऐक. एके दिवशी इंद्र सभेत बसलां असतां नारद तेथे आला. त्याची पुजा करून त्याला आसनावर बसून इंद्रानें विचारले कीं, 'मुने आपण संपूर्ण त्रैलोक्यांत फिरत असतां तरी कोठे विषेश आश्चर्याची गोष्ट आपल्या दृष्टींस पडली असल्यास मला ती सांगावी. ' हें ऐकून नारद म्हणाले,-देवेंद्रा, गंगेच्या उत्तर-तीरावर सौम्यभारी नांवाचा एक कुलीन वेदज्ञाता ब्राह्मण जितेंद्रिय होऊन वैदिक

कर्माचें अनुष्ठान करीत संतोषानें रहातो. एके दिवशी आपले नित्य कर्म समाप्त करून तो बसला असतां एक नम्र स्वभावाचा विद्वान व ज्ञानी ब्राह्मण अतिथीरूपानें त्याजकडे आला. आणि थोडा वेळ विश्रांति घेऊन सौभ्यभारीला म्हणाला,-'तुमचे उत्तम वर्तन पाहून मला फार संतोष झाला, मला आतां संसार-भोगांची मुळींच इच्छा राहिलेली नसल्यामुळे पुत्रांच्या स्वाधीन घरदार करुन जन्माचे सार्थक करावे असें वाटत आहे. तरीं कोणता मार्ग धरावा, एवढे कृपा करुन सांगा. संसार समुद्रातून पार कसें पाडावे, याची मोठी चिंता मला लागली आहें. अनेक जन्ममरणाच्या यातना भोगून मी कष्टी झालो आहे. तरी धर्मतत्वाचा मार्ग मला लावून द्या. हे ऐकून सौम्य-भारी त्याला म्हणाला,-' हे ब्राह्मणा तूं जो अपूर्व प्रश्न मला विचारलास, त्यासंबंधानें मलाही असाच मोठा संशय असून, माझेही मन जगातील कोण-त्याहीं वस्तुवर ठरत नाही. आपली शंका मी आजपर्यंत अनेकांनी अनेक मार्ग मला सुचविले, कोणी म्हणाला-यज्ञ करावे, कोणी योग, ध्यान, धारणा इत्यादि करावे असे म्हणालें. कोणी राजधर्मानें अनुष्ठान करावे असे सांगितले तर कोणी सौख्यादि शास्त्राचा अभ्यास करून गुरूची शुश्रुषा करावी असे सुचविले. कोणीं म्हणालें, वनाचा आश्रय करावा! कोणी सांगितलें, संन्यास घ्यावा, कोणी सुचविलें कीं कृच्छ, चांद्रायणादि व्रतें करावी; तर कोणी म्हणालें, मातापितराचीं भक्तीं करावी. कोणी भूतमात्रावर दया करावयास सांगू लागलें, तर इंद्रीयनिग्रह करून वेदाभ्यास करावा, असें काहींचे मत पडलें. हे पाहून मला त्रास झाला. तथापि तूं उपदेशाला योग्य आहेस यास्तव तुला थोडेसे गुह्य सांगतो. माझ्या गुरुनें मला ते सांगितलें आहे. तेथून पुर्वेकडे कांही अंतरावर गोतमी नदीच्या काठी नाग नांवाची नगरी आहे. तेथे पुर्व-काली देव यज्ञ करीत असत, त्या नामनगरीत पद्मनाभ नावाचा एक मोठा उपकारशील ब्राम्हण रहात असतो, केवल दर्शनानें तो सर्व संकटांचा परिहार करणारा असून मोठा दयाळू आणि शुद्ध आचाराचा आहे. तुझ्या मनात जी शंका आली आहे, तिचे तो समाधान करील, त्याच्यासारखा विद्वान कोठे मिळाव-याचा नाहीं. हे ऐकून तो अतिथी ब्राह्मण दुसऱ्या दिवशीं नागनगरीस निघाला, अनेक प्रदेश ओलांडींत तो त्या नगरीत आला, व मध्यान्हीच्या-सुमारास पद्मनागाच्या घरी पोचला. त्याला पाहतांच पद्मनागाची स्त्री पुजा घेऊन बाहेर आली, आणि अतिथीचे स्वागत करुन त्याला-'कोणत्या

कार्यास्तव आला' असें विचारूं लागली. अतिथीनें उत्तर दिलें, 'अशी आदराशील स्त्री ज्याची आहे, त्या पुण्यवान ब्राह्मणाचे दर्शन घेण्यासाठीं उत्कंठीत होऊन मी येथे आलो आहे. 'ब्राम्हण स्त्री म्हणाली,-'महाराज, माझे पति सूर्याचा रथ वहावयासाठीं सूर्यलोकी गेलें आहेत. ते परत येईपर्यंत तुम्ही येथे रहा.' ब्राम्हणानें उत्तर केलें, 'मला केवळ त्याचेच दर्शन पाहिजे आहे, म्हणून मी तो येईपर्यंत गोमतीच्या काठी जाऊन रहातों, तुझा पति आला म्हणजे मला सांगून पाठव, म्हणजे झालें. 'असें तिला सांगून तो ब्राह्मण गोमतीगिरी जाऊन राहिला.आणि संध्यास्नान करून निराहारवृत्तीनें काल लोटूं लागला, तेव्हां पद्मनागाच्या आप्तमंडळींनी घरी येऊन रहाण्याविषयी त्याची पुष्कळ विनंतीं केली, व त्याला सांगितलें कीं, आमच्या घरी आलेला अतिथी उपाशी असतां आम्हीं भोजन करीत नाहो, तरी आमच्यावर कृपा करण्यासाठीं म्हणून आपण घरी येऊन भोजन करावे,म्हणजे आमच्या वृद्ध व बालकांना त्रास होणार नाहीं. तें ऐकतांच ब्राह्मणानें त्यांस जेवावयाची आज्ञा दिली, व घरी जावयास सांगितलें. थोड्याच दिवसांत पद्मनाग सूर्याचें काम आटोपून घरीं आला. त्याच्या स्त्रीनें नेहमींप्रमाणें स्वागत केल्यावर, त्यानें तिला कुशल प्रश्न विचारले,-आणि म्हटलें,-' देव व अतिथि यांची पूजा करण्यात आळस झाला नाहींना ?' स्त्रीने उत्तर केलें.-' प्राणनाथा, पतिव्रतांना पतींचे वाक्य मान्य असलेंच पाहिजे. आपल्या सांगण्याप्रमाणें मी चालत होतें, परंतु एक ब्राह्मण आपली चौकशीं करीत आला. पण कोणत्या कामासाठीं आलों,- हें न सांगतां तो गोमतीच्या तीरीं उपवास करून वेदपठण करीत बसला आहे. तुमच्या दर्शनाविषयीं तो फार उत्सुक झाला आहे हें ऐकून पद्मनाग म्हणाला,- ' हा माझ्या दर्शनासाठीं आला आहे, तरी तो देव आहे कीं मनुष्यच आहे, हें कांहीं कळत नाहीं. तो देव असेल तर आपणच पुनः येथें येईल. त्याजकडे जाण्याचें काहीं कारण नाहीं;' परंतु त्याची स्त्री म्हणाली, महाराज तो जितेंद्रिय असून आपल्या दर्शनासाठीं त्याला मोठी उत्कंठा लागलेलीं दिसली. तरी आपण तेथें जाऊन त्याच आदर करून येथें आणावें. जो ब्राह्मण आपल्याकडे कांहीं आशेनें येतो.त्याचे समाधान न केल्यास गर्भहत्येचें पाप लागत असतें. आपण त्याची इच्छा पूर्ण करावी.' स्त्रीचें भाषण ऐकून पद्मनाग तसाच गोमतीवर गेला व त्या ब्राह्-

णाला नमस्कार करून त्यानें येथें येण्याचें कारण त्याला विचारिलें. ब्राह्मण म्हणाला, 'मी धर्मारण्य नांवाचा ब्राह्मण असून पद्मनागाची भेट घेण्यासाठीं येथवर आलों आहे.' व ज्याप्रमाणें शेतकरी पर्जन्याची वाट पाहत असतो, त्याप्रमाणें मी त्याची वाट पहातो.' तेव्हां पद्मनाग म्हणाला, ब्राह्मण मीच तो पद्मनाग तुझ्या दारा आहे. काय आज्ञा आहे ती सांग. मी आतां सूर्यलोकांहून आल्यावर स्त्रीनें तुझी हकीकत मला सांगितली, तेव्हां तुझी इच्छा पुरविण्यासाठीं मी तुजकडे आलों आहे. तुझी इच्छा पूर्ण झाल्यास मी माझें मोठें भाग्य समजेन.' तें ऐकून धर्मारण्य म्हणाला,' पद्मनागा, मी कांहीं द्रव्याच्या आशेने तुजकडे आलेंला नाहीं. दोन उपदेशाचे शब्द ऐकावे म्हणून आलों आहे. तूं आत्मनिष्ठ व धर्मपारायण असल्यामुळें, मला कांहीं अंतस्थ खुणेची गोष्ट विचारावयाची आहे. आतां तूं म्हणतोस कीं, सूर्यलोकाहून आलो म्हणून तर तेथें पाहिलेलें कांहीं आश्चर्य असल्यास प्रथम मला सांग.'

## उच्छवृत्ति निरूपण

पद्मनाग म्हणाला,–' सूर्याची मूर्तीच मुळीं आश्चर्यमय आहे. तो जलाची वृष्टि करितो, सर्व रसांचें शोषण करितो व अंधःकाराचा नाश ब्रह्मा, विष्णु, महेश या तिन्ही देवांचें स्थान त्याच्यावर असून तेथें सर्वच आश्चर्य आहे. परंतु एक विशेष आश्चर्य तुला सांगतों. सूर्यलोकावर असतां मध्यान्हीच्या सुमारास सर्व ब्रह्माण्ड तप्त झालें आहे अशा वेळीं एक दिवस आम्हीं एक विमान पाहिले. त्याचा प्रकाश दैदीप्यमान असून त्याच्यायोगानें आकाशांत दुसरा सूर्यच आला कीं काय, असें आम्हाला वाटलें. दुसरा सूर्य तर आम्हीं कधींच ऐकिला नव्हता. तेव्हां हें काय आश्चर्य असावें, असा विचार आम्हीं करित होतों, तो ते विमान अगदीं सुर्याजवळ आलें. सूर्यानें आपल्या उत्तम हातानें त्यांतील पुरुषाला आपल्या रथावर घेतांच तो सूर्यरूपांत मिळून गेला परंतु जेव्हां तो प्रथम सूर्याजवळ येऊन बसला, तेव्हां खरा सूर्य कोणता, हे ओळखण्याची आम्हाला मोठीच पंचाईत पडली. पण मग पुढें ते दोन्ही एकत्र झाल्यावर शंका निरसन करण्यासाठीं, तो कोण होता? म्हणून मी विचारलें. त्यानें सांगितलें, 'अरे, हा उच्छवृत्ति ब्राह्मण, वेळेला वायु, प्राण किंवा अन्न जसें मिळेल तसें भक्षण करून दारुण तप करीत होता. त्याला वासना किंवा इच्छा कसलीच नव्हती. देव व गंधर्वही त्याचा परा-

भव करण्यास समर्थ नव्हतें. असा हा अपूर्वयोगी, शांत स्वभाव व उच्छवृत्ति यांच्या योगानें ही योग्यता पावला.'

असा हा सूर्यलोकांचा चमत्कार ऐकून धर्मारण्य पद्मनागाला करून म्हणाला,—' पद्म नाग तूं देवरूपी आहेस. माझ्या मनांतील गोष्ट जाणून तिचेंच आश्चर्यरूपानें उत्तर दिलेंस. आतां, मीं कृतार्थ झालों. ज्या निमित्तानें मी येथें आलों, तें सफल झालें. आतां मला जाण्याची आज्ञा द्यावी. मी ही आतां उच्छवृत्तीचा स्वीकार करून तप करीन. असें म्हणून तो घरी गेला, व उच्छवृत्तीचा अंगिकार करून त्यानें मोक्षप्राप्ति करून घेतली.

भीष्म धर्माला सांगतात,— ' धर्मा, ही उच्छवृत्तीचीं हकीकत भार्गवानें प्रथम नारदास सांगितली. ती नारदानें इंद्राला सभेंत सांगितली. माझे व परशुरामाचें जेव्हां युद्ध झालें, तेव्हां वसूंनीं ती आम्हांला सांगितली. वैशंपायन जनमेजयाला सांगतात,—' राजा याप्रमाणें सेनजित् गीतेपासून तो उच्छवृत्तिकथेपर्यंत या मोक्षधर्माच्या कथा धर्माला भीष्मानें सांगितल्या, त्या मी तुला संक्षेपानें सांगितल्या आहेत.

---

# अध्याय २३ वा



## शोक दूर करण्याचा उपाय

वैशंपायन जनमेजयाला म्हणाले,—' राजा, शांतिपर्वांतील कथा ऐकिल्यावर धर्मानें भीष्माला पुनः प्रश्न केला, कीं, ' आजोबा, तुम्हीं येथवर मला उत्तम प्रकारचा उपदेश केलात; परंतु माझा संतोष झाला नाहीं. कारण तुम्हीं आमचे आजोबा असून तुमची जी ही घायाळ अवस्था झाली आहे, ती पाहून मला फार लाज वाटते, व मन अस्वस्थ होतें. केवळ आमच्यासाठींच एवढा हा अनर्थ व गोत्रघाताचा घात झाला. आम्हीं युद्धांत किती जणांचा वध केला असेल कोण जाणें ! अशा आम्हां दुष्टांना ईश्वरानें निर्माण तरी कशाला केले ! आतां आमचें जीवित कसें होईल हें कांहीं समजत नाहीं. ' याप्रमाणें धर्माचें उद्वेगाचें भाषण ऐकून भीष्म म्हणाला,—

'धर्मा, तूं व्यर्थ दुःख कां करितोस ? अरे, कौरव मृत्यु पावले त्यांना तुम्हीं मारिलें असें तूं समजतोस कीं काय ? पण तसे नव्हे. ते आपल्या कर्मानेंच ही दशा पावले. याविषयी तुझी समजूत पटण्याकरितां यम, गौतमी, काल, पारधि आणि सर्प यांचा संवाद सांगतों; तो ऐक.'

## गौतमी नामक ब्राह्मणीची कथा

गौतमी नांवाची एक ब्राह्मण स्त्री होती. तिच्या एकुलत्या एका मुलाला वनांत सर्पदंश होऊन तो मरण पावला. हें अर्जुन नामक एका व्याधानें पाहिलें. तेव्हां त्यानें सर्पाला फांस घालून गौतमीकडे आणिलें, आणि तो तिला म्हणाला;–'यानें तुझ्या बाळाला मारिलें, तरी मीं याला मारूं कीं जाळूं तें सांग ? हा मोठा पापी आहे.' हें ऐकून त्या स्त्रीनें उत्तर दिलें,–'अरे, या सर्पाला सोडून दे. माझ्या पुत्राच्या मरणाचा दोष त्याच्याकडे नाहीं. आपल्या कर्मामुळें तो मृत्यु पावला आहे. साप त्याला निमित्तमात्र झाला.' त्यावर व्याध म्हणाला,–'स्त्रिये, तुला एवढें वैराग्य कोठून आलें ? या दुष्ट सर्पाला सोडून दिल्यास पाप मात्र वाढेल.' ब्राह्मणीनें उत्तर दिलें,–'व्याधा, सर्पाला मारिल्यानें जर माझा बाळ उठत असेल तर त्याला मार, नाहीं तर काय उपयोग ?' हे गौतमीचे शब्द ऐकून, पाशबद्ध सर्प मनुष्यवाणीनें बोलूं लागला. तो म्हणाला, 'अरे व्याधा, तूं अज्ञानपणें मला व्यर्थ मारावयास निघाला आहेस. मी तरी पराधीन असून मृत्युच्या आज्ञेवरूनच या कुमाराला दंश केला.' तेव्हां व्याध म्हणाला, 'असें असेल, तर मृत्यु दंडाला पात्र आहे.' इतक्यांत सर्प पुनः म्हणाला, 'अरे, यजमान उपध्यांकडून यज्ञ करवितात; परंतु त्या पुण्यानें त्या उपाध्यांना स्वर्ग मिळतो काय ? हाच दृष्टांत माझ्याविषयीं चांगला आहे.' याचें असें बोलणें चाललें आहे. तों मृत्यु मूर्त स्वरूप घेऊन तेथें आला, आणि सर्पाला म्हणाला, 'अरे, मीही तुझा खरा यजमान नव्हे. काल हा सर्वांचा स्वामी आहे. ब्रह्मादिकही त्याच्याच स्वाधीन आहेत. त्यानेंच या कुमाराला नेलें. ज्याप्रमाणें मेघ वायूबरोबर इकडून तिकडे फिरत असतात, त्याप्रमाणें कालाच्या इच्छेनुरूप लोक वागत आहेत. सर्वांचे नियम करणारा तोच आहे.' हें ऐकून व्याध रागावून सर्प व मृत्यु या दोघांनाहीं मारावयास तयार झाला. तेव्हां

मृत्यु उभा राहून त्याला म्हणाला;–'बाबारे, मी कालाच्या आज्ञेनें वागणारा असल्यामुळें दोघेही आम्हीं निरपराधी आहोंत. अन्यायानें आम्हांला व्यर्थ मारूं नकोस.' यावर व्याधानें पुन: विचारिलें असें आहे तर प्राण्यांना पिडा करण्यांत तुम्हांला मोठें सुख कां वाटतें?' मृत्यु म्हणाला;–'हाही सर्व कालाचाच खेळ आहे. लोकांचीं मनेंही त्याच्याच स्वाधीन आहेत. त्याच्या आज्ञेनेंच आम्ही या बालकाचा वध केला.' असे जो त्यांचें भाषण चाललेलें आहे, तों कालही तेथें येऊन व्याधाला म्हणाला,–'अरे, लोकाना मारण्यांत, हा सर्प, मृत्यु व मी तिघेही केवळ निमित्त मात्र आहोंत. खरें पाहिल्यास जन्ममरणाचें कारण बरें वाईट कर्मच होय. त्या कर्माला अनुसरून आमचा व्यापार चाललेला असतो. हा कुमार आपल्या कर्मानेंच मृत्यु पावला, यांत संशय नाहीं.' हा संवाद ऐकून गौतमी म्हणाली,–'काल बोलला तें अगदीं सत्य आहे. माझें कर्मच पापी असल्यामुळें माझा पुत्र मृत्यु पावला.' गौतमीचें भाषण ऐकल्यावर व्याधानें सर्पाला सोडून दिलें व तो आपल्या घरीं गेला.

## सुदर्शन राजाची कथा

अशी कथा सांगून भीष्म म्हणाला,—'धर्मा, याप्रमाणें सर्व गोष्टी कर्माधीन असल्यामुळें शोक करणें व्यर्थ आहे.' नंतर धर्मानें पुढें विचारिलें, 'आजोबा, गृहस्थाश्रमांत राहून मनुष्यास मृत्यु जिंकिता येईल असा धर्म कोणता? तो कृपा करून मला सांगावा.' ही धर्माची विनंति ऐकून भीष्म त्याला पुढील कथा सांगूं लागले, भीष्म म्हणाले,–'प्रजापतीचा पुत्र जो मनु, त्याच्या इक्ष्वाकु नामक कुमाराला शंभर पुत्र झाले, त्यांतील दहावा जो दशाश्व तो महिष्मतीचा राजा असून त्याला मदिराश्व नामक पुत्र झाला. त्याला द्युतिमान् व पुढें सुवीर असे वंशवर्धक पुत्र–पौत्र झाले. सुवीराचा पुत्र दुर्जय व दुर्जयाचा दुर्योधन नांवाचा महाधार्मिक व उदार पुत्र होता. त्यानें नीतिवर्तन पाहून प्रत्यक्ष नर्मदा नदी त्याच्याकडे आली व तिनें त्याला वरिलें. पुढें त्यांना सुदर्शना नामक सुंदर कन्या झाली. तिला अग्नीनें दुर्बल ब्राह्मणाच्या रूपानें येऊन मागणी घातली; परंतु तो दुर्बल जाणून राजानें त्याला ती दिली नाहीं; पण पुढें हा अग्नि असें समजल्यावर त्याला फार वाईट वाटलें. मग

ब्राह्मणांना बोलावून तो त्यांना म्हणाला,—'अहो, माझ्या हातून मोठा अन्याय घडला आहे, तरी तुम्हीं कांहीं उपाय करून अग्नीला परत आणा.' तेव्हां त्याच्या सांगण्यावरून ब्राह्मणांनीं अग्नीची प्रार्थना केली केली, व राजगृहीं येऊन सुदर्शनेला वरावयास त्याला सांगितलें. अग्नीला तें मान्य होऊन तो राजकन्येकडे आला. तेव्हां राजानें अग्नीनें सर्वदा आपल्या घरीं असावें असें कबूल करून घेतल्यावर त्याला कान्या दिली. अग्नीला तें मानवलें व तिजवर तो फारच आरक्त झाला. पुढें तिला विद्वान् असा सुदर्श नांवाचा पुत्र झाला. त्याला पुढें ओघवत नामक कुमार होऊन त्यानें आपली ओघवती नांवाची कन्या सुदर्शन नामक राजाला दिली. सुदर्शन पत्नीसह गृहस्थाश्रम धर्मानें कुरुक्षेत्रांत रहात असतां त्यातें मोठा पण केला. तो असा कीं,–गृहस्थाश्रमांत राहून मृत्यूला जिंकावयाचें, व त्यासाठीं अतिथीला कधींही विमुख पाठवावयाचें नाहीं. त्या स्त्रीलाही सांगितलें की, प्रसंगीं प्राण द्यावा लागला तरीही चिंता नाहीं, पण अतिथीला विमुख जाऊं देऊं नकोस. ओघावतीनें पतीचें वचन शिरसामान्य केलें. असें चालले असतां एकदां सुदर्शन इंधन आणण्यासाठीं तो अरण्यांत गेला .अशी संधि पाहून मृत्यु ब्राह्मण रूपानें अतिथी होऊन ओघावतीकडे आला. त्याची पूजा करून तिनें त्याला काय इच्छा आहे, म्हणून विचारिलें. तेंव्हां तो म्हणाला,—'मीं कामातुर आहे तरी मला भोग दे. न देशील तर तुझा व्रतभंग होईल.'–हें ऐकून ओघावती मोठ्या चिंतेत पडली. परंतु तिला पतीचें वचन आठवलें, व ती अतिथीला संतुष्ट करण्यासाठीं त्याला भोग देण्यास तयार झाली. त्या प्रमाणें संभोग घेत अतिथी आनंद मानीत आहे, इतक्यांत सुदर्शन घरीं आला. व त्यानें स्त्रीला हाक मारिली. परंतु ती दार उघडीना. सुदर्शन बाहेर उभा आहे असें पाहून तिनें आंतूनच उत्तर दिलें कीं,– स्वामी, आंत अतिथी संभोगाच्या इच्छेनें आला आहे, मी त्याला संतोष देत आहे. तरी क्षणभर माझें चित्त व्यग्र करूं नका.'–हें ऐकून सुदर्शन म्हणाला,—'धन्य आहे मी आज; माझ्या स्त्रीनें देहाचेंही अर्पण करून अतिथीला संतुष्ट केलें.' तो स्त्रीला म्हणाला,—'पतिव्रते, तूं आज गृहस्थाश्रमाची सांगता करून दोन्हीं कुलांचा उद्धार केलास.'

हा सर्व प्रकार मृत्यु दुसरें रूप घेऊन आकाशांतून पहात होता; सुदर्शनाचा व्रतभंग झाल्यास त्याला दंड करावा, म्हणून तो टपून बसला

होता; परंतु तो व्रतापासून ढळला नाहीं. तेव्हां मृत्यु ब्राह्मण-रूप टाकून मेघगर्जनेच्या आवाजानें म्हणाला,—'अरे सुदर्शना, मीं ब्राह्मण नसून मृत्यु आहे, तूं गृहस्थाश्रमांत अति धैर्य दाखवून मृत्युला जिंकिलें आहे. तुझी स्त्री तर फार थोर पतिव्रता असून तिच्या दर्शनानेंच पापी जनांचा उद्धार होईल.' असा वर देऊन मृत्यु आकाशांत अदृश्य झाला. धर्मा, नंतर अग्नीनें तेथें येऊन सुदर्शनाचा धन्यवाद गाइला व देवांनीं त्यावर पुष्पवर्षाव करून पत्नीसह त्याला बिमानांत बसवून स्वर्गीं गेलें. भीष्म म्हणाले, धर्मा, हें सुदर्शनाचें आख्यान फार पुण्यकारक आहे.

## विश्वामित्र ब्राह्मण कसा झाला

ही कथा ऐकून धर्मानें पुनः विचारिलें,—'क्षत्रियादि तीन वर्णांना ब्राह्मण्य प्राप्त होत नसून विश्वामित्र ब्राह्मण कसा झाला ?' तेव्हां भीष्म सांगू लागले,—'पूर्वी भरतवंशांत द्विमीढ नांवाचा मोठा पराक्रमी राजा झाला. त्याचा जन्हु नांवाचा पुत्र असून त्यानें गंगेला पुनः निर्माण केलें. जन्हूचा मुलगा बलकाश्व नांवाचा होता. बलकाश्वाचा बल्लव व त्याचा कुशीक. कुशीकाचा गाधि, हा निपुत्रिक असल्यामुळें त्यानें वनवास पत्करला. तेथें त्याला कन्या झाली. तिचें नांव सत्यवती ठेवून पुढें त्यानें च्यवनऋषीचा पुत्र जो ऋचीक त्याला ती दिली. मी ती देण्यापूर्वी गाधीनें ऋचीकापासून एक सहस्त्र श्यामकर्ण देण म्हणून मागितले. ऋचीकानें वरुणाला प्रसन्न करून, त्याच्यापासून श्यामकर्ण मिळविले आणि राजाला आणून दिले. नंतर त्या दोघांचा विवाह होऊन तीं सुखानें एकत्र नांदूं लागलीं. पुढें एके दिवशीं ऋचीक संतोष पावून स्त्रीला म्हणू लागला,—'तुला काय पाहिजे तो वर माग,' तेव्हां सत्यवतीनें आपल्या मातेपाशीं जाऊन तिला पतीचें म्हणणें कळविलें. मातेनें तिला दोघींनाही पुत्रप्राप्ती व्हावी, असा वर ऋचीकापाशीं मागावयास सांगितलें. सत्यवतीनें परत येऊन पतीला त्याप्रमाणें सांगितलें असतां तो म्हणाला, 'ठीक आहे, दोघींनाही पुत्र होतील' असें म्हणून त्यानें सत्यवतीला ऋतुस्नात झाल्यावर औदुंबराला भेटावयास, व तिच्या मातेला तशा स्थितींत अश्वत्थाला भेटावयास सांगितले, व दोघींना दोन चरु मंत्रून खावयास दिलें. सत्यवती ते घेऊन मातेकडे आली, तेव्हां मातेनें तिला चरूंची अदलाबदल करावयास सांगितलें. ती म्हणाली, मला फसविण्या-

साठीं त्यानें तुझा चरु मात्र मंत्रिला असेल. मातेचें बोलणें सत्यवतीला मान्य झालें, व तिनें चरु आणि वृक्ष पालटले. मग पालट केल्याप्रमाणें दोघींना गर्भ व ऋषींचा बेत फुकट गेला. तेव्हां स्त्रीला म्हणाला, तूं अज्ञानानें ब्राह्मणाचा चरु मातेला दिलास आणि मातेचा क्षत्रिय चरु तूं घेतलास. तरी आतां तुला जो पुत्र होईल तो महाक्रूर क्षत्रिय होईल, आणि तुझ्या मातेला ब्राह्मण पुत्र होईल. हें ऐकून सत्यवतीला खेद होऊन मूर्च्छा आली. मग कांहीं वेळानें सावध होऊन ती पतीची विनवणी करून म्हणाली,–' आपल्या कुलांत क्षत्रिय पुत्र होऊं नये.' ऋचीकानें उत्तर दिलें, ' अगे, मंत्रविधान तर टळावयाचें नाहीं. तरी आमच्या तपःसामर्थ्यानें या गर्भाला ब्राह्मण करूं. आतां तुझ्या पुत्राला जो पुत्र होईल तो तेजोराशि क्षत्रिय होईल, व अधर्मांना त्राहि त्राहि करून सोडील.' जनमेजया, तोच ऋचीकाचा नातू पुढें परशुराम म्हणून प्रसिद्ध झाला.

भीष्म धर्माला सांगतात,–' पुढें त्या दोघींना पुत्र झाले. सत्यवतीचा जमदग्नि आणि गाधीच्या स्त्रीला विश्वामित्र हा विश्वामित्र मूळ ब्राह्मण बीजमंत्राचा असल्यामुळें तो शेवटीं पुनः ब्राह्मण होऊन आपल्या गोत्राचा प्रवर्तक झाला. एरवीं दुसऱ्या क्षत्रियादिकांना ब्राह्मण कधींही होता येणार नाहीं' ही विश्वामित्राची कथा द्वितीय स्तबकांत आली आहे; परंतु कथानुरोधानें येथें तिचा पुनः उल्लेख करावा लागला. असो; ' धर्म कर्माच्या स्वाधीन सर्व असल्यामुळें कौरवांचा निःपात झाला, आणि सुदर्शनाला उत्तम गति मिळाली.'

---

# अध्याय २४ वा



## पुष्प, धूप व यांच्या दानाचें फल

धर्मानें प्रश्न केल्यावरून भीष्म त्याला पुष्प–धूप-दीपादि दानांचें फल सांगूं लागला. पूर्वी सुवर्ण नामक ब्राह्मणानें नारदाला हाच प्रश्न केला होता. तेव्हां नारदानें त्याला शुक्र व बली यांचा एतद्विषयींचा संवाद

सांगितला. शुक्र बलीला म्हणाला,–' लता आणि ओषधी, तसेंच अमृत आणि विष, अशीं चंद्राच्या शरीरापासून उत्पन्न झालीं. त्यांत सुमन म्हणजे पुष्प हें उत्तम मनाचें द्योतक व लक्ष्मीवर्धक असल्यामुळें, देवांना प्रिय आहे. यास्तव पवित्र व सुगंधि पुष्पें प्रेमानें देवांना वाहिल्यास पुण्य व लक्ष्मी हीं प्राप्त होतात. या पुष्पांच्या अनंत जाती असून त्या सांगता पुरणार नाहींत. आतां धूपदानाचें फल ऐक. देवांना सर्व सुगंधि द्रव्यें आवडतात. परमेश्वरास चंदनाचा गंध तर विशेष प्रिय आहे. गुरगुळ यक्षराक्षसादिकांनां प्रिय वाटतो व सल्लकी वृक्षाचा धूप तर विशेष आवडतो. असें धूपांचेही भेद अनेक आहेत. पुष्पदानाचें जें फल तेंच धूपदानाचेंही आहे. आतां दीपदानाचें फल सांगतों. जें देवालयात दीप लावतात त्यांना स्वर्गप्राप्ति होऊन ते शेवटीं सूर्यलोकीं प्रकाशमय होतात. देवापुढें दीप लावणारा नरकवासांतुन मुक्त होतो. बलिदानाचेंही फल मोठें आहे. देव, पितर, यज्ञ, राक्षस. इत्यादि दररोज अन्नासाठीं गृहस्थाच्या घरीं येत असतात. गृहस्थानें त्यांना बलि-रूपानें अन्न दिल्यास ते त्याला आशिर्वाद देतात, व न दिल्यास शाप देतात. असा बलिदानाचा थोर महिमा आहे

## कृतज्ञतेचें फल.

धर्मा काशिराजाच्या नगरांतील एक पारधि अरण्यांत जाऊन मृगाना बाण मारूं लागला. इतक्यांत त्याचा एक बाण लागून तेथील वटवृक्ष अगदीं शुष्क झाला. त्याच्या ढोलीत एकशुक पक्षीं रहात असे. वृक्ष शुष्क झाल्या-वरही तो शुक उपाशींच तेथे राहूं लागला. हें त्याचें विचित्र आचरण पाहून इंद्राला आश्चर्य वाटून, तो ब्राह्मणरूपानें वटवृक्षापाशीं आला. आणि तो शुक अगदीं शुष्क झाला असें पाहून, त्याला तूं अशा स्थितींत येथें कां राहिला आहेस म्हणून विचारूं लागला. शुकानें उत्तर दिलें, 'अरे, तूं इंद्र आहेस हें मला तपोबलानें समजले' इंद्र म्हणाला–पण, अरे शुका, तूं इतर वृक्षांची फलें कां खात नाहींस ? शुकानें उत्तर केलें–देवेंद्रा, तसें केल्यास माझ्या पदरीं कृतघ्नतेचा दोष येईल; कारण या वृक्षानें माझें लहानपणा-पासून पालन केलें आहे. वैऱ्यांपासून यानें माझें रक्षण केलें आहे, व आपल्या दाट पानांत आश्रय देऊन वांचविलें आहे. तेव्हां याचा आश्रय मी कसा सोडूं याच्या चालत्या काळांत मी त्याजवळ राहिलों असून, आतां संकटांत त्याला

सोडून जाणें हें कृतघ्नपणाने क्रूर होऊन नरकाचें साधन होणार आहे.' शुकाचा याप्रमाणें पक्का निर्धार पाहून, इंद्र त्याला प्रसन्न होऊन वर मागण्यास सांगू लागला. तेव्हां शुक म्हणाला–देवा, या वटवृक्षाला पूर्ववत् करावें ' हें ऐकून इंद्रानें अमृत शिंपून वृक्षाला सजीव केलें व लगेच तो पत्रांनीं भरून गेला. मग इंद्र शुकाला म्हणाला, - 'तुला अंतीं स्वर्गप्राप्ति होईल.' असा वर देऊन तो आपल्या स्थानीं निघून गेला. धर्मा, या कथेच्या श्रवणानें कृतघ्नादि दोषाचा परिहार होतो, अशी ही पवित्र आहे. पूर्वींच्या लोकांचे उपकार जो जन्मभर विसरत नाहीं, तोच कृतज्ञ होय.

## दैव श्रेष्ठ, कीं उद्योग श्रेष्ठ ?

मग भीष्म धर्माला–दैव आणि उद्योग यांत श्रेष्ठ कोय, या संबंधांत वसिष्ठाची कथा सांगूं लागला, वसिष्ठानें एकदां ब्रह्मदेवाला याविषयीं प्रश्न केला. तेव्हां ब्रह्मदेव म्हणाला, ' दैव व पुरुषार्थ (उद्योग) ही दोन्ही समान आहेत. ज्याप्रमाणें शेतकरी शेत चांगलें नांगरून आंत बीं पेरील तरच पीक येईल; बीज नसेल तर नुसत्या नांगरलेल्या शेताचा कांही उपयोग नाहीं, त्याप्रमाणें दैवाशिवाय प्रयत्नही निष्फल होय. परंतु शेत नांगरल्याशिवाय ज्याप्रमाणें बियांचाही फारसा उपयोग होत नाहीं, त्याप्रयाणें पुरुषानें उद्योग केल्यावांचून केवळ दैवाला कांहीं शक्य नाहीं. शिवाय दैव ज्याला म्हणतात; तें तरी पूर्वीचें शुभाशुभ कर्मच होय. आणि ते तरी उद्यागाचेंच फल. ज्याप्रमाणें गाईच्या कळपांत वासरू आपल्या आईला नेमकें शोधून काढितें, त्याप्रमाणें ज्याचे कर्म त्यालाच भोगावें लागतें.

हें ऐकून धर्मानें विचारिलें, ' भीष्मदेवा, पूज्य आणि नमस्कार करण्यास योग्य, असें कोण तें सांगा.' तेव्हां भीष्म म्हणाला, ' धर्मा, ब्राह्मण पूजा करण्यास योग्य आहेत. जगांत ब्राह्मणाच्या अंगीं सर्वांशीं देवपण आहे. वेदाध्ययन हेंच त्याचे धन आहे. तें सर्व कर्मे ब्रह्मार्पण करीत असल्यामुळें, त्यांना वंदन अवश्य करावें. आणखी जो गोब्राह्मणांचे प्रतिपालन करणारा, व वेद मार्गानें चालणारा, तोही जगांत पूज्य व वंद्य होय. ब्राह्मणांचें स्तवन करून त्याला जें कांही अल्पस्वरूप द्यावें तें अनंतपट फल देणारे होतें. ब्राह्मण वेदांचे अधिकारी असल्यामुळें, विष्णूनेंही त्यांना पूज्य मानिलें आहे.

म्हणून गोपाल ज्याप्रयाणें गाईचें सर्वदा रक्षण करितो, त्याप्रमाणें राजानें ब्राह्मणांचें पालन करावें.

## संकल्पभंगाचा परिणाम

धर्मा, आतां दान देण्याचा संकल्प करून जो देत नाहीं, त्याचें काय होतें, याविषयीं तुला कथा सांगतों. अशा पुरुषाचा त्वरित पुण्यक्षय होतो. एक कोल्हा आणि एक वानर असे पूर्वजन्मीं मित्र असून मनुष्य होते, परंतु ते या जन्मी स्मशानांत राहून नरमांस भक्षण करीत. असें चाललें असतां एकदां वानरानें कोल्ह्याला विचारिलें, ‘ अरे, तूं कोणत्या पापास्तव ह्या योनींत जन्मास आलास बरें ?’ कोल्ह्याला पूर्वजन्मीचें स्मरण होतें. तो म्हणाला, ‘ मी पूर्वजन्मीं संकल्प करूनही दान दिलें नाहीं, या कारणास्तव मनुष्याचें मांस खाण्याचा जन्म मला आला आहे.’ हें ऐकून वानर म्हणाला, ‘ मी ह्याच पापामुळे वानर झालो.’ हा या दोघांचा संवाद एका ब्राह्मणानें ऐकून मला सांगितला. मी ब्राह्मणांची भक्ति करूनच या जगांत मान्यता पावलो, त्याप्रमाणें तूंही तसेंच कर. ब्राह्मण हा अग्निरूप असल्यामुळें, याची शांति करणें अवश्य आहे.

## हीन जातीस उपदेश करण्याचा परिणाम

हीन जातीला उपदेश करणारा उपाध्याय हीन बुद्धीचा असतो. याविषयीं एक कथा आहे. हिमालयाजवळ ब्रह्माश्रम नांवाच्या आश्रमांत ब्राह्मण व तापस रहात असून, ते वेदोक्त कर्माचें आचरण करीत असत. त्यांच्याकडे एकदां एक अत्यंत नम्र असा शूद्र, अतिथीरूपाने आला. त्याचा ब्राह्मणांनीं सत्कार करून त्याला सांगितलें कीं, तूं हीन जातीचा असल्यामुळें तप न करितां ब्राह्मणांची शुश्रुषा कर, म्हणजे तुला उत्तम गति प्राप्त होईल, हें शूद्राला मानवून तो त्या पर्णकुटिकेत ऋषींची सेवा करीत राहिला. त्याचा विनय पाहून सर्व ऋषींना संतोष होई. असे चाललें असतां एक ऋषि एके दिवशीं त्या शूद्राच्या झोंपडीत आला. त्यावेळीं तो शूद्र पितृश्राद्ध करीत होता. तो दर्भ मांडावयास चुकलेला पाहून ऋषीनें त्याला तो कसा मांडाव-

याचा हें सांगितलें, व अशा रीतीनें तो त्या शूद्राचा आचार्य झाला. पुढें तो शूद्र मृत्यु पावल्यावर आपल्या पुण्येंकरून मांडलिक राजा होऊन जन्मास आला व ऋषी त्याच नगरांत जन्मून त्याचा उपाध्याय झाला. राजाला पूर्वजन्माचें स्मरण राहिल्यामुळें तो उपाध्यायावर फार प्रेम करीत असे व त्याला पाहून मनांत हंसे. उपाध्यायाला तें पाहून आश्चर्य वाटे. एकदां राजा मर्जीत आहे असे पाहून, त्यानें त्याला हंसण्याचें कारण विचारिलें. तेव्हां कारण सांगावें कीं न सांगावें, असा राजाला मोठा विचार पडला; परंतु न रागावण्याचें वचन घेऊन त्यानें उपाध्यायाला मागील जन्मीचा इतिहास सांगितला, आणि तो म्हणाला—माझ्यासाठीं तुला हा दोष पडला आहे, तरी मी द्रव्य देतो तें घे व व्रत करून पुन्हां पवित्र हो. हा राजाचा उपदेश ऐकून उपाध्याय खिन्न होऊन तीर्थयात्रेला गेला आणि मग तप करून त्यानें पुनः ब्रह्मपदप्राप्ति करून घेतली व शेवटीं तो विष्णुलोकास गेला.

## लक्ष्मीचें वास्तव्य

ही कथा ऐकून धर्मानें पुनः विचारिलें,—' आजोबा, लक्ष्मीचें वास्तव्य कोणत्या स्त्रीच्या ठायीं असतें, तें मला सांगावें. ' तेव्हां भीष्म म्हणाला,— ' धर्मा हा प्रश्न पूर्वीं रुक्मिणीनें प्रत्यक्ष लक्ष्मीला केला होता. तेव्हां लक्ष्मी म्हणाली, रुक्मिणी, जो पुरुष क्रोधरहित असून, शुद्ध आणि कृतज्ञ असतो, व इंद्रियें स्वाधीन ठेऊन धर्माचरण करतो, त्याच्या ठिकाणीं मीं वास करितें. जे घातकी, कृतघ्न व दुराचारी आहे, त्याच्याजवळ मीं कधीं रहात नाहीं. हा क्रम पहिल्या तीन युगांत असतो; परंतु कलियुगांत मात्र विपरीत प्रकार झाल्यामुळें, मला पाप्याच्या व नष्टाच्या घरीं रहावें लागतें. जी स्त्री पति-व्रता व देवपरायण असून ब्राह्मणाची पूजा करिते, तिच्या ठायीं मीं वास करितें. व जी पतीशीं प्रतिकूल असून दुष्ट भाषण करणारी व परगृहासक्त असते, तिच्याविषयीं मला कंटाळा असतो. त्याचप्रमाणें सर्व भूषणें, नक्षत्रें, नदी, सुंदर पदार्थ, गाई इत्यादि माझीं रूपें आहेत. '

## स्त्रीपुरुषांच्या संभोगांत अधिक सुख कोणाला ?

असा प्रश्न धर्मानें केला असतां, भीष्मानें भंगाश्व आणि इंद्र यांची

कथा त्याला सांगितली. 'एकदां भृंगाश्व आणि इंद्र यांच्यांत वैर वाढलें. भृंगाश्व मोठा धार्मिक परंतु निपुत्रिक होता. म्हणून त्यानें पुत्रकामेष्टि यज्ञ करून शंभर पुत्रांची प्राप्ति करून घेतली. त्यामुळें इंद्राला त्वेष येऊन, त्यानें राजाचा नाश करण्याचा निश्चय केला. एके दिवशीं तो मृगयेसाठीं वनांत गेला असतां, इंद्रानें त्याला मोह पाडून सैन्यापासून दूर नेलें, व त्यामुळें तो क्षुधेनें व तहानेनें व्याकुल होऊन उदक शोधूं लागला. इतक्यांत इंद्रानें मायेनें उत्पन्न केलेलें सरोवर त्याच्या दृष्टीस पडलें. तो त्यांत शिरला, पण स्नान करून बाहेर येतो, तों त्याला आपण स्त्रीरूप झालों आहों, असें आढळून आलें. त्यामुळें त्याला फार दुःख होऊन आतां नगरांत कसें जावें, अशा विचारांत तो पडला. परंतु विवेक धरून तो तसाच गांवात आला. त्यावेळीं त्याचें तें विरूप पाहून सर्व लोक, हा काय प्रकार आहे, म्हणून त्याला विचारूं लागले. दैव बलवत्तर आहे, असें म्हणून राजानें त्यांना सर्व हकीकत सांगितली. नंतर त्यानें आपलें राज्य पुत्रांच्या स्वाधीन केलें, आणि आपण तापस होऊन वनांत गेला. तेथें गेल्यावर एका तापसानें तिला वरिलें, व त्यापासून तिला शंभर पुत्र झाले. तेव्हां तिनें परत राज्यांत येऊन, पूर्वीच्या पुत्रांना त्यांना अर्धा हिस्सा द्यावयास सांगितलें. त्यांनीं तें मान्य केलें आणी ते दोनशें पुत्र एकमतानें राज्य करूं लागले. इंद्राला हें समजलें, तेव्हां त्याला मोठा राग आला, आणि त्यानें ब्राह्मणरूपानें येऊन, दोन्ही प्रकारच्या पुत्रांत भेद पाडिला. तेव्हां पूर्वीच्या पुत्रांना हे आपले खरें बंधु नव्हत असें वाटून ते एकमेकांशीं युद्ध करूं लागले; व इंद्राच्या सांगण्यावरून त्यांनीं एकमेकांचा क्षय मांडिला. तेव्हां ती तापसी दुःखित होऊन पतीजवळ आली, व त्याला सर्व वर्तमान सांगून रडूं लागली. इंद्रालाही दया येऊन त्यानें तिला रडण्याचें कारण विचारिलें. त्या वेळीं तिनें मृगयेस गेल्यापासून स्त्रीत्व प्राप्त झाल्याची व नंतर शंभर पुत्र झाल्याची सर्व हकीकत सांगितली. तेव्हां इंद्र तिला म्हणाला,–'तूं मला त्रास दिलास, यास्तव एवढें दुःख मीं तुला दिलें. माझा अव्हेर करून तू यज्ञ केलास, म्हणून मीं इंद्रानें तुला स्त्रीत्व दिलें आहे.' हें ऐकून ती इंद्राच्या पायां पडून व त्याची करुणा भाकून त्याला पुत्रांचें संरक्षण करण्यास सांगूं लागली. इंद्रानें विचारिलें,–'तुझ्या कोणच्या पुत्रांचें रक्षण करूं?' तिनें उत्तर दिलें 'स्त्रीपणीं जे पुत्र झाले ते मला अधिक प्रिय आहेत. त्यांचें अवश्य रक्षण कर.' मग इंद्रानें तिला आणखी वर मागावयास

सांगितलें. तेव्हां ती म्हणाली,–' स्त्रीत्व मला आवडतें. तरी तेंच मला निरंतर असू दे.' इंद्र तिला म्हणाला,–' अगे, पुरुषत्व टाकून तूं स्त्रीत्व मागतेस हें मोठें आश्चर्य आहे ?' तापसी उत्तर करिते, ' देवा, मीं पुरुषत्वाचें सुख भोगलें, परंतु स्त्रीपणीं पुरुषसंगाचें सुख मला अधिक वाटलें म्हणून मला तेंच पाहिजे.' मग इंद्रानें तिचें मागणें मान्य करून, तो स्वस्थानीं निघून गेला. भीष्म म्हणाला, ' धर्मा, या कथेवरून पुरुषापेक्षां स्त्रीलाच कामोपभोगाचें सुख अधिक प्रिय आहे, असें दिसून येते.'

# अध्याय २५ वा.



## शिवमहिमा

मागील अध्यायांत सांगितलेली कथा ऐकिल्यावर धर्मानें शिवमहिम्न व शिवाची सहस्र नावें भीष्माला विचारिलीं. तेव्हां भीष्म म्हणाला,–' धर्मा, शिवाचा महिमा फार गहन आहे. तो ब्रह्मादिकांनाही कळत नाहीं. शंकरापासून विश्व उत्पन्न झाले असून, तो भोलानाथच सर्वांचा ईश आहे. त्याचें चरित्र एकट्या कृष्णाला कळण्यासारखें आहे. तेथे इतरांचा पाड लागावयाचा नाही. श्रीकृष्ण पुत्रप्राप्तीच्या इच्छेनें बदरिकाश्रमी गेला होता. त्यालाच तूं आता विचार.' हे ऐकून धर्मानें कृष्णाला प्रश्न केला. तेव्हां कृष्ण म्हणाला;–' धर्मा शिवमहिमा सांगावयास वर्षांच्या वर्षे लागतील, इतका तो गहन आहे तरी तो मी तुला थोडक्यांत सांगतो. एकदां रुक्मिणीच्या पुत्रांना पाहून जाबुवंतीलाही पुत्रप्राप्तीचीं इच्छा झाली. व ती मजपाशी तसेंच पुत्र मागू लागली, ते मला मान्य होऊन घरातील वृद्धांची आज्ञा घेऊन, पुत्रप्राप्तीचा प्रयत्न करण्यासाठीं मी कैलासावर आलो. तेंथें जवळ उपमन्यूचा आश्रम होता. तेथें अनेक शिष्य विद्याभ्यास करीत होते, मी जवळ जाऊन शिष्यवृंदामध्ये विराजमान झालेल्या त्या मुनीचें दर्शन घेतले. तेव्हां त्यानें माझें स्वागत करून माझा धन्यवाद गाईला. आणि माझ्या आगमनाबद्दल संतोष

म्हणून तो मला म्हणाला,–'देवा, आता तुम्ही येथेच रहा. तुमची पुत्रप्राप्तीची इच्छा येथें पूर्ण होईल. येथें प्रत्यक्ष शिवपार्वती नांदत असल्यामुळें अनेक ऋषीना येथें सिद्धी प्राप्ती झालेली आहे, मीही शंकराला प्रसन्न करून घेतले आहे, त्याचीही कथा तुला सांगतों. पूर्वी कृतयुगात व्याघ्रपाद नामक ऋषी होता. त्याचा मी पुत्र असून माझा धौम्य नावांचा बंधु होता, आम्हाला आमची माता नित्य दूध म्हणून पाण्यात कालवून पीठ देत असे, एके दिवशी तेथील राजानें आमच्या पित्याला आम्हाला बरोबर घेऊन यज्ञास यावयास सांगितलें. तेथे आम्ही गेलो असता खरे दूध आम्हांस मिळाले व ते अमृता-सारखे मधुर लागलें. मग आम्ही घरीं आल्यावर मातेला म्हणालो, 'तूं आम्हाला देतेस ते काहीं दूध नव्हे, तरी व्यर्थ आम्हाला कां फसवितेंस?' तें ऐकून तिला फार दु:ख झालें, व नेत्रांत अश्रू आणून म्हणाली,–'बाळांनो, आपण पर्णकुटीत रहाणारी गरीब माणसे, आपल्याला गाई कोठून मिळणार? जन्मांतरी ईश्वराची सेवा घडली असेल तर प्रसादानें भाग्य मिळत असते. मातेचें हे शब्द ऐकून मी तिला विचारलें, 'तो ईश्वर कोठे आहे, व तो कसा प्रसन्न कसा होईल? 'तेव्हां ती अश्रू आणून आम्हाला हातानें गोंजारून स्फुंदत स्फुंदत म्हणाली,–'अरे बाळा, तो शंकर प्रसन्न होणें फार कठीण आहे; पण भक्ती केल्यास मनोरथ पूर्ण होतात. 'हें ऐकून त्या दिवसापासून एक हजार वर्षे अंगुष्ठावर उभा राहून पर्णे खाऊन शंकराचें तप केलें. तेव्हां शंभू इंद्र-रूपानें प्रगट होऊन 'वर माग' असे म्हणू लागला. मी इंद्र समजून सांगितलें कीं, 'मला इंद्राशी कांही मागावयाचें नाही, मला शंकर पाहिजे आहे. शंकर वर देईल तेवढाच मी घेणार आहे. शिवभक्ती वांचून मला स्वर्गही नको आहे. शिवानेच तुम्हाला तुमचीं स्थानें दिली आहेत. तूं आपल्या ठिकाणीं जा. तुझ्याशीं मला कांहीं मागावयाचें नाहीं.' याप्रमाणें मी त्याला टाकून बोललो, तेव्हां संतुष्ट होऊन शंकर आपल्या खऱ्या स्वरूपानें प्रकट झाला. तेव्हां मी त्याची सहस्र स्तोत्रांनीं स्तुति केली. ती ऐकून सर्व देवगणही संतुष्ट झाले. मग शंकर प्रसन्न होऊन पार्वतीसह मला म्हणाला 'अरे, तुझी भक्ति मला कळली आतां तूं वर माग तेव्हां मी त्याची स्तुती पुन: करून म्हटलें मला तुझी अखंड भक्ति दे आणि तूं सतत माझ्या आश्र-मांत रहा. त्यावेळीं, तुला ज्यावेळीं जी इच्छा होईल ती तत्काल पूर्ण होईल' असें सांगून शंकर गुप्त झाला. कृष्णा, असा तो शंकर या आश्रमांत राहत असतो. हें सिद्धपुरुषाचें स्थान आहे. येथें तूं तप कर, म्हणजे आठ

महिन्यांत तुझी कामना पूर्ण होईल,' या उपमन्यूच्या म्हणण्याप्रमाणें, धर्मा, मी येथें उग्र तप करूं लागलों. कांही कालानें कर्पूरगौर असा शंभु आपल्या गणांसह माझ्यापुढें प्रकट होऊन, प्रसन्नपणें वर मागावयास सांगूं लागला, व म्हणाला 'कृष्णा, तूं सर्व पुरुषांत श्रेष्ठ होऊन युद्धांत नेहमीं जय पावशील व सर्वथा माझ्या सान्निध राहशील, तुला मीं बहुत पुत्र व कन्या दिल्या आहेत.' असा उत्तम वर देऊन शंकरपार्वती गुप्त झालीं. मी हें अपूर्व वरदान उपमन्यूला सांगितलें. तेव्हां तो म्हणाला,-कृष्णा, यांत नवल तें काय? शिवाचा महिमाच असा आहे. याहूनही तुला एक नवल सांगतों. पूर्वीं तंडि नांवाच्या एका ब्राह्मणानें सहस्र वर्षें तप करून शंकराला प्रसन्न करून घेतलें, व त्याच्या प्रसादानें तो मोठा उत्कर्ष पावला. मग त्यानें शंकराची 'शिव, शंभु,, पार्वतीश, त्रिनेत्र, विश्वेश्वर, स्थाणु, रुद्र, जटी, त्रिशूली, महेश, गंगाधर भूतनाथ, पिनाकी, विश्वनाथ,ईशान, लिंगमूर्ति, हर,' इत्यादि सहस्रनामांनीं स्तुति केली. तेव्हां शंकरानें त्याला 'तुला अक्षय्य असे लोक प्राप्त होऊन तूं परम ज्ञानी होशील, असा वर दिला.' तंडीचें शिवस्तोत्र पठन केल्यास पिशाच नाहीसें होतें. हें स्तोत्र तंडीला ब्रह्मदेव, इंद्र, यम व शिवाचे गण, अशा परंपरेनें मिळालें होतें. असा त्याचा संक्षेपतः इतिहास आहे. पुढें परशुरामानें हें स्तोत्र गाऊन शिवाची स्तुति केली तेव्हां शंकरानें त्याला-'तुला मातृवधाचेंही पाप लागणार नाहीं, व सर्वत्र जय मिळेल;'-असा आशीर्वाद दिला. त्याप्रमाणें हें स्तोत्र गाऊन गार्ग्य ऋषीनेंही त्रिकालज्ञान व सहस्र पुत्रांची प्राप्ति करून घेतली होती. धर्मा, मांडव्य ऋषीला सुळी दिलें होते, तेव्हां त्यानें शंकराची स्तुति केली असतां, शंकर प्रसन्न होऊन त्याला म्हणाला,-'मांडव्या, तुला शूलापासून इजा होणार नाहीं व अंतीं मुक्ति प्राप्त होईल.' याचप्रमाणें आणखी गालवऋषि बालपणीं वेदाध्ययन करून घरीं परत आला असतां, त्याचा पिता त्याला कोठें दिसेना व माताही रडूं लागली. त्यावेळीं गालव दुःखी होऊन शिवाकडे जाऊन, सहस्रनाम स्तोत्रानें त्यानें त्याची स्तुति केली. तेव्हां शंकरानें प्रसन्न होऊन, त्याला पित्याची भेट करवून दिली.

वैशंपायन म्हणतात,-'राजा, याप्रमाणें कृष्णानें शिवमहिमा सांगितल्यावर धर्म पुनः भीष्माकडे वळून त्यांना म्हणाला, 'आजोबा, कामजयाचें

फल व स्त्रियांच्या आचरणाचा प्रकार मला सांगावा.' तेव्हां भीष्मांनीं पुढील कथा सांगितली.

## अष्टावक्राची कथा

वदान्य नांवाच्या ऋषीची सुप्रभा नामक कन्या होती. अष्टावक्रानें तिला पाहिल्यावर तिच्याबद्दल वदान्यापाशीं मागणी केली. तेव्हां वदान्यानें सांगितलें कीं, 'तूं उत्तरदिशा पाहून आलास म्हणजे तुला कन्या देईन. कुबेरलोक टाकून हिमालयावरून शिवलोकास जा. तेथून पुढें श्यामावनांत एक वृद्ध नारी असेल तिची पूजा कर, व परत ये.' हें ऐकून अष्टावक्र उत्तरदिशेकडे निघून कुबेरनगरीजवळ आला. तेथें त्याच्या दूतांनीं अष्टावक्राचें वर्तमान कुबेराला कळविलें. त्यानें त्याला आपल्या घरीं बोलावून मोठ्या आदरानें राहवून घेतलें आणि आपल्या राजसभेंतील अप्सरांचें नृत्य वगैरे त्याला दाखविलें. नंतर तेथून तो कैलासावर गेला व अनेक ठिकाणें पाहिल्यावर त्याला एक सुवर्णाचें गृह दिसलें. त्या घराला द्वार नसल्यामुळें अष्टावक्रानें आंत हाका मारिल्या. त्याबरोबर कांहीं कन्यांनीं बाहेर येऊन त्याला घरांत नेलें. आंत एक वृद्ध स्त्री पलंगावर बसली होती. तिला आशीर्वाद देऊन अष्टावक्र तिनें दिलेल्या आसनावर बसला; व म्हणाला,– 'तुम्हांपैकीं एकीनें येथें रहावें व बाकीच्यांनीं निघून जावें.' त्याप्रमाणें सर्व जणी गेल्यावर ती वृद्धा मात्र तेथें राहिली. तिनें त्याची सेवा करून त्याला मोहित करण्यासाठीं अनेक प्रयत्न व मधुर भाषणें केलीं; परंतु अष्टावक्र निश्चयी व मनोनिग्रही असल्यामुळें तो तिच्या म्हणण्यास रुकार देईना. शेवटीं ती म्हणाली, 'मी स्वतंत्र कुमारिका आहे, तरी माझा तूं स्वीकार कर.' अष्टावक्रानें उत्तर दिलें, 'तूं स्वतंत्र म्हणतेस हें कसें तें समजत नाहीं. कारण स्त्रियांना स्वातंत्र्य कधींही नसतें.' मग त्याचा निश्चय पाहून ती म्हणाली, 'अरे, मीं प्रत्यक्ष उत्तर दिशा आहें. स्त्रियांच्या मनाची स्थिति तुला कळवून तुझी परीक्षा पाहिली. तूं खरा सत्यसंकल्प आहेस. स्त्रियांची स्थिति मीं दाखविली अशी आहे. असो, तूं आतां जा व तुला कन्या-पुत्रांची प्राप्ति होईल.' असा उत्तर दिशेचा आशीर्वाद घेऊन अष्टावक्र वदान्याजवळ आला, व त्याला घडलेला सर्व वृत्तांत त्यानें सांगितला. मग वदान्यानें त्याची

एकनिष्ठा व ब्रह्मचर्य पाहून आपली सुभद्रा त्याला दिली. अशी कथा सांगून श्रीकृष्ण आणि भीष्म यांनीं धर्माचें समाधान केलें.

# अध्याय २६ वा



## सत्पात्रताविचार

सत्पात्रता म्हणजे काय, असें धर्मानें विचारल्यावरून भीष्म त्याला म्हणाला, ' धर्मा जो तपस्वी व सदाचारी तोच सत्पात्र होय. अशा ब्राह्मणाला दान दिले असतां तें अनंतपट फल देणारें होतें. पण माझें स्वत:चें मतें विचारशील, तर दान द्यावयाचें तें श्रद्धापूर्वक चिकित्सा न करितां द्यावे मात्र पापी मनुष्याला कांहीं देऊं नये, व त्याच्यापासून कांहीं घेऊं नये भीष्म आणखी म्हणाला;–

' धर्मा, देवकर्मे करण्याचा काल, पूर्वा म्हणजे दोनप्रहरपर्यंतचा काल, पितृकर्माचा अपराण्ह म्हणजे दोनप्रहरानंतरचा काल, आणि मनुष्य कर्मे करण्याचा काल म्हणजे बरोबर मध्याह्न होय. या कालांचे अतिक्रमण केल्यास कृतकर्माचें फल राक्षस हिरावून नेतात. श्राद्ध केल्यानें स्वर्ग-प्राप्ति व न केल्यास नरकप्राप्ति होते. '

## ब्रह्महत्येचे प्रकार

धर्मानें पुनः विचारिलें, ' भीष्मदेवा, ब्राह्मणाचा वध केल्यावांचून दुसऱ्याही कारणानें ब्रह्महत्येचें पाप लागतें तरी ते प्रकार कोणते बरें ?' भीष्मानें उत्तर दिलें, ' धर्मा, ब्राह्मणाला आमंत्रण करून मग उचित दान न दिल्यास, किंवा वृत्तिच्छेद ( निर्वाहाचें साधन नाहींसें करणें ) केल्यास, अथवा गोब्राह्मणांचा छल केल्यासही ब्रह्महत्येचें पाप लागतें, पण या ब्रह्महत्या गौण होत.

मग धर्म म्हणाला,–कोणते देश, आश्रम आणि पर्वत फार पुण्यप्रद आहेत तें सांगा. तेव्हां भीष्म म्हणाला,–' याविषयी तुला एक संवाद सांगतों, तो ऐक.

## सिद्ध व उच्छवृत्ति ब्राह्मण यांची कथा

एकदा एक सिद्ध देशाटन करीत असतां, एक उच्छवृत्ति ब्राह्मण पाहून त्याच्या घरीं गेला, ब्राह्मणानें त्याचें योग्य अतिथ्य व पूजन करून त्याला भोजन दिलें, व नंतर दोघेजण सुखदु:खाच्या गोष्टी करीत बसले. तेव्हां ब्राह्मणानें म्हटलें,–महाराज, आपण कोणकोणते पुण्यकारक आश्रम, पर्वत इत्यादि फिरला आहां बरें ? सिद्धानें उत्तर दिलें; नैमिष. हिमालय, पुष्कर, गंगा, यमुना, कुरुक्षेत्र, शरयू, चंद्रभागा, गंगाद्वार, कुशावर्त, बिल्वक, नील-पर्वत, कनखल, घृतपाप (धोपेश्वर), वाराणसी. विश्वेश्वर, द्वारका, पंढर-पूर, प्रभास, इत्यादि अनेक पुण्यस्थळें मी फिरलों आहे. त्यापैकीं तुला कोणाचें महात्म्य सांगूं ?' हें ऐकून ब्राह्मणानें त्याला गंगामहात्म्य विचारलें, तेव्हां सिद्ध म्हणाला–'जेथें गंगेचा उगम झाला तो प्रदेश धन्य आहे. तसेंच ज्या आश्रमांतून व पर्वतांवरून ती वहात जाते, तेही धन्य होत. जे पुरुष गंगा-स्नान करितात, ते आपल्या दहा पिढयांचा उद्धार करितात. गंगेचें दर्शन, स्पर्शन. वंदन इत्यादि केल्यास अनेक जन्मीच्या पापांचा क्षय होतो.' हें ऐकून तो ब्राह्मण सिद्ध वाक्यावर विश्वास ठेवून गंगेवर गेला आणि तीत स्नानपान करून पवित्र झाला.'

धर्म म्हणाला,–'भीष्म आजोबा, इह–परलोक साधण्यासाठीं राजानें काय करावें बरें ?–' भीष्मानें उत्तर दिलें,–'धर्मा ब्राम्हणांच्या आशीर्वादानें राज्य मिळवून त्याचें पालन करावें, म्हणजे राजाला मरणोत्तर स्वर्गप्राप्ति होते. यासाठीं ब्राम्हणांना दान देऊन सुखी ठेवावें. हे राजधर्म पूर्वीं पृथ्वीनें वासुदेवाला सांगितलें होते. ती म्हणाली–'वसुदेवा, सद्‌बुधि, कीर्ति आणि सर्व सुखें, हीं ब्राम्हणाच्या प्रसादानेंच मिळतात. ब्राम्हण ज्याला देवपण देतात, तो प्रत्यक्ष देव होतो. तसेंच ज्यांनी ज्यांनी ज्यांनीं शाप दिला, ते आपल्या स्थानापासून भ्रष्ट झाले, ब्राह्मणाच्या प्रभावामुळेंच समुद्र खारट झाला, इंद्राला सहस्र भगें पडलीं व मागाहून ब्राह्मणाच्या उ:शापानेंच तो सहस्र नेत्र झाला असा ब्राह्मणांचा महिमा आहे.

वासुदेव–पृथ्वीचा संवाद ऐकिल्यावर धर्मानें विचारलें,––' अजोबा, स्त्री–स्वभावाचें मला सविस्तर वर्णन सांगा.' तेव्हा भीष्म पुढील कथा सांगूं लागला.

'नारदानें पंचचूला नामक अप्सरेला विचारले कीं, स्त्रीं स्वभाव कसा असतो तें सांग. पंचचूला म्हणाली,–'नारदा, स्त्रियांविषयीं मोठा अपवाद म्हणजे त्या अत्यंत कामासक्त असतात हा होय. पुरुषाभ्यतिरिक्त त्यांना कांहीं दिसत नाहीं, ज्याप्रमाणें अग्नीची काष्ठांनीं किंवा समुद्राची पाण्यानें कधींही तृप्ति होत नाहीं. त्याचप्रमाणें स्त्रियांना पुरुषांची तृप्ति होत नाहीं, त्या स्वभावानें फार चंचल असतात. याविषयीं तुला एक कथा सांगतें ती ऐक.

## देवशर्मा ब्राह्मण स्त्रीची कथा

देवशर्मा नांवाच्या ब्राह्मणाची रुचि नांवाची स्त्री होती. ती फार सुंदर व लावण्याची खाणच होती. तो तिचें परपुरुषांपासून नित्य रक्षण करीत असे, एकदां त्याला कोठें यज्ञाला जावें लागल्यामुळें, त्यानें आपल्या वपुल नामक शिष्याला तिचें आपल्यामागें उत्तम रक्षण करावयास सांगितलें कारण तो म्हणाला–'इंद्र हा मोठा कामुक पुरुष असून तो इतर स्त्रियांच्या अभिलाषानें अनेक रूपें धरून लोकांना मोह पाडीत असतो. असें शिष्याला नीट पटवून तो यज्ञाला निघून गेला. तो गेल्यावर तो वपुल शिष्य रुचीचें इंद्रापासून संरक्षण करीत राहिला. एकदां त्यानें मनांत आणिलें कीं, इंद्र हा नानारूपें धारण करितो, तरी एकाद्या वेळीं तो वायुरूप धरून गुरुस्त्रीला स्पर्श करील असा विचार करून वपुळानें योगबलानें तिच्या शरीरांत प्रवेश केला. इतक्यांत इंद्र सुंदररूप धारण करून तेथें आला. त्याला पाहून रुचि मोहित झाली, इंद्राला वाटलें कीं, हा प्रसंग उत्तम आहे. तरी आपली इच्छा आतां पूर्ण करून घ्यावी. परंतु वपुलाच्या भयामुळें रुचि कांहींच बोलेना. तेव्हां इंद्र तिला म्हणाला,–'हे सुंदरि, हा निर्जन प्रदेश असतां तूं माझ्याशीं कां बरें बोलत नाहींस' तिनें उत्तर दिलें, 'अरे, माझ्या शरीरांत वपुल आहे तो पहा!' हें ऐकतांच इंद्र कामातूर झाला होता तरी तेथून पळून गेला. मग देवशर्मा घरीं आल्यावर वपुलानें त्याला सर्व हकीकत सांगितली. ती ऐकुन देवशर्माला आनंद झाला, व त्यानें शिष्याला वर दिला.

एकदां एक अप्सरा आकाश–मार्गानें जात असतां तिच्या मस्तकांतील फुलें खालीं पडली. ती रुचीने घेतली व त्यांचा सुगंध पाहून आपल्या वेणींत

घातली. नंतर ती तशीच आपल्या प्रभावती नामक बहिणीकडे गेली. प्रभावतीनें ती सुगंधयुक्त फुलें पाहून, रुचीपाशीं तीं ती मागूं लागलीं. मग रुचि घरीं येऊन पतीला म्हणाली,'माझी बहीण असलीं फुलें मागत आहे.' इतक्यात वपुल तेथें आला, त्याला देवशर्म्यानें स्वर्गात जाऊन तसलीं फुलें आणावयास सांगितलें, वपुल त्याप्रमाणें स्वर्गलोकीं गेला आणि त्या अप्सरेनें जेथे वेणी सोडली होती, तेथें पडलेली फुलें घेऊन तो परत यावयास निघाला. तो आकाशांतून येत असतां त्याला वाटेंत दोनच विचित्र स्त्रीपुरुषें आढळलीं. ती गिरकीची खेळ खेळत होतीं. वपुल तो खेळ पहात आहे. तो त्याला पुढें आणखी सहाजण फांसे खेळतांना आढळले. ते खेळत असतां म्हणाले कीं,' आपला खेळ पाहणारा साक्षी कोणी नाहीं, तरी जो खोटें खेळेल त्याच्या माथीं वपुलाचें पाप जडो' वपुल हें ऐकून फार खिन्न झाला, व मनांत म्हणाला,–मी तपस्वी व सत्य वचनी असून पाप कोठे केलें हें समजत नाहीं. तो दुःखी होऊन तसाच आश्रमांत आला आणि गुरुपुढें फुलें ठेऊन व नमस्कार करून, त्याला सर्व वृत्तान्त त्यानें सांगितला. तेव्हां ऋषी अंतर्ज्ञानी असल्यामुळे, सर्व प्रकार जाणून वपुलाला म्हणाला,–अरे तूं योगबलानें गुरुपत्नीच्या शरीरांत प्रवेश करून एकांतांत राहिलास, हेंच तुझें पातक होय. आतां तूं असे म्हणशील कीं हें कळलें कसें? तर गिरकीचा खेळ करणारी ती स्त्रीपुरुषें म्हणजे रात्र आणि दिवस होत, व फासें खेळणारे सहाजण म्हणजे सहा ऋतु होत. ते सर्व प्राणिमात्राच्या पापपुण्याचे साक्षी आहेत. तूं मला न सांगतां, योगबलानें माझ्या स्त्रीशीं एकांतांत राहिलास, या पापामुळें तुला नरकवास होईल. परंतु तिचें इंद्रापासून तूं रक्षण केलें आहेस त्यामुळें तुला पुढें स्वर्गगति मिळेल, याकरतां पाप कितीही गुप्त असले तरी तें रात्र दिवस व ऋतु यांच्या दृष्टीआड राहत नाहीं.' अशी कथा सांगून अप्सरा नारदास म्हणाली–नारदा, कित्येक स्त्रिया चांगल्या व कित्येक वाईट असतात, परंतु त्यांत वाईटाची संख्या अधिक. चांगल्यांच्या योगानें पुरुषांचा उद्धार होतो; व वाईटांच्या संगतीनें नरकवास प्राप्त होतो.

## विवाहाचें प्रकार

ही कथा ऐकून धर्म म्हणाला–आजोबा, आतां विवाहाचें प्रकार किती आहेत ते सांगा. भीष्म म्हणाले, धर्मा विवाहाचे मुख्य पांच प्रकार आहेत.

कुल, शील व सदाचार यांनीं संपन्न असा वर पाहून कन्या देणें हा ब्राह्म-विवाह होय. कन्या विवाहास योग्य झाली असें पाहून एकमेकांच्या अनुमतीनें तिचे दान करणें, याला क्षात्रविवाह म्हणतात. पुरुषाच्या मनांत उपवर झालेली कन्या भरून ज्याचा विवाह होतो, त्याला गांधर्व विवाह म्हणतात. द्रव्य देऊन किंवा भय दाखवून कन्या नेणें, हा असुर–विवाह होय. तसेच मातापितरांच्या इच्छेविरुद्ध त्यांना मारझोड करून कन्येला पळवून नेणें ह्याला पैशाचविवाह म्हणतात. या पांच विवाहाच्या प्रकारात पहिले तीन उत्तम व शेवटचें दोन अधम होत. ब्राह्मणानें पहिल्या तीन वर्णांपैकी कोणत्याही वर्णाची स्त्री करावी. क्षत्रियानें क्षत्रिय व वैश्य यांपैकीं कोणतीही करावी. वैशानें मात्र स्वजातीचीच करावी; आणि शूद्राशीं संबंध करूं नये. शूद्रस्त्रीच्या ठायीं होणारी संतती निषिद्ध असल्यामुळें, तीन वर्णांपैकीं कोणीही शूद्र स्त्रीचें पाणीग्रहण करूं नये या सांगितलेल्या प्रकारांच्या उलट म्हणजे प्रतिलोम विवाह झाल्यास ती संतति वर्णसंकराची होय संकर जातीचें विवेचन पूर्वी सातव्या स्तबकांत आलेलेच आहे.

---

## अध्याय २७ वा



### गाईचें महात्म्य

वैशंपायन जनमेजयाला सांगतात, 'राजा, एवढें झाल्यावर भीष्म धर्मानें प्रश्न केल्यावरून त्याला गाईचें महात्म्य सांगू लागला. तो म्हणाला, 'गंगा यमुनांच्या मध्यें असलेल्या एक आश्रमांत च्यवनऋषी तप करीत बसला होता. तेथें तो जलचरांसह बारा वर्षे राहिल्यामुळें, ती त्या मुनीजवळ निर्भयपणें खेळत असत. एकदां तेथें कोणी धीवर (कोळी) येऊन त्यानें मासे धराबयासाठीं नदीत चहूंकडे जाळीं टाकलीं. तेव्हां च्यवनऋषीही माशांबरोबर त्या जाळयांत सांपडून वर निघाला. धीवरानें त्याला पाहिले, तेव्हां त्याला वाईट वाटून तो ऋषींच्या पाया पडूं लागला. ऋषीनें पाहिलें तों आपल्याबरोबर वर आलेल्या मत्स्यांपैकीं कांहीं मेले आहेत व कांहीं

तडफडत आहेत. तें पाहून च्यवन काकुळतीस येऊन धीवराला म्हणाला, 'अरे बाबा, मी माशांचा सहचर असल्यामुळें, त्यांच्याबरोबर मरणेंच मला योग्य आहे,' हें ऐकून धीवर खिन्न होऊन नहुष राजाला घडलेला वृत्तान्त सांगण्यासाठीं गेला. त्याचें भाषण ऐकून प्रधानासह राजा गंगेच्या तीरावर आला, आणि च्यवनाला नमस्कार करून त्याला आपल्या घरीं यावयास सांगू लागला. तेव्हां च्यवन म्हणाला, 'राजा मी माशांबरोबर जाळ्यांत सांपडल्यामुळें, धीवराची माझ्यावर सत्ता आहे. तरी त्याला माझें मोल दिल्यावांचून माझी सुटका व्हावयाची नाही. हें ऐकून नहूष त्याच्याबद्दल एक सहस्र सोन्याच्या मोहरा देऊं लागला; परंतु च्यवन म्हणाला, राजा, माझें मोल एवढ्यानें व्हावयाचें नाहीं. तेव्हां नहुष एक लक्ष मोहरा देऊ लागला, परंतु च्यवनानें पुनः सांगितलें, एवढ्यानें माझें मोल होणार नाही. तरी तूं ब्राह्मणांना माझें मोल किती ते विचार. हें ऐकून नहुष सर्वस्व द्यावयास तयार झाला, पण ब्राह्मणांनीं सांगितलें कीं, हा महातपस्वी व योगी असल्यामुळें याचें मोल ठरवितां येणार नाहीं. तेव्हां नहुषाला अतिशय दुःख होऊन त्यानें जमिनीवर अंग टाकलें. इतक्यांत तेथें गविजात नामक ब्राह्मण आला, आणि-'च्यवनाचें मोल मी करितों,' असें म्हणाला. तेव्हां नहुष आनंदित होऊन त्याकडे पाहूं लागला, मग गविजात म्हणाला. 'राजा, खरें पाहिल्यास ब्राह्मणाचें मोल देतां त्रिभुवनही पुरें पडणार नाहीं. तरी गाय व ब्राह्मण यांची योग्यता समान असल्यामुळें, च्यवनाबद्दल एक गाय दे, म्हणजे झालें, हें ऐकून नहुषानें आनंदित होऊन धीवराला एक गाय दिली. धीवरानें पुढें तो गाय च्यवनाला देऊन टाकिली, तेव्हां च्यवनाच्या कृपेनें तो धीवर व मत्स्य असे सर्व विमानांत बसून स्वर्गाला गेले, आणि च्यवन व गविजात, हेही आपआपल्या ठिकाणीं जावयास निघाले. याप्रमाणें गोदानाचा महिमा व गाईंचें महात्म्य आहे.

## कुशिक राजाची कथा

नंतर धर्मानें विचारिलें, 'आजोबा, जमदग्नि ब्राह्मण असून त्याच्या कुलांत क्षात्रवृत्तीचा परशुराम कसा झाला?' तेव्हां भीष्म म्हणाला, धर्मा, एकदां च्यवन ऋषि कुशिक राजाचें सामर्थ्य पहाण्यासाठीं मागील वैराचें स्मरण करून त्याचा नाश करण्याचा उद्देशानें त्याच्या घरीं गेला.

राजानें अतिथि आला असें समजून त्याची पूजा केली. व त्याला आंत नेऊन रात्रभर त्याची उत्तम बरदास्त ठेविली. मग सूर्योदय झाल्यावर त्यानें शयन केलें आणि राजाराणीला सांगितलें कीं, माझे पाय चेपा व निद्राभंग होऊं देऊं नका. तेव्हां कुशिक त्याची पत्नी ऋषीची झोप मोडूं नये म्हणून त्याचे पाय चेपीत बसली, च्यवन एकवीस दिवस सारखा एका कुशीवर निजून राहिला, व राजा राणी अन्नोदक घेतल्याशिवाय त्याची सेवा करीत राहिली. एकवीस दिवसांनीं ऋषि दुसऱ्या कुशीवर वळला. याप्रमाणें कित्येक दिवस निजल्यावर एके दिवशीं एकदम तो उठून मोठ्या त्वरेनें धावूं लागला. तेव्हां राजाराणीही त्याच्या मागें धावूं लागलीं. इतक्यांत तो अदृश्य झाला. तेव्हां त्यांना वाईट वाटून ती परत आलीं व शयनावर पाहतात. तों ऋषि पूर्वीप्रमाणें तेथें निजलेला दिसला. तेव्हां तीं त्याचे पुनः पाय चेपूं लागलीं. इतक्यांत तो उठून बसला, आणि म्हणाला, 'आतां मला अभ्यंग स्नान घाला. त्याप्रमाणें तयारी करून राजा त्याला स्नान घालणार इतक्यांत तो अदृश्य झाला व तापविलेलें पाणी सर्व निवून गेलें. थोड्या वेळानें तो पुनः दिसूं लागतांच कुशिकानें त्याला स्नान घातलें. अशा रीतीनें त्यांचे सत्व पाहू लागला, पण ते सत्वापासून ढळेनात, तेव्हां तो म्हणाला; 'राजा, मला रथांत बसून अरण्यांत जावयाचें आहे. पण रथाला घोडे न जुंपतां तुम्ही स्वतः लागलें पाहिजे. हें ऐकून त्यांनीं रथ तयार केला आणि आपण रथ ओढूं लागली. च्यवन रथावर बसला, व भराभर चालण्यासाठीं त्यांना चाबूक मारूं लागला. याप्रमाणें त्यानें त्यांची कसोटी निक्षून पाहिली, शेवटीं च्यवन त्यांना म्हणाला, 'राजा, तुम्हीं इतकीं सुकुमार असतां हे कष्ट सहन केलेत, तुम्हीं धन्य आहां! आतां वर मागा.' राजानें उत्तर दिलें, 'मुने, आपण आमच्या घरीं राहिला हेंच मोठें वरदान आहे. आम्हाला आपल्या कृपेकरून मुळींच क्लेश झाले नाहींत.' मग ऋषीनें संतुष्ट होऊन, त्यांना वारंवार आपल्या दर्शनासाठीं वनांत यावयास सांगून राजधानीस पाठविलें. त्याप्रमाणें एकदां राजा पुनः ऋषीच्या दर्शनासाठीं राणीसह तेथें आला असतां, त्याला आश्रमाच्या ठिकाणीं इंद्राच्या नगरीसारखी एक दिव्य नगरी दिसली. च्यवनही तेथें सिंहासनावर बसलेला दिसला. तेव्हां आपण पहातो हे खरे की स्वप्न, असा त्यांना भ्रम पडला. इतक्यांत ती नगरी नाहीशीं होऊन पूर्ववत् ऋषीचा आश्रम दिसूं लागला. तेव्हां

कुशिक राणीला म्हणाला, या ऋषीच्या तपाचें हें सामर्थ्य आहे. त्यानेंच ही मायावी रचना आपल्याला दाखविली. आपलें राज्य तर याला तृणासमान आहे असें बोलत आहे, तों च्यवनानें त्याला हाक मारली, व त्याला जवळ बसवून आणि आश्वासन देऊन त्याच्या धैर्याची स्तुति केली, व कांहीं वर मागावयास सांगितलें. तेव्हां कुशिक म्हणाला; ऋषे, आपल्या कृपेकरून मला कांहीं कमी नाहीं. तरी मला एक कौतुक वाटत आहे. त्याचा आपण उलगडा करावा. असें म्हणून ऋषीनें आपल्या घरीं येण्यापासून तो आपणाला रथाला जोडून अरण्यांत नेईपर्यंत जे खेळ केले, त्यांचीं कारणें विचारलीं. तेव्हां च्यवन म्हणाला, ' राजा मी देवलोकीं गेलों असतां तेथें भविष्य स्थितीसंबंधानें बोलतांना असें ऐकिलें कीं, ब्रह्म–क्षत्रांचा संकर व्हावयाचा आहे, व तुला जो पुत्र होईल तो ब्राह्मणांना मारील. त्यासाठीं तुझें कांहीं तरी छिद्र राहून तुझा कुलक्षय करावा. अशा हेतूनें मीं तुजकडे येऊन तुझा एवढा छल केला; परंतु तूं माझ्या पूर्ण कसाला उतरलास. आतां तुझ्या वंशांत विश्वामित्र नांवाचा पराक्रमी पुत्र होईल, आणि तुझ्या वंशावर भार्गवाची निरंतर कृपा राहील. या कृपेमुळें तुझा नातू मोठा तपस्वी ब्राह्मण होईल व त्याच्या उलट आमच्या वंशांत क्षात्रधर्मी पुरुष होईल.' हा इतिहास द्वितीय स्तबकांत आला आहे. परंतु कांहीं विशेष तऱ्हेनें येथें सांगावा लागला..

## दान महात्म्य.

धर्मराज पुढें म्हणाला,–'आजोबा, मला मोठा मोह उत्पन्न झाला आहे कीं, माझ्या हातून बंधुकुलाचा नाश झाल्यामुळें, त्यांच्या पुत्रांची व स्त्रियांची स्थिति काय झाली असेल! मला आतां कोणता नरक प्राप्त होणार हें कांहीं समजत नाहीं.' तेव्हां भीष्म त्याला म्हणाले,—' धर्मा, तूं व्यर्थ मोह पावूं नकोस. नरकगति चुकवावयासाठीं मी तुला दानरहस्य सांगतो, ते ऐक. त्याच्या योगानें तुला यश, पुण्य आणि उत्तम लोक यांची प्राप्ति होईल. गृहदान, शय्यादान, वस्त्र–भूषणदान, अन्नदान, गोदान, इत्यादि दानें स्वर्गप्राप्ती करून देणारी आहेत. उदकदानानें अखंड तृप्ति मिळते, व पृथ्वीदानानें सार्वभौमपदवी प्राप्त होते. गोदान केल्यास गाईच्या अंगावर असलेल्या

रोमांइतकीं वर्षेंपर्यंत स्वर्गवास घडतो, अभ्यंगदानानें आरोग्य मिळून, सुवर्ण-दान केल्यास वसुलोकाची प्राप्ति होते.' याप्रमाणें आणखी अनेक दानांचें माहात्म्य या प्रसंगीं भीष्मानें धर्मास सांगितलें. तें ऐकून, द्रौपदीसह सर्वांना आनंद झाला. मग पुनः धर्मानें सर्वांत उत्तम दान कोणतें, असें विचारिल्या-वरून भीष्म म्हणाला,–' भयपीडा निवारण करणें हें सर्वांत उत्तम दान होय. शरणागताचें रक्षण करणें व सत्पात्रीं दान देणें याचेंही माहात्म्य मोठें आहे तसेंच ज्या वस्तु आपणांस आवडतात, त्या त्यांच्या भोक्त्यांना द्याव्या. कोणी आशा धरून कांहीं मागितलें असतां, अहंकारानें न दिल्यास पाप लागतें. जे प्राणी कोणाशीं कांहीं मागत नाहींत व देवमनुष्यांची आशा सोडून, निस्पृह आणि धैर्यवान् असतात, त्यांना गाई, धान्य, वस्त्र गृह, इत्यादि सामग्री दान केल्यास तें दात्याला इह–परलोकीं धन्य करितें. ज्याप्रमाणें विप्रांना अग्नि-होत्रादि कर्मे अवश्य आहेत, त्याप्रमाणें दात्याला पात्रा–पात्र विचारही अवश्य आहे. कोप व लोभ न बाळगितां सर्वांशीं सत्य व गोड बोलणारा, अल्प-संतोषी, अध्ययनांत तत्पर व आचारयुक्त, अशाला बहुमानानें अन्नवस्त्रांचें दान केल्यास दाता सूर्यासमान पूज्य होतो. जो राजा अशांना कांहीं देत नाहीं, त्याला इहपरलोक अंतरून त्याचा समूल नाश होतो. ब्राह्मण, क्षत्रिय, आणि वैश्य, यांनीं हीं दानपात्रें अवश्य पहावीं. शूद्रांनीं अशा ब्राह्मणांची सेवा करावी. भीष्म आणखी म्हणाले, धर्मा, मला ब्राह्मण ज्याप्रमाणें प्रिय वाटतो, त्याप्रमाणें माता, पिता, भ्राता व स्वतःचा देहही प्रिय वाटत नाहीं

एवढें ऐकल्यावर धर्म म्हणाला,–' भीष्मदेवा, दोन ब्राह्मण समान-विद्येचे असून शांत स्वभावाचे व आचरणाचे असतील, तर त्या दोघांत कोणाला दान दिल्यानें अधिक पुण्य लागेल बरें ?' भीष्म म्हणाला,–'धर्मा त्यापैकीं जो मागेल त्याला दिल्यानें पुण्य आहेच; परंतु न मागणारास दान दिल्यानें अनंत पुण्य लागतें. नित्यशः बैल, रत्ने, पादत्राणें, वस्त्रें अश्वादि वहानें, षड्रस अन्नें, इत्यादिकांचें राजानें दान करावें. ब्राह्मणाजवळ जें असेल त्याचें रक्षण करून नसेल तें त्याला द्यावें, हें राजाचें कर्तव्य आहे. धर्मा, सर्व पदार्थ पृथ्वीपासून उत्पन्न होत असल्यामुळें, पृथ्वी दानासमान दुसरें दान नाहीं. भूमींत जितके रजःकण असतात, तितकीं वर्षे दात्याला स्वर्गवास होतो, व त्याची दहा कुलें उद्धरतात.'

याप्रमाणें दानमहात्म्य ऐकून धर्मानें विचारलें, 'कोणत्या दानानें त्वरित सिद्धि मिळते बरें?' तेव्हां भीष्म म्हणाले, धर्मा, पूर्वी एकदां हाच प्रश्न मीं नारदाला विचारला होता. तेव्हां तो म्हणाला,–'अन्नदान हें शीघ्र सिद्धि देणारें आहे. कारण प्राणिमात्राची स्थिति अन्नावर अवलंबून आहे. अन्नापासून रसोत्पत्ति होऊन पुरुष निर्माण होतो. यासाठीं अन्नदान केल्यानें अनेक पापांचा नाश होतो. भीष्म असें सांगत आहे, तो धर्म म्हणाला, 'कोणत्या नक्षत्रावर कोणतें दान करावें तें सांगा.' तेव्हां भीष्म म्हणाले, 'धर्मा, कृतिका नक्षत्रीं घृत व शर्करा, रोहिणीवर दुग्ध, घृत व शर्करा, मृगनक्षत्रीं सवत्स धेनु, आर्द्रीत अन्न, पुनर्वसूत नाना पक्वानें, पुष्यांत सुवर्ण, अश्लेषा नक्षत्रीं रौप्य व बैल, मघात रांजणभर तील पूर्वाफाल्गुनींत नाना भक्षपदार्थ, उत्तरांत गोदान, हस्तनक्षत्रीं हत्ती व रथ, चित्रांत बैल व पवित्र अन्न, स्वातींत आपल्याला प्रिय असलेली वस्तु, विशखा नक्षत्रांत गाई व धान्य, अनुराधांत उत्तरीय वस्त्रें, ज्येष्ठांत शाका, मूलनक्षत्रीं मुळें, पूर्वाषाढांत पात्रें, उत्तराषाढांत निर्मल व शितल अशीं उदकें द्यावीं, आणि अभिजित् नक्षत्रीं घृत व मधु द्यावीं, म्हणजे स्वर्ग मिळतो. श्रवण नक्षत्रावर परोपरीचीं वस्त्रें भूषणें देणारा विमानांत बसून स्वर्गास जातो, धनिष्ठा व शततारका यांवर सुगंधि द्रव्यें देणाराला अप्सरालोकाची प्राप्ति होते. पूर्वाभाद्रपदानक्षत्रीं चवळ्या दिल्यास धनधान्यें मिळतात. उत्तराभाद्रपदावर पितरांचें तर्पण करणाराला अन्नाची समृद्धि होते, रेवतीवर जे कास्य व गाई देतात, ते इहपरलोकीं सुखी होतात. अश्विनी नक्षत्रीं अश्व व धेनु यांचें दान करावें, आणि भरणी नक्षत्रांत तिल आणि धेनु द्याव्या; म्हणजे देणारा कीर्तिमान होतो. धर्मा, हा नक्षत्रांचा महिमा प्रथम नारदानें देवकीला सांगितला. या सर्व दानांत गोदान श्रेष्ठ होय. त्यामुळें पुत्र, पौत्र, पशु, लक्ष्मी सुख इत्यादि सर्व प्राप्त होतें. गाईच्या योगानें स्नान, संध्या, अनुष्ठान, इत्यादि साध्य होतात, म्हणून गाई देणारा व घेणारा अशा दोघांनांही गोदान पुण्यकारक होते.'

---

# अध्याय २८ वा



## उद्दालकोपाख्यान

भीष्म म्हणाले;–' धर्मा, एकदां उद्दालकानें दीक्षा घेऊन आपल्या नासिकेत नामक पुत्राला आपली सेवा करावयास सांगितलें. नासिकेतानें तें मान्य केलें. एकदां उद्दालक स्नानासाठीं नदीवर गेला असतां, तेंथें इध्म, दर्भ व कलश विसरून परत आला. तेव्हां त्यानें नासिकेताला ते आणण्यासाठीं नदीवर पाठविलें. तो तेथें जाऊन पहातो, तो लाटेबरोबर ते वाहून गेले असें आढळलें. मग परत येऊन त्यानें पित्याला तसे सांगितलें. त्यावेळीं दोन प्रहरची वेळ असल्यामुळें उद्दालक क्षुधातुर झालेला होता. वस्तु सांपडत नाहींत असें पुत्रानें सांगतांच त्याला क्रोध आला, आणि लगेच त्याला त्यानें यमाकडे जावयास सांगितलें. नासिकेत त्याची हात जोडून क्षमा मागूं लागला; पण इतक्यांत तो मृत होऊन जमिनीवर पडला. तेव्हां आपल्या हातून अनर्थ घडला असे पाहून उद्दालक शोक करूं लागला. तो सर्व दिवस व रात्र त्यानें शोकांत घालविली. दुसऱ्या दिवशीं सूर्योदय झाल्याबरोबर नासिकेत सचेतन होऊन उठला. तेव्हां त्याच्या गळ्यांत सुगंधि पुष्पांच्या दिव्य माला होत्या. उद्दालकानें त्याला पाहून विचारिले कीं, 'बाळा, यमलोक पाहिलास काय ? अरे, माझ्या भाग्यानें तूं परत आलास. तरी तेथें तूं काय काय पाहिलेस तें सांग. तें ऐकून नासिकेत म्हणाला, 'ताता तुमच्या आज्ञेनें मीं संयमिनी नगरीस गेल्यावर यमानें मला पाहून माझी पूजा केली, आणि तेथें येण्याचें कारण विचारलें. तेव्हां मी उत्तर दिलें कीं पित्याच्या आज्ञेवरून मीं येथें आलों आहें. तरी तुला काय करणें तें कर.' यम म्हणाला, 'बाळा, तुझा पिता आतां शोक करीत आहे, तरी तूं त्याच्याकडे लवकर परत जा. असे सांगून तो मला वर मागावयास सांगूं लागला, तेव्हां पुण्यभूमि मला दाखव, असे मीं त्याला म्हटलें. तेव्हां त्यानें मला विमानांत बसवून सर्व सुवर्ण व रत्न यांच्या प्रासादांनीं ( राजवाड्यांनीं ) भरलेले लोक आणि कल्पवृक्षादि तरु आणि दुधाच्या नद्या

दाखविल्या. त्या पाहून मीं यमास विचारले कीं याचा भोग कोण घेणार?' तेव्हां त्यानें उत्तर दिलेः—' जे कोणी दुग्धादि रस नेहमीं ब्राह्मणांना दान देतात, त्यांना या नद्या भोग्य होत. ग्रहणादि कालीं व पवित्र स्थानीं ब्राह्मणाला गाई देतात, त्यांना ह्या नद्या भोग्य होत. नासिकेता, आतां गाईचें स्वरूप सांगतों तें ऐक. दान द्यावयाच्या गाई पोसण्यास घेतलेल्या, किंवा लढाईंत जिकलेल्या अथवा घरीं वाढविलेल्या असाव्या. अशा गाई उपवास करून दात्यानें ब्राह्मणास द्याव्या, म्हणजे तिच्या अंगावर जितकीं रोमें असतात, तितकीं वर्षे त्याला स्वर्गवास मिळतो,' हें ऐकून मी यमाला विचारिलें. 'देवा, ज्याला गाय नाहीं त्यानें काय उपाय करावा?' तेव्हां त्यानें सांगितलें. मुला, ज्यापाशी गाय नसेल, त्यानें घृताची गाय द्यावी. तीही न मिळेल तर तिलांची किंवा जलाची द्यावी.' हें ऐकून मी यमाला नमस्कार केला, व आज्ञा घेऊन येथें आलों,

## गाईची योग्यता.

हें नासिकेताचें आख्यान सांगून भीष्म धर्माला म्हणाला, हेंच गोमाहात्म्य ब्रह्मदेवाने इंद्राला आणि बृहस्पतीनें मांधात्याला सांगितलें होतें. गोरस भक्षण करून व पत्नीसहित व्रतस्थ राहून योग्य कालीं व योग्य स्थानीं गोदान करावे. अशा रीतीनेंच पूर्वीच्या राजांनीं सिद्धि प्राप्त करून घेतली नृग, यौवनाश्व, भगीरथ, मांधाता, मुचकुंद, भरत, नैषध, सोमदत्त, दशरथ दिलीप इत्यादि राजे गोदान करून स्वर्गीं निश्चल झाले.' हें भीष्माचें उपदेश्यवचन ऐकून धर्मानें कपिला गाईचें दान करून ब्राह्मणांना संतुष्ट केले. मग भीष्म म्हणाला,– 'धर्मा गोष्टींत गोष्ट म्हणून वडिलांकडून ऐकलेली एक कथा मला आठवली आहे ती सांगतों ऐक. एकदां प्रजापतीनें दक्ष नांवाच्या आपल्या पुत्राला प्रजा उत्पन्न करावयास सांगितलें त्या वेळीं दक्षानें अनेकविध सृष्टि उत्पन्न करून, स्थावराहून विशेष असें जंगम निर्माण केलें. जंगम श्वापदादि प्राणी, त्या प्राण्यांत मनुष्य श्रेष्ठ आणि मनुष्यांत ब्राह्मण श्रेष्ठ असून त्यांच्यांत यज्ञ विशेष श्रेष्ठ आहे. या यज्ञाच्या योगानें दक्षानें सोमपान आदिकरून नानाविध वृत्ति उत्पन्न केल्या. त्यानें देवांना अमृतपान नेमून, इतरही प्राण्यांना यथायोग्य जीवन ठरवून दिलें. मग ऋषींनीं जीवनासाठीं ब्रह्मदेवाची प्रार्थना केली. त्यानें त्यांना अमृत दिलें. तें पिऊन त्यांनीं

तृप्तीची ढेकर दिली. तेव्हां त्या सुगंधानें त्यांच्या मुखापासून सुरभि म्हणजे कामधेनु उत्पन्न झाली. मग त्या कामधेनुपासून अनेक प्रकारच्या कपिला गाई उत्पन्न झाल्या. एकदां त्यांच्या वत्साच्या मुखापासून फेस निघाला, तो खालीं शंकर होता, त्याच्यावर पडला. त्याच्यामुळें शंकरानें रागावून तृतीय नेत्र उघडला व त्यांतून निघालेल्या वन्हीच्या योगानें त्या गाई काळ्या, मिळ्या व कांहीं कबऱ्या झाल्या; पण ज्या शंकराच्या मस्तकावरील सोमाच्या आश्रयानें राहिल्या, त्या मात्र कपिला राहिल्या. हा प्रकार पाहून ब्रह्मदेव शंकराला म्हणाला, 'शंकरा, तूं गोऊच्छिष्टानें पवित्र झालास. जसे चंद्रापासून अमृत मिळते त्याप्रमाणें गाईपासूनही अमृत स्रवते.' असे म्हणून ब्रह्मदेवानें त्या सर्व गाई एका बैलासह शंकराला दिल्या. शंकरानें त्या बैलाला ध्वजस्तंभावर ठेविले म्हणून त्याला वृषांक हे नांव मिळालें. गाईचा पति म्हणून त्याला पशुपति व नंदिकेश्वर अशी नांवे प्राप्त झाली. असो; कपिला गाईच्या दानानें तर अनंत फल प्राप्त होते. धर्मा, एकदां सूर्यवंशाशील सौदास नामक राजानें वसिष्ठाला सर्व त्रैलोक्यांत पवित्र काय तें सांगावयास सांगितले. तेव्हां वसिष्ठानें गाईची प्रतिज्ञा सांगितली. तो म्हणाला, 'गाईचें सर्व पवित्र असते. स्वाहाकार व स्वधाकार गाईशिवाय चालावयाचें नाहीत, गाय म्हणजे लक्ष्मी होय. यज्ञादिकांचा सर्व भार गाईवरच आहे. तिनें दाद केल्यास उभय लोकी सुख मिळते. ज्यापाशी सहस्र गाई असतील, त्यानीं शंभर गाईंचे दान करावे. ज्यापाशी शंभर असतील त्यांनी दहा गाई द्याव्या, याप्रमाणें दशांक गोसंख्या दान करावी, शंभर गाई देणाऱ्यानें त्याच्याबरोबर बैल द्यावा. त्याप्रमाणें गोमती विद्येचा जप करणाऱ्यालाही महापुण्य लागते,

ब्रह्मदेवानें उत्पन्न केलेला गाईचा तप करून ब्रह्मदेवाला संतोषित करुन, त्याच्यापासून वर मागून घेतला कीं,-'आम्हीं सर्वापेक्षां श्रेष्ठ असावे व आम्हाला कोणत्याही पापाचा लोप होऊ नये, आमचे मलमूत्रही पवित्र असावे. शिवाय आम्हाला दान देणाराला स्वर्गलोक व गोलोक यांची प्राप्तीं व्हावीं. आमचा अपमान करणारांना सर्व दोष लागावेत. ब्रम्हदेवानें त्याप्रमाणें त्यास वर दिला.

हें गाईचे महात्म ऐकून, धर्म म्हणाला,- ' भीष्मदेवा, सर्वांत पवित्र काय आहे ते सांगा. 'शुका, सर्व दानात गोदान थोर होय, त्यानें निःसंशय स्वर्गप्राप्ती होते. गाईच्या घृतादिकांनीच होमहवनाचीं सिद्धी होऊन देव

संतुष्ट होतात. यासाठीं गाई सर्वस्वी पवित्र आहेत. प्रथम गाईंना शिंगे नव्हती. पण मागाहून त्यांनीं तपश्चर्या करून ती मिळविली. अशा या गाईची पूजा करणारांकडे पुत्रपौत्रही स्वर्गास जातात.' पित्याचें भाषण ऐकून शुकानें गाईची पूजा केली.

यावर धर्मानें विचारले,–'भीष्म आजोबा, गाईचे मूत्र व विष्ठा लक्ष्मीयुक्त आहेत असे मी ऐकितो, तरीं हे कसे काय, ते सांगा 'हा प्रश्न ऐकून भीष्म म्हणाला,–'याविषयी एक प्राचीन कथा आहे. पूर्वीं एके प्रसंगी कमलोभ्दव लक्ष्मी दैत्याचा त्याग करून गाईजवळ आली. त्यावेळीं तिचें तेज पाहून 'तूं कोणती देवता आहेस?' असे त्यानी विचारले. तेव्हां लक्ष्मी म्हणाली –'मी सर्वांना प्रिय अशी लक्ष्मी आहे, मी दैत्यांचा त्याग करून देवात येऊन राहिले. तेव्हां सर्व देव सुखी झालें. आतां मी तुमच्यात रहावयास आले.' त्यावर गाय म्हणाली,–'देवी तू फार चंचल असून तुला बरीवाईट परिक्षा नाही, यास्तव तूं आमच्यांत रहावयास योग्य नाहीस.' लक्ष्मीनें उत्तर दिले. अहो, तुमच्याजवळ मी आले असतां, तुम्ही माझा अंगिकार करीत नाही हे ठीक नव्हे. गाई पुन: म्हणाल्या–'बाई, आम्ही तुझा काही अपमान करीत नाही. तूं चंचल म्हणून तुला आम्ही टाळीत आहो. तेव्हां लक्ष्मीनें त्यांना सांगितलें 'अहो, अनेक प्रकारचे तप करून ब्रम्हादिक देव माझ्या कृपाकटाक्षाची इच्छा करितात. ती मी होऊन तुमच्याकडें आले असतां तुम्ही माझा अपमान केला, अशी ख्याती होईल, तरी तुमच्या शरिरातील जो कुत्सित भाग असेल त्यांत मीं राहील,' तेव्हां गाई म्हणाल्या, 'आमच्यात कुत्सित असे काही नाही.' 'मग सर्व गाईनी मिळून विचार करून आपले मूत्र व विष्टा, यांत लक्ष्मीचे वास्तव्य ठरविले. असा निश्चय होतांच लक्ष्मी त्यांच्या मूत्रशेणात प्रविष्ट झाली. म्हणून मूत्र व शेण लक्ष्मीयुक्त मानण्यात येते.

## गोलोक सर्वात उच्च कां ?

भीष्म धर्मास म्हणाले,–' पूर्वी इंद्रानें दैत्याना मारिलें, त्यावेळी सर्व ऋषी यांना आनंद होऊन ते ब्रह्मदेवाकडे गेले, त्याची सेवा करूं लागले तेथें इंद्रानें ब्रह्मदेवाला विचारलें, 'हे पितामह, गोलोक सर्वात उच्च कां बरें?' ब्रह्मदेव त्यावेळीं म्हणाले, 'इंद्रा, गाईचा महिमा अगाध आहे. गाईशिवाय

यज्ञ सिद्धीस जाणार नाही. वृषभ हे गोपुत्र असुन त्याच्याच साह्यानें शेतीं होतें. आणि धान्य व घृत यांच्या योगानें यज्ञाची निष्पत्ति होत असल्याने गाईची योग्यता मोठी मानली आहे. आता गोलोक सर्वात उच्च कां ते सांगतो पूर्वीं देवयुगांत कश्यपाची जी स्त्री जी जी अदिति, तिनें तप करुन आपणास पुत्र मिळविले. तें पाहून दक्षकन्या जी कामधेनू तिनेही देवाची सहस्र वर्षे घोर तप केले. त्यावेळीं ती प्रसन्न होऊन तिबपुढे उभा राहिलो. आणि तिला वर माग म्हणून म्हणालो; परंतु मला मागावयाचे नाहीं, असे तिनें उत्तर दिलें. हें ऐकून मला संतोष वाटला आणि मी तिला वर दिला कीं, ' तुझी संतति सर्वांना सुखकर आणि पूज्य होईल. तुझा लोक सर्वांस प्रिय वाटून तेथें जरामरणाची भीति रहाणार नाहीं. तुमच्यापाशीं अमंगल असें कांहींच रहावयावें नाहीं.

## दक्षिणा व सुवर्ण यांची कथा

असें ब्रह्मदेवानें सांगितलेलें गोमहात्म्य धर्माला सांगून भीष्म म्हणाला ' धर्मा, आतां तुला दक्षिणा व सुवर्ण यांच्या उत्पत्तीची कथा सांगतों. माझा पिता शंतनु स्वर्गस्थ झाला असतां, मी एकदां त्याचें श्राद्ध करण्यासाठीं म्हणून गंगेवर गेलों. तेथें गंगामाता मला साहाय्य करण्यासाठीं आली. मग विधिप्रमाणें मी दर्भ जमिनीवर पसरले असतां, त्यांतून शंतनूचा हात पिंड घेण्यासाठी पुढें आला. तो मी चिन्हावरून ओळखला, व साक्षात् आपला पिता पिंड घ्यावयास आला, असें पाहून मला आश्चर्य वाटलें, व मनांत विचार आला कीं, ' पिंड दर्भावर द्यावा अशी देवाज्ञा असतां पिता हस्त काय म्हणून पुढें करतो बरें ?' असा विचार करून शेवटी शास्त्राधारें मी दर्भावर पिंड दिला. त्याबरोबर तो हस्त अंतर्धान पावला. रात्रीं स्वप्नामध्यें सर्व पितर मला भेटले व संतुष्ट होऊन मला म्हणाले, भीष्मा, तूं धन्य आहेस, शास्त्रप्रामाण्य तुजपाशीं आहे कीं नाहीं हें पहाण्यासाठीं तो हात वर आला होता; परंतु तूं शास्त्राधारास धरून दर्भावर पिंड दिलास, त्यायोगें आमचा पूर्ण संतोष झाला. परंतु आतां सुवर्णदक्षिणा देशील, तर देव व ऋषी हे संतुष्ट होतील.' मग मी त्यांच्या सांगण्याप्रमाणें जागा झाल्यावर सुवर्णदान केलें.

परशुरामानें क्षत्रियांना मारल्यावर, त्या पापाच्या क्षालनार्थं अश्वमेध केला; परंतु त्यानें त्याच्या मनानें समाधान झालें नाहीं. तेव्हां तो ऋषींना म्हणाला, ' ज्याच्या योगानें पुरुष कृतकृत्य होईल, असा सर्वांत उत्तम उपाय

कोणता '? तेव्हां वसिष्ठादि ऋषि म्हणाले,–' सर्वात सुवर्णदान हा उपाय श्रेष्ठ आहे. राजे, महाराजे, देव हे मुकुटादि अलंकार सुवर्णाचेच करून मस्तकावर धारण करितात. पूर्वी हिमालयावर शंकरानें तप करून त्याच्या कन्येशीं लग्न केलें, व त्याच्या योगानें त्याच्या तपाचा क्षय झाला. मग त्यांचा समागम पाहून देव भयभीत होऊन शंकराकडे गेले, आणि म्हणाले, -' देवा,तूं अमोघवीर्य असून पार्वती तशीच आहे. यासाठीं तुमची जी संतति होईल ती सर्वांचा दाह करील. तरी तुम्हीं कृपा कामदेवाला असा वर द्यावा कीं, स्त्री पुरुषांचा समागम केवळ आपल्यासाठींच न होतां सुखासाठीही व्हावा.' शंकरानें प्रसन्न होऊन तसा वर दिला, आणि मग आपण स्वतः उर्ध्वरेता झाला. तेव्हां पार्वतीला क्रोध हेऊन तिनें देवांना शाप दिला कीं, ' तुम्हीं आमच्या पुत्राच्या भयानें कामाचा उच्छेद करविला, तरी तुम्हीं अपत्यरहित व्हाल.' पार्वतीनें हा शाप दिला त्यावेळीं अग्नि तेथें नव्हता. तो पाताळांत गेला होता. पुढें एकदां शंकर आपलें वीर्य आवरीत असतां त्यांतील कांहीं भूमीवर सांडून अग्नीत पडलें, तें तेथेंच वाढू लागलें. पुढें तारकासुरानें त्रैलोक्याला पीडा केली असतां देव ब्रह्मदेवाला शरण गेले, व म्हणाले,–' हें देवाधिदेवा, तारकामुळें सर्व हव्यकव्य बंद पडले आहे.'–हें ऐकून ब्रह्मदेव म्हणाला,—' ज्यानें वेदमार्गाचा उच्छेद केला त्याचा त्वरित वध करा.' देवांनीं उत्तर केलें,—– ' आमच्या हातून तो कसा मरेल ? आम्हांला पार्वतीनें शाप देऊन अनपत्य ठेविलें आहे.'–मग ब्रह्मदेव म्हणाला,—' अहो, तुम्हीं म्हणतां हें खरें. परंतु शापाच्या वेळीं अग्नी तेथें नव्हता. सध्यां शिवाचें वीर्य त्यानें धारण केलें आहे. त्याला जो पुत्र होईल तो तारकासुराला मारील तुम्ही अग्नीला समोर आणा.'–ही आज्ञा ऐकून अग्नीला शोधूं लागले. तेव्हां पाताळांत बेडूक अग्नीनें तापले होते, त्यांतील एकानें येऊन देवांना सांगितलें कीं,—' अग्नि पाताळांत लपला आहे.' हें वर्तमान अग्नीला कळलें, तेव्हां ' त्यांना तुमची जिव्हा नष्ट होईल.' असा शाप देऊन, तो तेथून निघून अन्य ठिकाणीं गेला इकडे देवांनीं बेडकांना असा वर दिला कीं. तुम्हाला जीभ नसली तरी तुम्हीं शब्द कराल व बिळांत राहून जेव्हां तुम्ही मराल, त्यावेळीं पृथ्वी तुम्हांला जीवंत राखील, व मृगोदकानें पुनः तुम्हीं जिवंत व्हाल इतक्यांत हत्तीनें अग्नीला पाहून देवाला सांगितलें तेव्हां त्यानें हत्तीलाही ' तुमच्या जातीची जीभ उलटी होईल.'–असा शाप दिला, व तो तेथून

शमीच्या झाडांत जाऊन लपला. मग देवांनीं हत्तीचा शाप जाणून त्याला उलट वर दिला कीं. तुमची जिव्हा मरणकालीं मात्र उलटी होईल. शिवाय तिनें तुम्हाला सर्व रस जाणतां येतील, व उच्च स्वरही करतां येईल. इकडे शमीच्या पोटांत अग्नि गेलेला पोपटानें पाहिला व त्यानें देवांना तसें सांगितले अग्नीला हें कळतांच त्यानें शुकालाही 'तुझी जीभ उलटी वळेल' असा शाप दिला. देवांना हा शाप जेव्हां कळला, तेव्हां त्यांनीं शुकाला सांगितलें कीं,-जरी तुझी जिव्हा वळून आंखूड झाली तरी तुझी वाणी मनोहर होऊन बालकाप्रमाणें तूं बोलशील.' नंतर देवांना शमींमध्यें अग्नि आढळल्यामुळें ते शमीला श्रेष्ट मानूं लागले. नंतर अग्नि देवांना म्हणाला.—'हे देवहो, तुमची काय आज्ञा आहे ती सांगा.' तेव्हां देव म्हणाले,-'बा अग्ने, तारकासुरानें आम्हांला पीडिलें असून पार्वतीनें तर शाप देऊन आम्हांला अनपत्य केलें आहे. तेव्हां आतां त्या तारकासुरापासून तूं आमचें रक्षण कर.' देवांचें भाषण ऐकून अग्नि म्हणाला, 'देवहो तुमच्या आज्ञेप्रमाणें मी करितो; तुम्ही आतां स्वस्थ मनानें आपआपल्या ठिकाणीं जा.' असें सांगून अग्नि गंगेजवळ आला, आणि तिला सर्व वृत्तांत कळवून शंकराचा वीर्यगोल त्यानें तिच्या उदरांत ठेविला. पण तो गर्भ तेथें वाढूं लागला असतां, गंगा तो धारण करण्याला असमर्थ झाली. इक्यांत एक दैत्य अकस्मात् गंगेंत शिरला, व भयंकर शब्द करूं लागला. त्यामुळें गंगामाता क्षणभर व्याकुळ झाली व गर्भधारणास अधिकच असमर्थ होऊन ती अग्नीला म्हणाली; 'मी आतां गर्भ टाकून देते. माझा उपाय चालत नाहीं. अग्नीनें उत्तर केलें, 'गंगे, तुला सर्व पृथ्वी धारण करण्याचीही शक्ति असतां हा गर्भ धरवत नाहीं, असें कसें होईल ? असें म्हणून अग्नि तिला गर्भ टाकूं नकोस, असें म्हणत असतांही ती मेरूवर गेली व तेथे तिने तो गर्भ टाकून दिला; व परत येऊन अग्नीला हें वर्तमान कळविलें. अग्नीनें विचारिले, 'तो गर्भ कसा आहे ?' तेव्हां गंगा म्हणाली 'स्वामी तो तुमच्या सारखाच असून त्याच्या तेजानें सर्व मेरूपर्वत दीप्तिमान् झाला आहे. तो कदंबाप्रमाणें परिमलयुक्त असून तेजानें सूर्यकिरणांसारखा आहे. त्या गर्भाच्या रसानें मृत्तिकेला स्पर्श केला; त्याबरोबर त्या मृत्तिकेचें सर्व सुवर्ण झालें, व त्यांतील काहीं गंडकी नदींत पडलें. असा हा

तुझा पुत्र प्रतापशाली आहे.' हा वृत्तांत ऐकून, अग्नीला संतोष झाला. इकडे मेरूवर पडलेल्या त्या गर्भाचें कृत्तिकांनीं रक्षण केलें, म्हणून त्याला 'कार्तिकेय' म्हणूं लागले. पुढें त्याला त्यांनीं गुहेंत ठेविल्यामुळें, त्याला 'गुह' असें नांव मिळालें. हा कार्तिकेयाचा उत्पत्तिप्रकार अन्यरूपानें दुसऱ्या स्तबकांत आलेला आहे.

## सुवर्णाच्या उत्पत्तीची दुसरी कथा

सुवर्णाच्या उत्पत्तीची दुसरीही एक कथा आहे ती अशी कीं, ईश्वरानें एकदां वरुणरूप धरून यज्ञ करीत असतां ब्रह्मदेवाच्या कन्येला पाहिलें. त्यावेळीं त्याचा वीर्यस्राव झाला. तो पूषा देवानें गोळा करून अग्नींत टाकिला, तेव्हां त्याच्या ज्वालेपासून भृगऋषि उत्पन्न झाला. अंगाऱ्यापासून अंगिरऋषि व भस्मांतून शुक्र निघाला. त्याच्या अश्रूंपासून अत्रि झाला व रक्तापासून कांचन उत्पन्न झालें. असा तो ब्रह्माग्नि सर्व देवमय आहे, व त्याचें सारभूत हें सुवर्ण होय. ही कथा वसिष्ठानें परशुरामाला सांगितली होती.

## श्राद्धविधि प्रकार

हा इतिहास ऐकून धर्मानें श्राद्धविधि सांगण्याविषयीं भीष्माची प्रार्थना केली. तेव्हां भीष्म म्हणाला,–'श्राद्धाला कृष्णपक्ष उक्त होय. त्यांत प्रतिपदादि तिथींचीं अनेक फलें आहेत. शिवाय बहुतेक नक्षत्रांवर कामनाश्राद्धें करितां येतात. श्राद्धद्रव्यें तिल, यव, इत्यादि प्रसिद्ध आहेतच. तसेच शालि, मुगधा, उडीद व मृगादि प्राण्यांचे मांसही श्राद्धाला सांगितलेलीं आहेत. शिवाय गाईचें तूप, दूध, गूळ, साखर, पांढरें जिरें इत्यादि पदार्थही पाहिजेत. अपराण्ह काल हा श्राद्धाला उचित होय. कांसे, रूपें, व सोनें यांची भांडी श्राद्धांत घ्यावीं. असत्य बोलणारा, रोगी, वेदाध्ययन न करणारा, व्याजबट्टा करणाला, गाणारा, कपटी, पित्याची आज्ञा न मानणारा, परस्त्रीगमन करणारा, अनाचारी, घरें जाळणारा, विष घालणारा, सेवा करणारा, तेल व गंध विकणारा, सुतारकाम करणारा, मित्रद्रोही, चोर इत्यादि प्रकारचा ब्राह्मण श्राद्धाला सांगू नये. कुलशीलसंपन्न, शांत, जितेंद्रिय, मातृभक्त, पितृभक्त, अग्निहोत्री, वेदपठन करणारा व स्वस्त्रीवश अशा

ब्राह्मणाला श्राद्धाला बोलवावें. श्राद्धाच्या पूर्व दिवशीं नम्र व ब्रह्मचर्यानें राहून श्राद्धदिवशीही तसेंच श्राद्ध करावें, म्हणजे उत्तम लोकाची प्राप्ति होते.' हा श्राद्धविधि ऐकून धर्मानें–'श्राद्ध मूळ कसें उत्पन्न झालें ?'–असा भीष्माला प्रश्न केला. तेव्हां भीष्म म्हणाला,–'स्वयंभुव मनूच्या अमदानींत त्याच्याच वंशांत दत्तात्रेय नांवाचा राजा होऊन गेला. त्याचा पुत्र तिमि व तिमीचा श्रीकांत. हा हजार वर्षे तप करून मरण पावला. त्याचा पुत्र, शोक करून विव्हल झाला असतां, आपल्या कल्पनेनें श्राद्धाला योग्य असे पदार्थ त्यानें मिळविले, व अमावास्येला प्रातःकालीं ब्राह्मणांस बोलावून पित्याला उद्देशून त्यानें यज्ञ केला. यज्ञ पूर्ण होतांच तो मनांत म्हणाला,-'मीं हें काय केलें ? यानें ऋषि व पितर यांना क्रोध तर येणार नाहींना ? असें म्हणून तो भीतिग्रस्त झाला, आणि त्यानें दत्तात्रेयाचें स्मरण केलें. स्मरण करितांच दत्तात्रय तेथें आला, व श्रीकांताच्या पुत्राला म्हणाला,–'अरे, हा पितृयज्ञ तूं मनानें कल्पून केलास हा धर्मच झाला. याची स्फूर्ति तुझ्यावांचून दुसऱ्या कोणाला होण्यासारखी नव्हती. तरी तूं भिऊं नकोस.' एवढें सांगून दत्तात्रेयानें त्याला आणखी कांही श्राद्धाचे अंगभूत प्रकार सांगितले, व नंतर परंपरेनें श्राद्धाचा प्रसार पृथ्वीवर झाला.

आतां छत्र, पादत्राणें, इत्यादि देण्याचा प्रकार ऐक. पूर्वी जमदग्नि खेळत असतां लक्ष्यावर बाण टाकी, व रेणुकेला ते परत आणावयास सांगे. ती पतीच्या आज्ञेप्रमाणें ते परत आणून देई. एके दिवशीं जमदग्नीनें तिला नित्याप्रमाणें बाण आणावयास सांगितल्यावर ती ते आणावयास गेली; परंतु वाटेंत ऊन लागल्यामुळें क्षणभर विश्रांति घेण्यासाठीं एका द्राक्षीच्या मंडपाखालीं बसली. त्यामुळें तिला परत यावयास जरा उशीर लागला. तेव्हा तो रागानें तिला उशीर होण्याचें कारण विचारूं लागला. रेणुका अगदीं भीतीनें कापूं लागली. ती म्हणाली,–'स्वामिनाथा, सूर्याच्या तापामुळें क्षणभर द्राक्षीच्या वेलीखालीं मी बसलें म्हणून उशीर झाला.' हें ऐकून जमदग्नि म्हणाला,—'सूर्यानें तुला पीडा केली, त्यालाच पहा आतां विधून खालीं पाडतों.' हा प्रकार पाहून सूर्य घाबरला, आणि ब्राह्मणरूप धरून जमदग्नीजवळ आला. व म्हजाला,-'मुने, आठ महिने किरणांनीं रस शोषून घ्यावा, व चार महिने जलवर्षाव करून व अन्न निर्माण करून प्राण्यांचें जीवन चाल

वावें, असें सूर्याचें कर्तव्य आहे. त्यांत त्याचा अपराध तो काय आहे ?' तेव्हां ऋषि म्हणाला,–' तूं सुर्य आहेस हें मी जाणलें. तरी तुझ्या किरणां-पासून पीडा होणार नाही. असा कांहीं उपाय सांग. तूं शरण आला आहेस, त्याअर्थी तुला मी आत्तां मारीत नाहीं.' हें ऐंणून सूर्यानें त्याला छत्र व पादुका देण्याचा प्रघात पडला. हीं देणारा इहपरलोकीं सुखी होतो. त्याप्रमाचेंच चंप कादि सूगंधि पुष्पें, धूर घृताचे दीप, इत्यादि देवांना दिल्यानेंही सुख प्राप्त होतें. जातळी, विहिरी बांधून जलदान करितात, ते उत्तम लोकास जातात. तसेंच आंबा, वड, इत्यादि शीतल छायेकरितां वृक्ष लाविल्यानेंही पूर्वजांचा होतो. याप्रमाणें अनेक दानें करून नानाप्रकारचें गोलोक. ब्रह्मलोक, इत्यादि लोकांस गेले असतां ब्रह्मदेवानें त्यांना विचारलें कीं, तुम्ही कोणत्या दानां-मुळें या लोकीं आलांत,' तेव्हां ते म्हणाले, देवा, आम्ही भागीरथीच्या तीरीं अनेक कोटि सुवर्णदानें निष्काम मनानें केलीं, त्या पुण्यामुळें तुमचें दर्शन झालें. याप्रमाणें उपवास करून उद्यापनार्थ जो ब्राह्मण भोजन घालतो, तो शेवटीं आपल्या पुण्याप्रमाणें उत्तम लोकास जातो.'

---

# अध्याय २९ वा



## मनुष्य अल्पायु होण्याचें कारण

याप्रमाणें भीष्मानें सांगितलेलें, दानमहात्म्य ऐकिल्यावर धर्मानें पुनः विचारलें कीं, ' आजोबा, मनुष्य शतायु आहे, असें वेदात सांगितलें असून तो आधींच कां बरें मृत्यु पावतो ?' धर्माचा प्रश्न ऐकून भीष्म म्हणाले– धर्मा, जे केलें असतां सत्कीर्ति व आयुष्य वाढतें, तें सदाचरण, आणि ज्यानें अधर्म आणि अकीर्ति वाढते, तें दुराचरण होय. पूरुष पुणीयु असला तरी तो दुराचरणानें अल्पायु होतो; व अल्पायु असतांही सदाचरणानें दीर्घायु होतो. मन क्रोधरहित ठेवून दुसऱ्यांचा हेवा न करणें, व सत्यवादी आणि श्रद्धाळु होऊन लोकांशीं सरळपणें, त्याप्रमाणें वागणें देहशुद्धि राखण्यासाठीं स्नानादिक करणें,याला आचार म्हणतात,व त्यानें पुरुष शतायु होतो.परंतु खद-

खदां हंसणें, मोठे घास घेणें, याच्या योगानें आयुष्याची हानि होते. चार घटिका रात्र उरली आहे अशा वेळी शयनावरुन उठून शौचामुखमार्जनादि-देहधर्म उरकून अंतःकरणांत परमेश्वराचें स्मरण करावें, व मातापितरांना नमस्कार करावा. परस्त्रीगमनाचा विचारही कधी मनात आणं नये. प्रातः-कालीं देवतापूजन करून शक्त्यनुसार दान धर्म, करावा, गो, ब्राह्मण आणि अग्नि यांना कधींही उच्छिष्ट अर्पण करूं नये. उच्छिष्टपणें चंद्रसूर्याचें दर्शन घेऊं नये. फुटक्या पात्रांत जेवूं नये. एक वस्त्र नेसून स्नान किंवा भोजन करूं नये व नग्नपणें स्नान किंवा शयन करूं नये. मस्तकावर थापटचा मारूं नये व शिर खाजवूं नये. शिरःस्नान करून मग तेलानें अंग माखूं नये. अनध्या-याच्या दिवशीं अध्ययन करूं नये. अनोळखी मनुष्याबरोबर परगांवी जाऊं नये. ब्राह्मण, क्षत्रिय आणि सर्प, यांचा अपमान करूं नये. ब्राह्मण, गाय, राजा, वृद्ध, माणसे, गरोदर स्त्री, यांना प्रथम मार्ग करून द्यावा. वाटेंत जातांना देवालय किंवा मोठें वृक्ष दिसल्यास त्यांना प्रदक्षिणा करून जावें. देव पितरांना दिल्यावाचुन भोजन करूं नये. कोणाला उद्वेग येईल असें कठोर वचन बोलूं नये. निरर्थक शब्द बोलूं नये; व अज्ञानानेही अमंगल शब्द बोलू नये. गो, ब्राह्मण. वेद, देव, वडील, यांची निंदा करूं नये. किटलेल्या आर-शांत स्वरूप पाहूं नये. पर्वकालीं स्त्रीगमन करूं नये आसनावर बसतेवेळीं तें ओढून त्यावर बसूं नये. डोक्यावर तांबडें फूल धरूं नये. एकादशीला नियमानें उपवास करावा व जेवते वेळीं चांडालादिकांचें दर्शन करूं नये. तीन वर्णाच्या पुरुषांनीं स्त्री, शेळी, उंटीण, हत्तीण, चमरी, यांचें दूध पिऊं नये. जेवतांना गोष्टी बोलूं नये. रात्रीं श्राद्ध करूं नये, जेवल्यावर केंस विंचरू नयेत, हातांत दिलेलें मीठ खाऊं नये, कुष्टिनी, अपस्मारी, इत्यादि रोगग्रस्त स्त्रिया व त्यांच्या कन्या यांशीं गमन करूं नये. मघा, रेवती हीं नक्षत्रें व ऋतूपासून पहिले चार दिवस व श्राद्ध दिवस टाकून स्त्रीगमन करावें. ऋतूपासून समदिनीं गमन केल्यास कन्या आणि विषम दिवशीं केल्यास पुत्र होतो, व एकंदर सोळा दिवसपर्यंत ऋतुकाल असतो. धर्मा, हे सर्व आचार योग्यपणें पाळणारा पुरुष शतायु होतो व उलट वागल्यास त्याचें आयुष्य क्षीण होतें,

## उत्तम तीर्थ कोणतें

याप्रमाणें सदाचार–लक्षणें सांगितल्यावर भीष्म धर्माला म्हणाला,– ‘सत्यभाषण व अगाध धैर्य ज्यांत आहे, असें मन हेंच सर्व तीर्थांत श्रेष्ठ तीर्थ होय. त्याचप्रमाणें मृदुपणा आणि सज्जनपणा हीही तीर्थें होत. भूतदया, इंद्रियनिग्रह, निर्लोभपणा, निरहंकार, औदार्य, हीं मानसतीर्थें होत. यांत स्नान केल्यास उत्तम लोकाची प्राप्ति होते. पूर्वी जी गंगादि तीर्थें सांगितलीं, त्यांत व या मानसतीर्थांत स्नान करणारा, निःसंशय मोक्षाचा अधिकारी होतो.

यावर धर्म म्हणाला,–‘हा प्राणी पंचभूतात्मक देह टाकून जाऊं लागला, म्हणजे त्याचेबरोबर कोण जातो बरें?’ भीष्मानें उत्तर दिलें,– ‘बा धर्मा, शरीर टाकून जाते वेळेस एकटा धर्म मात्र प्राण्याबरोबर येतो. धर्मानें मात्र जीवाला सुख मिळतें, व कुकर्मानें दुष्ट योनि प्राप्त होते. ब्राह्मण वेदाधिकारी असला, तरी पतितापासून त्यानें दान घेतल्यास तो नरकवास भोगतो, व मग गर्दभ, बैल, ब्रह्मराक्षस इत्यादि योनि फिरून, पुनः ब्राह्मणजन्मास येतो. पतिताचें आचार्यपण करणारा ब्राह्मण नरकवास भोगून कृमि होतो, व मग लांडगा व श्वान अशा योनींत जन्मून पुनः मनुष्य होतो. जो पुत्र मातापितरांचा नित्य अपमान करितो, तो गर्दभयोनींत जातो. जो धन्याचें अन्न खाऊन त्याचें उलट अहित चिंतितो, त्याला वानरयोनि प्राप्त होते. जो लोकांच्या ठेवी बुडवितो, तो शंभर हीन योनि भोगून शेवटीं कृमि होतो. परक्यांचा विनाकारण द्वेष करणारा हरिण होतो व विश्वासघात करणारा तो मत्स्याच्या जन्मास जातो. तील, उडीद, कुळीथ, शिरस, चणे, राळे, मूग, गहूं, इत्यादि इत्यादि धान्यें चोरणारा उंदीर होतो. एकाला कन्या देण्याचा निश्चय करून जो दुसऱ्यास देतो, तो कृमियोनींत उत्पन्न होतो. हीच अवस्था स्त्रीहत्या करणाराची होते. दुसऱ्यांचें भोजन चोरणारा मक्षिकेच्या, व मीठ चोरणारा चिडीपक्ष्याच्या जन्मास जातो. लोखंड चोरणारा कावळा होतो, कासें चोरणारा हारीण होतो, रुपें हरण करणाराल. कबुतराचा, सुवर्ण नेणाराला कृमीचा आणि धुतलेलें रेशमी वस्त्र चोरणाराला पशूचा जन्म प्राप्त होतो. देवकार्य व पितृकार्य आरंभून त्यांना मांसादिक न देतां आपणच भोजन करतो, तो कावळा होतो. ब्राह्मणस्त्रीशीं

व्यभिचार करणारा चांडालाच्या जन्मास जातो, व यमदूत त्याचे अनेक प्रकारांनीं हाल करितात. अशस्त्राचा वध करणारा गर्दभ होऊन अनेक यमयातना भोगतो. धर्मा, अशीं हीं नाना प्रकारच्या पापांची फले आहेत.

## धर्माचें फल

पापाचीं फलें ऐकिल्यावर, धर्माचें फल ऐकिण्याची इच्छा धर्माला झाली. तेव्हां भीष्म त्याला म्हणाले, 'धर्मा, पूर्वी सांगितलेलीं पापें केल्यावर पश्चाताप होऊन जो पुनः तीं कधींही न करण्याचा निश्चय करितो, त्याचें पाप हळुहळु कमी होत जातें. प्रथम अज्ञानानें पाप करून जो पुनः धर्मशील होऊन प्रायश्चित करितो, तो त्या पापापासून मुक्त होतो, मन ताब्यांत ठेवून श्रद्धापूर्वक प्रायश्चित करून जो सुपात्रीं अन्नादि दान करितो, व वेदाध्ययन करून पुनः सदाचारानें वागूं लागतो, तोही पापमुक्त होतो.

नंतर धर्मानें विचारिलें, 'भीष्मदेवा, अहिंसा–ध्यान, इंद्रियनिग्रह आणि गुरुसेवा या सर्वांत अधिक कल्याणप्रद कोणतें बरें?' भीष्म म्हणाला, 'अहिंसा आदिकरून सर्व धर्माचीं द्वारेंच होत. त्यांत अहिंसा हा श्रेष्ठ धर्म असून त्याच्या अनुषंगानें सर्व धर्म राहतात. आपल्याला जसें दुःख होतें, तसेंच दुसऱ्यालाही होतें असें जाणावें, असा विचार करून जे प्राण्यांचा वध करीत नाहींत, ते महापुण्यकर्ते होत. जो अश्वमेध करून पुनः यावज्जन्म मांस भक्षण करीत नाहीं, तोही महापुण्यवान् होय. पण जो आपलें मांस परमांसानें पुष्ट करितो, तो नरकांत घोर यातना भोगितो. अहिंसेसारखा दुसरा मोठा धर्मच नाहीं. जो अहिंसक आहे, तो मांस भक्षक कसा होईल? द्रव्य देऊन मांस घेणारा, दुसऱ्यानें दिलेलें मांस खाणारा व स्वतः प्राण्याला बांधून मारणारा, हे सारखेच पापी होत. यास्तव मांसभक्षक तो सर्व पापकर्ता व मांस वर्ज्य करणारा तो सर्व धर्मकर्ता असे समजावें.'

## कीटकोपाख्यान

पाप–पुण्याची व्यवस्था ऐकिल्यावर धर्म म्हणाला,—'सकाम किंवा निष्काम–बुद्धीनें युद्ध करून त्यांत पडणाराला कोणती गति मिळते बरें?' भीष्म म्हणाला,—'धर्मा, जो ज्या भावानें प्राणत्याग करितो, त्याला तशी

गति मिळते. एकदां व्यासमुनि वाटेनें जात असतां त्याला एक किडा आढळला. व्यासाला पाहून तो किडा त्याच्या बरोबर चालूं लागला. व्यासानें हें जाणून त्याला म्हटले;--' अरे, तूं अशी तांतडी करून कां चालतो आहेस? किडा बोलला,-' ऋषे, मागाहून थोरल्या वाटेनें बैलांचे घुंगुर व गाड्यांची चाकें वाजत आहेत. तेव्हां त्यांच्या खालीं सांपडून मी चुरडेन, या भीतीनें पळत आहे.'-हे ऐकून व्यास म्हणाला,--' अरे, तुला हा देह एवढा प्रिय कां वाटतो ? मनुष्यदेहावांचून इष्ट भोग भोगतां येत नाहींत ?' किड्यानें उत्तर दिलें.-' ऋषिनायका, जीव सर्वांना सारखाच प्रिय आहे, या देहांतच मला सुख वाटूं लागलें आहे. देहानुरूपच प्राण्याला विषय-सुख मिळतें. मी पूर्वजन्मीं शूद्र असून फार श्रीमान् होतो परंतु अतिशय कृपण असून बुद्धिमानांचा मला तिटकारा असे. परद्रव्य हरण करण्यांत तर मी फार तत्पर होतों. मी सर्वांना अपशब्द बोलून कष्टवीत असें, व देव-पिरांचा अपमान करीत असे. अशा स्थितींत असतांना मी एकदां मातेची व एका कुलशीलसंपन्न ब्राह्मणाची पूजा केली होती. त्या पुण्यामुळेंच मागील जन्मीचें स्मरण मला राहिले आहे. आतां मला सुख केव्हां होईल तें सांगावें.' यावर व्यासानें उत्तर केले,--' हे कीटका, कृतकर्म भोगल्याशिवाय सुटावयाचें नाहीं. तुला अद्यापि श्वान, घोरपड, वराह, हरीण, पक्षी या योनि भोगावयाच्या आहेत. त्या भोगल्यावर तूं राजा होशील, व माझें दर्शन झाल्यावर ज्ञानोपदेश घेऊन तूं ब्रह्मलोकाला जाशील.'-हें ऐकून कीटक आपल्या वाटेनें निघून गेला.

हें कीटकोपाख्यान ऐकून धर्मानें विचारिलें,-' विद्या तप आणि दान, यांत श्रेष्ठ कोणतें ?' भीष्म म्हणाला,- -' धर्मा, या विषयीं व्यास व मैत्रेय यांचा संवाद आहे तो ऐक. मैत्रेय ऋषि वाराणशींत रहात असतां, व्यास अज्ञात रूपानें तेथें गेला. मैत्रेयानें त्याची पूजा करून त्याला उत्तम भोजन दिलें. तें उत्तम कामिक अन्न भक्षण करून व्यासाला आश्चर्य वाटलें. तें मैत्रेय म्हणाला,--' व्यासदेवा, तूं हर्ष, क्रोध इत्यादिकांपासून मुक्त असतां, तुला या अन्नामुळें विस्मरणीय कां बरें वाटला ?' व्यासानें उत्तर केले; 'मला अन्नाचा विस्मय वाटला नाहीं. तूं तपस्वी आधींच शुद्ध, त्यांत माझ्यासारखा क्षुधार्त पाहून त्याला तूं अन्नदानानें संतुष्ट केलेस, तेव्हां तुला कितीतरी उत्तम लोकांची प्राप्ति होईल ! एवढें थोडें देऊन त्याचें मोठें फल मिळणार

म्हणून मला आश्चर्य वाटलें.' हें ऐकून मैत्रेय म्हणाला,--' तुम्ही दानाचें एवढें महात्म्य सांगतां व आपणही धर्म, विद्या व तप यांनीं संपन्न आहां. तरी सर्वांत श्रेष्ठ काय तें सांगा.' त्यावर व्यास म्हणाले; --' तपश्चर्येनें पापांचा नाश होऊन पुरुष निग्रह अनुग्रह करण्यास समर्थ होतो, व इंद्रादि लोकांची त्याला प्राप्ति होतें. तरी या सर्व तपादि धर्मांवर ताण करणारा असा दानरूप धर्म होय. यास्तव विद्या, तप आणि दान एकत्र मिळाल्यास लक्ष्मीची वृद्धि निःसंशय होते. धर्मा, असा हा दानमहिमा आहे.

## अध्याय ३० वा



### स्त्रियांचे आचार

भीष्म धर्माला म्हणाले, 'धर्मा, आतां तुला स्त्रियांच्या आचाराविषयीं सांगतों. ' पूर्वी कैकय्यकन्येनें शांडिल्य ऋषींच्या पत्नीला विचारलें कीं, ' तूं कोणत्या पुण्याच्या योगानें सर्व पापापासून मुक्त होऊन देवलोकांत विमानांतून फिरतेस ? व तुझी कांति चंद्रासमान असून तूं दिव्य वस्त्रें परिधान केलीं आहेस, हें कोणत्या पुण्याचें फळ आहे तें सांग !' हें ऐकून शांडिल्य-पत्नी म्हणाली, ' मीं कधींही भ्रताराला कठीण शब्द बोलले नाहीं, व त्याच्या सेवेत कधीं अंतर केला नाहीं. तो देव पितृ-कार्यें जीं जीं करी, ती ती करण्यांत मी त्याला त्याच्या मनाप्रमाणें साहाय्य करीत असे. सासू सासऱ्यांची मी नित्य सेवा करीत असे. मी कोणाशीं भांडलें नाहीं, किंवा पतीच्या आज्ञेशिवाय कधीं बाहेर गेलें नाहीं. पति घरी आला असतां मी मोठ्या संतोषानें त्याला आसन तांबूल देऊन त्याचे पाय रगडीत असे, व विंझण्यानें त्याला वारा घाली. कोणताही पदार्थ त्यानें खाल्ल्याशिवाय मी कधी खात नये. सकाळीं त्याच्या आधीं उठून रात्रीं त्याच्या मागून निजत असे. कुटुंब व सेवक यांना देऊन उरेल तें अन्न मी भक्षण करी. पति बाहेर देशी गेला असतां, मी सर्व भोगांचा त्याग करून, पतिसमक्ष मात्र चंदन, पुष्पमाला, काजळ गोरोचन इत्यादिकांनीं देह सुशोभित करून वेणीरचना

करीत असे. गृहांत अमकी वस्तू नाहीं, तमके पाहिजेच, असे मीं त्यानां कधींही बोललें नाहीं. व्यभिचारिणी स्त्रीशीं मी कधींही संबंध ठेविला नाहीं. अशा प्रकारच्या धर्मानें राहत असल्यामुळें मला ही विमानगति मिळाली आहे.

## काल माहात्म्य

मग धर्मानें विचारिलें असतां, भीष्म त्याला कालाचा महिमा सांगू लागले. ते म्हणाले,–' धर्मा, कालरूप विष्णूचा प्रभाव मीं तुला सांगितलाच आहे. त्याप्रमाणें महादेवाचाही सांगितला एकदां श्रीकृष्ण बारा वर्षे व्रत करीत असतां त्याचें तप पाहण्यासाठीं नारद, व्यास, धौम्य, कौशिक, जैगीष, देवल आदिकरून ऋषि तेथें आले. त्यांची कृष्णानें पूजा करून त्यांत आसनावर बसविलें व सर्वजण आनंदानें गोष्टी करूं लागले. अशा प्रकारें गोष्टी करीत असतां, कृष्णाच्या मुखांतून एकदम अग्नि निघाला व समोर असलेल्या पर्वतावरील सर्व वृक्ष, वेली, श्वापदें इत्यादिकांस त्यानें जाळून खाक केले. तेव्हां मोठा हाहा:कार होऊन अग्नि कृष्णाच्या चरणी लागला. नंतर कृष्णानें कृपाकटाक्षानें पर्वताकडे पाहून पुन: त्याला पूर्वीप्रमाणें सचेतन केलें. तें पाहून सर्व ऋषि आश्चर्यभरित झाले. त्यांचें आश्चर्य पाहून कृष्ण त्यांना म्हणाला,—' तुम्ही विचारज्ञ आणि निस्पृह व निर्भय असतां तुम्हाला असा विस्मय कां वाटला बरें ?' ऋषि म्हणाले, ' कृष्णा, तूं विश्वाचा मातापिता आहेस. अशी तुझी लीला ऐकिली होती, तीच आम्हीं आज प्रत्यक्ष पाहिली. तरी आम्हांला उत्पन्न झालेला संशय आतां दूर कर.' हें ऋषींचें बोलणें ऐकून, कृष्ण त्यांना म्हणाला,–' हा अग्नि माझ्या देहापासून पुत्राप्रमाणें निघाला, व त्यानें माझें वरदसामर्थ्य पाहाण्यासाठीं या पर्वतावें भस्म केलें, व त्याला मीं पुन: पूर्ववत् केले या मृगादि श्वापदांची तुम्हांला करुणा आल्यामुळें मी असें केलें, हें तुम्ही ज्ञानदृष्टीनें नीट पहा म्हणजे तुम्हांला समजेल. असो; पण आतां तुम्ही कोठें कांहीं विशेष आश्चर्य पाहिले असल्यास सांगा. हें ऐकून नारायणाचा भक्त असा नारदमुनि त्याला ईश्वरपार्वतीचा संवाद सांगू लागला. तो म्हणाला,–' पूर्वीं हिमालयावर शंकर तप करीत होते व त्यांच्यापुढें भुतें व रुद्रगण क्रीडा करीत होते; त्यांचें

यज्ञोपवीत दोन सर्पांचें होतें. व्याघ्रचर्माचें त्यांनीं उत्तरीयवस्त्र करून गजचर्म परिधान केलें होतें, व अप्सरा त्यांच्यापुढें नृत्य करीत होत्या. अशा प्रकारें शंकर आसनावर असतां सर्व देवगण त्यांना नमस्कार करण्यासाठीं आला. ऋषींही तेथें येऊन त्यांचा जयजयकार करूं लागले. अशा रितीनें आनंदानें ते सर्व सभेंत येऊन बसतात, तो पार्वतीही तेथें आली, तिनें आल्याबरोबर शंकराच्या विक्राळ दिसणाऱ्या नेत्रांवर हात ठवून ते झाकून टाकिले. त्याबरोबर विश्व अंधःकारमय होऊन, स्वाहाकार स्वधाकार बंद पडलें. तेव्हां शंकरानें आपला तिसरा नेत्र उघडिला. त्याबरोबर त्यांतून ज्वाला निघूं लागून, बारा सूर्य आकाशांत प्रकट झाले कीं काय, असे वाटूं लागले. हिमालयावरील सर्व प्रकारच्या वनस्पती व लता जळून मृग सिंह आदिकरून श्वापदें अगदीं दीन होऊन गेलीं. हा प्रकार पाहून हिमालय व पार्वती चिंताक्रांत झाली. हे जाणून महादेवानें कृपादृष्टीनें पर्वताकडे पाहिलें त्याबरोबर तो पूर्वींहून आधिक चांगला झाला. हें पाहून पार्वती संतुष्ट झाली व शंकराला तिसऱ्या डोळ्यांतून प्रलयाग्नि निघण्याचें कारण विचारूं लागला तेव्हां शंकर तिला म्हणाला,–‘ पार्वति तूं पोराप्रमाणें माझे डोळे झांकिलेस तेव्हां मला तिसरा नेत्र उघडावा लागला. प्राणिमात्राचें रक्षण करण्यासाठीं मी तो नेहमीं झांकून ठेवीत असतो, तो आता उघडल्यामुळें त्यांतील अग्नीनें पर्वताला जाळून टाकिलें; परंतु तुझा पिता जळल्यामुळें तुला खेद झालेला पाहून मी त्याला पुनः पूर्ववत केलें. ’ हें शंकराचे भाषण ऐकून पार्वतीला संतोष वाटला. ती म्हणाली.–‘ महादेवा, तुझीं चारी वदनें कोणतीं व त्यांत दक्षिण मुख सर्वांत क्रूर कां, तसेंच या तुझ्या जटा कबऱ्या कां ? तसेंच हातीं पिनाक कंठ निळा व वहान नंदी, असें कां ? व तूं ब्रह्मचर्यानें कां राहतोस ?’ तेव्हां शंकर तिला म्हणाले,–‘ पार्वती, ब्रह्मदेवानें तिलोत्तमा नांवाची सर्वांत सुंदर अप्सरा उत्पन्न केली, ती पाहण्यासाठीं मी चतुर्मुख झालों. उत्तर मुखानें मी तुझ्याशीं क्रीडा करित असल्यामुळें ते सौम्य झाले. पश्चिम मुखानें मी ऋषीवर अनुग्रह करितों, व पूर्व मुखानें ईश्वरत्वाचा व्यापार करितों त्यामुळें तीही सौम्य झालीं आहेत आंता उरलें दक्षिण मुख तें घोर व संहारक झालें आहे. मी जटा व ब्रह्मचर्य हीं लोकहितार्थ धारण केलीं आहेत, व देवांच्या रक्षणासाठीं हातीं पिनाक घेतला आहे. आणि कपिल गाईच्या उत्पत्तीच्या वेळीं नंदी माझें वाहन झाला आहे.’

## धर्माचें लक्षण

हीं उत्तरें ऐकून पार्वतीनें शंकराला धर्माचें लक्षण विचारिलें. तेव्हां शंकर म्हणाला,–' अहिंसा, सत्यभाषण भूतदया, शांति, दान, परदापराङ्मुखता, कोणी दिल्याशिवाय न घेणें, मद्यमांसाचा त्याग करणें, इत्यादि गोष्टींना धर्मलक्षणें म्हणावे त्याचप्रमाणें वेदाध्ययन, शास्त्रपठन, वेदमार्ग. ब्रह्मचर्य, गुरूसेवा, लक्षणोक्त विवाह, हीहीं धर्माची लक्षणें आहेत पहिल्या पद्धतीनें स्त्रीला वरून गृहस्थाश्रमानें अग्नीचें आराधन करावे. व अतिथीं अभ्यागतांचा परामर्श घ्यावा. स्त्रीपुरुषानी रात्रंदिवस एकमतानें वागावे. हा ब्राह्मणाचा गृहस्थाश्रमधर्म होय. क्षत्रियांनी स्नानसंध्या करुन विप्रद्वारा अग्निहोत्र करावे. वेदाध्ययन करून प्रजेचे पालन करावें, व यथाशास्त्र दंड करून व यथोचित शब्द बोलून दुःखितांचें रक्षण करावे, अशा रितीनें वागून जो युद्धांत प्राण सोडतो, त्याला अश्वमेधाचे पुण्य लागते. वैश्यानें पशुपालन करून व्यापार करावा, व सत्य बोलून अध्ययन करावें. इंद्रियांना ताब्यात ठेवून व सौम्यपणें राहून ब्राह्मणांचे स्वागत करावे. त्यानें तिळ, सुगंधि वस्तु लाख, मीठ, इत्यादिकांचा विक्रय करू नये. शुद्रानें गुरु व देव यांची पूजा करून ब्राह्मणाची सेवा करावी, सत्य भाषण सर्वांना सामान्यच आहे. गृहस्थाश्रमानंतर वानप्रस्थाश्रम आणि संन्यासाश्रम. वानप्रस्थाश्रमांत वनांत जाऊन तेथे अग्निहोत्रादि कर्में करून शीतोष्णादि द्वंद्वें सहन करावीं. व शेवटी जटा धारण करून ब्रह्मनिष्ठ व्हावे. संन्यासाश्रमांत पर्णकुटीत राहून वैराग्य संपन्न व्हावें, व सुखदुःख समान मानून त्रिकाल स्नानसंध्या करावी. हात हेच पात्र समजून त्यात भोजन करावे, व कोणत्याही विषयावर आसक्ती न धरतां अध्यात्मशास्त्रांत मन घालावे. पार्वती, वर्णाश्रम फार श्रेष्ठ आहे. हीन कर्मे केल्यानें ब्राह्मण शूद्र होतो. व उत्तमकर्में करून शूद्रही ब्रह्मनिष्ठ होवू शकतो.. हे वर्णाश्रमधर्म पुरुषाचें होत. आतां पार्वति सावित्री जशी ब्रह्मदेवाची किंवा लक्ष्मी विष्णूची, त्याप्रमाणें तूं माझीं जगप्रसिद्ध प्रिय पत्नि आहेस. तरी तूं आपल्या मुखानें आतां मला पतिव्राताधर्म सांग.

## पतिव्रता धर्म.

शंकराचे भाषण ऐकून पार्वतीं म्हणाली, 'देवाधिदेवा, ज्याप्रमाणें

पुरूषाचा मित्र पुरूष, त्याप्रमाणें स्त्रियाचेही मित्र स्त्रियाच असतात. तरी मीं तापी, रेवा, शरयू, गंगा, सरस्वती, इरावती, चंद्रभागा, इत्यादि ज्या नद्या अखंड आपल्या सेवेला आहेत, त्यानां पतिव्रताधर्म विचारून आपल्याला सांगते. 'असे म्हणून पार्वती नद्यांकडे गेली. व त्याच्याशी पतिव्रता धर्मांची विचारपूस करून परत शंकराकडे आली; व म्हणाली, 'स्वामी मला जे कळलें, ते मी तुम्हाला सांगते. मातापितरानी ब्राह्मण, अग्नि व सूर्य यांना साक्षीं ठेवून कन्या वराला दिलेलीं असतें, व ब्राह्मणानी तिला 'भर्तृसहचारिणी हो' असा उपदेश केलेला असतो. म्हणून स्त्रीनें या उपदेशाप्रमाणें वागावे. गोड स्वभाव धरून पतीवर नित्य लक्ष ठेवावे, व भर्त्यानें खंती केलीं तरी आपण त्याबद्दल खंती करूं नये. त्याला निष्ठूर वचन कधीहीं न बोलतां त्याची मेहमी सेवा करावी, त्याच्या समोर शरीर शुद्ध व अलंकृत ठेवावे. पति दरिद्री, रोगी असला तरी त्याची सेवा करण्यांत अंतर करूं नये, स्त्रियांना सर्व तीर्थें व व्रतें भर्तृसेवा हीच होत, असे जीं मानते. तींच खरी पतिव्रता होय, असा हा पतिव्रताधर्म पार्वतीनें सांगितला.

---

# अध्याय ३१ वा



## सर्वांचा कर्ता हर्ता कोण ?

नारद कृष्णास म्हणाला, ' देवा, शिवाचीं सभा थोडीशी विसर्जन झाल्यावर ऋषींनी त्याला प्रश्न केला कीं, 'कर्ता, हर्ता व कालस्वरुप कोण? तेव्हां शंकर म्हणाले, ' जो निर्गूण वासुदेव तोच सर्वाचें मूळ होय. सर्व विश्व त्याच्या आंत असून तो त्रैलोक्याचे रक्षण करण्याराठीं अनेक रुपे धारण करितो. मनूच्या वंशात सुद्युम्न, नहुष, ययाति यदु कोष्टा इत्यादि क्रमानें शूरसेन नामक राजा अवतीर्ण होऊन त्याच्या वसुदेव नामक पुत्राच्या घरी मूर्तिमंत 'ब्रह्म' असा वासुदेव अवतीर्ण होणार आहे. तोच कालरूपी असून सर्वांचा कर्ता-हर्ता होय. ऋषीहो, तुम्हीं व मी त्याचीच पूजा करूं ते राम-कृष्णरूप बंधु पुरातन विष्णुस्वरूपीच होत. नारद म्हणाला, कृष्णा

शंकर आमच्यापाशी असे बोलत आहे. तो सर्व हिमाचल अंधकार व धूम्र व्याप्त झाला. मग आम्ही वाट फुटेल तिकडे दाही दिशांनी चालू लागलो असतां पाठीमागे वळून पहातो तो हिमालय मुळीच नाहीसा झाला, नंतर आम्ही फिरता फिरता या ठिकाणी आलो, व जसे तेथे ऋषींनी पाहिलें, तेंच आम्हाला येथें तुझ्याजवळ दिसले. कृष्णा,' तुझें दर्शन झाल्यानें आम्ही आज कृतार्थ झालो. 'असें म्हणून सर्वांनी कृष्णाला नमस्कार केला.

याप्रमाणें धर्ममहात्म्य सांगून भीष्म धर्माला म्हणाला, ' धर्मा, त्या कृष्णाच्या पुजनानेंच तुला जय व किर्ती प्राप्त होतील. हाच विश्वाचा हेतू-भूत महापूरुषाच्या पूजा नानाप्रकारच्या आहेत. अनेक ऋषींनी त्याची अनेक नामे केली आहेत, नाना तीर्थांच्या स्नानापेक्षां या विष्णुसहस्रनामाच्या जपानेंच विष्णून संतोष होऊन, धर्म, अर्थ, काम व मोक्ष यांची प्राप्ति होते. तें सहस्त्रनाम मूळ भारतांत सांगितलें आहे. तें तूं अवश्य पहा.

राम रामेति रामेति रमे रामे मनोरमे ।
सहस्त्रनाम तत्तुल्यं रामनाम वनारने ॥

## सहस्त्रार्जुनाची गोष्ट

मग भीष्म म्हणाला, ' धर्मा, वर्णामध्यें ब्राह्मणास श्रेष्ठ कां मानतात. त्या संबंधीं तुला एक गोष्ट सांगतों.' महिश्मती नगरीस सहस्त्रार्जुन नांवाचा राजा राज्य करीत असतां त्यानें दत्तात्रेयात्ती उत्तम सेवा करून त्याला प्रसन्न करून घेतलै. तेव्हां दत्तात्रेयानें त्याला तीन वर दिलें. मग सहर्जुनानें सहस्त्र हस्त, आसमुद्रांत पृथ्वीचे राज्य, इत्यादि त्याच्यापासून मागून घेऊन तो धर्मानें प्रजेचें पालन करूं लागला. परंपु एके समयीं तो राज्यमदानें उन्मत्त होऊन माझ्यासारखा निग्रहानुग्रह करावयास कोणीच समर्थ नाहीं, असें म्हण लागला. तेव्हां आकाशवाणीनें असें सांगितलें कीं, ' अरे, निग्रहानुग्रहाला एक ब्राह्मण मात्र समर्थ आहे. त्याच्या प्रसादानेंच हें सामर्थ्य इतरांना मिळतें. हें ऐकून सहस्त्रार्जुनानें ब्राह्मणांसच जिंकण्याची प्रतिज्ञा करून सैन्य तयार केलें, त्यावेळीं वायु सहस्त्रार्जुनाकडे जाऊन त्याची समजूत करण्यासाठीं म्हणाला,—' राजा, ब्राह्मणाचा पराभव केल्यास राष्ट्रांत क्षोभ उत्पन्न होईल व तुझा नाश होईल. तुला सहस्त्रहस्त कोणाच्या प्रसादानें मिळाले याचा वचार कर. ब्राह्मणांना असलेलें मोडण्याची व नसलेलें नवीन करण्याची

शक्ति आहे. भूमि जिंकून त्यांना दान द्यावी. याविषयी तुला प्राचीन कथा सांगतों ती ऐक. ' सोमाची भद्रा नांवाची कन्या विवाहांत उतथ्य ऋषीला दिली होती. तो तिच्यासह सुखानें नांदत असतां, एकदां त्याची स्त्री जलाशयावर स्नान करावयास गेली तोंच वरुणानें तिला धरली, व बलात्कारानें तो तिला भोगूं लागला. हें वर्तन नारदानें त्वरित उतथ्याला कळविलें. वरुणाला चार समजुतीच्या गोष्टी सांगून स्त्रीला परत आणावयास उतथ्यानें नारदाला सांगितलें. त्याप्रमाणें नारद वरुणाकडे गेला, परंतु तो कामोन्मत्त झालेला असल्यामुळें नारदाचें म्हणणें ऐकेना. तेव्हां नारद तसाच उतथ्याकडे आला. उतथ्यानें संतापून समुद्राचें पाणी शोषून टाकिलें तेव्हां मात्र वरुण व्याकुल होऊन भद्रेला घेऊन उतथ्याला शरण आला सहस्त्रार्जुना, आतां तूंच सांग बरें, यांत मोठा कोण तो ? दुसरीहि अशीच गोष्ट आहे. पूर्वी दैत्यांनीं ब्राह्मणांचा पराभव केल्यामुळें यज्ञादि हव्यकव्य कर्मे बंद पडून देव पितर दुःखी झाले. तेव्हां त्यांनीं अगस्त्याला भेटून त्याला सर्व वर्तमान सांगितलें. अगस्त्यानें तें ऐकून आपल्या मुखावाटे तपोबलानें अग्नीचे लोळ सोडून दैत्यांची राख करून टाकिली. अशा प्रकारे ब्राह्मणांनीं दुष्टापासून पृथ्वीचें रक्षण केलें आहे. तर आतां ब्राह्मण व क्षत्रिय यांत श्रेष्ट कोण हें तूंच सांग याप्रमाणेंच अत्रि, च्यवन, वसिष्ठ, यांचा महिमा आहे. ते रुष्ट झाल्यास इंद्रादिकांचाही क्षय करतील. तरी, हे सहस्त्रार्जुना, तूं गर्व धरून अनुचित असें कांहीं करूं नकोस.' याप्रमाणें वायूनें सहस्त्रार्जुनास उपदेश करून त्याची समजूत केली.

## बहुला गाईची कथा

हीं कथा ऐकल्यावर धर्मानें सत्यधर्माचें महात्म्य काय, तें सांगण्याविषयी भीष्मास विनंति केली तेव्हां भीष्मानीं त्याला बहुला गाईची कथा सांगितली. ती अशी:–' मथुरा देशांत चंद्रावती नांवाचें अतिशय सुंदर नगर होतें. हा सर्व देश धनधान्यांनीं समृद्ध असून यांत अनेक प्रकाराचे विद्वान् लोक असत. चंद्रावती नगरीच्या उत्तरेस सिंहादि हिंस्त्र पशूंनीं व्यापिलेलें असें एक निबिड अरण्य होतें. त्यांत कामरूप नांवाचा एक थोरला वाघ नित्य राहत असें. अरण्याजवळ उत्तम गवताची कुरणें होतीं. त्यांत चरण्यासाठी एकदां एका ब्राह्मणाची बहुला नांवाची सुंदर गाय कळप सोडून गेली

तिला पाहतांच कामरूप वाघ एकदम उडी मारून पुढें आला. त्याला पाहून बहुला घाबरली, व चंद्रमुख नांवाच्या आपल्या नूतन वत्साचें तिला स्मरण हुंबरडा फोडून रडूं लागली. वाघानें तिला रडण्याचें कारण विचारितां तिनें सांगितलें कीं, ' माझा पहिलाच सुंदर वत्स घरीं आहे. त्याला मोहानें मी अजून पान्हाहि दिला नाही, व त्याला कोणाच्या स्वाधीनही केलेलें नाहीं. तरी, तूं जर आज्ञा देशील तर त्याला पान्हा देऊन मी परत घेईन, व मग तूं मला भक्षण कर.' वाघानें उत्तर दिलें,' अगे, मेल्यावर पुत्र कसला आणि काय कसलें ? पण तूं एकदां घरीं गेल्यावर परत येशील हें संभवतें तरी काय ?' गाय म्हणाली, मी असत्य कधीं बोललें नाहीं. जर मी परत आले नाहीं, तर मला अनेक पापें लागोत. ब्राह्मण व आचार्य अग्नींत हवन करीत असतां, त्यांना अडथळा करणाराचें पातक माझ्या माथी येवो. तसेंच द्रव्य घेऊन वेदविक्रय करणारा व थोडक्यात संतोष न बाळगणारा ब्राह्मण मद्य-मांस विकणारा वैश्य दुसऱ्याचा उत्कर्ष न सहन करणारा, पतिची अवज्ञा करणारी स्त्री, चोरी करुन पोट भरणारा, विषप्रयोग करणारा, इत्यादि सर्व पापे मला लागोत. ' हें ऐकून वाघ मनांत म्हणाला, ' हिच्या बोलण्याची एकदां प्रतिती तर पहावी. ' असा विचार करून त्यानें तिला घरी जाण्याची आज्ञा केली. मग ती दीनवदनानें घरी आली. तिच्या मैत्रिणीं दीनपणानें कारण विचारता तिनें वाघाचा वृत्तांत सांगितला. व पुत्राला लवकर पान्हा पिण्याविषयीं सांगून ती म्हणाली, 'मला लवकर वाघाकडे गेलें पाहिजे,' तें ऐकून तिचा वत्स म्हणाला, 'माते, तूं घरी रहा, व मीं त्या वाघाकडे जाऊन तुझे वचन पुर्ण करितो, ' असें म्हणून तो वाघाकडे जावयास तयार झाला, परंतु त्याला परोपरीनें उपदेश करून बहुला म्हणाली, ' वत्सा, अरे सत्व मेलें म्हणजें राहिले काय ? वनांत चरताना अति लोभ करून कळप सोडून जाऊ नयें, व नेंहमी सावध रहावें; एवढे लक्षांत ठेव म्हणजे झाले? 'असे त्याला सांगून व आपल्या सोबतिणीचा निरोप घेऊन बहुला वाघाकडें आली. तिचे सत्य पाहून वाघ म्हणाला;-'असें सत्य पशुयोनीत आहे हे मोठे आश्चर्य होय. गाई तूं आता खुशाल घरी जा. तुला मरण येणें योग्य नाही. जेथे तुझ्यासारख्या सत्वशील गाई आहेत तो देश धन्य आहे. तसेच तेथील राजाही धन्य होय. तुझ्या दर्शनानें माझी दुष्टबुद्धी नाहीशी झाली, मी अतःपर हिंसा करणार नाही

असे वाघ म्हणत आहे, तो देवांनी त्याला विमान पाठविले; व त्यातून तो स्वर्गास गेला आणि ती बहुला गाय आपल्या वत्साकडे परत आली. हे बहुलाख्यान फार पवित्र आहे.

वैशंपायन जनमेजयास म्हणाले,–'राजा, यानंतर भीष्मानें धर्माचा संशय दूर करण्यासाठीं त्याला अनेक कथा सांगितल्या. त्या शांति व अनुशासन या पर्वात इतिहास-समुच्चय म्हणून प्रसिद्ध आहेत- या कथा सांगितल्यावर भीष्म क्षणभर स्तब्ध राहिला. व्यास म्हणाला,–'भीष्मा, हा धर्मराज व कृष्ण, आदिकरून सर्व मंडळी घरी जावयास उत्सुक झाली आहेत तरी त्याना आज्ञा दे.' हे ऐकून भीष्मानें सर्वांना आज्ञा देऊन सांगितले, –'आता उत्तरायण होईल, तेव्हां सर्व सामुग्रीसह तुम्हीं येथे परत या.' नंतर सर्व मंडळी त्याला नमस्कार करून हस्तिनापुरास परत आली. तेथे धर्माला राज्यावर बसवून, पांडवानी नीतीनें राज्य चालू केलें. मग पन्नास दिवस झाल्यावर, उत्तरायण सुरु झाले असे पाहून चंदनादि, कर्पूर, फुले, इत्यादि सामुग्री घेऊन ते सर्व धृतराष्ट्रासह कुरूक्षेत्रास पुन: आले, शरशय्येवर भीष्माला पाहून सर्वानी त्याला वंदन केले. भीष्मानें डोळे उघडून पाहिले, तो सूर्य उत्तरेकडे वळला आहें. तेव्हां माघ महिना सुरु झाला होता. आपला अंतःकाल आता जवळ आला असे पाहून, भीष्मानें धृतराष्ट्राला सांगितले कीं '‘धर्म हा साक्षात् यमाचा अवतार आहे. तरी त्यावर नेहमी कृपादृष्टी ठेव. दुर्योधनानें आपल्या कर्मामुळें सर्वांना संकटात पाडिले. पण तें आता असो. मी आता निजधामास जातो. सर्वांचीं मजवर कृपा असावी. हा कृष्ण साक्षात् ईश्वर आहे. असे नारदानें मला सांगितले आहे. 'असें बोलून व कृष्णाला नमस्कार करून, ॐनमः असें म्हणून भीष्मानें आपला प्राण बाहेर काढिला. तो तेजाचा गोल पाहून देव आनंदीत झाले, व त्यानीं पुष्पवृष्टी केलीं. मग गंगेच्या तीरावर त्याची उत्तरक्रिया उत्तमप्रकारे केली. गंतामातेनेंही आपलें दुःख त्यावेळी प्रकट केले, तेव्हा तिचें सांत्वन करुन पांडव हस्तिनापूरास आले. तेथे सर्व लोकांनी ध्वजा–तोरणानी नगर उत्तम शृंगारुन मोठा उत्सव केला. आणि मग धर्म आदि करुन सर्वांचा निरोप घेऊन श्रीकृष्ण द्वारकेस गेला,

वैशंपायन म्हणालें,–'जनमेजया, ही भारतातील दोन पर्वें म्हणजे मोक्षाची ठेवच होत· भीष्माची पवित्र वाणी म्हणजे भाविकांचे पाप दूर

करणारी पवित्र गंगाच होय. तींत स्नान केल्यास भक्ति, ज्ञान व वैराग्य याचीं वृद्धी झाल्याशिवाय राहाणारच नाही. असो; याप्रमाणें हा तेरावा स्तबक पूर्ण झाला. आता पुढच्या स्तबकात अश्वमेधादि पांच पर्वांचा वृत्तांत यावयाचा आहे. मधुकर कवी म्हणतो आठव्या स्तबकापासून व्यासंदिष्ट मार्गानें मी कल्पतरुची रचना केली; ही श्रीकृष्णाची कृपाच होय. अनंत शस्त्रे व पुराणें याचे अवलोकन करुन त्यांचा अंत लावण्याची शक्ति नाही, परंतु प्राकृत लोकाना हरिकथेची गोडी लावण्यासाठीं मी हा लहान प्रयत्न केला आहे, त्याच्या श्रवणानें भक्ति ज्ञान व वैराग्य, ही श्रोत्यांच्या मनात उत्पन्न होतील, अशी आशा आहे.

**स्तबक तेरावा समाप्त**

# स्तबक चौदावा



## अध्याय १ ला



### ईशस्तुति

हे परात्परा, तू ओंकार स्वरूप असून निर्गुण व सगुणही आहेत. हें परिपूर्ण अनंता, तुला मी नमस्कार करितों. हे मंगलकारका तुझा जयजयकार असो. तूं अनंत कोटि ब्रह्मांडांचा नायक आणि स्वयंप्रकाश असून योगिजनांच्या मणीरूपी चकोराला चंद्राप्रमाणें आहेस. तुझी अनंत नामे असून तुझ्या अनंत लीलांचें संत महंत सदासर्वकाल वर्णन करीत आहेत. अशा तुला अनन्य भावानें नमस्कार करून कथाकल्पतरू ग्रंथाला मीं आरंभ केला. तरी तो आतां मजकडून तूं पूर्ण करीव. तूं कृपाकटाक्षानें सर्व विघ्नांचा नाश करितोस, यास्तव विश्वविनाशक हे नांव तुला अगदीं यथार्थ आहे, हें गजानना, मला अज्ञाला ग्रंथ रचण्याची बुद्धि दे, अशी प्रार्थना केल्यावर गजाननानें प्रसन्न होऊन, माझ्या वरानें तुझा ग्रंथ संपूर्ण होईल, अशी खूण दिली. मग मीं ब्रह्मदेवाची कन्या व ज्ञानाची केवळ नदीच, अशी जी वीणापुस्तक धारिणी शारदा तिची मजकडून ग्रंथ वदविण्याविषयीं मी प्रार्थना केली, आणि या भवसमुद्राचें पैल तीर दाखविणारे जे परात्पर श्रीगुरु त्यांचाही प्रसाद घेतला. तरी आतां मी व्यासोक्त कथा सांगावयास आरंभ करितों.

### ग्रंथवर्णन

श्रीमद् व्यासांनीं संस्कृतांत जी अठरा पुराणें व भारत आदिकरून ग्रंथ केले, तेच मीं संक्षेपानें श्रोत्यांना महाराष्ट्र भाषेंत सांगत आहे. मागें तेरावा स्तबक पूर्ण झाला, आतां या चौदाव्यांत अश्वमेध प्रकरण सांगावयाचें आहे, व्यासकृत मूळ महाभारतांत अश्वमेध प्रकरण थोडक्यांत सांगितलेलें आहे, जैमिनीनें त्याहून अधिक सांगितलें आहे. आतां मी त्या दोघांचाही आशय संक्षेपानें सांगून, शिवाय इतर ग्रंथांच्या आधारानेही अनेक कथाप्रसंग

त्यांत योजिले आहेत. नामापाठकांचा एक अश्वमेध ग्रंथ मराठी भाषेंत आहे. तोही मोठ्या प्रयत्नानें मीं मिळवून आणिला आहे. शैशिळेपलीकडे परमाचल कामण्ण भट्ट नांवाचे एक गृहस्थ होते. त्यांच्या घरी तेलगू लिपींत लिहिलेले प्राचीन संस्कृत पुस्तक होतें नामापाठकानें तेथें जाऊन पंडितांकडून तें वाचविलें आणि त्याचा तात्पर्यार्थ मनांत आणून प्राकृतांत लिहिला त्या ग्रंथांतील प्रसंगही कथा जुळविण्यासाठीं. या कथाकल्पतरूंत मी घेतले आहेत, असो, यानंतर जनमेजय राजाला ऋषि आनुशासनिक पर्वांतील कथाभाग सांगू लागला, वैशंपायन म्हणाले,--

## अश्वमेधाचा आरंभ

"राजा, आनुशासनिकांत सांगितलेला वृत्तांत आटोपल्यावर, कित्येक दिवसांनीं पांडवांनीं अश्वमेध आरंभिला. त्यावेळीं भीष्माचार्य स्वर्गस्थ झाल्यामुळें धर्माला अत्यंत दुःख झालेलें होतें. त्याचें सांत्वन करण्यासाठीं व्यास त्याच्याकडे आले असतां धर्मानें त्यांना विचारिलें,-' हे महर्षे, माझ्या हातून घडलेल्या बांधवांच्या क्षयाचें पातक नष्ट होईल, असा कांहीं उपाय मला सांगा. भीष्मावांचून हें राज्य सुखावह वाटत नाहीं, भीमानें राज्य करावें व मी तीर्थयात्रेला जावें, असें मला वाटतें.'-हें ऐकून व्यास म्हणाले, -' धर्मा, अश्वमेध केल्यानें सर्व पातकांचा क्षय होतो. तरी तूं व्यर्थ मनाला खंती घेऊं नकोस, तुला राज्य प्राप्त झालें आहे, त्याचें तूं धर्मानें रक्षण कर.' तेव्हां धर्म म्हणाला,--' ऋषे, तुम्ही म्हणतां हें खरें; परंतु मला द्रव्याचें साह्य नाहीं, आणि प्रजेला पीडा करून द्रव्य मिळविणें तर मुळींच उचित नाहीं. मग अश्वमेध कसा करावा ? व्यासांनीं उत्तर केलें,--' राजा, पूर्वी मरुत्वांताच्या एका पूर्वजानें यज्ञांत ब्राह्मणांस द्रव्यराशी दिल्या होत्या. त्यांना नेववत ना, म्हणून त्यांनीं त्या हिमालयावर टाकिलेल्या आहेत तें द्रव्य घेऊन ये, व तूं यज्ञ कर.' धर्म म्हणाला,--महाराज, ब्रह्मस्व घेणें हें अधमाचें कृत्य; तें मी कसें करूं ? तेव्हां व्यास म्हणाले,--' धर्मा, तूं राजा असल्यामुळें त्या द्रव्याचा तूंच स्वामी आहेस. दुसरा त्याचा स्वामी उरलेला नाहीं. यास्तव तें तूं खुशाल घे.'-याप्रमाणें द्रव्याची चिंता दूर झाल्यावर धर्मानें व्यासांना यज्ञविधीची माहिती विचारिली तेव्हां व्यास म्हणाले,-- ' धर्मा, वीस हजार याज्ञिक बोलावून प्रत्येकाला एक एक सहस्र गाई, अश्व

रथ आणि हत्ती देऊन एक भार सुवर्ण–दक्षिणा द्यावी. गाईच्या दुधासारखा शुभ्रवर्णाचा, पिवळ्या पुच्छाचा, शामवर्ण आणि सुंदर आयाळ असलेला अश्व डोक्यावर पत्र बांधून, चैत्री पूर्णिमेला सोडावा, व त्याच्या रक्षणासाठीं बंधु व पुत्र सैन्यासह बरोबर पाठवावे. हा जेथें जेथें मलमूत्र सांडील तेथें तेथें धर्मशाळा विहिरी बांधून उत्तम मूर्तींची स्थापना करावी. सर्व राजांना जिंकून द्रव्यभांडार जमवावे. आणि एक वर्षानंतर तो श्यामकर्ण अश्व परत आला म्हणजे त्याचें हवन करावें. अश्व माघारा येईपर्यंत यजमानानें असिधाराव्रतानें रहावें.' व्यासाचें भाषण ऐकून धर्म म्हणाला,–'श्रीकृष्ण द्वारकेस गेल्यामुळें आपल्याला त्याचें साहाय्य येथें मिळणार नाहीं. यामुळें यज्ञ करणें मोठें कठीण दिसतें.' तेव्हां भीम म्हणाला, 'दादा कृष्ण जवळ नाहीं असें उगीच कां म्हणतां ? प्रत्येक कार्यात त्याचें आपल्याला साह्य आहे. हेंही कार्य तो सिद्धीस नेईल. तुम्हीं अश्व कोठून आणावयाचा तें मात्र व्यासांना विचारून घ्या.' तेव्हां व्यासांनीं सांगितलें, कीं, 'भद्रावती नगरींत यौवनाश्व राजाजवळ श्यामकर्ण अश्व आहे, तो तुम्हीं आणावा. परंतु त्याच्या रक्षणासाठीं त्या राजानें दहा अक्षौहिणी सैन्य ठेविलेलें आहे. यासाठीं सावधपणानें वागा म्हणजे झालें.' हें ऐकून, भीम कृष्णाचें स्मरण करून म्हणाला,–' मी त्या अश्वाला घेऊन येतों.' त्या वेळीं कर्णाचा पुत्र वृषकेतूही त्याच्याबरोबर जावयास तयार झाला. आपल्या पित्यानें म्हणजे कर्णानें अन्यायी कौरवांची बाजू उचलिल्यामुळें, अर्जुनाला त्याचा वध करावा लागला, व त्यायोगानें कर्णाला सूर्यलोकाची प्राप्ति झाली, हा त्याच्यावर उपकारच झाला, असें म्हणून वृषकेतूनें पांडवांच्या मनांतील आपल्याविषयींचा किंतु अगोदरच काढून टाकिला होता. तेव्हां या प्रसंगीं त्याचें हें भाषण ऐकून भीमाला संतोष झाला. त्यानें घटोत्कटाचा पुत्र जो मेघवर्ण, त्याला हांक मारून सांगितलें कीं, 'मेघवर्णा, तुझ्या पित्यानें आम्हांला गंधमादन पर्वतावर वाहून नेलें होतें. त्याचा पराक्रम मोठा होता; परंतु दुर्दैवानें तो रणांत पडला आतां तूं आणि अर्जुन मिळून मीं श्यामकर्ण अश्वाला घेऊन येईपर्यंत धर्माचें रक्षण करा.' हें भाषण ऐकून, मेघवर्ण म्हणाला,–'ताता, पित्याप्रमाणेंच माझेंही बल दाखविण्यासाठीं मी तुम्हांबरोबर येतो. आणि अश्वाला खाद्यावरून येथें आणितों. तुम्हीं दोघांनीं तेथें युद्ध करून अश्वाला हस्तगत

करून घ्यावे. मेघवर्णाचें हें भाषण ऐकून, धर्माला मोठा आनंद झाला, मग पांडवांनीं व्यासांची बोळवण करून त्यांना रजा दिली.

## श्यामकर्णाचें हरण

नंतर रात्रीं सर्वजण विचार करण्यासाठीं एकत्र बसले असतां, अकस्मात् तेथें श्रीकृष्ण हजर झाले. धर्मानें त्यांची यथोचित पूजा करून त्यांना आसनावर बसविलें व मध्यरात्रीं अकस्मात् आल्याबद्दल आश्चर्य प्रकट केलें. तेव्हां द्रौपदी म्हणाली,–'यांत आश्चर्य वाटण्याचे कारण नाहीं. कृष्णदेवानें सर्व संकटापासून आपलें रक्षण केलें आहे, तरी या प्रसंगीं तो स्वस्थ कसा राहील ?' यानंतर सर्वांचा हास्यविनोद झाला. त्या वेळीं कृष्ण म्हणाला,–'धर्मा, भीमाच्या सांगण्यावरून तूं यज्ञाला प्रवृत्त झालास, तरी तुला या स्थूलोदर व खादाडाची माहिती नाहीं काय ? याची स्त्री कोण तर हिडिंबा राक्षसी, हा मंदबुद्धि सर्व पृथ्वीवरील राजांना काय जिंकणार!' कृष्णाचें हें भाषण ऐकून, भीम राग आल्यासारखें दाखवून म्हणाला,–'महाराज, आपलें स्मरण करूनच मी ही बुद्धि धरिली. अरे कृष्णा, तूं मला बोललास तें सर्व तुलाही लागू आहे. तुझें तरी पोट कोठें लहान आहे ? त्यांत तर सर्व विश्वें भरून राहिली आहेत. तूही बाइलबुद्धीचा असून, अस्वली जी जांबुवती तिच्याशीं विवाह केलास.' याप्रमाणें विनोद होऊन सर्वांना आनंद झाला असतां, कृष्ण म्हणाला,–'धर्मा, तूं बंधुक्षयाच्या पापाला भितो आहेस तर तें सर्व मजकडे दे.' भीमानें उत्तर केले, 'कृष्णा, तुला जें द्यावे तें अनेक पट होऊन परत मिळतें, असे आहे. यासाठीं तुला पाप न देतां, अश्वमेधाच्या पुण्याचें उदक मात्र तुझ्या हातावर आम्हीं घालूं.'

नंतर दुसऱ्या दिवशीं सूर्य उगवल्यावर भीम वृषकेतु आणि मेघवर्ण हे कुंतीनें दिलेली शिदोरी घेऊन भद्रावतीस गेले. तेथील रम्य उपवनें आणि फलपुष्पांनीं भरलेलें वृक्ष पाहून त्या तिघांना मोठा आनंद झाला. इतक्यांत एका सरोवरावर यौवनाश्वाचा श्यामकर्ण घोडा पाणी प्यावयास आला. त्याला पाहून भीम म्हणाला, 'मी या अश्वाचें आतां हरण करतों.' मेघवर्ण म्हणाला,–'मीं जवळ असतां आपण त्रास कां करितां ?' असें बोलून त्यानें आपल्या राक्षसी मायेनें एकदम धुरळा उडविला, आणि तो घोड्याला घेऊन

आकाशांत गेला. त्याची गर्जना ऐकून इंद्रालाही आश्चर्य वाटलें, आणि हा प्रकार काय आहे, तें पहाण्यासाठीं त्यानें आपले दूत मेघवर्णाकडे पाठविले. त्यांना आपला वृत्तांत सांगून मेघवर्णानें त्यांस परत पाठविलें. तें वर्तमान ऐकून इंद्राला संतोष झाला. इकडे यौवनाश्वाचे दूतही त्याला घडलेला वृत्तांत सांगूं लागले. तो ऐकतांच यौवनाश्व मोठ्या क्रोधानें सैन्यासह मेघवर्णाशीं युद्ध करण्याकरितां निघाला. त्यांचा घनघोर संग्राम झाला. त्यांत भीमानें यौवनाश्वाच्या सुवेग सामक पुत्राला मूर्च्छित केलें. तें पाहून राजानेंही भीमावर हल्ला करून त्याला मूर्च्छित केला आणि वृषकेतूला पळवून लावण्यासाठीं तो त्याकडे वळला. परंतु वृषकेतूनें त्याचे बाण तोडून त्याला जखमी केलें व आपणच पुन: त्याच्यावर पाणी शिंपून त्याला सावध केलें. हें पाहून यौवनाश्व त्याची स्तुति करून म्हणूं लागला, 'अरे, तूं मला जीवदान दिलें; तरी तूं कोण हें मला सांग.' त्यानें सर्व वृत्तांत सांगितला. हा प्रकार चालला आहे, इतक्यांत भीम सावध झाला, व मेघवर्णहि तेथें आला. तेव्हां युद्ध समाप्त करून राजानें त्या सर्वांना आपल्या नगरांत नेलें, आणि त्यांची पूजा करून ते सर्व नागरिकही यज्ञासाठीं म्हणून धर्माकडे यावयास निघाले भीमानें पुढें जाऊन धर्माला सर्व वृत्तांत सांगितला. तेव्हां तोही यौवनाश्वाला सामोरा गेला. नगरांत प्रवेश केल्यावर द्रौपदी यौवनाश्वाच्या राण्यांना मोठ्या आनंदानें भेटली. याप्रमाणें श्यामकर्णाला आणिल्यावर चैत्री पूर्णिमेला कृष्ण द्वारकेस निघून गेला.

पुढें एके दिवशीं धर्माच्या आज्ञेवरून भीम कृष्णाला आणण्यासाठीं द्वारकेस गेला. त्यावेळीं मंदिरांत कृष्ण भोजनास बसला होता व त्याच्या पुढें नानाविध पक्वान्नांनीं भरलेलें ताट वाढिलेलें होतें. भीम बाहेर आला आहे, असें जाणून कृष्णानें दासीला सांगून त्याला तेथेंच उभें केलें. तेव्हां भीमाला राग आला आणि तो म्हणाला; ' मला बाहेर उभा करून कृष्ण स्त्रियांसह घरांत जेवित बसला आहे, त्यास दुष्काळ पडला आहे, कीं अन्न महागलें आहे ?" हें ऐकून कृष्ण पापडांचा व सांडग्यांचा अधिकाधिकच आवाज करूं लागला. तो ऐकून तर भीमाला अधिकच राग आला, व तो म्हणाला,—' या कृष्णाचा गळा बहुतकरून सुईणीनें मुसळानें विधिला असावा, नाहीपेक्षां त्याच्या घशांत घास अडकला असतां !' याप्रमाणें विनोदानें भीम कृष्णाची निंदा करीत असतां, कृष्णानें त्याला आंत बोलावलें आणि जेवावयास सांगितलें. तेव्हां तो म्हणाला,—'कृष्णा आतां मला जेवणाची गरज नाहीं. तूं

तृप्त झालास म्हणजे सर्व त्रिभुवन तृप्त होते.' याप्रमाणें थोडा वेळ दोघांचा विनोद झाल्यावर भीमानें सर्वांना यज्ञाचे निमंत्रण दिलें; व त्याप्रमाणें सर्व यादवांसह कृष्ण हस्तिनापुरास यावयास निघाला.

# अध्याय २ रा



## यौवनाश्वाला श्यामकर्णाची प्राप्ति

यौवनाश्वाला श्यामकर्णाची प्राप्ति कशी झाली, हें जाणण्याची इच्छा होऊन धर्मानें व्यासांना प्रश्न केला. तेव्हां व्यास म्हणाले, 'धर्मा, यौवनाश्वाच्या नगरीचा तट उंच गगन चुंबित आहे. एके दिवशीं सूर्य आकाशांतून मार्ग आक्रमींत असतां, त्याचा रथ त्या तटाला लागून अडखळला. त्यावेळीं सूर्यानें क्रोध होऊन तो पाडला व रथाला वाट केली. मग एके दिवशीं यौवनाश्व प्रधानासह शिकारीस जात असतां, आपल्या शहराचा तट फोडलेला पाहून त्यानें चवकशी केली. तेव्हां नगररक्षकांनी झालेला वृत्तांत त्याला सांगितला. तो ऐकून यौवनाश्व संतापला आणि त्यानें सूर्याबरोबर युद्ध सुरू केलें यौवनाश्वाला सूर्यांवर मोहनास्त्राचा प्रयोग करुन त्याला मुर्च्छित केलें, व आकाशांत जाऊन तो त्याच्या पुढें उभा राहिला. तेव्हां सूर्य सावध झाला, व आपला पराभव झाला असें पाहून त्याला लाज वाटली. परंतु यौवनाश्व हा आपला वंशज (सूर्यवंशी राजा) असें जाणून त्यानें त्याला हा श्यामकर्ण दिला; आणि सांगितलें कीं, 'या अश्वाला रविवारीं उदक पिण्यास द्यावें. इतर वारीं दिल्यास विघ्न होईल; करितां याचें रक्षण नीट करा. सूर्यानें याप्रमाणें सांगितल्यावर यौवनाश्व श्यामकर्णाला घेऊन नगरांत आला, आणि त्यांनें त्याच्यावरून कुरवंडी केली. भीम, वृषकेतु आणि मेघवर्ण भद्रावतीस गेले, त्यावेळीं अश्व सैन्यासह सरोवरावर आला होता. अश्वाला पाहतांच मेघवर्णानें मायेनें मगराचें रुप घेतलें व सरोवरांत प्रवेश केला, इतक्यांत अश्व तेथे येऊन पाणी पिऊं लागला. तों त्या मगराला पाहून बुजला. त्या वेळी त्याचे रक्षक घंगाळांत पाणी घेऊन त्याला पाजूं

लागले. इतक्यांत मेघवर्ण त्याला घेऊन आकाशांत गेला. अशीही पुराणांतरीं कथा आहे असो, त्यानंतर यौवनाश्वानें आपली कन्या वृषकेतूला दिली आणि तो परिवारासह हस्तिनापुरास आला.

## कृष्णाचें हस्तिनापुरास आगमन

इकडे द्वारकेहून श्रीकृष्णही कुटुंबासह नगराबाहेर येऊन उतरले. नंतर त्यानीं विश्वकर्म्याला बोलावून तेथें द्वारकेसारखें एक सुंदर नगर तयार करविले व त्यांत सर्व यादवांना विश्रांति दिली. श्रीकृष्ण सर्व परिवारासह आलें असें समजतांच धर्म आपल्या बंधुवर्गासह तेथें आला, व त्यानीं सर्व पाहुण्यांचा सत्कार केला. द्रौपदीनें स्त्रियांची भेट घेऊन सर्वांना वस्त्रालंकार वाटले इतक्यांत श्रीकृष्ण द्रौपदीला भेटण्याकरितां तेथें आले. त्याना पाहून द्रौपदीला अवर्णनीय आनंद झाला. कृपाकटाक्षानें आपल्या भगिनीकडे पाहून कृष्णानें तिला अलिंगन दिलें व त्याचप्रमाणें सुभद्रेला भेट देऊन ते धर्माकडे गेले त्यांचें भाषण चाललें असतां धर्म म्हणाला,—'कृष्णा, तुझ्या कृपाप्रसादानें आमचा अश्वमेध आतां सिद्धीस जाईल.' ते ऐकून कृष्णानें अश्व पाहण्याची इच्छा दर्शविली. तेव्हां धर्मानें श्यामकर्णाला सभेंत आणविलें. त्याला पाहून कृष्णाला संतोष झाला. त्यावेळीं अश्वाला पहाण्यासाठीं सर्व यादव गोळा झाले गोपिनींही त्यावरून आरत्या ओवाळून त्याची पूजा केली, व सर्व लोक आनंदित झाले. इतक्यांत तेथें एक अनर्थ उद्‌भवला.

## शामकर्ण हरण

अनुशल्य नांवाचा दैत्यांचा राजा त्यांप्रसंगीं आकाश मार्गानें संचार करीत असतां धर्माच्या सभेच्या वर आला आणि अंतराळीं स्थिर होऊन खालीं पाहूं लागला. इतक्यांत त्याचे वीर मोठमोठ्यानें गर्जना करीत खालीं उतरले, व श्यामकर्णाला घेऊन चालते झाले. तो प्रकार पाहून तेथें एकच हाहा:कार उडाला, आणि सर्व यादव वीर युद्धाला प्रवृत्त झाले. तेव्हां अनुशल्यानें आपल्या सैन्याला उत्तेजन देऊन सांगितलें कीं,—'तुम्ही कृष्णाला जिंकून धरून आणल्यास तुमच्या श्रमाचें मी सार्थक करीन. आज लढण्याची शिकस्त करून यादवांना भूमीवर लोळवा. मी तुमचे उपकार कधींही विसरणार नाहीं. बापहो, असेंही करून कृष्णाला धरून आणा.' हें अनुशल्याचे

भाषण ऐकून सर्व सैन्याला स्फुरण चढलें व ते मोठ्या आवेशानें यादवांवर तुटून पडले. श्रीकृष्ण सिंहासनावर बसले होते, त्यांना हा प्रकार पाहून मोठा विस्मय वाटला, व त्यांनीं हातांत विडा घेतला. परंतु तो उचलण्यासाठीं कोणीही पुढें येईना. तेव्हां मदनानें तो विडा उचलून प्रतिज्ञा केली,—' मी अनुशल्याला जिंकून धरून आणतो, तसे न झालें तर रुक्मिणीच्या पोटीं मीं पाषाण जन्मलों असें समजावें.' असें बोलून तो रथावर चढला आणि धनुष्याची दोरी चढवून लढण्यास पुढें सरसावला. इतक्यांत अनुशल्याचा एक वीर त्याच्यावर चाल करून आला. त्यावेळीं श्रीकृष्णाला आपल्या पुत्राविषयीं मोह उत्पन्न होऊन, त्यांनीं दुसरा विडा घेतला. तो वृषकेतूनें उचलून प्रतिज्ञा केली कीं,—' मी अनुशल्याला धरून न आणिल्यास आपल्या मातेला व्यर्थ शीण दिला असें समजेन.'–असें बोलून तो रथावर चढला व युद्धाला निघाला. इकडे मदन दैत्यसैन्याचा भयंकर संहार करीत चालला असतां अनुशल्य त्यावर धांवत आला, आणि बाणानें त्याला रथासह उडविलें व कृष्णाजवळ पाडिलें. मदनाला पडलेला पाहून कृष्णाला क्रोध आला. व तो त्याला म्हणाला,—' धिक्कार असो तुला, प्रतिज्ञा हरवून अधमासारखा परत कशाला आला ?' हे कृष्णाचे शद्ब ऐकून भीम कृष्णाला म्हणाला,–' देवा, हा प्रद्युम्न वीर प्रतिज्ञा असत्य करणारा नव्हे. अनुशल्यानें याला बाणानें उडविलें त्यायोगे तो येथें आला. त्यानें रणांत पाठ दाखविलेली नाहीं तुम्हीं याच्यावर व्यर्थ कोप कां करितां ? असें बोलून भीम गदा घेऊन कोपलेल्या रुद्राप्रमाणें अनुशल्याच्या सैन्यांत शिरला आणि अनुशल्याच्या वीरांचा व हत्ती घोडे यांचा चुराडा करूं लागला. त्या वेळीं प्रेतांचे जिकडे तिकडे ढीग पडले, आणि पृथ्वीवर रक्ताचा पूर वाहूं लागला. हें पाहून अनुशल्य अत्यंत क्रोधाविष्ट होऊन भीमावर धांवला. परंतु भीमानें त्याच्या रथाचा चुराडा करून त्याला खालीं पाडिलें, इतक्यांत अनुशल्यानें तोल संभाळून एका बाणानें भीमालाही उडविलें, आणि कृष्णाच्या शेजारी नेऊन पाडिले. त्याला पाहून श्रीकृष्ण स्वतः रथावर चढून लढण्यासाठीं निघाले. कृष्णाला पाहतांच सर्व दैत्य पळूं लागले. तेव्हां वृषकेतूनें पाठलाग करून त्यांचा नाश केला. मग त्यानें अनुशल्याच्या रथाचे घोडे मारून सारथ्याचें शिर उडविलें, आणि आणि प्रत्यक्ष अनुशल्यालाही मूर्च्छित करून भूमीवर पाडिलें. नंतर त्याचे

केश धरून वृषकेतूनें त्याला ओढीत कृष्णाच्या पायांवर आणून टाकिलें, आणि तो म्हणाला,—' देवा, माझी प्रतिज्ञा सत्य झाली. हा आपला दैत्य घ्या.'—हें पाहून कृष्णाला संतोष झाला. आणि त्यानें वृषकेतूला प्रेमानें आलिंगन दिलें. नंतर अनुशल्याला शांत करून कृष्णानें सांगितलें कीं,—तुम्हीं आम्ही मिळून धर्माचा अश्वमेध सिद्धीस नेला पाहिजे.'-हें ऐकून अनुशल्याला आनंद झाला, तो म्हणाला,—' देवा, मी सर्वस्वी तुमचा आहे. आज्ञा कराल तें करायला मी तयार आहे.'—याप्रमाणें अनुशल्याला जिंकिल्यामुळें यज्ञसिद्धीचें हें एक शुभ चिन्ह समजून धर्माला आनंद झाला,

## यज्ञाचा आरंभ

नंतर धौम्यादि सर्व ऋषि सभेंत जमले असतां त्या श्यामकर्णाल कृष्णानें तेथें आणिलें. मग धर्माच्या हस्तांत यज्ञकंकण बांधिलें. त्या वेळीं ब्राह्मणांनीं वेदघोष सुरू केला, व वाद्यांच्या गजराने आकाश दुमदुमून गेलें. जमलेल्या सर्व राजांची पूजा झाल्यावर, कृष्णानें अर्जुनाला बोलावून त्याच्या मस्तकावर वरदहस्त ठेविला, आणि त्याला सांगितलें कीं,—' पार्था, या अश्वाबरोबर तूं जा, आणि पृथ्वी जिंकून सर्व पदार्थ आण. जो अश्वाला धरील त्याच्याशीं युद्ध कर; आणि जे करभार देतील त्यांचा आदर कर. माझे छपन्न कोटि यादव, यौवनाश्व, सुवेग, अनुशल्य आणि वृषकेतु यांनाही बरोबर घे. अवघड प्रसंगीं तुमचें रक्षण करावयास तयार आहेच.' कृष्णाच्या आज्ञेप्रमाणें अर्जुन अश्वाबरोबर नघाला. त्यावेळीं वृषकेतुचे नीट रक्षण करण्याबद्दल कुंतीनें अर्जूनाला पुन; पुन: बजावून सांगितले. नंतर अर्जुन कवच व कुंडलें घालून आणि धनुष्यबाण घेऊन रथावर आरुढ झाला. व नगराबाहेर येऊन उभा राहीला इकडे वृषकेतूनेंही अंत.पुरात जाऊन आपल्या परम स्त्रिनें म्हणजे यौवनाश्वाची कन्या जी नम्रदंती, तिनें वाढलेल्या भोजनाचा प्रेमानें स्वींकार करुन तिल सांगितले की, 'मी अश्वाबरोबर जात आहे, पण कुंतीमातेची तूं मनोभावे सेव करीत जा,' तिनें उत्तर केले, 'महाराज, कुंती माझी दुसरीच माता आहे आपल्या आज्ञेप्रमाणें मी वागेन, व माझ्या सत्कुलाला योग्य असेंच आचरण करीन. आपल्याला सर्वकार्यांत विजय असो. 'याप्रमाणें निरोप घेतल्यावर वृषकेतूही रथांत बसून नगराबाहेर येऊन अर्जुनास मिळाला नंतर उत्तम मुहूर्त पाहून कृष्णाने धर्माकडून, अश्वाची पूजा करविली, व त्याच्या

मस्तकावर पत्रिका बांधून त्याला सोडून दिलें, व त्याच्या मागून सर्व सैन्य चालू लागलें, व त्यावेळीं वाद्यांचा गजर, रथाचे धडधडाट, व सैन्यांच विजयसूचक आरोळ्या, यांनी पृथ्वी दुमदुमून गेली,



# अध्याय २ रा

## श्यामकर्णाचे प्रयाण

दुसऱ्या अध्यायांत सांगितल्याप्रमाणें श्यामकर्ण पुढे व त्याच्या मागाहून वृषकेतु, कृतवर्मा, अर्जून, कृष्णपुत्र, प्रद्युम्न, यौवनाश्व, सुवेग, अनुशल्य मेघवर्ण असे वीर अफाट सैन्याभारासह चालू लागले, त्यांच्याबरोबर अठरा लक्ष सुलक्षणी हत्ती व असंख्यांत छत्रचामरे होती, प्रत्यक्ष श्रीकृष्ण ज्याचा सहाय्यकर्ता त्या पांडवाना कसली कमतरता असणार असो. याप्रमाणें अश्व निघाल्यावर प्रथम त्यानें पश्चिम दिशेस जाऊन कृष्णाला मान दिला मग उत्तर दिशेकडे तो चालू लागला, इतक्यांत एक विपरीत गोष्ट घडून आली.

## गणपतीचा कोप

अश्व निघण्यापूर्वी सर्वजण गणपतीस नमस्कार करावयास विसरले होते. आणि ते कोणाच्या लक्षांतही नव्हते. असो; अश्व उत्तर दिशा संपून वायव्येकडे वळला, व त्याच्या मागोमाग अनेक नगरे व अरण्ये ओलांडीत तें सैन्य भवानीच्या बाह्ळीक वनांत आलें. मोठ्या प्रयासानें ते ओलांडिल्यावर ते एका बागेशीं आले. तेथें गणपतीचें देवालय होतें. ते पाहून घोड्यानें त्याला प्रदक्षिणा केली, व तो गणपतीपुढें येऊन उभा राहिला. मागाहून त्याचे रक्षक आले, त्यांनींही गणपतीचें दर्शन घेतलें. इतक्यांत घोड्यानें मूर्तीजवळ अंग घासलें, त्याबरोबर तोही गणपतीस्वरूप होऊन राहिला. हें पाहून रक्षक धांवत अर्जुनाजवळ गेले आणि झालेला वृत्तांत त्यांनीं त्याला सांगितला. तें ऐकून अर्जुनाला फार आश्चर्य वाटलें व तो सर्व वीरांसह

देवालयापाशीं आला. तों त्याला तेथें दोन गणपती दिसले. अश्वाचा गणपती झाला, असें पाहून अर्जुन चिंताग्रस्त झाला. इतक्यांत तेथें एक भवानीची भक्ति करणारी स्त्री त्याच्या दृष्टीस पडली. तिला पाहतांच अर्जुनानें तिला नमस्कार करून तिची विनवणी केली. तेव्हां ती म्हणाली, 'अर्जुना, तूं चिंता करूं नकोस. हें बाहाळवन आहे, हिंगुळाजमाता भवानी येथें राज्य करीत असून तिची मी भक्तीण आहे. पलीकडे भवानीचें देऊळ आहे तेथें तूं जा, म्हणजे ती तुला अश्वाची सर्व हकीकत सांगेल.' तिच्या सांगण्याप्रमाणें अर्जुन तेथें गेला व देवीला प्रदक्षिणा करून तिची स्तुति करूं लागला. अर्जुनाची स्तुति ऐकून पार्वती प्रसन्न झाली. तेव्हां अर्जूनानें अश्वाला सोडण्याविषयीं तिची प्रार्थना केली. देवी म्हणाली, 'तुम्हीं माझ्या पुत्राची प्रथम पूजा केली नाहीं, म्हणून असा हा प्रकार झाला आहे.' असे म्हणून तिनें गणपतीला हाक मारून सांगितलें; कीं, 'हा यज्ञ कृष्णाचाच आहे, यांत कांहीं अन्याय झाल्यास त्या देवाधिदेवाचा आपल्यावर कोप होईल, यासाठीं घोडा देऊन स्नेह करणेंच योग्य आहे.' पार्वतीचें असें भाषण ऐकून गणपतीनें उत्तर केलें, 'माते, यांनीं आमचा अव्हेर केला आहे. म्हणून कांहीं झालें तरी मी वारू परत देणार नाहीं.' मग अर्जुन गणपतीच्या पाया पडून नम्रतेनें म्हणाला, 'देवा, आमच्याकडून घोर अपराध घडला तरी कृपा करून क्षमा कर आणि अश्व परत दे.' भवानीनेंही पुनः त्याला सांगितलें, 'जर तूं माझा खरा पुत्र असशील, तर अर्जुनाचा घोडा परत दे.' हें ऐकून मात्र गणपतीनें घोडा सोडून दिला.

मातेच्या आग्रहास्तव जरी गणपतीनें घोडा सोडिला, तरी त्याचा राग कांहीं शांत झाला नव्हता. पुनः कांहीं वेळानें त्यानें अश्वाची गतीच कुंठित करून टाकिली. कांहीं केलें तरी घोडा पुढें पाऊल टाकीना. शेवटीं दिवस मावळला! तेव्हां सर्व सैन्यानें तेथेंच मुक्काम केला. नंतर अर्जुन वृषकेतूला बरोबर घेऊन पुनः भवानीकडे आला, व तिची प्रार्थना करून घोडा चालूं लागण्यास काय उपाय करावा, म्हणून विचारूं लागला. तेव्हां हिंगुळामाता म्हणाली, 'पार्था, भिण्याचें कांहीं कारण नाहीं. तुम्ही प्रथम गणपतीची अवज्ञा केल्यामुळें, तो हे सर्व खेळ करीत आहे. कोणत्याही कार्याच्या प्रारंभीं त्याची पूजा करावी तेव्हांच सुख होतें. तो तुम्हांवर रागवला आहे. त्यामुळें हीं विघ्नें येत आहेत.' असें बोलून हिंगुळाजेनें पुनः गणपतीला हाक

मारिली, व ती त्याला म्हणाली, बा गणनाथा, हें सैन्य कृष्णाचें असल्यामुळें तें आपलेही आहे. तरी आपणच आपल्याशी विरोध करणें बरें नव्हें. त्याच्या चुकीबद्दल झालेले कष्ट त्याना पुरे आहेत. आतां त्याच्याशीं सख्य कर.' नतर अर्जुनानेंही गणपतीच्या चरणीं लीन होऊन अनेक प्रकारें त्याचीं स्तुति केली. मग गणपतीनें प्रसन्न होऊन त्याला आलिंगन दिलें, आणि तो म्हणाला; 'अर्जुना, आतां मी तुझें विघ्न निवारणारा आहे. जा, आतां तुझा नेहमी विजयच होईल.' असें बोलून घोड्याचा जडपणा काढून घेतांच घोडा चालू लागला. नंतर गणपतीची आज्ञा घेऊन सर्व निघाले. त्यावेळीं गणपतीनें अर्जुनाला सांगितलें, 'पार्था, पुढच्या पर्वतावर गंधमादन नावाचा दैत्यपति आहे. त्याच्या हातीं अश्व न लागेल अशा सावधपणानें तुम्ही चला.' गणपतीच्या सूचनेप्रमाणें अर्जुन सावधपणें चालू लागला.

## पार्वती हिंगूळा कां झाली

एवढा कथाभाग ऐकिल्यावर जनमेजय म्हणाला,-'मुने, पार्वती हिंगळा कां झाली, आणि गणपतीनें घोड्याला दोन वेळां विघ्न कां केले, तें ऐकण्याची इच्छा आहे.' मुनी म्हणाले-'राजा, आदिशक्तिपासून तीन देव उत्पन्न झाले. त्यांत विष्णूनें दैत्यांच्या अनेक कुलांचा नाश केला, तेव्हां लवणासुर नांवाच्या एका प्रबल दैत्यानें घोर तपश्चर्या करून शंकराला प्रसन्न केलें, व विष्णूला मीं मारावे असा त्यापाशी त्यानें वर मागितला शंकरानें 'होय' म्हणताच विष्णूला मोठी काळजी उत्पन्न झाली, आणि तो तसाच मेरूच्या शिखरावर गेला. तेथें गेल्यावर त्यानें शंकराला प्रसन्न करून घेतलें. तेव्हां शंकरानें त्याला सांगितले कीं, 'याच वेळेस जाऊन तूं लवणासुराचा वध कर.' शंकराची अशी आज्ञा होतांच विष्णु दैत्याला मारावयास गेला; परंतु हातांत शस्त्र नाहीं असें पाहून तो चिंताग्रस्त झाला. इतक्यांत एक शशृंग हरिण त्याच्या दृष्टीस पडला. याचें शिंग उपटून हत्यार करावें म्हणून विष्णु पुढें गेला, तों तो हरिण पर्वताच्या शिखरावर पळून गेला. तेव्हां विष्णूला राग आला, व त्यानें हरिणाला 'जन्मकालीं तुझें पुढचे पाय चलन करणार नाहींत.'-असा शाप दिला. नंतर विष्णूनें त्याला पकडलें; व त्याचीं शिंगें उपटून तीं त्यानें त्याच्याच नाभीत खुपसलीं याच्या योगानें हरिणाची नाभि सुगंधयुक्त झाली. त्या नंतर शिंगाचे हत्यार

करून विष्णूने लवणासुराचा वध केला. तेव्हांपासून त्याचे–शाङ्र्गधर–असें नांव प्रसिद्ध झालें, व कस्तूरीमृगाची उत्पत्ति तेव्हांपासूनच झाली. पुढें रावणाच्या भयानें शंकर त्या वनांत राहूं लागले. तेव्हां गंगेला घेऊन शंकर कोठें गेले, हे पार्वतीला न समजून ती हिंगुळरूपानें फिरत फिरत या वनात आली व शंकरास भेटली. अशी कथा लिंगपुराणात आहे. असो; गणपतीनें घोडा दोन वेळां का अडविला, त्याचें कारण असें -प्रथम आपली अवज्ञा झाली म्हणून व दुसऱ्या वेळीं युद्ध करावें म्हणून गणपतीनें वारूला अडविलें. परंतु अर्जुनानें युद्ध न करितां हिंगुळेची प्रार्थना करून सुटका करून घेतली. त्यामुळे दोन्ही विघ्नें दूर झाली.

## गंधमादन दैत्याची कथा

पुढें तो अश्व सैन्यासह वाद्यांच्या गजरात उत्तर दिशेनें चालला असतां, वाटेंत एक गगनचुंबित पर्वत आला. त्यावर चढून तो घोडा एका गुहेशीं गेला आणि तेथें जमीन हुंगू लागला. हा विपरीत प्रकार पाहून सर्व लोक आश्चर्य करूं लागले. इतक्यांत गंधमादन दैत्यानें गुहेतून बाहेर येऊन अश्वाला आंत नेलें, व पुन: तो बाहेर आला. तेव्हां वृषकेतु आणि अर्जुन त्यावर बाण सोडूं लागले; पण त्या दोघांनाही क्रमानें उचलून तो दैत्य विवरांत घऊन गेला. हा प्रकार पाहतांच सर्व वीर गर्भगळीत होऊन श्रीकृष्णाचें स्मरण करूं लागले. इकडे श्रीकृष्ण हें संकट जाणून भीमासह निघालें व सैन्याला येऊन भेटले. मग दैत्य विवराचें द्वार बंद करीत असता, भीमानें त्याला पकडलें आणि वर उचलून त्याच द्वारावर आपटून ठार केलें दैत्याचा नाश होतांच विवर मोकळें झालें, व वृषकेतु आणि अर्जुन घोड्यासह बाहेर आले, आणि कृष्णाला भेटलें. गंधमादन मेला तेव्हां त्याच्या शरिराच्या दुर्गंधीनें सर्व वन भरून गेले; त्या दुर्गंधीचा पुढें हिंग झाला. द्वापारयुगापर्यंत जिऱ्याची फोडणी देत असत; परतु या वेळेपासून पुढें हिंगाची फोडणी द्यावयाचा प्रघात सुरू झाला. हिंग हें त्याचें नांव प्रथम कृष्णानें ठेविलें. असो. त्या दैत्याचें प्रेत नंतर त्यांनीं समुद्रांत टाकून दिले. समुद्रानें लाटेबरोबर तें उडविलें, तेव्हां तें भार्गवगिरीवर येऊन पडलें. तेथेंही हिंगाचें दुसरें स्थान उत्पन्न झालें. त्याचीं जीं हाडें समुद्रांत राहिलीं त्यांपासून स्वागाही पदार्थ झाला. सोनें रुपें गाळण्यांत आणि कांच करण्यांत याचा उपयोग होतो.

वैशंपायन म्हणाले,--' राजा गंधमादन आणि गंधमालती अशीं दोन भावंडें मयूर पर्वतावर जन्मलीं. पुढें गंधमालतीचा विवाह झाला, तेव्हां तिच्या पतीचा गंधमादनाशीं विरोध पडून गंधमादन या पर्वतावर येऊन राहिला, आणि गंधमालती पतीसह मयूर पर्वतावरच राहिली, अशी यांची कथा आहे. असो; याप्रमाणें या संकटांतून घोडयाची सुटका करून श्रीकृष्ण धर्माकडे परत आले, आणि धर्माला त्यांनीं सर्व वृत्तांत सांगितला. नंतर त्याची आज्ञा घेऊन ते परत द्वारकेस गेले. इकडे अर्जुन आदिकरून वीर अश्वासह श्रीगीरि पर्वतावरील निबिड अरण्यांतून मोठया अडचणीनें मार्ग क्रमीत चालले असतां, ते सर्व एका दिव्य नगरापाशीं आले. तें नगर इंद्राच्या अमरावतीप्रमाणें शोभिवंत होते. परंतु अर्जुन अश्वासह तेथें जातांच तेथील नागरिक पळून जाऊं लागले तो प्रकार पहातांच अर्जुनास आश्चर्य वाटलें, आणि त्यानें कृष्णाचें स्मरण केलें. त्याबरोबर श्रीकृष्ण तेथें प्राप्त झाले. अर्जुनानें त्यांना ह्या नगरीची हकीकत विचारिली.

## भारत नगरीची कथा

श्रीकृष्ण म्हणाले,--' अर्जुना, पूर्वी या नगरीचा राजा भरत नांवाचा होता. त्याचें यादवांशीं वैर चालू असतां माझा गोकुळात अवतार झाला त्यावेळीं माझा प्रभाव ऐकून भरताला फार राग आला, व भयही उत्पन्न झाले, तेव्हां कालऋषि नांवाचा त्याचा पुरोहित होता; त्यानें भरताला धीर देऊन यादवांचा संहार करण्यासाठीं तप करण्यास सांगितलें. त्याप्रमाणें तो तप करूं लागला; परंतु त्याच्या तपाबरोबरच यादवांचा उत्कर्ष होत असलेला पाहून तो गतधैर्य झाला. नंतर तो आपल्या तीन स्त्रियांसह गुरूकडे गला आणि म्हणाला,--' हे गुरो, मला संतति नाहीं. तरी या स्त्रियांच्या ठिकाणीं आपण संतति उत्पन्न करावी.'-गुरूनें त्याचें म्हणणें मान्य करून त्या स्त्रियांना रतिसुख दिलें. त्यापासून कालयवन, दुर्बद्धि आणि त्रिगुण असे तीन पुत्र झाले. त्यांपैकी कालयवन भरताच्या मागे राजा झाला. तो यादवांशीं आपल्या पित्याप्रमाणेंच वैर करूं लागला. पुढे मुचुकुंदाच्या दृष्टीनें त्याचा नाश झाला. त्या नंतर दुसरा दुर्बुद्धि, तो रुक्मिणी-हरणाच्या प्रसंगीं मारला गेला. तिसरा बंधु त्रिगुण मात्र गुणसंपन्न होता, त्यास शेवटीं राज्याभिषेक झाला. अर्जुना, मागील वैर स्मरून हे लोक तुम्हांस भिऊन

पळत आहेत, तरी यांना अभय देऊन त्रिगुणाची राज्यावर स्थापना कर.' कृष्णाच्या सांगण्याप्रमाणें अर्जुनानें नगरांत दूत पाठवून सर्वांना श्रीकृष्णाच्या दर्शनाला बोलाविलें. त्याप्रमाणें नागरिकांसह त्रिगुण तेथें आला. तेव्हां कृष्णानें त्याला अभय वचन देऊन त्याची राज्यावर स्थापना केली. त्यानें सर्वांचा सत्कार करून कृष्णार्जुनाची द्रव्यभारानें पूजा केली. तें द्रव्य हस्तिनापुरास पाठवून कृष्ण घोड्यामागून सर्व परिवारासह चालूं लागले चालतां चालतां अनेक गिरिकंदरें आणि उपवनें ओलांडित ते निम्हाळ वनांत एका सरोवरापाशीं आले. तें सरोवर पाहून पूर्वीं तेथें घडलेला चमत्कार अर्जुन कृष्णास सांगू लागला.

## सर्पाचे चार प्रश्न

अर्जुन म्हणाला,--' देवा, आम्हीं कुंतीसह या वनांत भ्रमण करीत असतां, एकदां तहानेनें व्याकुळ झालों. तेव्हां धर्मानें भीमाला पाणी आणावयास पाठविलें. तो ह्या सरोवराजवळ येऊन पाणी भरून घेतो आहे, इतक्यांत तेथें एक सर्प येऊन त्याला म्हणाला.--' अरे, माझ्या प्रश्नांचीं उत्तरे दे, नाहींतर मरशील.'-असें म्हणून त्यानें सुखी कोण, आश्चर्य कोणतें, मार्ग कोणता आणि वार्ता कोणती ?-असे चार प्रश्न केले भीमाला या प्रश्नांचीं उत्तरे देतां न आल्यामुळें, तो मरून पडला. पुढें आमची चौघांचीही अनुक्रमानें तीच स्थिति झाली. तेव्हां आम्हांला शोधण्यासाठीं धर्म स्वतः तेथें आला. त्यालाही सर्पानें तेच प्रश्न विचारिले. तेव्हां त्यानें मात्र उत्तरें दिली. तो म्हणाला,--' आपल्या घरीं राहून प्रवास न करतां व कर्ज न करितां पांच दिवशी कां होईना पण जो स्वकष्टार्जित भाजी खातो, तो सुखी होय. तसेंच प्रत्येक हजारों प्राणी मृत्युमुखांत पडत आहेत, हे पहात असूनही प्राणी संसारांत सुख मानतो, हेंच मोठें आश्चर्य आहे. वेद अनंत व ऋषींची मतेही भिन्न आहेत; परंतु थोर लोक ज्यानें जातील तोच मार्ग; आणि मोहरूपी कढईखालीं सूर्य अग्नि लावून, काल,भूतांना अहोरात्र शिजवित असतो हीच वार्ता होय.'-अशी चारी प्रश्नांची योग्य उत्तरें धर्मानें दिल्याबरोबर, त्या सर्पाला स्वर्गातून विमान आलें, आणि आम्हींही सावध झालों. देवा, तो सर्प मग मनुष्य-देहानें विमानांत बसून स्वर्गास गेला तो कोण होता बरें?' हा प्रश्न ऐकून, श्रीकृष्ण अर्जुनाला ती कथा सांगू लागले

## नहुष राजाची कथा

कृष्ण म्हणाले,––' अर्जुना, कृतयुगांत नहुष नांवाचा चक्रवर्ति राजा होऊन गेला. त्यानें नव्याण्णव यज्ञ संपवून शंभराव्याला आरंभ केला होता. ही बातमी जेव्हां इंद्राला कळली, तेव्हां तो चिंताग्रस्त होऊन विष्णूला शरण गेला. विष्णूनें त्याला अभिवचन देऊन नहुशाला निरोप पाठविला कीं, 'तीन घटिकांच्या आंत वहानांत बसून अमरावतीस घेऊन जावें,' हा निरोप ऐकून नहुषाला आनंद झाला, आणि वहान कोणतें घ्यावे याचा विचार करूं लागला. यानें ब्राह्मणास सांगितले कीं, माझे वहान तुम्हीं होत असाल तर तुम्हाला मी अपरिमित धन देईन. ब्राह्मणानी होय म्हणतांच त्यांच्या खांद्यावर पालखी ठेऊन त्यांत बसून तो अमरावतीस निघाला. इकडे विष्णूनें कपट करून नहुषाचें शरीर जड केले, पालखीचे वजन जड झाल्यामुळें ब्राह्मण हळू हळू चालू लागले. तेव्हां राजाला त्यांचा राग येऊन तो त्याच्यावर करून झपझप चालावयास सांगू लागला. तेव्हां ते ब्राह्मण क्रुद्ध झाले, आणि 'तूं सर्प होशील' असा त्यांनी त्याला शाप दिला. ब्राह्मणाची शापवाणी ऐकता राजा काकुळतीस येउन उःशाप मागू लागला. तेव्हां ब्राह्मणानी चार प्रश्न सांगितले, व म्हणाले,–'उदक पिण्यासाठीं सरोवरावर जे कोणी येतील त्यांना हे प्रश्न विचार, कालेकरून पांडव तेथे येतील, व धर्म त्यांची उत्तरे देईल, तूं मुक्त होशील. 'याप्रमाणें कृष्णानें कथा सांगितल्यावर सर्वजण रात्रभर तेथें वस्तीस राहिले आणि प्रातःकाली घोडा सोडून चालू लागले, व कृष्ण द्वारकेस परत गेला.

---

# अध्याय ४ था



## इंद्रभानाची कथा–श्यामकर्णाचे हरण

श्रीकृष्ण द्वारकेस गेल्यावर अर्जुनादि वीर सैन्यासह वाद्यांच्या कडकडाटात पुनः अश्वामागून जाऊं लागले. हस्तिनापूरापासून दोन हजार योज-

नाच्या अंतरावर ते गेले. इतक्यांत श्यामकर्ण एकाएकी आकाशांत उसळून दिसत नाहिसा झाला. सर्वजण दाही दिशा शोधूं लागलें, तरी घोडा दिसेना तेव्हां अर्जुनाला मोठी चिंता प्राप्त झाली. अर्जुनानें त्याची पूजा करुन अश्वाला कोठे पाहिलें काय म्हणून त्याला विचारलें, आणि अर्जुन म्हणाला; 'घोड्याचा शोध नच लागला तर शेवटी कृष्णास बोलवावे लागेल,' हे ऐकून नारद म्हणाला, 'पार्था, अश्वाचा शोध लावूनच मी तुला सांगावयास येथें आलो आलो आहे येथून थेट उत्तरेस गरूडभवन नावाचे एक नगर आहे. तेथे इंद्रभान नांवाचा एक राजा आपल्या सात पराक्रमी पुत्रासह राज्य करीत असतो. पूर्वी सागरपूत्रांनी त्याचा पराभव करून गरुडभवन लुटल्यामुळे इंद्रभानाला फार दुःख झाले. त्यानें उग्र तप करून इंद्राला प्रसन्न करुन घेतले तेव्हा इंद्रानें पुत्रासहवर्तमान त्याला अश्वासन देऊन पुनः राज्यावर स्थापिलें आहे. पुढे इंद्रभानाने त्या सागरपुत्रांना युद्धांस पाचारण केले; परंतू कपिल शापानें त्याचें भस्म झाले होते. हे वर्तमान इंद्रभानाला समजले, तेव्हां आपल्याबरोबर लढणारे वीर कोणी उरले नाहीत असे वाटून तो बेफाम झाला आहे. त्याचे नगर येथून सहस्र गांवे दूर आहे. मजबरोबर तुम्ही येत असाल, तर मी तुम्हांस दाखवितो.' +अर्जूनानें हें ऐकतांच सैन्य तयार केलें आणि अनेक पर्वत व अरण्यें ओलांडीत तो नारदासह गरूडगंगेच्या तीरावर आला. तेथे आल्यावर पलीकडच्या तीरावर त्यांना अमरावतीप्रमाणें शोभायमान असे गरुडभवन नगर दिसले. जो कोणी धरील त्याच्याशी मात्र लढावयाचें, इतरांना व्यर्थ त्रास द्यावयाचा नाहीं; अशी कृष्णाची आज्ञा असल्यामुळें अर्जुनानें नारदाबरोबर दूत पाठवून घोडा तेथें आहे की नाही याची खात्री करुन घेतली. घोडा तेथे असल्याचे दाखवून नारद निघून गेला नंतर अर्जुन तयार झाला. इंद्रभानानें आपलें भाट अर्जूनाकडे पाठवून त्यांच्याद्वारे आपली व आपल्या सात पुत्रांची बढाई.त्यानें अर्जुनाला कळविली अर्जुनानें ती हकीगत ऐकून घेऊन त्या भाटाचा बहुमान केला व आपण युद्धांस तयार आहोत असा निरोप कळविला. अर्जुन तयार आहे असें भाटाकडून कळताच इंद्रभाटानें आपलें सन्य तयार करविले. व उभयताचे युद्ध सुरु झालें. परंतु थोड्यांच वेळांत अर्जूनानें इंद्रभानाचा पाडाव केला. तेव्हां

+ इंद्रभानाचा गर्व हरण करण्याकरितांच नारदानें हा प्रसंग आणला होता.

इंद्रभानानें इंद्राचे स्मरण केलें. स्मरण करतांच इंद्र तेथे आला, आणि राजाला धीर देऊन तो स्वत: अर्जुनाशी लढण्यासाठीं उभा राहिला. तेव्हां मारुती त्याचबरोबर युद्धास सिद्ध झाला. तें पाहून अर्जुनानें मेघवर्णादि वीरांसह हनुमानाला सहाय्य करण्याविषयी आज्ञा केली, व सर्वांचें भयंकर युद्ध सुरु झालें. दोन्हीकडील वीर भिडलें. तेव्हां लढाईस अपूर्व रूप आलें. इंद्रानें हनुमानावर वज्राचा प्रहार केला, पण हनुमानानें उलट इंद्राला मुष्ठीप्रहार करून मुर्च्छित केलें. इतक्यांत इंद्रानें सावध होऊन हनुमानाला वज्रानें मूच्छित पाडिलें, आणि मेघवर्णालाही उडवून दिलें, याप्रमाणें अर्जुनासह सर्व पांडवसैन्याचा संहार करून इंद्र विजयी झाला. इंद्र विजयी होतांच इंद्रभानानें त्याचा गौरव केले. नंतर इंद्रानें इंद्रभानाच्या सैन्यावर अमृत शिंपून सर्वांना उठविलें. याप्रमाणें शरणागतांचें रक्षण करण्यासाठीं इंद्राने आपला पुत्र जो अर्जुन त्याचाही वध केला.

असो, इंद्र स्वस्थानीं गेल्यावर नारदाची स्वारी तेथें आली. तेव्हां मारुतीची व त्याची गांठ पडली. मारुतीला पाहून नारद म्हणाला,–'मारुते, रामायणांत तुझे पोवाडे फार झाले; पण आतां असा दीन कशानें झालास?' तेव्हां मारुति म्हणाला,—'बाबारे, तूं पक्का कळलाव्या आहेस, आणि हा सगळा तुझाच प्रताप आहे. परंतु आतां एवढें तरी कर, कीं हस्तिनापुरास जाऊन धर्माला हा वृत्तांत सांग'–मारुतीच्या इच्छेप्रमाणें नारदानें जाऊन धर्माला सर्व हकीकत कळविली. तें वर्तमान ऐकून सर्व चिंतातुर झाले. मग द्रौपदीनें स्नान करून कृष्णाचें स्तवन केलें त्याबरोबर कृष्णदेव तेथें प्रगट झाले व नारदाचें एकंदर कारस्थान जाणून त्यांना त्याचा फार रागही आला ते म्हणाले,—'नारदा, नसती कळ लावून आमची चेष्टा करण्याची तुला पूर्वीपासून संवयच आहे.! नंतर लागलीच कृष्ण गरुडावर बसून भीमासह गरुडभवनास आले. त्यावेळीं तेथील अनर्थ पाहून भीमाने तर धरणीवर अंग टाकलें. मग कृष्णानें गरुडाला ताबडतोब स्वर्गी पाठवून अमृत आणविले आणि तें शिंपून सर्वांना सावध केलें. नंतर युद्धाची तयारी करून त्यांनी इंद्रभानाला सज्ज होण्यास सांगितलें. दोन्ही सैन्यें समरांगणांत भिडल्यावर भीमानें हां हां म्हणतां शत्रुसैन्याचा चुराडा उडविला. कृष्णानें सुदर्शन सोडून प्रधानासह इंद्रभानाच्या सातहि पुत्रांना स्वर्गी पाठवून दिलें. परंतु इंद्र-

भान मात्र पळून गेला, व गरुडगंगा समुद्राला मिळतें त्या ठिकाणीं दडून बसला. इकडे कृष्णानें अर्जुनाकडून सर्व गरुड भवन जाळून टाकिलें, आणि त्यांतील सर्व संपत्ति रथांत भरून भीमाबरोबर ती हस्तिनापुरास पाठवून दिली.

इकडे इंद्रभान गरुडसंगमात लपला होता, तेथून तो वज्रगिरीवर गेला आणि तेथें तप करून त्यानें इंद्राला पुनः प्रसंन्न केलें, आणि तो म्हणाला,—'देवेंद्रा, तूं मला दिलेलें वरदान फुकट गेले, तरी आतां माझें रक्षण कर.' इंद्रानें त्याला आश्वासन देऊन तो कृष्णाशीं युद्ध करावयास सिद्ध झाला आणि त्यानें कृष्णाच्या मुकुटावर वज्राचा प्रहार केला. पण कृष्णाने सुदर्शन सोडल्याबरोबर तो तेथून पळत सुटला. त्याची झालेली ही त्रेधा नारदानें ब्रह्मदेव आणि शंकर यांना सांगितली. तेव्हां त्यांनीही गरुड-भवनास येऊन कृष्णाचा जयजयकार केला. इंद्राची अशी दशा झालेली पहातांच इंद्रभान निराश झाला, व इंद्राला म्हणाला, 'आतां माझी सर्व आशा खुंटल्यामुळें अग्निकाष्ठें भक्षून प्राणत्याग करावा हेंच उचित दिसतें,' असें बोलून त्यानें अग्नि प्रदिप्त केला, आणि आंत उडी टाकणार, इतक्यांत इंद्रानें त्याला आवरून धरलें, व म्हणाला,—'इंद्रभाना भिऊं नकोस, मी कसेही करून तुझे पुत्र उठवितों व तुला पुनः राज्य देतों. तसें नच झालें तर दोघेही अग्निकाष्ठ भक्षू.'—असें म्हणून इंद्र त्याला घेऊन शंकर व ब्रह्मदेव यांच्याकडे गेला, आणि त्यांना आपली हकीकत सांगून इंद्रभानाला त्याचें राज्य परत देण्याविषयीं त्यांची प्रार्थना केली. तेव्हां ते सर्व श्रीकृष्णाकडे आले, व त्यानीं इंद्रभानाला त्याच्या पायावर घातलें तेव्हां कृपाळू होऊन कृष्णानें विश्वकर्म्याकडून अमरावती सारखें नवीन नगर तयार करविलें आणि इंद्रभानाच्या सर्व परिवाराला उठवून त्याची पुनः राज्यावर स्थापना केली. पण तेथें पाणी नव्हतें. तेव्हा इंद्रानें जमिनीवर वज्रप्रहार करून पाणी उत्पन्न केलें. त्यालाच वज्रगंगा म्हणतात. हें मोठे तीर्थ असून पूर्वसमुद्राला जाऊन मिळतें. असो, एकदें झाल्यावर सर्वजण आपापल्या स्थानीं गेले. नंतर कृष्णानें पूर्वीच्या गरुडभुवनावर एक सुंदर नगर वसवून मेघवर्णाची तेथें स्थापना केली. मेघवर्णाचा वंश तेथें अद्याप आहे.

याप्रमाणें सर्व व्यवस्था केल्यावर कृष्णानें श्यामकर्णाला सभेंत आणविलें, व पुनः त्याची पूजा करून त्याच्या मस्तकावर पत्रिका बांधिली.

मेघवर्ण आणि वृषकेतु यांना त्याचे रक्षक केलें आणि सर्व सैन्य त्यामागून चालूं लागलें.' ही कथा ऐकून जनमेजयानें विचारिलें,–'मुने, एवढा अनर्थ नारदानें कां केला,' तें सांगावें.'–तेव्हां वैशंपायन, राजाला त्याचें कारण सांगूं लागला.

## नारदानें अश्व पळविण्याचे कारण

वैशंपायन म्हणाले,—' राजा, एकदां एकादशीच्या दिवशीं नारद गरुडगंगेवर स्नान करून इंद्रभानाला भेटला होता. त्या वेळीं राजानें त्याची पूजा केली, व त्याच्याजवळ तो आपली थोरवी सांगूं लागला. तो म्हणाला, ' आम्हीं सागराचा पाडाव करण्याकरितां इंद्राला प्रसन्न करून घेतले, परंतु कपिलशापानें सगर भस्मीभूत झाले. आतां आमच्याबरोबर लढणारा वीर कोणीच उरला नाहीं. तुम्हांला कोणी आढळल्यास त्याला इकडे घेऊन या. पुढें या अश्वमेधाच्या प्रसंगीं त्या गोष्टीचें त्याला स्मरण झालें, आणि इंद्रभानाला ती हकीगत सांगण्यासाठीं तो त्याच्या सभेत गेला. तेथें इंद्र होताच. तो नारदाची टवाळी करून म्हणाला 'अरे, हा कुत्रे खेळवणारा आज इकडे कोठून आला ' हें ऐकून इंद्रभान म्हणाल,–' देवेंद्रा, हा महंत दैवयोगानें आमच्या घरी आला आहे, त्याला असें बोलूं नये.' इंद्रानें उत्तर केलें;' अरे हा गांवांत भिक्षा मागून कुत्र्यांना घालतो, व उरलेलें आपण खातो.' इंद्रानें केलेली ही थट्टा ऐकून इंद्रभामानही तसेंच बोलूं लागला. तेव्हां नारद संतापून उठला, व तेथून जाऊं लागला. तेव्हां राजाही त्याच्या मागोमाग जाऊन समजूत करूं लागला. परंतु नारदानें निक्षून सांगितलें कीं, ' मी तुझ्याकडून भीक कशी मागवितो तीं पहा, तुला इंद्राचें वरदान आहे, पण दोघांचेंही शौर्य आतां लोकरच कळून येईल.' असें म्हणून तो गंगेवर गेला, व स्नान करून श्यामकर्णाची वाट रोखून श्यामकर्ण तेथे येतांच त्याला तो गरुडभुवनास घेऊन गला. घोड्यानेंही नारदाचें कार्य समजून गडबड केली नाहीं. नगरांत गेल्यावर अश्वासह नारदाला पाहून इंद्रभानराजा पुन्हां थट्टा करून म्हणाला,–' कां ? सापाला गारुडी फिरवितो त्याप्रमाणें भिक्षा मागण्यासाठीं आज घोडें सजवून फिरत घातें! ' राजा याप्रमाणें बोलतो आहे, इतक्यांत राजपुत्रांनी तेथें येऊन घोड्याचे सरफांस तोडून त्याला ते गल्लोगल्ली फिरवूं लागले. तें पाहून नारद त्यांना म्हणाला,–' तुम्हांलाही असेंच फिरावें लागेल बरें, लक्षांत ठेवा.

राजा, तुझ्याबरोबर लढणारा वीर तुला पाहिजे होताना ? या घोड्याच्या मस्तकावरचा लेख वाच, म्हणजे तो वीर येथें आला आहे असें तुला समजेल इंद्रभान थट्टा करून म्हणाला,–' भला वेडा आहेस; घोड्याच्या डोक्यावर चिंधी बाधून मोठा शूर–वीर लढावयास आणला आहेस.' घोड्याच्या-नारदानें रागानें उत्तर केले–, ' राजा व्यर्थ गर्व करूं नकोस. आतांच अर्जुनाला घेऊन येतों म्हणजे तुला सर्व समजेल. तुझ्या मनांतील भ्रम तोच नाहींसा करील.' याप्रमाणें बोलणें झाल्यावर राजानें घोड्यावरील सर्व अलंकार काढून त्याला एकीकडे नेऊन बांधविलें, आणि तो नारदाला म्हणाला, ' अरे जा लवकर, माझ्या शत्रूला घेऊन ये; नाहींतर आणखी अपमान पावशील.' हें ऐकून नारद तेथून निघाला, आणि अर्जुन चिंताक्रांत बसला होता तेथें आला, वगैरे कथा पूर्वी सांगितलीच आहे.



# अध्याय ५ वा

## अर्जुनाच्या गर्वाचें निराकरण

मागील अध्यायांत सांगितल्याप्रमाणें श्यामकर्णाला शृंगारून त्याच्याबरोबर सर्व सैन्य चालूं लागलें, त्यावेळीं सैन्याच्या भारानें पृथ्वि थरथरूं लागली. श्रीकृष्ण यावेळीं बरोबर होते. वाटेंत अनेक राजे शरण येऊन तेही अश्वाबरोबर निघाले. तेव्हां त्या राजांना अर्जुन म्हणाला,–' अहो, तुम्हांजवळ एवढें सैन्य असतां, तुम्हीं युद्ध न करतांच आम्हांला शरण कसे आला बरें? त्यांनीं उत्तर केलें ' अर्जुना, आम्हीं श्रीकृष्णाला शरण आलों, तुला नव्हे. श्रीकृष्ण जवळ नव्हते तेव्हां तुझी स्थिति काय झाली, ती सर्वांना माहित आहेच,' हें राजाचें उत्तर ऐकून अर्जुनाला राग आला, आणि धनुष्य बाण घेऊन त्यांच्यावर तो धांवला; परंतु कृष्णानें त्याचें निवारण करून त्याला सांगितलें कीं, 'हें वीर लढावयास आले, तर त्याच्यापुढें प्रत्यक्ष मारेंही चालावयाचे नाहीं हे विष्णूचे परम भक्त आहेत. तरी तूं व्यर्थ त्यांना दुखवूं नकोस ' कृष्णानें असें सांगितलें, तरी अर्जुनाचा राग शांत झाला नाहीं. हें पाहून कृष्णानें राजांना जवळ बोलाविलें आणि त्यांस सांगितलें,–

पांडवांची पूजा करणार नाहींत, त्यांच्या देशांत दुर्भिक्ष होईल. करितां तुम्हीं अर्जुनाला दुखवूं नका.' हें ऐकून अर्जुन शांत झाला, व तो कृष्णाची स्तुति करूं लागला.

नंतर कृष्णानें पांडवांना असा वर दिला कीं, 'शेतकरी पांडवांची पूजा करितील, त्यांचीं पिकें उत्तम येतील.' हें वरप्रदान झाल्यापासून शेतकरी लोक शेतांतील खळ्यावर पांडवांची स्थापना करून त्यांची अद्याप पूजा करितात.

## जलरूप झालेला मायावी रासक्ष

नंतर श्रीकृष्णासहवर्तमान फिरत फिरत तो श्यामकर्ण अनंत देशात आला. तेथें अवचित एक सरोवर त्याच्या दृष्टीस पडले. श्यामकर्ण त्या सरोवराजवळ जातांच त्यानें त्यांत बुडी मारली व जो आंत जाऊन बसला तो वर येईना. तें पाहून सैन्यांत सर्वत्र हाहाःकार उडाला रक्षकांनीं ही हकीगत कृष्णाला सांगितली. तेव्हां श्रीकृष्ण सर्वांना त्यातील पाणी प्यावयास सांगू लागले. ते पाणी तोंडात घेतात तो ते खारे लागलेले पाहून त्यांनी ते टाकून दिलें कृष्णानें अंतर्दृष्टीनें सर्व प्रकार जाणून अगस्तिऋषीचें स्मरण केलें. त्याबरोबर ऋषि तेथें आला. त्याची पूजा करून कृष्णानें त्या सरोवराचें उदक पिऊन टाकण्याविषयीं त्याची प्रार्थना केली. त्याच्या सांगण्याप्रमाणें अगस्तीनें एकाच आचमनांत ते सरोवर खलास केले. तेव्हां आंत श्यामकर्ण आणि दोन राक्षस बसलेले त्यांना दिसले. मग घोड्याला बाहेर आणून कृष्णानें त्या राक्षसांना आपल्या गदेनें ठार केलें. त्यावेळीं त्यांच्या मुखांतुन दिव्य तेज निघून ते कृष्णचरणी लीन झालें.

या अनंत देशांत पूर्वीं उदक नव्हतें तेव्हां राक्षसभुवनाहून हे दोन राक्षस तेथें येऊन मायावी सरोवर करून त्याजवळ बसलें. लोक तेथें येऊन पाणी घेऊन जाऊं लागले. म्हणजे हे राक्षस त्यांच्या मागोमाग जाऊन त्यांना खाऊन टाकित, अशा रीतीनें अनेक नागरिकांचा संहार झाल्यावर लोकांनीं तें सरोवर वर्ज्य केलें. याप्रमाणें कांहीं काल गेल्यावर एकदां बृहस्पति तेथें आला असतां त्याला हें राक्षसांचें मायावी कृत्य समजून आलें, तेव्हां बृहस्पतीनें समुद्राचें चिंतन केले. त्याबरोबर ब्राह्मणवेषानें समुद्र तेंथें आला असतां, बृहस्पतीनें 'हें सरोवर खारट करून टाक, म्हणजे लोक येथें येणार

नाहींत, व त्यामुळें त्यांचा बचाव होईल' असें सांगितलें. आज्ञा होतांच समुद्रानें सरोवरांत स्नान केलें व त्याबरोबर तें खारट झालें. एवढें झाल्यावर बृहस्पतीनें विचार केला कीं, एवढयानें कांहीं भागावयाचें नाहीं. कारण हे राक्षस दुसऱ्या ठिकाणीं जाऊन लोकांना त्रास देऊं लागतील.' असें म्हणून त्यानें त्यांना शाप दिला. कीं, तुम्हीं येथें दगड होऊन पाण्यांत रहाल? शाप ऐकून राक्षस उःशाप देण्याविषयीं त्याची विनवणी करूं लागले. तेव्हां बृहस्पति त्यांना म्हणाला, 'द्वापार युगांत जेव्हां कृष्णार्जुन श्यामकर्ण वारूला घेऊन येथें येतील, तेव्हां तुमची मुक्ति होईल.' त्याप्रमाणें यावेळीं कृष्णानें त्यांना मुक्ति दिली. या राक्षसांच्या रक्ताच्या रेंबापासून सप्तधातूंची उत्पत्ति झाली. थोडेसे रक्त नागांनी भक्षण केल्यामुळें तें क्रूरबुद्धि झाले, आणि पांडवांच्या सैन्याना दंश करूं लागले.

तेव्हां कृष्णानें त्या नागांना असें करण्याचें कारण विचारले असतां ते म्हणाले, 'हे जगज्जीवना, आम्हांला वरदान दे, नाहींतर आम्ही असेंच सैन्याला भक्षीत राहूं.' तेव्हां कृष्णानें त्यांना वर दिला कीं, 'तुम्ही येथें रहा व मनुष्यें दूध देतील तें पीत जा.' वर ऐकून सर्प तेथें राहिले आणि लोकही कृष्णाच्या आज्ञेप्रमाणें त्यांची पूजा करूं लागले, त्या देशाला सर्प शयन म्हणतात.

नंतर घोडा पुढें जातां जातां एकदम अडला, व मागें वळला. असें कां झालें म्हणून अर्जुनानें विचारिलें असतां, श्रीकृष्ण म्हणाले, 'पूर्वीं मोहिनी-रूप धरून विष्णूनें विरोचन दैत्याला मारिलें, त्यावेळीं सूर्यानें दिलेला मुकुट फुटून त्यांतील रत्नें जिकडे तिकडे विखुरलीं. हें पाहून सूर्य तेथें आला, आणि विष्णूला म्हणाला,—'आतां हीं रत्नें मनुष्यें न नेतील, असा कोणता उपाय करावा?' तेव्हां विष्णूनें उत्तर केलें, 'आजपासून कोणत्याहि प्राण्याला या स्थलीं रीघच होणार नाहीं.' विष्णूच्या या शापामुळें हा घोडा पुढें जाऊं शकत नाहीं.

याप्रमाणें कथा सांगितल्यावर श्रीकृष्ण अर्जुनाला म्हणाले,—'मी ब्रह्मदेव व शंकर यांची भेट घेऊन येतो. त्यांनीं इंद्रभानाच्या संबंधांत आपल्यावर उपकार केले आहेत.' असें म्हणून ते ब्रह्मलोक आणि कैलास येथें गेले.

## शंखराजाची कथा.

इकडे अर्जुन सैन्यासह मोठ्या उल्हासानें जात असतां, दीपावती नांवाच्या एका दिव्य नगरीशीं आला. तेथें घरोघर पारिजातक असून लोक शालिग्रामाची मनोभावानें पूजा करीत होते. जिकडे तिकडे रामनामाचा गजर चालत असून तें नगर अन्नछत्रांनीं पवित्र झाले होतें. घोडा नगराच्या बाहेर उभा राहिला; तेव्हां तेथील शंख नांवाच्या राजाला दूतांनीं सर्व प्रकार सांगितला. शंख नगराबाहेर येऊन पहातो, तो धर्माचा घोडा अश्वमेधासाठीं सोडलेला आहे, असें त्याला आढळून आलें. श्रीकृष्ण ज्याचा सारथी त्या अर्जुनापुढें आपलें कांहीं चालावयाचें नाहीं, तरी त्यास शरण जावे, असा विचार करून शंखानें अर्जुनाची भेट घेऊन श्यामकर्णाची पूजा केली, व पांडवांना अपार द्रव्य दिलें. नंतर दोघांनीं एकमेकांचा सन्मान केल्यावर अर्जुन श्यामकर्णासह पुढें मार्ग आक्रमूं लागला. बरेच दूर गेल्यावर घोडा एका विवरापाशी आला. इतक्यांत त्यांतून एक व्याघ्र बाहेर आला आणि उडी मारून घोड्याच्या पाठीवर बसला. तें पाहून सगळें सैन्य आश्चर्यचकित झालें. अर्जुनानें पुढें काय मजा होते ती पहावी असा विचार करून त्याचा कोणास प्रतिकार करूं दिला नाहीं. वाघाला पाठीवर घेऊन घोडा धांवत जातां जातां पुढच्या एका अरण्यांत एक शिवालय होतें, तेथें जाऊन उभा राहिला. हा व्याघ्ररूपी शिवच होय, असें जाणून अर्जुन रथांतून उतरला आणि अष्टोत्तर शिवमंत्राचा त्यानें भक्तीनें जप केला. त्यावेळीं व्याघ्र कृपाळू होऊन निघून गेला. अर्जुन ध्यान संपवून पहातो तो, घोडा एकटाच त्याच्या दृष्टीस पडला, नंतर त्यानें देवालयांत जाऊन शंकराची पूजा केली, आणि आपलें नांव त्या देवालयाच्या भिंतीवर लिहून ठेविलें.

त्या वनांत धवलेश्वर शंकर व्याघ्ररूपानें तपश्चर्या करीत होता. अर्जुनाची भक्ति कितपत आहे, हें पाहाण्यासाठीं व घोड्यावर बसण्याचें सुख कसे असतें, याचा अनुभव घेण्यासाठीं, तो उडी मारून घोड्याच्या पाठीवर बसला. मागून वाद्यांच्या गजरांत सैन्य चालत आहे, असें पाहून त्याला आनंद झाला आणि तो आपल्या मनांत म्हणाला,–' पार्वतीशीं लग्न केलें, त्या वेळीही असा सोहाळा झाला नव्हता.' असो, अर्जुनाची प्रेमळ भक्ति पाहून त्यानें घोड्याला सोडून दिलें.

## कामाक्ष्या नगरींतील चमत्कार.

बाघापासून सुटल्यावर घोडा चालत असतां कांहीं वेळानें दुसऱ्या एका वनांत आला. तेथें भिल्लीणरूपानें पार्वती त्याला धरून घेऊन जाऊं लागली अर्जुनाला ही बातमी लागतांच सर्व सैन्यासह त्यानें तिला वेढा दिला, व अश्व सोडविण्याचा तो प्रयत्न करूं लागला. परंतु त्या घोड्याच्या शरीरांत शक्तीचा संचार करवून पार्वतीनें त्याला खिंकाळून आकाशांत उडावयास लाविलें. आतां घोड्याशिवाय पुढें कसें जावें, असा विचार करीत ते हळूं हळूं मार्ग चालूं लागले. ज्ञानी श्यामकर्ण बरोबर होता, तोपर्यंत मार्ग हुडकून काढण्याची पंचाईत त्यांना कधीही पडली नाहीं परंतु तो गेल्यामुळें आतां सर्वांस आंधळ्यासारखें झालें. पांच दिवसांनीं ते सैन्य वनाच्या बाहेर पडलें, तेव्हां त्यांना एक मनुष्य दिसला. त्याला–ही वाट कोठें जातें?– म्हणून विचारितां, त्यानें काऊर देशास जातें म्हणून सांगितलें. त्याप्रमाणें जात असतां पुढें त्यास दोन ब्राह्मण भेटले. त्यांचेजवळ अर्जुनानें विचारपूस केली. तेव्हां ते म्हणाले, 'पुढें कामाक्ष्या नगरी आहे. तेथें तुम्हीं जाल तर पुनः सुटण्याची पंचाईत पडेल. ती कामाक्ष्या मोठी प्रख्यात देवता असून तेथें गेल्यास तुम्हाला प्रत्यक्ष अनुभव येईलच. ती कुंजाश्वविद्येंत प्रवीण असून तुम्हांला मोठा पाहुणचार करून आपल्या घरीं राहवील.' असें सांगून ब्राह्मण निघून गेले. इकडे अर्जुन सैन्यासह वाट चालतां चालतां एका दिव्य नगराच्या बाहेर येऊन उतरला. तेव्हां तेथील लोक त्यांना पाहून आश्चर्य करीत म्हणाले,—'अहो! हे अज्ञ लोक येथें कशाला आले? आतां ही कामाक्ष्या यांना हत्ती, घोडे, गाढव, बैल असें करून बंदींत घालील.' याप्रमाणें ते बोलत आहेत, तो त्या नगरांतील स्त्रिया तेथें आल्या; आणि त्या सन्याला आपल्या घरीं येण्याचा आग्रह करूं लागल्या. प्रेमकटाक्ष त्यांच्यावर फेकून व कर्पूरयुक्त विडे देऊन त्या सैनिकांना म्हणाल्या,—'अहो! आमच्या घरीं या, कामाक्ष्येचे पूजन करून सर्व प्रकारचे भोग भोगीत रहा, परंतु त्यास कोणी उत्तर देईना. तेव्हां त्या पुनः नानाप्रकारच्या शृंगार–चेष्टांनीं त्यांना मोहित करूं लागल्या. तें पाहून अर्जून आपल्या वीरांना म्हणाला,—'अहो, त्या व्यभिचारिणी आहेत, तरीं यांना झोडपून हांकून द्या.' असें सांगून त्यानें चौफेर पहारे ठेविले आणि सैन्यांत कोणी येणार

नाहीं असे केले. परंतु त्या स्त्रियांनीं कुंजात्रिविद्येनें पहारेकऱ्यांना मोहिनी घातली, आणि सैन्यांतील पुरुषांना एकदम भोग देऊन घेऊन जाऊं लागल्या. हे वर्तमान अर्जुनाला कळलें, तेव्हां तो चिंतेंत पडला. तें जाणून कृष्णानें तीन खुणेचे बाण आकाशमार्गानें फेकून दिले. हे बाण कृष्णानें आपल्या रक्षणार्थ पाठून दिले आहेत, असे जाणून अर्जुनानें ते अभिमंत्रून तिनही दिशांना सोडून दिले. याप्रमाणें कांहीं दिवस लोटले तरी अश्व हातीं लागेना, इकडे अश्वमेधाचें काम थांबलें, असें पाहून श्रीकृष्ण अर्जुनाकडे आले, व सर्व प्रकार पाहून म्हणाले,—'अरे पार्था, या दुष्ट स्त्रियांनीं कुजांत्रिविद्येनें तुम्हांला नाडलें आहे. असो, झाले ते झाले. आतां पुढच्या मार्गाला लागलें पाहिजे. घोडा याच नगरांत आहे. तेव्हां कांहीं तरी कपट केलें पाहिजे आपण संन्यासी होऊन गुरु-शिष्यांचीं बतावणीं करीत नगरांत जाऊं.' असें ठरवून ते दोघे नगरांत गेलें, आणि जे आपले लोक, घोडे, बैल, वगैरे रूपानें तेथें होते, त्यांना त्यांनीं ओळखिले. नंतर हे दोघें संन्याशी कामाक्षयेच्या देवळांत जाऊन तिची स्तुति करूं लागले. देवीनें नर-नारायणांना ओळखिलें, आणि ती म्हणाली,—'तुम्ही येथें आलेले पाहून मला आनंद झाला.' तेव्हां कृष्णानें तिला विचारिले,—'पार्वती, तूं येथें कां बरें रहातेस ?' देवीनें उत्तर केलें,—'शंकर कपटानें मला सोडून व गंगेला जटेंत लपवून वनांत गेले, त्यांना शोधतां शोधतां मला शीण झाला, तेव्हां मी येथें राहूं सागलें. पतिवियोगानें मला कांहीं सुचत नाहींसे झाल्यामुळें, मी हें नगर रचून येथें कुनांत्र विद्या प्रगट केली. माझ्या भक्तिणी पुरुषांना धरून बैल, घोडे करितात, आणि रात्रीं भोग भोगण्यासाठीं पुनः त्यांना पुरुष करितात. ही कामविद्या मी तुलाही शिकवीन.' कृष्ण म्हणाला,—'माते, मीहि तुला पुनः पतिवियोग होणार नाही, अशी मोहिनी विद्या शिकवीन, कांहीं काळजी करूं नकोस.' तेव्हां देवी म्हणाली,—'कृष्णा कांहींतरी उपाय करून शिवाला येथें आणून मजवर उपकार कर.' कृष्णानें उत्तर केलें, 'हा सर्व तुझाच खेळ आहे. एरवी तुजविबाय शिवाला चैन पडावयाचे नाही. असे असतां आम्हांला विनाकारण कां चाळवतेस ? मी तुझें काम करीन; पण लीलेनें श्यामकर्णाला लपविलें आहेस, त्याला सोडून दे, व या पार्थावर उपकार कर. हे ऐकून देवी हसली आणि विवरात उतरून श्यामकर्णाला बाहेर घेऊन आली. हें पाहून अर्जुनाला वाटलें. यावेळी कृष्ण जर आला नसता तर घोडा कधीही

हाती लागला नसता. घोडा मिळाल्यावर जाण्याविषयी कृष्ण देवीची आज्ञा मागू लागला. तेव्हां देवी म्हणाली, 'अर्जुनाला घोड्याबरोबर पाठवून दे, व व तूं येथेंच रहा.' त्याप्रमाणें घोड्याबरोबर अर्जुनाला वाटेला लावून कृष्ण कामाक्ष्येजवळ राहिला. कृष्णानें संन्यासीरूपानें देवीची पूजा केल्यामुळें, त्यानंतर तिचे बहुतेक पुजारी संन्यासीच झाले. कृष्णाला देवीनें ठेऊन घेण्याचे कारण असें की, शिवाला वश करण्यासाठी वशीकरण विद्या कृष्णापासून तिला शिकावयाची होती. तिला ती विद्या शिकविल्यावर, तिला बाहेर देशी प्रसार होऊ नये, म्हणून कृष्णानें शाप दिला! कीं, ही विद्या येथेंच सफल होईल. इतरत्र तिचा उपयोग व्हावयाचा नाहीं.



# अध्याय ६ वा

## चंपावती नगरीचा वृत्तांत

कामाक्ष्यानगरीहून श्यामकर्ण सैन्यासह निघाला. तो चंपावती नामक एक सुंदर नगरापाशी आला. या नगरांत लोकवस्ती अगदी थोडी असून, लोकांची पोटे गरोदर स्त्रीप्रमाणें मोठी झालेली होती. हा प्रकार पाहून अर्जुनानें आश्चर्यानें त्या लोकांना या प्रकाराचे कारण विचारले. तेव्हां ते म्हणाले,–या डांग देशाचें पाणी जे पितात त्याची अशीच स्थिती होते. हें ऐकून सर्व सैन्य नवल करुन त्याची थट्टा करू लागले. तें पाहून लोक म्हणाले, 'तुम्ही आमची थट्टा करितां परंतु लवकर तुम्हालाहि हा अनुभव येईल.' अर्जुनानें पुन: विचारले, 'हा देश असा का झाला? आणि तुम्ही इतर ठिकाणी कां जात कां नाही?' त्यानी उत्तर केलें, ऋषि–शापामुळें आमच्या देशाची अशी स्थिती झाली आहे. इतर देशचे लोक जरी येथे आलें, तरी त्यांचीही हीच अव्यस्था होते; व येथील उदक न सोडल्यामुळें तें नि:सत्व होऊन मरतात.' हें ऐकून अर्जुन घोड्याला त्या दिशेहून फिरविण्याचा प्रयत्न करूं लागला. परंतु कांही केलें तरी घोडा परतेना. होतां होतां तो उभा राहिला आणि जमिनीवर पडून लोळूं लागला. ते पाहून अर्जुन दु:खानें म्हणाला–

'हा श्यामकर्ण येथें कशाला आला कोण जाणें? आतां काय होईल कोणास ठाऊक! शेवटी कांही इलाज नाही असे पाहून सर्वजण तेथें राहिले. थोड्या वेळांत तेथील अन्नपाणी पोटांत जाताच सर्वांची पोटे फुगली. व सर्वजण कुंथू लागलें. आता कोणत्या तोंडानें परत जावे. धर्मकार्याला हें मोठें विघ्न आलें. असे म्हणत साडेबारा महिने ते तेथें कुचंबत राहीले, एक दिवस अर्जुन कण्हत कण्हत घोडा पसरला होता तेथे गेला, आणि त्याची नाना प्रकारे गोंजारणी करून त्याला उठवूं लागला. थोड्यांच वेळांत घोडा उठला तेव्हा अर्जुन उरलें-सुरले सैन्य घेऊन त्याच्यामागून धावूं लागला. त्यांची ती विशाल पोटे पाहून सर्व लोक हंसत. मेघनाद राक्षस असल्यामुळे त्याला मात्र कोणतीही व्याधि जडली नव्हती.

## जलोदराचे कारण

जनमेजय म्हणाला,-'मुने, असें होण्याचे कारण काय, ते सांग।. तेव्हा वैशंपायन म्हणाले,-'राजा एके दिवशी यादव शिकारीस गेले असतां रानात एक ऋषि ध्यानस्थ बसलेला त्याच्या दृष्टीस पडला. त्याला पाहून त्याची थट्टा करण्यासाठीं त्यांनी सांबाच्या पोटावर चिरगुटें बांधून व त्याला स्त्रीवेश देऊन ते ऋषीला म्हणाले, 'या स्त्रीला पुत्र होईल की कन्या होईल. ते सांगा. ऋषी ध्यान संपवून पहातो तो त्याचें सर्व कपट त्याला समजलें, व त्यांना त्यानें शाप दिला की, हिच्या पोटी जे होईल ते कुलक्षय करील, आणि या देशांत जो येईल त्याचें व येथील लोकाचेही उदर वाढेल. अशी पुराणांतरी कथा आहे.

## सुजन राजाची कथा

याप्रमाणें उदरे मोठी होऊन सैन्य चाललें असतां, श्यामकर्ण पूर्वेकडे वळून हेमाद्रि पर्वतापाशीं आला तेथे एक कर्दळीवन असून, त्याच्या शेजारी सुर्जन नांवाच्या राजाचे नगर होते, तेंथें आल्यावर ते सैन्य सुर्जनाच्या दृष्टीस पडले. व त्यांची मोठीं पोटे पाहून, त्यानें त्या लुटण्यास आरंभ केला. अर्जुनाचे सैन्य दुर्बल झालेलें असल्यामुळें, त्यापैकी प्रतिकार करावयास पुढें येईना. तेंव्हा मेघवर्णाने सुर्जनावर चाल करून त्याच्या सैन्याचा नाश केला आणि सुर्जनाचा गळा दाबला. ही वार्ता नगरांत

कळतांच, राजाचा पुत्र अगणित सैन्य घेऊन लढावयास आला. इकडे श्यामकर्ण कर्दळीवनांत गेला होता, त्यास आणण्यासाठीं मेघवर्ण गेला. इकडे राजपुत्रानें येऊन पांडवांच्या सर्व सैन्याला जिंकून अर्जुनालाही नग्न केलें, मेघवर्ण परत आला तो, ही विपरीत स्थिति त्याच्या दृष्टीस पडली. ती पाहतांच त्याचा क्रोध अनावर झाला. त्यानें त्या नगरावर हल्ला करून सर्वांचा निःपात केला आणि सर्व नगर लुटून आणिलें. नंतर अन्नपाणी देऊन, आपल्या सर्व सैन्याचें त्यानें एकट्यानें दोन दिवस रक्षण केलें. हा प्रकार घडला त्यावेळीं सुर्जनाची राणी कामाक्षेची पूजा करण्याकरिता गेली होती. परत आल्यावर सर्व विपरीत प्रकार पाहून ती देवीजवळ गेली. आणि पतिपुत्रांची झालेली भयंकर अवस्था देवीला कळवून म्हणाली,– ‘माते, या वेळीं तूं मला साहाय्य कर, नाहीं तर मी येथेंच प्राणत्याग करीन.’ हें ऐकून कामाक्ष्या संतापून उठली. त्या वेळीं श्रीकृष्ण जवळ होता. तो देवीला म्हणाला,–‘ मला टाकून तूं जाऊं नकोस. मी तुझा भक्त आहे आणि अर्जुन माझा सखा आहे. त्याचा घात करशील तर मीही धांवून त्याच्या रक्षणासाठीं येईन. हिला तूं अभयदान देतेस, पण त्यामुळें तुझ्या-माझ्यांत वैर वाढेल हें बरे नाहीं.’ कामाक्ष्येला तें मानवलें आणि कृष्णासह ती युद्धभूमीवर आली, व कृपाकटाक्षानें तिनें राजादिकांस सावध केलें, पण मागील वैर आठवून ते युद्धास सरसावले परंतु कृष्ण व कामाक्ष्येनें त्याचें निवारण केलें, मेघवर्णानें एवढा पराक्रम केलेला पाहून कृष्णाला मोठें कौतुक वाटलें, व त्यानें त्याला आलिंगन देऊन त्याची प्रशंसा केली. नंतर कृष्णानें अमृतदृष्टीनें पार्थादिकांकडे पाहून त्यांचा रोग दूर केला. नंतर चंपावती नगरीपाशीं मेलेल्या सर्व सैन्याला उठवून कृष्ण अर्जुनाला म्हणाला, ‘बा अर्जुना, आतां या सुर्जनाची या राज्यावर स्थापना कर, तो तुम्हाला कर-भार देईल आणि त्यामुळें कामाक्ष्याही संतुष्ट होईल.’ त्याप्रमाणें सर्व व्यवस्था झाल्यावर सुर्जनानें अश्वमेधासाठीं अपार द्रव्य दिलें, आणि अर्जुनाची बोळवण केली.

## कर्दळीवनांतील प्रकार

असा प्रकार इकडे चालला आहे, तो श्यामकर्णाला आणण्यासाठीं सैन्य कर्दळीवनांत गेलें. तेथें एका केळीशीं तो अडकला होता. अनेक उपाय केले

तरी तो सुटेना, म्हणून अर्जुनानें त्या केळीवर बाण सोडिला. त्यायोगें ती केळ तुटली; परंतु त्याबरोबर श्यामकर्णाचें शिर आकाशांत उडालें. हें पाहून अर्जुन चिंतातुर झाला, आणि 'हा काय अनर्थ ! आतां यज्ञ कसा तडीस जाणार ?' असें म्हणून दुःख करूं लागला. इतक्यांत श्रीकृष्ण तेथें आला, व श्यामकर्ण काय झाला म्हणून अर्जुनाला विचारूं लागला. तेव्हां अर्जुनानें झालेली हकीकत त्याला सांगितली. केळ जेथें तुटली होती तेथें कापराची रास उत्पन्न झाली होती. ती पाहून कृष्णानें अंतर्ज्ञानानें तो सर्व प्रकार जाणला, आणि तो अर्जुनाला बरोबर घेऊन कैलासास गेला. तेथें शंकर ध्यानस्थ बसले होते, व त्यांच्या कंठांतील मुंडमालेंत श्यामकर्णाचें शिर होतें. अर्जुनानें तें ओळखून त्याला वंदन केलें, आणि शंकराची स्तुति केली. त्याची भक्ति पाहून शंकरानें ध्यान आटोपलें, आणि तो कृष्णार्जुनांना म्हणाला,–'चला, तुम्हांला साहाय्य करण्यासाठी मी तुमच्या बरोबर येतों.' असें म्हणून तें तत्काळ निघाले. तो इकडे असा चमत्कार झाला कीं, अश्वाचें शिर पुनः उत्पन्न झालें. शंकरानें अश्वाजवळ जाऊन त्याला अमृत दृष्टीनें उठविलें; व सर्वांना आनंदित करून तो कैलासीं निघून गेला.

## अश्वाचें शिर कसे निघालें ?

अर्जुनानें बाणानें तोडलेली केळ पूर्वजन्मींची रंभा होती. एकदां नृत्यांत चूक झाल्यामुळें इंद्राचा शाप होऊन तिची अशी अवस्था झाली होती; परंतु 'धर्माचा अश्व येऊन तुला अडकेल व मग अर्जुनाच्या बाणानें विद्ध होऊन तूं स्वस्थानीं येशील.' असा तिला उःशाप मिळाला होता. त्याप्रमाणें अर्जुनानें बाण मारल्याबरोबर तिची सुटका झाली व ती अश्वाचें शिर घेऊन इंद्राकडे गेली. तेथे जाऊन व अश्वाचें शिर दाखवून तिनें इंद्राला आपला उद्धार झाल्याचें सांगितलें. तेव्हां इंद्रानें तें शिर शंकराकडे पाठवून दिलें. हा प्रकार कृष्णानें ज्ञानदृष्टीनें जाणून पूर्वीं सांगितल्याप्रमाणें तें शिर परत मिळविलें. शिवाय या चमत्कारांत त्यानें पुढील भविष्यही दाखवून दिलें. तें असें कीं, हा घोडा हस्तिनापुरास गेल्यावर त्याचा हवनप्रसंगीं शिरच्छेद होईल, तेव्हां त्याचें शिर कंठमालेंत जाईल. रंभेचा शिरच्छेद केल्यावर तेथें कर्पूराची रास उत्पन्न झाली, त्याची प्रतीति अद्यापि पृथ्वीवर आहे. ती अशी कीं, केळ तोडल्यावर तीतून कापूरदोडा काढितात. असो, यानंतर

श्रीकृष्णानें श्यामकर्णाला पुनः सोडून दिलें, व कामाक्ष्येला काऊरदेशीं पाठवून तो स्वतः अर्जुनाच्या संमतीनें सुर्जनापाशीं राहिला.

## अध्याय ७ वा



### सप्तऋषींस कृष्णाचें वरदान

कर्दळीवनांतून घोड्याला सोडविल्यावर त्याच्या मागून सर्व सैन्य हिमालयाच्या शिखराकडे वळलें. तेथें एका दाट अरण्यांतून जात असतां, घोडा एकदम उभा राहिला आणि चोंहोकडे पाहूं लागला. तेथें सात ऋषि हात पाय पसरून निजलेले होते. त्यांस पाहून तो श्यामकर्णही त्यांच्याप्रमाणेंच डोळे झांकून त्यांत जाऊन निजला. रक्षकांनीं अर्जुनाला हें वर्तमान सांगताच तो आश्चर्य करीत तेथें आला आणि जवळपास पाहूं लागला, तों पर्वतात कोरलेलें एक घर त्याला दिसलें त्यांत मुलींचीं खेळण्याचीं लहान लहान बाहुलीं पडलीं होती ते सर्व पाहून हें काय संकट आहे कोण जाणे, कृष्णा- शिवाय याचें निवारण कसें होईल?' असें म्हणून अर्जुनानें रक्षकांना चाबूक मारून घोड्याला उठवावयास सांगितलें; परंतु कांहीं केल्या घोडा पाय हालविना. तेव्हां वृषकेतूच्या सांगण्यावरून अर्जुनानें श्रीकृष्णाचें स्मरण करतांच श्रीकृष्ण लगेच तेथें येऊन अर्जुनाला भेटले. नंतर तें घोड्याजवळ गेले. घोड्यानें कृष्णाला पहातांच मान हालवून तो उठला, आणि त्याबरो- बर निद्रित झालेलें ते सातजणही उठून कृष्णाच्या पायां पडलें. तेव्हां कृष्णानें ते सप्तर्षि आहेत असें जाणून त्यांना वर दिला कीं, 'आजपर्यंत तुम्हीं भूमीवर पडून होतां, तरी आतां नक्षत्रमंडलांत जाऊन स्वस्थ रहा.' असा वर मिळतांच तें तारांगणांत जाऊन राहिले आणि कृष्ण सैन्याकडे निघून आले.

### सप्तऋषींच्या निद्रेचें कारण

नंतर कृष्णानें अर्जुनाला त्या ऋषींची हकीकत सांगितली, कृष्ण म्हणाले,–'एकदां दक्षानें यज्ञाला आरंभ करून सर्व देवांना निमंत्रण केलें.

तेव्हां शंकर आले नाहींत असें पाहून त्यानें त्यांना पुनः बोलावणें पाठविलें. शंकरांनीं आपल्यास यावयास वेळ नाहीं, असें सांगून पार्वतीला मात्र नंदीवर बसवून पाठविलें. शंखस्फटिकांचे अलंकार घातलेल्या आणि बैलावर बसलेल्या पार्वतीला पाहून दक्ष म्हणाला,–'अरे, हिला मागील द्वारानें आंत घ्या.' तिच्या बहिणीही तिची ही भिकार स्थिति पाहून तिला हसूं लागल्या. हा अप मान सहन न होऊन पार्वतीनें संतापून अग्निकुंडांत उडी टाकली, आणि विद्युद्रूपानें ती आकाशांत गेली. नंतर रुद्रानें दक्षाचा नाश केला. पुढें ही पार्वती हिमालयाच्या पोटीं जन्मास आली. इकडे शंकर स्त्रीविरहामुळें काम्यकवनांत येऊन तपश्चर्या करूं लागले. एके दिवशीं ही पर्वताची कन्या त्यांच्या दृष्टीस पडली असतां, त्यांना तिच्याशीं विवाह करण्याची इच्छा झाली व त्यांनीं सप्तर्षींना तिच्याबद्दल मागणी घालावयासाठीं हिमालयाकडे पाठविलें. हिमालयानें त्यांचा सत्कार करून त्यांना उत्तम भोजन घातलें. त्यायोगें अजीर्ण होऊन ते तेथेंच राहिले. मिष्टान्नांची चाड लागल्यामुळें तें स्थल त्यांना सोडवेना. पार्वती आपल्या घरकुल्यांत बाहुल्यांशीं खेळे तें पहावयास तें जात, तेव्हां ती भातकुलीचें अन्न त्यांना वाढी. अन्न खाल्यावर हातपाय पसरून ते तेथें झोंप घेत. इकडे मदन शंकराला त्रास देऊं लागला, तेव्हां त्याचें त्यांनी भस्म करून टाकिलें, आणि विष्णूला ऋषींच्या शोधार्थ पाठविलें. विष्णु हिमालयाकडे येऊन ऋषींची चौकशी करूं लागला, तेव्हां हिमालयाच्या सांगण्यावरून ते पार्वतीकडे आले. तो तेथें दारांतच निजलेले ऋषि त्याच्या दृष्टीस पडले. विष्णूला पाहून त्यांना लाज वाटली आणि ते तसेच डोळे मिटून पडून राहिले. तेव्हां–'असेच येथें तीन युगें लोळत पडा' असा त्यांना शाप देऊन विष्णु निघून गेला. पुढें शंकराचा विवाह झाला, तरी ऋषी तसेच तेथें पडून राहिले. त्यांना मुक्त करण्यासाठींच घोडा त्यांचेजवळ गेला होता. अशी कथा अर्जुनाला सांगून श्रीकृष्ण द्वारकेस निघून गेले.

## मदनावती नगरींतील हकीकत

श्रीकृष्ण निघून गेल्यावर सैन्य श्यामकर्णासह पुढें चालूं लागलें. तें कांहीं वेळानें मदनदेशांतील मदनावती नांवाच्या नगरीजवळ आलें. मदनभद्र नांवाचा राजा तेथें राज्य करीत असून मदनमंजरी नांवाची त्याची राणी

होती. त्या नगरींतील लोक मोठे शिवभक्त होते. घोडा जवळ आल्यावर ते सर्व लोक तटाच्या बुरुजांवर त्याला पहावयासाठीं जमले. श्यामकर्ण नगरांत शिरला, तेव्हां राजसेवकांनीं त्याला धरून राजाकडे नेले. राजानें त्याच्या मस्तकावरील पत्रिका वाचून व सर्व वृत्तांत जाणून घोड्याला किल्ल्यांत बांधून ठेवावयास सांगितलें, आणि आपळा पुत्र मदनधूर्मा आणि प्रधान केतुवीर यांसह सैन्य तयार करून तो युद्धास सिद्ध झाळा अर्जुनाचे दूत येऊन घोडा मागूं लागले असतां, 'युद्धावांचून घोडा मिळावयाचा नाहीं,' असा त्यानें परत निरोप पाठविला. अर्जुनानें तो निरोप ऐकून मोठा त्वेषानें शहरावर चाल केली. दोन्हीं सैन्यें एकत्र झाल्याबरोबर प्रथम वृषकेतु आणि राजपुत्र मदनधुर्मा यांचें तुमुल युद्ध झालें एकमेक एकमेकांना बाणांनीं विद्ध करीत असतां, राजपुत्रानें तीन बाण मंत्रून वृषकेतूवर सोडिले, आणि त्याचा उजवा हात तोडिला. त्याबरोबर अर्जुनाला त्वेष येऊन त्यानें मदनधूर्मावर अभिमंत्रित बाण सोडून त्याला ठार केलें, पुत्रवधाची बातमी कळतांच, राणी धांवत मदनभद्राकडे गेली आणि तिनें त्याला युद्धास उठविलें. क्रोधाविष्ट होऊन मदनभद्र राजा समरांगणांत आला, आणि त्यानें अर्जुनाबरोबर दारुण युद्ध सुरू केलें. तेव्हां प्रद्युम्न अर्जुनाला आणि केतुवीर मदनभद्राला साह्य करूं लागले. बराच वेळपर्यंत एकमेक एकमेकांना मूर्च्छित करीत होते. केतुवीरानें मोठा पराक्रम करून आपला रथ भग्न झाला असतांही व डावा हात जाया झाला असतांही कृतवर्म्याला ठार मारिलें. तेव्हां पांडवांकडील मकरध्वज वीरानें त्यावर चालून येऊन त्याचा उजवा पाय तोडिला. तशाही स्थितींत डावा पाय जमिनीवर टेकून केतुवीर प्रधानानें मकरध्वजावर उजव्या हातानें शस्त्र-प्रहार करून त्याला यमसदनीं पाठविलें. मग अनुशल्याच्या अंगावर चालून गेला. आपणावर येणारे बाण चुकवीत चुकवीत, या थोटला प्रधानानें अनुश-ल्यास धरलें व सैन्यांत भिरकावून दिलें; आणि त्या मागून धांवत धांवत जाऊन शस्त्रानें त्याचा वध केला. नंतर तो यौवनाश्वाचा समाचार घेण्या-करितां त्यावर वळला, आणि सुवेक नामक त्याच्या पुत्रासह त्याला त्यानें जीत केलें. तेव्हां चवरबंबाळ नांवाचा यादवांकडील वीर त्यावर धांवून आला. इकडून मदनभद्रानें आपले सबळ आणि बिकटकेतु नांवाचे पराक्रमी बंधू प्रधानाच्या मदतीला पाठविले. चवरबंबाळानें लगट करून विकटकेतूला

ठार केले. तेव्हां कालकंद नांवाच्या वीरानें धावून चवरबंबाळाला मारिलें, नंतर तो सात्यकीशी लढूं लागला असतां यौवनाश्वानें त्याला ठार केले, तेव्हां रविश्रास नांवाचा मदन भद्राचा वीर त्याच्या अंगावर धांवला; परंतु सात्यकीच्या बाणांनीं लवकरच त्याला या जगांतून सोडविलें. तेव्हां मदनभद्रानें संतापून सात्यकीला मारण्यासाठीं विजयबाहु नांवाच्या वीराला त्यावर पाठविले, विजयबाहूनें सात्यकीला जिंकलें आणि तो अर्जुनाला म्हणाला,--' अरे आतां तुला जिंकतों पहा.' परंतु हें शब्द सहन न होऊन अर्जुनानें एक बाण मंत्रून त्याच्यावर सोडला त्या अग्नीप्रमाणें प्रदीप्त झालेल्या बाणाला पाहून सर्व सैन्य पळालें, व विजयबाहु मरून पडला, आपले सर्व वीर पडलें असें पाहून मदन भद्र स्वतः अर्जुनाशीं लढावयास आला. अर्जुनानें मूर्च्छित केलें, परंतु पुनः सावध होऊन मदनभद्रानें कुलदीपिका मंत्राचा जप केला. त्याबरोबर त्याची कुलदेवता तेथें येऊन उभी राहिली. राजानें तिला बाणाच्या टोकावर बसवून बाण सोडला. त्या धगधगीत बाणाच्या योगानें अर्जुनाचा कंठनाळ चिरून तो जमिनीवर पडला. व त्याच्या सर्व सैन्यांत हाःहाःकार उडाला. हें पाहून मेघवर्णाला फार क्रोध आला. त्यानें मदनभद्राशीं निकराची झोंबी सुरू केली, शेवटीं त्याचे पाय धरून त्याला गरगर फिरविलें, आणि पर्वतावर आपटून ठार केले. राजाचा याप्रमाणें वध झालेला पाहून त्याची मंदनमंजिरी नांवाची राणी राक्षसीरूपानें समरभूमीवर आली, आणि मेघवर्णाच्या सैन्यावर शिला-पाषाणांचा वर्षाव करूं लागली. पांडव सैन्यांतून जितकें बाण येतील तितकें गिळून टाकून ती हत्ती घोडे यांनाही भराभर तोंडात टाकू लागली. तिच्या अंगाला शस्त्र लागून जे रक्तबिंदु गळत त्यापासून अनंत राक्षसी उत्पन्न होत, आणि त्याही सैन्याला खाऊन टाकीत. याप्रमाणें राक्षसींचा अधिकाधिक विस्तार होऊं लागला. शेवटीं मेघवर्णानें अतित्वेषानें मंदनमंजरीवर मुष्टिप्रहार करून तिला मूर्च्छित केले. पण मंदनमंजरी लगेच सावध झाली व तिनें मेघवर्णाला उचलून आकाशांत नेलें आणि तेथून खालीं टाकून दिलें. परंतु मेघवर्ण मध्येंच कावा साधून जमिनीवर उभा राहिला आणि तिच्या पाठीस लागला. तेव्हां मंदनमंजरी पळत पळत पार्वतीच्या देवालयाकडे गेली. ती पार्वतीची मोठी भक्तीण असल्यामुळें तिनें तिला सोन्याची नगरी देऊन वर दिला होता कीं, ' तुझ्या संकटसमयीं मी तुला पावेन.' या वराप्रमाणें ती आतां पार्वतीचे

सहाय्य मागण्यासाठीं तिजकडे गेली.

---

# अध्याय ८ वा



## रुद्राक्षाची उत्पत्ती

मंदनमंजरी पार्वतीकडे चालली असें पाहतांच, मेघनादानें धांवत जाऊन तिचे केश धरिले. तेव्हां ती त्याची करुणा भाकून म्हणाली,—' अरे बाबा, माझें प्राण वांचव, मी तुझी दासी होऊन राहीन.'—मेघनादानें उत्तर केलें—' अगे, माझा बंधु बृषकेतु तूं मारिलास तो आतां मला कसा भेटेल ? त्याच्याबरोबर माझा सर्व आनंद नाहींसा झाला आहे !'— हे त्याचे करुणालाप ऐकून मदनमंजरी म्हणाली, 'बाबारे, तुझा बृषकेतु तुला आठवला; पण आमचा तुम्ही एवढा अनर्थ केला त्याची वाट काय?' हे तिचे खोचक बोलणें ऐकून मेघनादानें विचार केला कीं, ' हिला आता सोडून दिल्यास ही उरलेल्या आमच्या सर्व सैन्याचा नाश करील, तेव्हा हिचा आपण नाशच केला पाहिजे.' असे म्हणून त्यानें तिचें पाय धरले व मारण्यासाठीं तो गरागर फिरवूं लागला; पण इतक्यांत तीं त्याच्या हातून निसटली: व एका पर्वतावर आदळून मूर्च्छित झाली. थोड्या वेळानें ती सावध होऊन पहाते, तो मेघवर्ण तिच्या पाठीस लागला आहे. तेव्हा ती कैलासाकडे पळत गेली. मग मेघवर्ण सैन्याकडे परत आला. इकडे मदनमंजरीनें पार्वतीकडे जाऊन तिला सर्व हकीगत सांगितली. पार्वतीनें आश्वासन देउन सांगितलें की, 'काहींतरी उपाय करून मीं तुझ्या शत्रूंचा वध करीन. आतां आपण शंकराकडे जाऊन त्याचें साहाय्य मागूं.' ते ऐकून मदनमंजरी धरणीवर पडून म्हणाली,—' शंकरानें साहाय्य न केलें तर माझा कार्यनाश होऊन मी तुझ्या नांवानें देहत्याग करीन.' पार्वतीनें उलट तिला सांगितलें, ' शंकर साहाय्य न करतील तर मीही प्राणत्याग करीन. तूं भिऊं नको. माझा प्राणनाथ माझें ऐकल्याशिवाय रहावयाचा नाहीं. मग त्या दोघी शंकराकडे गेल्या, पार्वती मदनमंजरीला बाहेर उभी

करून आपण मंदिरांत गेली, आणि शंकराची नानाप्रकारें स्तुति करूं लागली शंकरानें डोळे उघडून 'आज अशीं स्तुति करण्याचें कारण काय ?' म्हणून तिला विचारलें. तेव्हां प्रथम कार्य करण्याचें कबूल करून घेऊन ती म्हणाली 'तुम्हीं जेथें मदनाला जाळिलें, त्या मदन देशांत मदनावती नगरीत मदनभद्र राजा, भक्ति करणाऱ्या मदनमंजरी नांवांच्या राणीसह माझ्या वरदानानें राज्य करीत होता. त्यावर एका दैत्यानें धाड घालून राजपुत्रांसह त्याला ठार मारून सर्व देशाचा विध्वंस केला आहे, म्हणून आपलें साहाय्य मागण्यासाठीं ती माझी भक्त मदनमंजरी मजकडे आली आहे. तिला सहाय्य करावें' हें ऐकून शंकरानें एक जटा तोडून फेकून दिली. त्याबरोबर विक्राळ दाढांचा एक वीर तेथें उत्पन्न झाला,व 'काय आज्ञा आहे?' म्हणून शिवास विचारूं लागला. शंकरानें त्याचें नांव ' रुद्राक्ष' ठेविलें. पार्वती मदनमंजरीला म्हणाली, ' या रुद्राक्षाला घेऊन जा, म्हणजे तो तुझें कार्य करील,'

नंतर मदनमंजरी त्या रुद्राक्षास घेऊन मदनावतीस आली. तेथें अर्जुन आदिकरून मेलेल्या वीरांना एकत्र करून, मेघवर्ण त्याचें रक्षण करीत बसला होता. श्रीकृष्णाला हें वर्तमान कळवावयास जावें, तर ही श्वापदें भक्षण करतील अशा विचारांत तो आहे, इतक्यांत ती राक्षसी रुद्राक्षासह तेथें आली. त्या दोघांनीं मिळून मेघवर्णाला जमिनीवर पाडून उरलेल्या सैन्याचा संहार केला, आणि मिळालेली सर्व लूट नगरांतील किल्ल्यांत नेऊन ठेविली. नंतर त्यांनीं आपल्या सर्व वीरांची प्रेतें जमवून एका मोठ्या चितेवर रचलीं व त्याचें दहन केलें त्या वेळीं त्या वीरांच्या स्त्रियांनींही अग्निप्रवेश केला. एवढें झाल्यावर रुद्राक्षानें मदनमंजरीला विचारिलें, ' आतां काय करावयाचें आहे तेव्हां तिनें उत्तर केलें, ' तुम्हीं आतां जाऊं नका; कारण या मारलेल्या वीरांचें वडील हस्तिनापुरीं आहेत, असें घोड्याच्या मस्तकावरील पत्रिकेंत लिहिलें आहे; तरी ते आल्यावर माझा प्राण घेतील. म्हणून तुम्ही तेथपर्यंत येथें थांबा.' तें ऐकून रुद्राक्ष तेथें राहिला. परंतु त्याच्या मनांत मोठा दचका बसून राहिला. इतक्यांत नारद तेंथें आला. मेघवर्णानें अभिमंत्रित बाण प्रेतांच्या रक्षणासाठीं ठेविले होते. ते बाण, कोणी श्वापद आलें असें समजून नारदावर आले; परंतु त्यानें कृष्णस्मरण करतांच ते पशुपक्ष्यांना मार मारून स्वस्थ बसले बाणांचें हें सामर्थ्य पाहून नारद मनांत हर्षित होऊन हें वर्तमान श्रीकृष्णाला सांगण्यासाठीं तो त्वरित द्वारकेस गेला. सर्व प्रकार ऐक-

तांच श्रीकृष्ण. रुक्मिणी व नारद यांसह हस्तिनापुरास आले. तेथें सर्वांनीं अर्जुनादिकांचें कुशल विचारलें असतां, सर्व सुखरूप आहेत असें सांगून कृष्णानें धर्माला एकांतीं नेलें, व खरा प्रकार सांगितला. नंतर श्रीकृष्ण स्वतः गरुडावर बसून मदनावतीस गेले. तेथील विपरीत प्रकार पाहून धर्मकार्य सिद्धिस-नेण्यासाठीं त्यांनी अमृतदृष्टीनें सर्वांना जीवंत केलें. परंतु पुढें पाहतात तो, रथ, घोडे, हत्ती, वगैरे सर्व लूटून नेलेलें त्यांस दिसलें. तेव्हां कृष्णानें विश्वकर्म्याला बोलावून त्याच्याकडून शस्त्रांनीं भरलेलें रथ मागविले, आणि कल्पवृक्षाकडून वस्त्रें वगैरे इतर हरतऱ्हेचे जिन्नस आणून सैन्याला पुरविले. या प्रमाणें कृष्णाच्या साहाय्यानें सर्व सैन्य पुनः सिद्ध झालेलें पाहतांच, त्या नगरींतील लोकांनीं मदनमंजरीला जाऊन ती हकीकत कळविली. ती ऐक–तांच रुद्राक्ष पुनः सर्वांना अभयवचन देऊन आकाशांत उडाला, व मोठ्यानें गर्जना करीत पांडवसैन्यावर उडी घालून त्याला खंड विखंड करूं लागला. मदनमंजरीनेंही पुनः बऱ्याच सैन्याचा फडशा उडविला. तें पाहून मेघवर्ण रुद्राक्षावर धावून गेला. दोघांची फार भयंकर झोंबी होऊन शेवटीं रुद्राक्षानें मेघवर्णाला चिरडून गिळन टाकिलें, आणि तो वृषकेतूकडे वळला. वृषकेतूनें जितके अग्निबाण त्याच्यावर सोडले ते सर्व गिळून रुद्राक्ष त्याला खावयासाठीं जवळ आ . इतक्यांत प्रद्युम्नानें पुढें होऊन त्यावर बाण सोडिले. तेही गिळून रुद्राक्ष आकाशांत उडाला, आणि प्रद्युम्नावर झेप घालून त्यानें त्याला अर्धें गिळून टाकिलें. असा प्रकार पाहतांच अनिरुद्ध पुढें झाला, आणि त्यानें आपल्या गदेनें रुद्राक्षाच्या मुखावर प्रहार केला. परंतु रुद्राक्षानें त्या दोघोनाही गट्ट केले, आणि तेथून तो यौवनाश्वाकडे वळला. तेव्हां यौवनाश्वाचा पुत्र सुवेग पुढें आला, पण त्या सर्वांना बगलेंत मारून रुद्राक्ष वर उडाला, व तेथून त्यानें सर्वांना टाकून दिलें. मदनमंजरीनें त्यांना लगेच उचलून तोंडात टाकिलें. हें पाहून विजयबाहु नांवाच्या यादवानें रुद्राक्षावर घाव घालून त्याचा कोथळा फोडला. तेव्हां त्यांतून तीन लक्ष मनुष्यें निघालीं, व रुद्राक्ष घायाळ झाला. परंतु मदनमंजरीनें व त्यानें मिळून विजयबाहूला गिळून आणखीही लक्षावधि वीरांचा फडशा उडविला. नंतर रुद्राक्षानें कालदंत प्रधान व चवरबंबाळ यांनांही दाढेखाली रगडून टाकिलें. असा प्रकार पाहतांच अनुशाल्व धांवत आला, आणि त्या दोन्ही राक्षसांना घेऊन तो

आकाशांत उडाला, आणि तो म्हणाला,–' अरे, पूर्वी घोडा घेऊन मी उडालो होतों, तेथे तुमचा काय पाड ?' परंतु रुद्राक्षानें त्याचे पाय धरून त्याला खाली पाडिले, व कृतवर्मा आणि मकरध्वज यांना फाडून त्यांची आंतडी खात खात ती दोघे नाचूं लागलीं. हा प्रकार पाहून कृष्णालाही अचंबा वाटला आणि हा राक्षस कोणी पाठविला असावा, याचा तो विचार करूं लागला. इकडे रुद्राक्षानें सात्यकीला धरिलें, तेव्हां केवळ धाकानें तो अर्ध-मेला झाला. तेव्हां वृषकेतु प्रतिज्ञेनें कृष्णाला म्हणाला,' आतां माझें क्षात्रतेज पहा. ' असें म्हणून तो रुद्राक्षावर अग्निबाण टाकूं लागला. त्याच्या योगानें रुद्राक्षाच्या अंगांतून ज्वाला उठल्या. त्या विझविण्यासाठीं तो अनेक वीर, हत्ती, घोडे यांना फाडून त्यांचे रक्त त्यांवर शिंपू लागला. हा अनर्थ पाहून वृषकेतूनें अग्निबाण माघारा घेतला व वरुणास्त्र सोडिलें. ते रुद्राक्षानें गिळले आणि वृषकेतूला खाण्यासाठीं तो मदनमंजरीसह त्याच्यावर धांवला हा आकांत पाहून कृष्ण त्याच्या साहाय्याला धांवले. तो त्यालाही खावया-साठीं मदनमंजरी धांवत आली. तेव्हां कृष्णानें तिच्यावर सुदर्शन सोडिलें. तिनें तें गिळून टाकिलें; पण तिचें पोट फोडून चक्र पुनः कृष्णाच्या हातीं आलें. हा अनर्थ पाहून सूर्यालाही दुःख झालें, व क्षणभर सर्वत्र अंधःकार पडला. ही दोघें अनिवार झालेली पाहून, कृष्णानें मारुतीचें स्मरण केलें. त्याबरोबर मारुति तेथें आला, व ' काय आज्ञा आहे ' म्हणून कृष्णास विचारूं लागला. तेव्हां राक्षसीचा संहार करण्याची कृष्णानें त्याला आज्ञा केली. आज्ञा होतांच मारुतीनें जोरानें भुभुःकार करून तिची पाठ धरिली तेव्हां ती राक्षसी पळत सुटली. शेवटीं पळतां पळतां थकून, ती तोंड वासून पडली. ती तोंड वासून खालीं पडतांच मारुतीनें तिच्या तोंडांत उडी मारिली, आणि पोटांत जाऊन तिचें शरीर फुगविलें. मग मानेस पुच्छ वेटा-ळून मारुतीनें एक हिसडा दिला, त्याबरोबर ती मेली. नंतर रुद्राक्षाला धरण्यासाठीं मारुतीनें आपले पुच्छ पाठविलें. परंतु इतक्यात रुद्राक्ष अर्जु-नाला घेऊन आकाशात उडला, व कृष्णानें सोडलेलें सुदर्शनही त्यानें गिळून टाकिलें. तेव्हां हा सर्व खेळ शंकराचा आहे असें कृष्णाला समजून आलें. मग त्यांनीं क्षणभर जपून वागण्याविषयीं सांगून, ते स्वतः कैलासावर गेले, व शिवास म्हणाले,–' महाराज, बरी मौज केलीत. रुद्राक्षाकडून आम्हांला निःशस्त्र करवून आमचा घात करविला, त्यापेक्षां आपण स्वतः आपल्या हाताजें

हल्ला कां नाहीं केला?' हें कृष्णाचें खोचदार बोलणें ऐकून, शिवानें उत्तर केलें, 'एका दैत्यानें अनर्थ मांडला आहे असें पार्वतीनें सांगितल्यावरून मीं रुद्राक्षाला त्याच्या नाशाकरितां पाठविलें. तुमचा त्यांत संबंध होता हें मला माहीत नाहीं.' असें म्हणून शंकर पार्वतीला रागावूं लागला. तेव्हां पार्वती कृष्णाच्या पाया पडून त्याची क्षमा मागूं लागली. नंतर शिवानें कृष्णास सांगितलें,–'कृष्णा, रुद्राक्ष अद्भुत शक्तीचा असून सहसा कोणास आटोपायाचा नाही. तरी आतां हा माझा त्रिशूल घेऊन जा, व तो ईशान्य कोणांत टाकून त्याचा वध कर. नंतर गंगासंगमांत त्याला नेऊन टाक. कारण तो गंगेपासूनच माझ्या जटेत निर्माण झाला आहे.' शंकराच्या आज्ञेप्रमाणें श्रीकृष्ण त्रिशूळ घेऊन, अर्जुन–रुद्राक्षांचें युद्ध चाललें होतें तेथें आले, व ईशान्येस त्रिशूळ फेकून त्यांनीं रुद्राक्षाचा अंत केला. त्यावेळीं त्याच्या शरीरांतून सुदर्शन बाहेर येऊन कृष्णाच्या हातांत पडलें. मग अर्जुनानें बाण मारून त्याचें शिर गंगासंगमावर नेऊन टाकिलें. याप्रमाणें अर्जुनावरील संकटाचें निवारण केल्यावर, कृष्णानें सर्व सैन्याला अमृतवृष्टीनें पुनः जिवंत केलें. श्रीकृष्णाचें हें चरित्र पाहून सर्वांस आनंद झाला. नंतर रुद्राक्ष पुनः सजीव होईल कीं काय, या भीतीनें श्रीकृष्ण गंगासंगमावर त्याला प[ाहा]वयास गेले. तेथें त्याचें शिर धडाकडे टवकारून पहात होतें. कृष्ण दृष्टीस [प]डतांच त्यानें त्याजवळ वरदान मागितलें. तें शिर म्हणालें, 'देवा, मला तुझ्या हातून मृत्यु आला आहे, तरी मला आतां वरदान द्यावें.'

## रुद्राक्षास वरदान

तेव्हां श्रीकृष्ण म्हणाले,—'तुझ्या मनांत असेल तें तूं मागून घे.' असें म्हणतांच 'माझ्या शिरें करून जे शिवाचें स्मरण करितील, त्यांना शंकराची प्राप्ति व्हावी,'-असें मागितले, कृष्ण 'तथास्तु' म्हणून अर्जुनाजवळ आला. नंतर त्या सर्वांनीं नगरींत प्रवेश करून लोकांना अभय दिलें आणि किल्ल्यांत जाऊन वीरांनीं आपले नेलेले सर्व जिन्नस ओळखून परत घेतले. याप्रमाणें सर्व तयारी झाल्यावर कृष्णानें सिंहासनावर बसून श्यामकर्णाची पूजा केली, आणि तेथील भांडार फोडून त्यांतील वस्त्रालंकारांनीं रथ भरून ते हस्तिनापुरास पाठविले. मग मदनभद्राच्या जागीं राज्यावर कोणास बसवावें, याचा विचार कृष्ण करीत असतां अर्जुनानें सुचविलें कीं,–'प्रद्युम्नाला राज्य

द्यावें.'–हा विचार सर्वांना पसंत पडल्यावर प्रद्युम्नाला तें राज्य देऊन कृष्णानें घोडा सोडिला, आणि त्याचें कुशलवृत्त सांगण्यासाठीं हस्तिनापुरास गेला. तेथें धर्माला भेटून मग रुक्मिणीसह कृष्ण द्वारकेस गेला, व पुनः रुक्मिणीची अनुमति घेऊन अर्जुनाकडे आला.

## रुद्राक्ष महात्म्य

इकडे रुद्राक्षाचा वध झाल्यावर त्याचें जे रक्त पडलें, त्यापासून रुद्राक्ष फळें उत्पन्न झाली, व ती शिवानें आपल्या कंठमालेंत ओविली म्हणून रुद्राक्ष धारण केले असतां रुद्र प्रसन्न होतो, असें मानले आहे.



# अध्याय ८ वा

## वल्लभी राजाची कथा

श्रीकृष्ण द्वारकेहून परत आल्यावर अश्वासह सैन्य पुनः चालूं लागलें. मदनभद्रासारखा वीरही मारला गेला, हे ऐकून देशोदेशीचें राजे अर्जुनाला करभार देऊन शरण गेले. तेव्हां कृष्ण म्हणाला.---‘ पार्था, तुझीं माता पितरें धन्य आहेत. तूं आज सर्व पृथ्वी जिंकल्यामुळें तुझी सर्वत्र ख्याति झाली आहे.'–तेव्हां अर्जुनाने उत्तर केले,—‘ हें तुझ्याच कृपेचें फल आहे.' असें जरी अर्जुनानें म्हटलें खरें, परंतु कृष्णाने प्रशंसा केल्यामुळें त्याच्या मनांत आपल्या पराक्रमाबद्दल गर्व उत्पन्न झाला. नंतर तो श्यामकर्ण, सैन्यासह चालतां चालतां परत हस्तिनापुराजवळ जाऊन उभा राहिला तेव्हां कृष्णानें त्याजवळ जाऊन कानांत कांहीं खूण सांगितली. त्याबरोबर तो पूर्वेकडे वळून भागीरथी संगमाजवळ आला. तेथें सोमकांत नगरींत वल्लभी राजा राज्य करीत होता. त्या शहराजवळ सर्वांनीं मुक्काम केला. सकाळीं सर्वजण उठून पाहतात तों घोडा नाहीं. तेव्हां ते चिंता करीत बसले. इतक्यांत नारद तेथें आला. कृष्णानें त्याला घोड्याचें वर्तमान विचारिलें.

तेव्हां तो म्हणाला,—' कृष्णा, तुमचा घोडा सोमकांत नगरीच्या द्वाराला जाऊन उभा राहिला असतां, तेथील वल्लभी राजाच्या वीरांनीं त्याच्या सर्व रक्षकांना पिटाळून लाविलें, आणि त्याला धरून नेलें. तो राजा महा-पवित्र असून एकशें आठ ऋषींची मनोभावानें सेवा करीत असतो. त्याच्या भक्तीमुळें अनेक देवता त्याला प्रसन्न असून त्याच्या सन्निध राहत असतात. ऋषींच्या आशीर्वादामुळे त्याला एकशें आठ हात व तितकींच शिरकमलें प्राप्त झालेली आहेत; आणि प्रत्येक हाताला एक याप्रमाणें एकशें आठ विष्णूरूप देवता त्याचें रणांगणांत नेहमीं रक्षण करीत असतात. तूं तर अर्जुनाच्या रथावर एकटाच आहेस.'–हे नारदाचें भाषण ऐकून अर्जुनाचें तोंड उतरलें, नारद पुढें सांगू लागला,—' अर्जुना, सूर्यवंशी बाहूक नांवाचा राजा कालवशांत मरण पावला असतां त्याची गणनामा नांवाची स्त्री अग्निप्रवेश करूं लागली. परंतु वसिष्ठानें वंश बुडेल या भीतीनें तिचें निवा-रण करून तिला सांगितले कीं, ' तुझ्या गर्भांत सुंदर पुत्र आहे, तरी तूं असें साहस करूं नकोस.' राणीला तें मानवलें, व तिनें आपला बेत सोडून दिला, पुढें नऊ मास भरल्यावर तिला पुत्र झाला, त्याचें नांव सगर ठेविलें त्याचें लग्न होऊन त्यांला आठ हजार पुत्र झाले, त्यांनीं सर्व पृथ्वी जिंकून शेवटी इंद्राचें नगर जिकण्यासाठीं अश्वमेधास सुरवात केली, तेव्हां इंद्रानें भीतीनें त्यांचा घोडा पळवून पाताळांत कपिशेजारी नेऊन ठेविला, पुढें सगरपुत्रांनीं कपिलमुनींचा अपमान केल्यामुळें, कपिलमुनीनें रागावून त्यांचें भस्म केलें, त्यामुळे पुत्रशोकानें सगर मरण पावला, पुढें त्याच्या भगीरथी नावांच्या नातवानें स्वर्गांतील गंगा पातालांत नेऊन आपल्या पूर्वजांचा उद्धार केला, त्याच भगीरथाच्या कुलांत हा वल्लभी जन्मास आला आहे, व त्यानें सर्व देव व ऋषि यांना वश केलें आहे, नारद असें सांगत आहे, तों वसिष्ठमुनि तेथें आले, त्यांचा सत्कार केल्यावर,—'वल्लभीस अश्व परत द्यावयास सांगून आमचें कार्य सिद्धीस न्यावें,' अशी अर्जुनानें वसिष्ठास विनंति केली, ती,मान्य करून वल्लभीला जाऊन सांगितलें कीं,–' राजा, तूं ज्याचें नेहमीं ध्यान करीत असतोस, तो हृषीकेशी कृष्ण अर्जुनाचा साहाय्यकारी आहे तरीं तूं निरभिमानें त्याचा अश्व परत देऊन त्याचा बहुमान कर.' हें ऐकून वल्लभी सर्व सैन्य सिद्ध करुन अश्व परत द्यावयास सिद्ध झाला. इतक्यांत नारदानें येऊन त्याला खिजविलें, नारद म्हणाला,–'अरें, तूं अश्वाच्या

मस्तकावलील पत्रिका वाचलींस काय? ज्याच्या अंगात पुरुषार्थ असेल त्यानेंच घोडा सोडून द्यावा, असे तीत लिहीले आहे. हा घोडा तुझा पूर्वज जो सगर त्याचा असून सुर्याच्या रथानें तो पवित्र झालेला आहे, त्याला तूं परत दिल्यास तुझी अपकीर्ति होईल, ' हे ऐकून राजानें प्रधानाचा सल्ला घेतला. त्यानेंही तसेंच मत दिले. राजाची उपास्य देवता जो अनंत त्यानें त्याला सांगितले,-'अरे, पार्थाचा सारथि जो कृष्ण तोही माझाच अवतार आहे. अर्जुनाला अभिमान झाल्यामुळे त्याला कृष्णानें येथे आणले आहे. तुम्ही केवळ माझ्या बळावर जाल, तर माझे त्याच्यापुढें काही चालावयाचे नाही. तूं महापराक्रमी आहेस; परंतु तो वनमाली कृष्ण सर्व युक्त्या जाणत असल्यामुळे, त्याशी युद्ध करण्यात फायदा नाहीं. तरी तूं व्यर्थ अभिमान धरू नकोस. ' अनंताचे भाषण ऐकून राजाला फार खेद वाटला, तरी पण तो म्हणाला,-'मी क्षणात कृष्णार्जुन जिकून टाकीन. माझे कौतुक तर पहा असें बोलून प्रधानकरवी त्यानें सर्व सैन्य तयार करविले व गंगासंगमी येऊन तळ दिला. दोन्ही सैन्याचें युद्ध सुरू झाले दोन पक्षाकडून असंख्य बाण सुटूं लागले. मेघनाद आणि वल्लभाचा प्रधान यांची भयकर झुंज होऊन मेघनादानें प्रधानाला एक मोठ्या शिलेखाली दडविलें. हे पाहुन वल्लभीनें आपला रथ जोरानें हाकला. आणि वीरांना उत्तेजन देऊन सर्व भूतांना पांडव सैन्यावर सोडलें. त्या भूताना हनुमान आणि मेघवर्ण यांनी पळवून लाविला. इकडे प्रधान पडला असे पाहून धूम्रभान नांवाचा पुत्र त्वेषानें चाल करून आला त्याचे व वृषकेतुचे युद्ध होऊन सूर्यास्ताच्या सुमारास वृषकेतुनें त्याचा वध केला, नंतर प्रातःकाल झाल्यांवर पुनः दोन्ही सैन्ये लढावयास तयार झालेली पाहून वल्लभीनें अनंताची प्रार्थना केली. तेव्हा देव म्हणाला,-'राजा, मी तुझ्या बाणावर राहीन व त्यायोगे तुला अर्जुनाचें बाण लागणार नाहीत; परंतू माझें निवारण मी करीत असतां तूं ऐकत नाहीस, हें खरे नव्हे. आता माघार घेतल्यास माझ्या प्रसन्नपणास बोल लागेल. ' हे ऐकून राजा म्हणाला, माझीं लाज देवाला आहेच तेव्हां अनंत आणखी म्हणाला, 'अरें, मला तर शस्त्र हातात घ्यावयाचे नाही. मी सर्व शस्त्रास्त्रे माझा व्यक्त अवतार जो श्रीकृष्ण त्याच्या स्वाधीन केलीं आहेत. तुझ्या भक्तीनें वश होऊन मात्र मी यास्थळीं नेहमी रहातो. याप्रमाणे अनंतानें राजाला सांगितल्यावर तो म्हणाला, 'देवा, तुमच्या कृपेनें मी पांडवांना

जिंकीन, माझें कौतुक पहा.' असें म्हणून त्यानें आपल्या सैन्याला इशारा दिला. घनघोर संग्राम सुरु झाला. शस्त्रास्त्राच्या खणखणाटानें आकाश भरुन जाऊन रक्ताचे पूर वाहूं लागले. वल्लभीं व यौवनाश्व याचें तुमूल युद्ध होऊन महिष नांवाच्या वल्लभीच्या प्रधानानें यौवनाश्वाला पाडिले. तेव्हा सुवेग, अनुशल्य, सात्यकि, मदन इत्यादि पांडवाकडील वीरांनी वल्लभीवर असंख्यात बाणांचा वर्षाव केला. पण तितक्याही बाणांचें निवारण करुन वल्लभीनें चार अभिमत्रीत बाण सोडून त्या चौघांची शिरें उडविली. कृष्णानें ते पाहून अर्जुनाला म्हटले, 'पार्था, तूं व्यर्थ अभिमान धरल्यामुळें, आज तुझ्यासाठीं माझ्या पुत्राला सैन्यासह मरावें लागले.' तेव्हां अर्जुनानें उत्तर केलें, 'कृष्णा, मला गीतेचा उपदेश करून माझ्या हातून तू गोत्रहत्या घडविलीस तेव्हां कां बरे क्षात्रधर्माचा मला अभिमान बाळगण्यास सांगितलेस? त्यावेळीं क्षात्रधर्माची प्रशंसा करून आता तूंच त्याची निंदा करतोस, तरीं हें बोलणें तुझ्याविरुद्ध जाते ? हे ऐकून 'फार बोलण्यात अर्थ नाहीं, असे म्हणून कृष्णानें मेघनाद व वृषकेतु यांना वल्लभीवर पाठविले. त्यांनी त्याच्यावर मोठमोठ्या धोंडी फेकल्या. परंतू वल्लभीनें त्यांचा चूर करून टाकला. तेव्हां वृषकेतुनें प्रतिज्ञा करुन अनंतासह वल्लभीचा रथ आकाशांत उडविला. वल्लभीं मोठ्या कष्टानें खाली येतो आहे, इतक्यांत मेघनादानें पुनः त्याला रथासह उडवून दिलें, तेव्हां वल्लभी रथावरील भैरवगणांस म्हणाला, वृषकेतुपेक्षां मेघनादाचेंच बळ अधिक दिसते, 'तेव्हा अनंत म्हणाला, 'आता यांचा नाश केल्याशिवाय मी रहात नाही.' असे बोलून तो रथाखाली उतरला आणि कृष्ण पाहात असतां त्यानें वृषकेतू आणि मेघवर्ण यांची शिरें बाणांनी उडवून दिली. वल्लभीनें हे पाहून अनंताला नमस्कार केला. अर्जुनाला मात्र त्यामुळें फार दुःख होऊन तो हातचें धनुष्य टाकून जमिनीवर पडला. इकडे वल्लभीनें सर्व सैन्याला हैराण केलें; तेव्हां कृष्ण अर्जुनाला म्हणाला, पार्था, आता शोक करू नकोस. युद्ध न केल्यास वल्लभी सर्वांना बांधून नेईन. अर्जुनानें पुनः धनुष्य घेतले, व शंख वाजवून तो युद्धास तयार झाला. कृष्णाला अर्जुनाच्या रथावर पाहून वल्लभीनें नमस्कार करून म्हटलें-देवा, तुमच्या कृपेनें मी आतां पार्थाला जिंकतों पहा. कृष्ण कांहींच बोलला नाहीं. तेव्हां अर्जुन म्हणाला-अरे अरें गडबड करूं नकोस. धनुष्य घेऊन बाण सोड. वल्लभीनें उत्तर केलें, पार्था

आतां कृष्णासह तुझा रथ उडवितों पहा. तुझ्या व माझ्या रथावर एकच श्रीहरि आहे, कांहीं भिन्न नाहींत.' याप्रमाणें भाषण झाल्यावर दोघांचें युद्ध सुरू झालें. वल्लभीनें अर्जुनाचा रथ बाणानें वर उडविला. तो समुद्रांत पडेल या भीतीनें कूर्मानें समुद्रांतून येऊन त्याला आपल्या पाठीवर सांवरिले. इतक्यात गरुडही तेथें येऊन रथाला सांवरू लागला. तेव्हां कृष्णाला संतोष झाला. नंतर हनुमान् म्हणाला, ' देवा, वल्लभीनें सैन्यात कहर केला असेल, तरी त्वरा करून तिकडे गेले पाहिजे.' कृष्ण म्हणाला,- ' मारुते, आतां तुझा काय पराक्रम आहे तो दाखव, '–कृष्ण असें बोलतांच मारुतीनें रथ खांद्यावर घेतला आणि वेगानें डडी मारून सैन्य होते तेथें तो आला. इकडे वल्लभी सर्व सैन्याचा नाश करून आपल्या नगराला परत चालला होता. अर्जुन परत आलेला पाहातांच, तो आपल्या सैन्यासह माघारी वळला, व पुनः प्रतिज्ञा करून म्हणाला,–' आतां पुनः तुझा रथ आकाशांत उडवितों.'–तेव्हां अर्जुन म्हणाला,—' मी आतां पाऊलभरही रथ हालूं देणार नाहीं, आणि हाललाच तर प्राण ठेवणार नाहीं.' आतां मोठा कठीण प्रसंग आला, तसें जाणून कृष्णानें रथाभोवतीं सुदर्शन घातलें व हनुमानालाही इशारत देऊन त्यालाआड उभे राहाण्यास सांगितलें. याप्रमाणें तयारी होऊन दोघे लढूं लागल्यावर वल्लभीचें बाण सुदर्शनामुळें शतखंड होऊं लागले. अर्थात् अर्जुनाचा रथ अणुमात्रही ढळला नाहीं. त्यावेळीं आपली प्रतिज्ञा असत्य झाली, असें पाहून वल्लभीनें प्राणत्यागाचा निश्चय केला; व सोन्याची झारी घेऊन तो कृष्णाची पूजा करण्याकरितां निघाला. अनंतालाही तें मानवलें, व त्यानें वल्लभीच्या चंद्रभागा नांवाच्या राणीस तेथें शृंगारून आणविलें. ती येतांच राजाच्या डावीकडे उभीं राहून दोघेजण कृष्णाजवळ आली. त्यावेळा कृष्ण व अनंत हे एकरूप झाले. व राजा त्यांची षोडशोपचारें पूजा करूं लागला. तेव्हां देवानी आपल्या या सात्त्विक भक्ताला आलिंगन देऊन म्हटलें.– ' राजा तुझें सत्त्व अगाध आहे.' तेव्हां राजा नमस्कार करून म्हणाला,–'देवा, आज मी सनाथ झालों,'–असें म्हणून त्यानें आपलीं एकशेआठ शिर–कमलें तोडून कृष्णाची पूजा केली. त्यावेळीं त्याजवर देवांनी पुष्पांचा वर्षाव केला. मग त्याच्या शरीरांतून ज्योति निघाली, व ती श्रीकृष्ण परमात्म्याच्या शरीरांत अन्तर्धान पावली ' हें पाहून अर्जुनाला मोठा विस्मय वाटला, आणि त्याच्या सर्व गर्वाचा परिहार झाला. तो कृष्णाला म्हणाला,–' देवा, तुझा महिमा अगाध असून

ब्रह्मादिकांसही कळणार नाहीं.' वल्लभीचीं तुटलेलीं शिरकमलें शिवानें आपल्या कंठमालेंत ओंविली आणि धड गरुडानें गंगेंत नेऊन टाकिलें. नंतर स्वर्गींचें अमृत आणवून कृष्णानें मृत झालेल्या सर्व सैन्याला उठविलें. भागा राणीनें कृष्णाचें स्मरण करून अग्निप्रवेश केला. नंतर कृष्णानें हें सोमकांत नगर एका ब्राह्मणाला दिलें; व श्यामकर्णाला पुनः शृंगारून सोडलें तदनंतर श्रीकृष्ण अर्जुनाचा निरोप घेऊन द्वारकेस गेला. हे स्थळ पवित्र जाणून अनंदानें तेथेंच वास केला व तेव्हांपासून ओढयाजगन्नाथ म्हणून हें स्थान लोकांत प्रसिद्ध झालें आहे.

---

## अध्याय १० वा



### महिष वध

श्रीकृष्ण द्वारकेस गेल्यावर तेथील व्यवस्था लावून, नंतर ते हस्तिनापुरास आले आणि धर्मादिकांना भेटून पुनः अर्जुनाजवळ आले. श्यामकर्ण पुढें व मागून सर्व सैन्यासह कृष्णार्जुन चालले असतां, गिरि व वनें ओलांडीत ते सर्व एका पाठारापाशीं आले. तेथें आल्यावर एकाएकीं घोडा अदृश्य झाला, व पुनः सर्व चिंताग्रस्त झाले. त्याला शोधण्यासाठीं ते सैन्यासह वनोवनीं फिरत असतां, एके ठिकाणीं त्यांना जमिनींतून वर आलेलें महिषाचें अक्राळ विक्राळ मुख दिसलें. त्याला पाहातांच सर्व सैन्य भयभीत झालें. तेव्हां कृष्णानें त्याचा वध करावयास अर्जुनाला सांगितलें. अर्जुनानें बाण मारून त्याचा शिरच्छेद केला. तेव्हां कृष्ण अर्जुनाची स्तुति करून म्हणाला,- 'शाबास अर्जुना, तूं सर्वांना निर्भय केलेंस.'

### ब्रह्मचाऱ्यांशीं गांठ

मग ते पुढें चालले असतां एक तेजःपुंज ब्रह्मचारी त्यांच्या दृष्टीस पडला. हा कोणी तपस्वी असून अश्वाची हकीकत सांगेल, असें कृष्णानें म्हटल्यावरून अर्जुन अश्वाची हकीकत त्याला विचारूं लागला; पण ब्रह्मचारी कांहीं उत्तर न देतां तसाच पुढें चालला. तेव्हां अर्जुन गर्वानें त्यास

धरावयास धांवला. परंतु बराच वेळ धावल्यानें अर्जुन थकला. त्याच्या पराक्रमाची परीक्षा पाहाण्यासाठीं ब्राह्मण थांबला, व अर्जुन जवळ येतांच त्यानें त्याला आपल्या झोळींत टाकिलें.

वैशंपायन ऋषि म्हणतात, 'राजा, हा ब्रह्मचारी रुद्रगणांपैकीं असून आदि वलींच्या वंशांत जन्मला होता. त्याचें नांव बलिवर्धन असून तो शिवाचा मोठा भक्त होता. त्याच्या पोटांत जठराग्नि कडक असे व त्याच्या शांतीकरितां म्हणून तो शंकराच्या वरदानानें नेहमीं लोखंडाचे सव्वाखंडी चणे खात असे. असें लिंगपुराणांत वर्णन आहे. अर्जुनाचा गर्व पाहून तो त्याला झोळीत भरून चालूं लागला, तेव्हां अर्जुन घाबरून गेला, आणि मनांत कृष्णाचें चिंतन करूं लागला. अर्जुन दिसत नाहीं, असें पाहून त्याचे वीर त्याला शोधूं लागलें; पण अर्जुनाचा कोठेंही शोध लागेना. तेव्हां ते कृष्णाजवळ परत आले, आणि अर्जुनाला शोधून काढण्याविषयीं त्याची विनवणी करूं लागले, इकडे दोनप्रहरची वेळ झालेली पाहून ब्रह्मचाऱ्यानें झोळीत हात घातला आणि तींतून मूठ मूठ लोखंडाचे चणे काढून, तो ते कडकडावून खाऊं लागला. हें पाहून अर्जुन घाबरला; व त्याला वाटलें की, चणे संपल्यावर हा आपल्यालाही खाऊन टाकील. असें म्हणत, व भीतीनें तो कृष्णाचें चिंतन करीत आहे; तोच कृष्ण तेथें येऊन हळूच बाजूस उभा राहिला. चणे संपल्यावर ब्रह्मचारी अर्जुनाला धरून तोंडांत घालूं लागला; इतक्यांत कृष्ण प्रकट झाले, व त्याला म्हणाले, ' अरे, तूं योग्य ब्रह्मचारी दिसलास म्हणून आम्ही आमचा शिष्य तुजकडे पाठविला; परंतु तूं तर त्यालाच खाऊन टाकूं लागलास ? यास काय म्हणावें ?' कृष्णाचें भाषण ऐकतांच ब्रह्मचाऱ्यानें अर्जुनाला सोडून दिलें, व कृष्णाची स्तुति करून तेथें येण्याचें कारण त्याला तो विचारूं लागला. तेव्हां कृष्णानें उलट अर्जुनाला खाण्याचें कारण त्यास विचारिलें. तेव्हां तो म्हणाला ' देवा, यानें तुमचा भक्त म्हणून मला मुळींच सांगितलें नाहीं. तेव्हां हा कोणी तरी असेल म्हणून मी याला खात होतों.' अर्जुनाला हा सर्व प्रकार पाहून फार लाज वाटली, व तो प्राणत्याग करावयास तयार झाला. परंतु कृष्णानें त्याची समजूत केली, आणि ब्रह्मचाऱ्याला श्यामकर्णाचें वर्तमान विचारिलें तेव्हां तो म्हणाला, ' देवा एका विवरांत चौबळ नामक राक्षस राहत असतो त्यानें तुमचा अश्व नेला आहे. माझ्याबरोबर चला, म्हणजे तो तुम्हांला

दाखवितों.' हें ऐकून कृष्ण व अर्जुन त्याच्याबरोबर जाऊं लागले; परंतु तिघे विवरापाशी जातांच तो बलिवर्धन ब्रह्मचारी अदृश्य झाला.

## बलिवर्धन अदृश्य होण्याचें कारण

वैशंपायन म्हणतात, ' बलिवर्धन या ठिकाणीं आश्रम करून राहत असतां रामानें रावणाला मारिल्यावर सर्व राक्षस जिकडे तिकडे पळून गेले. त्यांत चौबळ राक्षस बलिवर्धनाच्या आश्रमांत आला, आणि त्याला पिटाळून लावून आपण त्यांत राहिला. चौबळ महापराक्रमी असून त्याचा मृत्यु श्रीकृष्णाच्या हातून व्हावयाचा होता. म्हणून त्यानें वारूला पकडून आपल्या विवरांत गुप्तपणें ठेविलें होतें. बलिवर्धन चौबळाला फार भीत असे म्हणून विवर दाखविल्याबरोबर त्यानें तेथून पलायन केलें. कृष्ण आणि अर्जुन विवरांत गेल्यावर चौबळानें त्या अश्वाला अंतरिक्षांत झुगारून दिलें. हें पाहून कृष्ण अर्जुनाला म्हणाला, ' हा रामाच्या वेळचा प्रसिद्ध राक्षस आहे तेव्हां याच्या मृत्यूचें कांहीं वर्म बलिवर्धनाला माहीत असेल, तरी तूं त्याला लवकर घेऊन ये.' कृष्णाच्या आज्ञेप्रमाणें अर्जुन विवराबाहेर आला, व बलिवर्धनाला बोलावण्यासाठीं जाऊं लागला. तों पुढें त्याला समुद्र दिसला. समुद्राला पाहतांच अर्जुन दचकला, परंतु मनांत कृष्णाचें स्मरण करीत तो पाण्यांत जाऊं लागला. इतक्यांत तेथें जलदेवता त्याच्या दृष्टीस पडल्या. त्यांना 'बलिवर्धन कोठें आहे' म्हणून अर्जुन विचारूं लागला. तेव्हां– 'काय वेड्यासारखी पुसापूस मांडिली आहेस,'–असें म्हणून त्यांनीं अर्जुनाला धरिलें आणि पाण्यांत बुडविण्यासाठीं त्या त्याला घेऊन जाऊं लागल्या. तेव्हां अर्जुनानें घाबरून कृष्णाला हाक मारिली. त्याबरोबर 'भिऊं नकोस' म्हणत कृष्णानें हाक दिली. कृष्ण तेथें दिसतांच तें मायेचें पाणी सर्व नाहींसें झालें व मोठा कडकडाट होऊन आकाशवाणी झाली कीं,–' देवा, या राक्षसाशीं युद्ध करूं नकोस. हा त्रेतायुगींचा असून रामाच्या बाणानेंच याचा वध होणार आहे' ही आकाशवाणी ऐकून कृष्णानें मारुतीचें स्मरण केलें. मारुति येतांच कृष्ण त्याला म्हणालें, ' मारुते त्राटिकेच्या वधस्थनांत जा, व तेथून रामाचा बाण घेऊन ये. कृष्णाच्या आज्ञेप्रमाणें मारुति तेथें गेला व सर्पाकृति बाणाला पाहून रामनामानें त्याची स्तुति केली. तेव्हां सर्प बाणाकृति झाला. मग तो घेऊन मारुति परत आला. नंतर कृष्णानें तो बाण राक्षसावर सोडून त्यांचा

बध केला. याप्रमाणें चौबळाचें भय नाहीसें झाल्यावर बलीवर्धनानें तेथें येऊन कृष्णाला नमस्कार केला. तेव्हां कृष्ण म्हणाला, 'ब्राह्मणा, भला आहेसरे, तूं स्वतः लोखंड खातोस, परंतु राक्षसाला पाहतांच भिऊन पळतोस, हें काय ?' त्यानें उत्तर केलें, देवा मी येथें दोन शिष्यांसह राहत असतां, या दुष्ट राक्षसानें त्या दोघांनाही एकदम खाऊन टाकिलें. तेव्हां मी भीतीनें पळालों, तो आज बहुत काळानें श्यामकर्णाच्या निमित्तानें येथें आलों. तू त्या राक्षसाला मारून आश्रम मोकळा केलास, हें फार चांगलें झालें. आतां तो माझा आश्रम मला दे.' कृष्णानें ठीक आहे असे म्हणून आश्रम त्याला दिला आणि मग घोड्याला घेऊन सर्वजण तेथून निघाले. याप्रमाणें अर्जुनाचा गर्व नाहीसा करून कृष्ण द्वारकेस निघून गेला.

---

# अध्याय ११ वा



## यक्षिणी नगरीतील वृत्तांत

अर्जुन आदिकरून वीर श्यामकर्णासह पुढे चालले असतां, वाटेत अनेक राजे त्याना करभार देऊन शरण आले. पुढे अनेक देश फिरत फिरत विंध्याद्रीचे अरण्य ओलांडून तें सर्व सैन्य पल्लव देशी आले, तेंथे कामिनी नदीच्या कांठी घोडा जाऊन उभा राहिला असतां, असा चमत्कार झाला की तिच्या विशाल पात्रातून श्यामकर्णासारखा दुसरा घोडा बाहेर आला, आणि ते दोघे अश्व एकामेकांशी भांडत भांडत पाण्यात गेलें. थोड्यात वेळांत पुनः ते बाहेर आले, व राक्षस त्यास धरावयास येताच ते दोघेही उसळून आकाशांत गेलें. तेंव्हा अर्जुनाला चिंता उत्पन्न झाली, तो म्हणाला, 'कृष्ण द्वारकेस गेला, तेव्हां त्याच्या वांचून हें संकट कसे निभावणार !' असें म्हणून त्यानें सैन्याला सागितले की, येथें एकादे नगर पाहून त्याच्या शेजारी रात्र घालवावी." आज्ञेप्रमाणें सैन्य चालले असतां, त्या कामीनी नदीचें पात्र एकदम दुभंगले आणि सैन्य नदी उतरून पार गेलें. त्यावेळी मौज पाहाण्यासाठीं

तेथें बरेच लोक जमले. त्या लोकांना पाहून अर्जुनादिकांना थोडा धीर आला आणि त्यानी त्यांच्याकडे आपले दूत पाठवून त्या देशाची विचारपूस करविली. लोकांनी उत्तर दिले, या देशाला पल्लव देश म्हणतात. ही कामिनी नदी व हिच्या काठचे हे यक्षिणीभवन नगर आहे. येथें यक्षिणीं राहत असून सुलभा नांवाची त्याची राणी आहे. तिच्या हाती तुम्ही लागल्यास सुटणें कठीण जाईल.' असें सांगून त्यानी त्या दूतांना सैन्याची माहिती विचारली. दूतांना अर्जुनाचा वृत्तांत सांगून यक्षिणीला अर्जुनाची भेट घेण्यासाठी बोलावयास त्यांना सांगितले. तेथें यक्षिणीच्या दूती होत्याच. त्यानी उलट अर्जुनालाच आपल्या सुलभा राणीकडे पाठविण्याविषयी निरोप दिला. तेव्हां दूतांनी येऊन अर्जूनाला त्याप्रमाणें सर्व हकीगत कळविली. दूतांचा निरोप ऐकतांच अर्जुन हातात शस्त्रास्त्रे घेऊन सैन्यासह निघाला. दूतांनी सुलभेला अर्जुनाच्या सैन्याची खबर कळविलीं. ती ऐकताच तिनें भूतांना अर्जुनावर पाठविले, आणि यक्षिणी विवरद्वार धरून बसल्याः यक्षिणी आंत राहिल्या असें पाहून अर्जुन धैर्य करुन सैन्याला म्हणाला, 'तुम्ही सर्व येंथेंच रहा, मी आंत जाऊन कांहीं उपाय झाल्यास पहातो, ' असें म्हणून अर्जुन वृषकेतुसह विवराच्याद्वारापाशी आला, आणि द्वारपालीकेस हाक मारून म्हणाला,–'अर्जुन आणि वृषकेंतू भेटावयास आले आहेत, असें आपल्या स्वामीनीला जाऊन सांगा. ' सुलभेला तें कळतांच तिचे तिनें त्यानां आंत बोलाविले. ते दोघें विवरांत गेले. त्या विवरात जिकडे तिकडे पेठा बसलेल्या होत्या, आणि ठिकठिकाणी चौथरे व सुंदर मंडप घातलेलें होते. प्रकाशासाठीं दिव्य मणी जागोजाग लटकविलेले असून एका सिंहासनावर सौंदर्याची पुतळी, अशी ती सुलभा मोठ्या थाटानें बसलीं होती. अर्जुन व वृषकेतु यांना पहातांच तिनें त्यांना सत्कारपूर्वक एका मंचकावर बसविले. मग अर्जुन तिची स्तुति करुन तिला घोड्याची हकिकत विचारूं लागला. तिला जरी कांही माहीत नव्हते तरी तीं म्हणाली,– 'तुम्ही कांही काळजी करू नका; आम्ही तो आणून देऊ.' असें म्हणून ती नाना उपायांनी अर्जुनाचें मन मोहूं लागली. तिनेंही घोडा लपविला असावा असें अर्जुनाला वाटून, तो तिची अधिकाधिक विनवणी करू लागला. तेव्हा ती खदखदा हंसून त्यावर कटाक्ष मात्र फेकू लागली. आता येऊन बाहेर कसे पडावे, अशा विवंचनेने अर्जून तिला म्हणाला,–'तुझ्या मनातील भाव तरी काय आहे? तिनें हसून

उत्तर केले; 'दुसरे काय, आपण चार गोड शब्द माझ्याशी बोलावे अशी इच्छा आहे.' अर्जुन तिचा हेतू जाणून म्हणाला,-तूं जर घोडा आणून देशील तर माझा हेतू पूर्ण करीन. ' सुलभेनें उत्तर केलें; मला आपण वराल तर मागाल तें देईन, मला येथें कांहीं उणें नाहीं. ' अर्जुन म्हणाला,-सुलभे धर्म हा आमचा वडील बंधु असून त्यानें अश्वमेधाला सुरवात केली आहे तो समाप्त होईपर्यंत ब्रह्मचर्यव्रतानें रहाणें आम्हाला अवश्य आहे तूं घोडा आणून दे; म्हणजे अश्वमेध पूर्ण झाल्यावर तुझें म्हणणें मी कबूल करीन. सुलभेनें उत्तर केलें, 'अर्जुना, मी आपल्याला वरिले आहे तरी आता येथून जाण्याची गोष्ट व्यर्थ कशाला काढता?' असे म्हणून तिनें अर्जूनाला झोंपाळयावर नेऊन बसविलें आणि त्याच्या अंगाला पनिमल द्रव्यें लावून त्याला ती मोहवूं लागली. अर्जुनानें मनांत विचार केला कीं, येथें अनेक भूतें असल्या- मुळें पळून जाणें शक्य नाहीं. तेव्हां कांहीं उपाय केला पाहिजे. प्रथम येथें सैन्याला आणून या भूतांचा नायनाट करावा, आपला एकटा मेघनाद हाही हे काम करील.' असा विचार करून तो सुलभेला म्हणाला,-' हे सुंदरी, सर्व सैन्य येथें आणून त्यासह तुझ्यापाशीं रहावें. असें माझ्या मनांत आहे.'-हें ऐकतांच तिनें आपल्या यक्षिणींना, सैन्याला आणण्यासाठीं बाहेर पाठविलें. त्या यक्षिणी सैन्याजवळ येऊन त्याला म्हणाल्या,—' अहो, सर्व सुखांचा उपभोग घेण्यासाठीं अर्जुन तुम्हांला आंत बोलावितो आहे.'-वीरांनी उत्तर केलें,--' वृषकेतु येथें येईल, तरच आम्ही येऊं; नाहीं तर एखादा अनर्थ होईल.' यक्षिणींनी परत जाऊन सुलभेला तसें सांगितलें. तेव्हां तिनें वृष- केतूला पाठवून, सर्व सैन्याला विवरांत आणिलें, आणि त्यांना लागतील ते पदार्थ देऊन विवराच्या एका विस्तीर्ण भागांत,-अर्जुनाची व त्यांची भेट न होईल,-अशा ठिकाणी नेऊन ठेविलें. नंतर त्या यक्षिणींनीं त्या सर्वांना, कामभोहाने लुब्ध करून, युद्धाचा विसर पाडला. अर्जुन आणि वृषकेतु मात्र सावधपणें ब्रह्मचर्य संभाळून, वश न होतां तेथें राहिलें.

## वृषकेतूची सुटका

असे चाललें असतां, वृषकेतु एक दिवस सुलभेला म्हणाला,—' आमचें थोडेसें सैन्य बाहेर राहिलें आहे, तरी त्याला येथें आणून सर्व सुखाचा उप- भोग घेऊं.' सुलभेनें सांगितलें,—' मी यक्षिणी पाठवून त्यांना आणवितें.'-

त्यावर वृषकेतु म्हणाला,–' मी गेल्याशिवाय तें येणार नाहींत.'–तेव्हां सुलभेनें त्याच्याबरोबर कांहीं यक्षिणी देऊन त्याला बाहेर पाठविलें. बाहेर आल्यावर सैन्य कोठें दिसत नाहीं, असें पाहून–सैन्य कोठें आहे,–म्हणून त्या त्याला विचारूं लागल्या. परंतु त्यांना कांहीं तरी सागून, स्नान करण्याच्या मिषानें तो नदींत गेला, व तेथें स्नान करून त्यानें मत्रपूर्वक सूर्याचें ध्यान केलें; आणि सूर्यापाशी धनुष्यबाण मागितले. सूर्यानें वरुणाकरवीं ते त्याजकडें पाठवून दिले. तें पाहून हा काय चमत्कार आहे, असें त्या यक्षिणी म्हणत आहेत, तोंच धनुष्याचा टणत्कार करून वृषकेतूनें त्यांच्यावर हल्ला केला. तेव्हां कित्येकींनी पळत जाऊन सुलभेला सर्व वृत्तांत सांगितला. तो ऐकून सुलभा फार रागावली, व अनक शस्त्रधारी यक्षिणींना तिनें त्यावर पाठवून दिलें, व असे कसें झालें, म्हणून ती अर्जुनाला विचारु लागली. अर्जुनानें उत्तर दिलें,––' वृषकेतु कर्णाचा पुत्र असल्यामुळें, सूर्यानें आपला नातू म्हणून त्याला रथ व धनुष्यबाण पाठवून दिलें असावे. त्याला कांही अपाय झाल्यास, सूर्य स्वत: युद्ध करावयास येईल, व मग मोठा अनर्थ होईल हें ऐकून सुलभा मनांत दचकली, व म्हणाली,–' एकट्यानें एवढा घोटाळा केला ! तेव्हां बाकी सर्वांना कोडून ठेविलें हें एका अर्थीं बरे झालें'. असे म्हणून तिने, यक्षिणीना विवराचे द्वार बंद करुन एक लहान छिद्र ठेवण्यास सांगितले.

इकडे वृषकेतुची व यक्षिणींची झटापट होऊन त्यात त्यानें व सूर्यानें मिळून त्यांचा संहार केला अशाप्रकारें विजयी होऊन वृषकेतू हस्तिनापुरास गेला, व झालेला सर्व वृत्तांत त्यानें धर्मास सांगितला. त्यावेळी द्रौपदीनें त्याला प्रेमानें गोंजारलें, आणि स्नान करून कृष्णाचे ध्यान केले. त्यावेळीं द्वारकेंस कृष्णाने शयन केले होते. द्रौपदीचा धावा ऐकून तो लगबगीनें उठला व बहीण धावा करीत आहे, असे रुक्मिणीला सांगून तो त्वरेनें हस्तिनापूरास आला. तेथे आल्यावर धावा करण्याचे कारण त्यानें द्रौपदीला विचारले, द्रौपदीनें घडलेली सर्व हकीगत कृष्णाला सांगितली. मग सर्वांना आश्वासन देऊन वृषकेतुबरोबर कृष्ण रथांत बसून यक्षिणींच्या विवराजवळ आला नंतर कृष्णाला बाहेर उभा करुन वृषकेतु विवरांत शिरला त्याला पाहतांच हा पुन: घातकी आला असें यक्षिणी म्हणू लागल्या. सुलभा म्हणाली, ' माझ्या यक्षिणीना तूं मारिलेंस, आता तूं कसा सुटतोस ते पहातेच. ' वृषकेतुनें त्यांस

कांही उत्तर न देता अर्जुनाला मात्र कृष्ण बाहेर आला आहे, आता भिण्याचें कारण नाही, असे खुणेनें सुचविलें. इकडे विवराबाहेर कृष्णानें भयंकर नृसिंह रुप धारण करून मुखातून अग्निज्वाला काढिल्या. त्याच्यायोगानें जिकडेतिकडे अग्नि प्रगट होऊन सुलभेसह सर्व यक्षिणी जळून गेल्या. नंतर अर्जुनाला भेटून कृष्णानें त्यास सैन्याची हकीगत विचारली. अर्जुनाला सैन्याची भेट झालेली नव्हतीच. तेव्हां कृष्णानें त्यांचा शोध लावून सर्वांना वर काढिले व नृसिंहरूप टाकून तो सर्वांना भेटला. परंतू श्यामकर्ण कोठे दिसेना, म्हणून गदेनें सर्व विवर फोडून टाकले. तरी घोडा सापडला नाही. विवर पडल्यावर त्यातून रधुाचे लोट निघू लागले, म्हणून त्याचे नांव धूम्रकुंड ठेवून तेथे त्यानें मनुष्याची वस्ती करविली.

नंतर मेघनाद व वृषकेतु यांच्या स्वाधीन सैन्य करून तो अर्जुनासह अश्वाची वार्ता विचारण्यासाठीं ब्रह्मदेवाकडे गेला. एकमुखी, दोनमुखी असे एकवीस मुखापर्यंत ब्रह्म त्याच्या दृष्टीस पडले. प्रथम एकमुखाजवळ त्यांनीं चौकशी केली. त्यानें त्यांना द्विमुखाकडे जावयास सांगितलें द्विमुखानें पुनः त्रिमुखाकडें त्यांना पाठवून दिलें, याप्रमाणें फिरत फिरत ते एकवीसमुखीं ब्रह्माजवळ गेले, आणि त्याची स्तुति करूं लागले त्याचें ध्यान उतरल्यावर कृष्णानें त्याला घोडयाची वार्ता विचारली. तेव्हां तो म्हणाला, 'निरालंब स्थानांत जाऊन तेथें अश्वाची चवकशी करा.' त्याप्रमाणें ते निरालंबांत गेले. तेथें त्यांना श्यामकर्ण दिसला; परंतु तेथून अर्जुनानें खालीं पाहिलें, तो त्याला चक्कर आली. कृष्णानें त्याला म्हटलें, 'अरे, मागें तूं ऐरावत जसा स्वर्गाहून पृथ्वीवर आणिलास, तसा घोडा खालीं आण.' अर्जुनानें उत्तर केलें, 'देवा येथें मला सेतु बांधता यावयाचा नाही.' असे म्हणून अर्जुनानें कृष्णाची नानाप्रकारें स्तुति केली. तेव्हां कृष्णाला दया येऊन त्यानें आपलें मायापटल काढून घेतले. त्याबरोबर तेथें ब्रह्मलोक किंवा निरालंब प्रदेश कांहीच नसून, आपण पृथ्वीवरच उभें आहोंत व घोडा आपल्यापुढें आहे, असें अर्जुनाच्या दृष्टीस पडलें. हा चमत्कार पाहून अर्जुन धक्क झाला. नंतर तो म्हणाला, 'देवा, तुझी करणी अगाध आहे, ती आम्हा अज्ञानांना कशी कळेल ?' मग कृष्णानें त्याला थांबवून घोडा परतवून हस्तिनापुरास न्यावयास सांगितले. तेव्हां अर्जुन बोलला, 'कृष्णा, आतांपर्यंत मोठमोठ्या संकटांतून तूं आम्हांला वांचविलेंस,

तसेंच पुढेही बांधविशील. आम्ही घोड्याला परतवीत नाहीं.' हें ऐकून कृष्णानें श्यामकर्णाला पुनः अभिषेक करवून पुढें सोडिलें आणि सैन्याबरोबर त्याच्या मागून तो चालूं लागला.

कांहीं वेळ चालल्याबर पूर्वीप्रमाणेंच पुनः श्यामकर्णासारखाच दुसरा घोडा तेथें येऊन त्याच्याबरोबर चालूं लागला. तेव्हां खरा श्यामकर्ण कोणता, हें कोणाला समजेना. त्यावेळीं 'परकी घोडा ओळखून त्याला मारून टाका' असें कृष्णानें अर्जुनाला सांगितलें. परंतु अर्जुनाला आपला घोडा कांहीं ओळखतां येईना. तेव्हां वृषकेतु पुढें झाला, आणि घोड्यांना हुंगून पाहूं लागला. तों एकाला दुर्गंधि येत असलेली त्याला आढळली. मग त्यानें त्याची जीभ ओढून टाकिली, आणि त्याच्या शिश्नाचा छेद करून त्याला सोडून दिलें. त्याबरोबर तो अदृश्य झाला, आणि एकटा श्यामकर्ण मात्र तेथें राहिला. इतक्यांत त्या मायावी राक्षसरूपी घोड्याची जिव्हा व शिश्न जेथें तोडून टाकिलीं होतीं, तेथें अजगरी व अजगर अशीं जनावरें उत्पन्न होऊन तीं वृषकेतूला खावयास धांवली. परंतु त्यानें त्यांचे तुकडे तुकडे करून फेंकून दिले, असें पुराणांतरी सांगितलें आहे. हा मायावी घोडा सुलभेचा राक्षस असून अश्ववेष घेऊन आला होता. वृषकेतूनें त्याला छेदून टाकिलें नसते, तर अनर्थ झाला असता. याप्रमाणें सर्व सकटांतून सैन्याची मुक्तता करून कृष्णानें घोडा पुनः चालू केला. कृष्णानें जेथें नृसिंहरूप घेऊन यक्षिणींचा संहार केला होता, तें पुढें नृसिंहाचें जागृत-स्थान झालें.

---

# अध्याय १२ वा



## कालचमत्कार

यक्षिणीभुवनाचा नाश केल्यावर कृष्णार्जुनांसह सर्व सैन्य चालत चालत एका नगरापाशीं आलें. तेथें लोकांची वस्ती पुष्कळ होती, व ते सर्व तरुण होते, घोडा तेथें येतांच त्यांच्यांत जाऊन उभा राहिला, तिसरा बहुत

सुरू होतांक्षणीच ते सर्व तरुण लोक म्हातारे दिसूं लागले, तेव्हां, हे काय आश्चर्य आहे, असें अर्जुनानें कृष्णाला विचारिले, कृष्ण म्हणाला,–' सर्व सैन्यासह आपण रात्रभर येथेंच राहूं, म्हणजे काय मौज होते ती दिसेल, ' कृष्णाच्या सांगण्याप्रमाणें सर्वजण विश्रांति घेत तेथेंच पडले, इतक्यांत रात्र होतांच तेथील सर्व रान असंख्य माणसांनीं भरून गेलें. तो प्रकार पाहून अर्जुनानें त्यांपैकीं कोणाशीं भाषण न करण्याविषयीं आपल्या सैन्याला ताकीद दिली. त्याप्रमाणें सैन्य शांतपणानें ती मौज पहात आहे, तों ते सर्व लोक मरण पावले, आणि सूर्योदय होतांच ते सर्व पुनः जिवंत झाले. नंतर त्यांनीं धान्यें पेरिलीं तीं थोड्याच वेळांत तयार होऊन सर्वांचें भोजन झालें, आणि संध्याकाळ होतांच ते लोक पुनः पूर्वींप्रमाणें मरण पावलें. ह्या चमत्काराचा अर्थ काय ? म्हणून अर्जुन कृष्णाला विचारूं लागला. तेव्हां कृष्ण म्हणाला अरे, असे चमत्कार वाटेंत किती तरी आढळतील. ब्रह्मदेवाची एक घटका म्हणजे तुमचें एक युग होतें, त्याचप्रमाणें यांच्या आयुर्मर्यादेचें मान तुम्हाला अल्प वाटलें, तरी त्यांना तें योग्यच आहे. आणखी असें कीं, तुम्हांला आतां पर्यंत वाटेत जे कष्ट झाले, त्यांचेंही स्पष्ट स्वरूप या चमत्कारावरून सहज कळून येणार आहे.

## नग्न स्त्रिया

याप्रमाणें कृष्णानें सांगितल्यावर सैन्य पुढें चालूं लागलें, तों त्यांना आणखी एक चमत्कार आढळला. त्या अरण्यांत कांहीं नग्न स्त्रिया नाचत होत्या. त्यांच्याजवळ जातांच तोहि त्यांच्याबरोबर फिरून नाचूं लागला. याप्रमाणें पांच रात्री गेल्या, तरी घोडा हातीं लागण्याचें चिन्ह दिसेना. तेव्हां अर्जुन त्यांच्यावर चाल करून जाऊं लागला. त्या अदृश्य झाल्या तेव्हां कृष्ण म्हणाला,–' अर्जुना, त्यांना पकडावयास तुझें सर्व सैन्य पुरें पडणार नाही. ' असे म्हणून तो स्वतः पुढें गेला, व क्षणही न लागतां त्यानें घोड्याला धरून आणिले. त्याबरोबर त्या स्त्रिया दृश्य झाल्या, व कृष्णाच्या पाया पडूं लागल्या. त्या स्त्रिया वनदेवता असून शंकराच्या शापामुळें नग्न रहात असत, असें लिंगपुराणांत सांगितलें आहे.

## सुवर्णाचें नगर

नग्न स्त्रियांचा चमत्कार पाहिल्यावर तें सैन्य पुढें चाललें. तें एका

नगरांतील सर्व प्राणी व वस्तू सुवर्णाच्या होत्या. घोडा नगरांत शिरल्यास तोही सुवर्णमय होऊन जाईल, म्हणून अर्जुनानें सैनिकास घोड्याला परतावयास सांगितले. तेव्हा कृष्ण म्हणाला,–'अर्जुना, वृथा भ्रांति धरतोस कशाला? आतां तुम्ही पूर्वदिशेकडे मार्ग फिरवा, म्हणजे झाले.' त्याप्रमाणें सैन्य चालूं झाल्यावर कृष्णानें अर्जुनाला त्या नगराची हकीगत सांगितली. तो म्हणाला,–'एकदां शंकर रागावून या ठिकाणी आले असतां, पार्वती त्यांना समजविण्यासाठी आली, व सुवर्णपुष्प अर्पण करून तिनें त्याची समजूत केली, त्यावेळी कुबेरानें येथें येऊन नवनिधी येथें ठेवून दिलें, व त्यामुळें येथील सर्व भूमि सुवर्णमय झाली.' याप्रमाणें अर्जुनाला कथा सांगून श्रीकृष्ण द्वारकेस गेले.

## नीलध्वजाची कथा.

इकडे अर्जून सैन्यासह चालला असतां, महिकावती नामक नगरीशीं आला. तेंथे नीलध्वज नावांचा राजा राज्य करीत असून त्याचा प्रवीर नावाचा महापराक्रमी पूत्र होता. श्यामकर्ण सैन्यासह नगराच्या बाहेर आला त्यावेळीं प्रवीर राजपुत्र तेथें आपल्या आंठशे स्त्रियांसह क्रीडा करीत होता. त्याच्या मदनमंजिरी राणीनें घोड्याला पाहाताच पकडून पतीजवळ आणिले. त्याचें पिवळें पुच्छ, राजसकांती आणि नीलवर्ण नेत्र पाहून प्रविराला मौज वाटली; पण त्याने त्याच्या मस्तकावरील पत्रिका जेव्हा वाचली; तेव्हा त्याला पांडवाची हकीगत कळून येऊन तो घोडा सोडू लागला. परंतू मदन मंजिरीनें तिरस्कार करून त्याला भित्रा म्हटले. तेंव्हा प्रवीरास, त्यानें घोड्याला स्त्रियासह राजवाड्याकडे पाठवून दिले; आणि आपण युद्धासाठी तयार होऊन बसला. पांडवसैन्य जवळ येताच, मदनमंजरी प्रवीराची सारथी झाली व प्रवीरानें धनुष्याची दोरी आकर्ण ओढून अर्जूनावर निकराचे बाण सोडिले ही युद्धाची वार्ता नीलध्वजाला कळतांच, तोही सैन्य तयार करून तेथें दाखल झाला, आणि आपल्या पुत्राचा पराक्रम पाहून त्याला समाधान वाटलें. प्रवीराने अर्जूनाच्या सैन्याला जेव्हां त्राहीं त्राही करून सोडिलें, तेव्हां अर्जूनानें त्याच्यावर हल्ला करून त्याला क्षणभर हैराण केलें. त्याजबरोबर नीलध्वजानें आपला जामात जो अग्नि त्याचे स्मरण केलें. अग्निने तेथें येऊन धडाक्यानें सैन्याला जाळून टाकण्याची सुरवात केली. अर्जुनानें त्यावर

अरूणास्त्राचा प्रयोग केला. त्यायोगे अग्नि क्षणभर विझलासे होऊन पुनः जोरानें पेटला, व पाण्यालाही जाळूं लागला. तो प्रकार पाहून अर्जुनाला चिंता उत्पन्न झाली. तो म्हणाला,–'धर्मानें अग्निला सतुष्ट करण्याकरिता, अश्वमेध करण्याचे योजिले असतां आज अग्निच आमच्यावर रूष्ट कसा झाला?' अर्जुनाचे शब्द ऐकून अग्नि बोलला. 'अर्जूना, नीलध्वज माझा सासरा आहे. म्हणून त्याच्यासाठीं मी युद्धाला तयार झालो आहे. तूं क्षणभर बाजुला हो.' हे ऐकून अर्जुन जरा स्तब्ध झाला. आणि त्याच्या सैन्यानीही माघार घेतली. याप्रमाणें अग्निच्या साहृयानें नीलध्वज विजयी झाला. मग अग्नि त्याला म्हणाला,–' हे राजतिलका, अर्जुन कृष्णाचा सखा असल्यामुळें, त्याचा अश्व धरुन ठेवणें इष्ट नाही. त्यामुळें शेवटी अनर्थच होईल. याकरितां त्याला तूं सोडून दे.' राजा हे ऐकून मनात भ्याला, आणि लगेच आपली स्त्री जी ज्वाला तिच्याकडें जाऊन तो म्हणाला,–कांते, अर्जुनाच्या सैन्याचा व्यर्थ नाश करू नकोस. आपण त्याचा घोडा परत देऊन प्रवीरासह त्याला भेटूं, आणि वैर नाहींसे करूं. ज्वालेनें उत्तर दिलें–हा क्षत्रियधर्म नव्हे. तुम्ही त्याला घोडा परत दिल्यास, सर्व लोक तुम्हाला भिरू म्हणतील.' हे ऐकून राजा रागानें पुनः रणांगणात आला, व अर्जुनाबरोबर युद्ध करू लागला. परंतु थोड्यांच वेळांत त्याचें सर्व सैन्य मरण पावले. शेवटीं पुत्रासह तो किल्लयांत पळून गेला. तेथे गेल्यावर आपल्या राणीला तो म्हणाला, 'दुष्टे, तुझ्या सांगण्या-वरून मी सर्व सैन्याला नाश करविला. आतां तुला वाटेल ते कर. मी अश्व परत घेऊन अर्जुनाला शरण जाणार, असे बोलून तो प्रवीरासह वस्त्रालंकार घेऊन अर्जुनाला शरण गेला. आणि मोठ्या प्रेमाने त्यांनें त्याला अलिंगन दिले. नंतर सर्वांना मोठ्या थाटानें नगरांत नेऊन त्याने तेथे राजसभा भर-विली. याप्रमाणें भारतांत व जैमिनीअश्वमेधांत कथा आहे; परंतू पुराणांत अशी कथा आहे कीं, वृषकेतुनें नीलध्वजाला पुत्रासह धरुन अर्जुनापाशी आण-ल्यावर तो शरण आला.

नीलध्वजानें याप्रमाणें पांडवाशी सख्य करून तो म्हणाला, 'अहो, माझे भाग्य थोर म्हणूनच मला धर्माच्या कार्यांत देह झिजविण्याची संधि मिळाली आहे. तुमच्या संगतीनें आता मी या संसारापासुन खास मुक्त होईन. नंतर

अग्निच्या सूचनेवरून सर्वजण नगरींत आले, आणि भोजन व मानपान यांत त्यानी सर्व रात्र आनदाने घालविली. दुसऱ्या दिवशी अश्वाची पूजा करून त्याला सोडिले, आणि नीलध्वजही सैन्यासह त्याबरोबर चालू लागला.

## ज्वालेची प्रतिज्ञा

इकडे आपला पति अर्जुनाचा घोडा राखण्यासाठी त्याबरोबर चालूं लागला. असे पाहून ज्वालेला फार दुःख झाले. ती तशीच आपल्या बंधूकडे गेली. व त्याला म्हणाली, 'बधो, अर्जुनाने माझें घर जाळून पतिपुत्रांना जिकले, आणि त्याना तो बरोबर घेऊन गेला. या अपमानाचा परिहार करणे असेल, तर तू अर्जुनाचा वध कर, नाहीतर मी प्राणत्याग करीन.' बंधुनें उत्तर केलें, 'थोड्याच दिवसांत मी तुझें कार्य करीन, तेथपर्यंत तू माझ्या घरीं रहा. ज्वाला म्हणाली,'मी थांबणार नाही, तूं आतांच घरी जा' हें ऐकून बंधु रागावला, व म्हणाला, ' निर्लज्जे, आपलें घर बुडवून माझेही घर बुडवू पहातेस काय? ' भावाचें असें भाषण ऐकून ज्वालेंची निराशा झाली, आणि रागावून ती गंगेच्या पलिकडे जावयास निघाली. नौकेवर बसतानां तिच्या पायाला गंगोदक लागले. त्याबरोबर-अरेंरे, मला पाप लागले, असें तिचें उग्दार ऐकून नौकेतील लोकांना आश्चर्य वाटले. इतक्यांत गंगेतून एक स्त्रीं येऊन तिला म्हणालीं, 'अगे, या जलाची कां बरें निंदा करतेस?' तिला पाहताच ज्वालेनें, ही गंगा आहे असें ओळखिले व ती म्हणाली,'गंगे, तुला शंतनूपासून आठ पुत्र झाले, त्यापैकीं सातांनाही तूं स्वत: मारलेस आणि आठवा जो भीष्म तो अर्जुनाच्या हातून मेला. तूं अपूत्रवती आहेस, व त्या दोषामुळेंच तुला स्पर्श करणें उचित नाही. 'हे ऐकून गंगा संतापली, आणि अर्जुनाला शाप देऊन म्हणाली,-'तू माझ्या भीष्माचा वध केलास त्याअर्थीं तुझें मस्तक सहा महिन्यात वन्हिज्वालेत पडेल. 'शापदान ऐकून ज्वालेला संतोष वाटला, आणि बाणरूपानें ती बभ्रुवाहनाच्या भात्यात जाऊन बसली.

---

# अध्याय १३ वा



## कर्कशेची कथा

नीलध्वज राजाला बरोबर घेऊन अर्जुन अश्वामागून चालला असता, वाटेत एक बावन हात लांबीची शिला पडली होती. तिच्याशीं घोडा जाऊन उभा राहिला. त्याबरोबर घोड्याचे पाय धोंडीला अडकले, व कांहीं केलें तरी ते सुटतना. हे मोठे संकट आलें असे म्हणून अर्जुन सर्व राजासह त्याच्या निवारणाचा उपाय शोधू लागला तेव्हां कांही जणानी त्याला सांगितले की, पलीकडे एक ऋषींचा आश्रम आहे, तेथें जाऊन चौकशी करावी. त्याप्रमाणें अर्जुन तेथें गेला. ऋषिमंडळाच्या मध्यभागी सौमरि नांवाचा महातपस्वी ऋषि ध्यानस्थ बसलेला त्याच्या दृष्टीस पडला. त्याला नमस्कार करून घोड्याला सोडविण्याचा उपाय अर्जुनानें विचारला. तेव्हां सौमेरी शिलेची हकीगत सांगू लागला. तो म्हणाला;–'अर्जुना, कर्कश नांवाची ब्रह्मदेवाची एक कन्या होती. तीं त्यानें उद्दालक नांवाच्या ऋषीला दिली होती. विवाहप्रसंगी उपाध्यायानी तिला पतीच्या आज्ञेप्रमाणें वागत जा, म्हणून सांगितलें, तेव्हा तिनें हसून उत्तर दिलें. 'मीं कोणाच्याच सत्तेत न राहतां आपल्या मनाप्रमाणें करीत जाईन.' हे ऐकून जमलेंल्या मंडळीना आश्चर्य वाटलें. नंतर उद्दालक ऋषि आपल्या स्त्रीला घेऊन आश्रमांत आला. घरीं आल्यावर त्यानें तिला सडासमार्जन करावयास सांगितलें. तेव्हां तिनें तसे तर केले नाहीच, पण उलट पूजासामग्री जिकडेतिकडे विस्तारून टाकीली. याप्रमाणें नित्य ती पतीच्या उलट वागून शिव्या देई. मनास येईल तर ती पतिला भोजन देई, नाही तर उपाशीच ठेवी. नेहमीं कपाळास आठ्या घालाव्या, देवघरांत विष्ठा टाकावी, अशाप्रकारे ती विपरीत कृत्ये करी त्यामुळें, ऋषीची षट्कर्मेंही बंद पडली. रात्रंदिवस कराकरां दांत खाऊन रडत बसणें, अन्न शिजवीत असतां श्वानास कडेवर खेळविणें, गळ्यांत मनुष्याच्या हाडाच्या माळा घालणें, आणि ऋषि जर कांही बोलला, तर मुसळ घेऊन त्याच्या मागे लागणें, अशा अनेक कारणास्तव उद्दालकाला उद्वेग उत्पन्न होऊन तो अरण्यांत निघून गेला, व चालतां चालता थकला

असता, एका वृक्षाखाली झोपी गेला. इतक्यांत एक गरुडपक्षी तेथे आला दुःखित ब्राह्मणाला पाहून, त्यानें दुःखाचें कारण त्याला विचारले. तेव्हां स्त्रीच्या संगामुळे आम्ही दुःख पावलो आहे, असें उद्दालकानें त्यास उत्तर दिलें. तेव्हां गरूड म्हणाला, 'तुझी स्त्री कशी आहे ती मला दाखव.' तेव्हां गरुडाला घेऊन ऋषी आश्रमाजवळ आला. कर्कशेला पाहून गरुडाला हसू आलें, आणि आपलें पीस उपटून तो उद्दालकाला म्हणाला, ऋषे, या पिसां-तून तूं या आपल्या स्त्रीकडें पहा.' ऋषीनें तसें करतांच त्याला कर्कशेच्या ऐवजी एक मोठी कुत्री दिसली. ते पाहून ऋषी घर सोडून वनवासांस जाव-यास तयार झाला. तेव्हां गरुडानें त्याला सांगितले कीं, 'कौंडिन्य ऋषी तुजकडे येईपर्यंत तूं धीर धर. 'असें सांगून पक्षी उडून गेला, आणि कांही कालानें कोंडिन्य ऋषी तेथें आला. त्यानें येताच तुम्हांला किती अपत्ये आहेत.–असा उद्दालकाला प्रश्न केला. तो म्हणाला, 'माझी स्त्रीच माझ्या मनासारखी नाही, तेव्हां अपत्ये कसली व कोठून होणार? ' नंतर त्याची सर्व परिस्थीति लक्षात आणून कौंडिन्य म्हणाला, 'उद्दालका, तुला एक युक्ति सांगतो. तुला जे इष्ट असेल, त्याच्या विरुद्ध तूं नित्य बोलत जा, म्हणजे तुझी स्त्री त्याच्या उलट करीन, व त्यायोगानें तुला सुख होईल. मी उद्या विश्वामित्राला भेटून तुझ्या घरी भोजनास येतो. 'असें सांगून कौंडिन्य निघून गेला. कौंडिन्यानें केलेला उपदेश लक्षांत ठेवून उद्दालक आपल्या स्त्रीला म्हणाला,–'अगे, उद्या कौंडिन्य येथे आला, तर तो त्याला घालवून दे.' कर्कशेनें उत्तर केले, 'मीं तर त्याची पूजा करुन सत्कार करीन.' हे ऐकून ऋषी म्हणाला,' मी उदयीक पितृश्राद्ध वगैरे काही करणार नाहीं. 'त्यावर तिनें उत्तर दिलें, 'मग मी करणारच' तेव्हां ऋषी म्हणाला,–'करावयाचेच तर सूर्यास्ताच्या वेळीं कर.' ती म्हणाली,'नाही,मी तर मध्यान्हही उलटू देणार नाही.' त्यावर ऋषी म्हणाला,' श्राद्धाच्या वेळीं मी सारा भ्रष्टाकार करीन.' त्यावर कर्कशा बोलली,'नाही, मी तर सर्व गोष्टीं पवित्रपणानें करीन.' त्यावर ऋषी म्हणाला,'मी पीतरांना कुळीथाचीं उसळ आणि तेल व गूळमात्र वाढीन.' तिनें सांगितलें, 'उत्तम उत्तम पक्वानें करून तुप व साखर त्यांना वाढीन' याप्रमाणें उलट बोलून ऋषीनें आपल्या स्त्रीकडून सर्व तयारीं करविली. उद्दालकाला कौंडिन्याच्या म्हणण्याची पूर्ण प्रतीति आलीं. दुसऱ्या दिवशी कौंडिन्यऋषी त्याजकडे आले, तेव्हां कर्कशेनें त्यांची पूजा केली आणि सर्व

श्राद्धविधी निर्विघ्नपणें पार पडला. तेव्हां आपल्या स्त्रीला शहाणपणा आला, असे समजून त्यानें तिला श्राद्धाचे पिंड गाईला घालावयास सांगितले. परंतु कर्कशेनें ते उलट मंत्राप्रमाणें ते विष्ठेत जाऊन टाकलें. ते पाहून उद्दालकाचा क्रोध अनिवार झाला, व त्यानें तिला 'तूं शिला होऊन पड'–असा. शाप दिला. शापवाणी ऐकताच तिला वाईट वाटले व ती पतिजवळ उशाःप माग् लागली त्यावेळीं ऋषि म्हणाला, 'तुला पांडवांचा शामकर्ण चिकटेल आणि अर्जुनाचा स्पर्श होताच तुझी मुक्तता होईल.'

अशी कथा सांगून सौमरि अर्जुनाला म्हणाला,–'ती ही शिला होय. तूं जाऊन तिला स्पर्श कर; म्हणजे श्यामकर्णाची सुटका होईल, 'सौभराच्या सूचनेप्रमाणें अर्जुनानें शिलेजवळ जाऊन स्पर्श केला. त्याबरोबर घोडा शिलेपासून सुटला व कर्कशा मुक्त होऊन विमानातून स्वर्गलोकी गेली.

## अमीराव नांवाच्या वानरराजाची कथा.

याप्रमाणें कर्कशेला मुक्त करून अर्जुन घोड्यासह चालू लागला. पुढें ते सिंदूरगिरीजवळ आले. तेव्हां त्यांच्यापुढची वाट कंदरानें अडवू टाकली. या सिंदूर गिरी रील शिखरे, झाडे, वगैरे सर्व सोन्याची होती. सैन्य तेथे आलें त्यावेळी जवळच लोहगिरी नांवाच्या पर्वतावर ऋतुध्वज नामक राजाची ऋतुमतीं नांवाची सुंदर कन्या क्रीडा करण्यासाठीं सख्यांसह आलेली होतीं व किष्किधाचलाचा राजा जो अंगद त्याचा वडीलपुत्र अमीराव तोही आपल्या इतर वानरमंडळीसह विहार करण्यासाठीं तेथें आला होता, त्याच्या दृष्टीस ती पडतांच तो कामातुर झाला. त्यानें लगेच आपले दूत पाठवून तिचें कुलगोत्र विचारले. तेव्हा ती म्हणाली, 'दूतहो, मी ऋतुध्वज नांवाच्या लोहगिरीच्या राजाची कन्या असून गरूडाच्या भृगु नांवाच्या कुमाराशी माझा विवाह ठरला आहे.' दूतानीं ती हकीगत अमीरावाला सांगितलीं. तेव्हां त्यानें शंबळ नांवाच्या आपल्या प्रधानाला ऋतुमतीला मागणी घालण्यासाठी ऋतुध्वजाकडे पाठविले, त्याप्रमाणें शंबळ त्याच्याकडे आला असतां, राजानें सांगितलें की, 'ती पूर्वीच गरुडाच्या पुत्राला निश्चित द्यावयाचे झालें आहे. त्यावर शंबळानें सांगितलें. 'किष्किधापती अंगदाचा पुत्र जो अमीराव त्याच्यापुढे भृगूचा पाड काय? त्याचा पराक्रम मोठा आहे. तुला पहाणें असल्यास आत्ताच दाखवितो.' असे म्हणून तो आकाशांत उडाला व वानरसेनेसह

लोहगिरीवर हल्ला करुन तें नगर त्यानें जाळून टाकले, आणि ऋतुमतीला उचलून नेलें. याच सुमारास पांडवाचीं व वानरांचीं गांठ पडली. सैन्याला पहातांच वानर त्यांना धमकी देऊन वाट मागू लागले. तेव्हां पांडवांचे वीर रागावून त्यांना मारीत सुटले. शेवटीं दोघांची निकराची मारामारी जुंपली. तेव्हां वृषकेतुनें त्या वानरांचा नाश करण्याचा सपाटा चालविला. याप्रमाणें आठ दिवस युद्ध झाल्यावर अर्जुनानें हनुमंताला शिष्टाईसाठी वानरांकडे पाठविलें. हनुमान येतांच सर्व वानर त्याच्या पाया पडूं लागले. तेव्हां हनुमान त्यांना म्हणाला;--' अहो, ऋतुध्वजाची कन्या गरुडाची सून ठरलेली असून, गरुड कृष्णाचें वाहन आहे. तेव्हां कृष्ण कोपल्यास तो तुमचें सर्वांचे प्राण घेईल. गरुडानेंही स्वतः समुद्राशी संग्राम करून टिटवीला साहाय्य करण्यासाठीं त्याचें शोषण केलें होतें. तेव्हां अशा थोराशीं तुम्हीं वैर उत्पन्न केलें, हें बरें केलें नाहीं.'--हनुमानाचें भाषण ऐकून, गरुडानें समुद्राचें शोषण कसें केलें, ती कथा ऐकण्याची इच्छा त्यांनीं दर्शविली. तेव्हां मारुति म्हणाला,--

## टिटवीची गोष्ट--समुद्राचें शोषण

" एका टिटवीनें समुद्रतिरीं एकदां अंडीं घातलीं होतीं. तीं एका बेडकीनें गिळून ती समुद्रांत जाऊन बसली. त्यावेळीं टिटवा आणि टिटवी दुःखित होऊन समुद्रापाशीं आपलीं अंडी परत मागूं लागलीं. परंतु समुद्र ती देईना. तेव्हां त्या दोघांना राग येऊन ती चोचीनें समुद्राचें पाणी उपसूं लागलीं. हें पाहून नारदाला आनंद झाला, व तो म्हणाला,--' या निमित्तानें समुद्र आणि गरुड यांची झुंज लावूं या '--असें मनांत आणून तो टिटव्यांना म्हणाला,--' अहो, तुम्ही किती म्हणून पाणी उपसाल ? त्यापेक्षां तुम्ही आपल्या नायकाला साहाय्यार्थ बोलवा, म्हणजे तो तेव्हांच तुमचें कार्य करील.'--टिटव्यांनीं नारदाच्या बोलण्याकडे लक्ष न देतां, पाणी बाहेर काढण्याचा आपला क्रम तसाच चालू ठेवला. हें पाहून नारद तसाच अंतरिक्षांत गेला आणि रामाश्रमीं जाऊन गरुडाच्या कामकेतु नांवाच्या पुत्राला त्यानें टिटव्यांचा झालेला सर्व वृत्तांत सांगितला. तो ऐकून कामकेतुला फार राग आला, आणि त्यानें अनेक पक्षिकुलें जमवून समुद्राला वेढा दिला. इकडे टिटवा-टिटवी पाणी उपसून थकल्यामुळें मूर्च्छित पडलीं होतीं, त्यांना

नारदानें सावध करून कामकेतुला मदतीला आणिल्याचें सांगितलें. तेव्हां त्यांना मोठा आनंद झाला नंतर कामकेतुच्या सांगण्यावरून सर्व पक्षी पाठबंधारे घालून समुद्राचें पाणी शोषूं लागले. इंद्राचे मेघही येऊन त्या कामीं पक्ष्यांना मदत करूं लागले, पाणी बाहेर जाऊं लागल्याबरोबर जलचरें मोकळीं पडलीं, तेव्हां पक्षी त्यांना खाऊं लागले त्यावेळीं समुद्राचा पुत्र जलधर व पद्मवर्ण नांवाचा महामत्स्य हे कामकेतुवर तुटून पडलें. पण सर्व पक्ष्यांनीं मिळून त्यास चीत केलं. जलधरानें पुन: चपळाई करून कामकेतुला एक तडाखा देऊन मूर्च्छित केलें. तें पाहून नारद हे वर्तमान सांगण्यासाठीं गरुडाकडे गेला. गरुड त्यावेळीं ब्रह्मगिरीवर ध्यानस्थ बसला होता. तेथें जातांच नारदानें त्याचा जयजयकार केला मग गरुडानें ध्यान संपवून काय वार्ता आहे, म्हणून नारदास विचारिलें. तेव्हां नारदानें समुद्राचा वृत्तांत व त्यामुळें कामकेतूचा झालेला घात गरुडास सांगितला. तें ऐकून गरुड क्रुद्ध झाला आणि समुद्राचें पारिपत्य करण्यासाठीं निघाला. इकडे लोकालोक पर्वतावर दुस्तर नांवाचा पक्षी होता, तो कामकेतूचें वर्तमान ऐकून समूद्राजवळ आला, आणि त्याने आपल्या चोंचीच्या तडाख्यानें जलधराला मूर्च्छित पाडिलें. जलधर मूर्च्छित पडतांच चंद्र त्याच्या मदतीला आला. त्याचाही दुस्तरानें पराभव केला. त्या वेळीं दुसऱ्या जलचरांनी दुस्तराला वेढा दिला व चंद्रानें त्यावर शस्त्राघात करून त्याला धरणीवर पाडिलें. जलधर व चंद्र दोघेही समुद्राचे पुत्र असल्यामुळें तो त्याच्या मदतीला आला होता. दुस्तर पडतो आहे तोंच, पूर्वीं सांगितल्याप्रमाणें गरुड तेथें आला, व मोठ्या आवेशानें समुद्राला गिळावयासाठीं धांवला. त्यावेळीं समुद्राची त्रेधा उडाली, व त्यानें श्रीविष्णूचें स्तवन सुरूं केलें. स्तवन ऐकतांच विष्णु तेथें आला व गरुडाचें निवारण करूं लागला, परंतु गरुड ऐकेना. तेव्हां विष्णु रागावून त्याला म्हणाला,––‘ अरे, माझा अपमान करून तूं समुद्राला कसा जिंकतोस तें पहातों.’–तेव्हां गरुड म्हणाला,––‘ स्वामी, हा भ्रम सोडा,’–गरुडानें असें म्हणतांच विष्णु युद्धास तयार झाले, आणि त्यांनीं गरुडावर सुदर्शनाची प्रेरणा केली. परंतु गरुडानें ते गिळून विष्णूला कासावीस केलें. तेव्हां विष्णूनें रुद्राचें स्मरण केलें. त्याबरोबर रुद्र तेथें प्रगट झाला, व त्यानें गरुडावर ‘त्रिशूल फेंकला परंतु तोही गरुडानें गिळून टाकिला. त्यावेळीं देवांमध्यें मोठा आकांत झाला. हा प्रकार पाहतांच नारद धांवत धांवत ब्रह्मदेवाकडे गेला व

ब्रह्मदेवाला घेऊन तेथे आला. ब्रह्मदेव येतांच गरुडाचा जयजयकार करून त्याला त्याने आशिर्वाद दिला, आणि विचारलें.--' अरे, तूं हा काय अनर्थ मांडला आहेस ? तुझ्या कोपापुढें हे हरिहर टिकले नाहींत, मग तो समुद्र बापडा काय टिकणार ?' गरुडानें उत्तर दिलें,--' तूम्ही जर या सर्व पक्ष्यांस उठवाल व टिटवीचीं अंडीं परत देववाल, तर मात्र मी समुद्राला मारणार नाहीं.' गरुडाचें म्हणणें सर्वांना मान्य झालें· मग ब्रह्मदेवानें समुद्रास सांगून बेडकीला अंडी ओकावयास सांगितले, आणि नारदानें पाताळातून शेषाला अमृत आणावयास सांगितले. नंतर तें शिंपून सर्व मृत पक्षिकुलाना उठविलें· याप्रमाणें सर्व मनासारखे घडून आल्यावर गरुडानें देवाला नमस्कार केला. नंतर विष्णू गरुडाला म्हणाले,–'तुला काय पाहिजे असेल ते माग.' त्यावर गरुड म्हणाला,–'तुम्हांला कांही कमीं असल्यास तें तुम्हीच मागा.' 'असें त्यानें म्हणताच विष्णूनें त्याला आपलें वाहन होण्यास सांगितले. या मागणीनें गरुडाला धन्यता वाटली, व तो विष्णूच्या चरणी लागला. नंतर त्यानें रुद्राला त्रिशूळ, व विष्णूला सुदर्शन परत देऊन ब्रह्मदेवाला नमस्कार केला. मग सर्व देव आपआपल्या स्थानी निघून गेले.

असा गरूडाचा पराक्रम सांगून हनुमान अमीरावाला म्हणाला,– ' त्या गरूडाचीं सून तूं पळविली, हें बरे नाहीं केलेंस. 'हे ऐकून अमीराव भ्याला व त्यानें ऋतुमतीला बापाकडे पाठवून दिले. मग अर्जुन हनुमंताकडे आला, व सैन्य पुढें चालू लागलें. अशी कथा गरुडपुराण व अग्निपुराण सांगितलीं आहे

---

# अध्याय १४ वा



## कराली राक्षसाची कथा.

हनुमान वानराशी सख्य करून अर्जुनाकडे परत आल्यावर सैन्य पुनः चालू लागलें. अनेक नगरे टाकून तें एका रानापाशी आले. तेथे साठ योजनें विस्तीर्ण असे सरोवर होते. श्यामकर्णानें त्या सरोवरांत पाणी पितांच त्यानें मूळ स्वरूप जाऊन त्याला घोडीचे रूप प्राप्त झाले. अर्जुन व इतर राजे हें

आश्चर्य पाहण्यासाठीं तेथें आले, व त्यांनी पुन: घोड्याला पाण्याशीं नेलें. तेव्हां घोडीचें रूप पालटून तिचा वाघ झाला व पुन: वाघ पाणी प्यावयास गेला असतां त्याचा सिंह झाला. हा चमत्कार पाहून ही कोणी मायावी राक्षसाची कृती असावी असें वाटून अर्जुनानें कृष्णाचें स्मरण केलें, व सरोवरांत एक बाण सोडला. त्याबरोबर आंत कराला नांवाचा राक्षस होता, तो तडफडत बाहेर येऊन पडला आणि सर्व सरोवर त्याच्या रक्तानें लाल होऊन गेले. इतक्यांत कृष्णहीं तेथें आला. तेव्हां सर्व राजांनी त्या राक्षसाची हकीगत सांगण्याविषयीं कृष्णास विनंती केली. कृष्ण म्हणाला,-'वेदमाणि नांवाच्या राक्षसाचा पूर्वी वध केल्यामुळें त्याचा कराली नांवाचा बंधु त्याचा सूड घेण्याकरिता सरोवरात दडून बसला. त्यानेंच कपटानें अश्वाला धरून नाना रूपे दाखविली. परंतू माझ्या कृपेनें अर्जुनाला दिव्यदृष्टी मिळाल्यामुळें, त्यानें तें ओळखून त्याचा वध केला. आता तुम्ही पुढें स्वचित्तानें चलावें. असे सांगून कृष्ण द्वारकेस गेला.

## अर्जुन परिमला.

नंतर अर्जुन श्यामकर्णासह फिरतां फिरता स्त्रीदेशात आला. तेथें सर्व स्त्रियाच असून परिमला नांवाची राणी होती. त्या नगरीत आठ सहस्र स्त्रिया नगराबाहेर विहारासाठीं आल्या असतां, श्यामकर्ण त्यांच्या दृष्टीस पडला. त्यांनी त्याला धरून परिमलेजवळ नेले. त्याच्या मस्तकावरील पत्रिका वाचली. आणि त्याला अश्वशाळेत बांधून ठेवण्यास सांगितलें.

इकडे अर्जुनाचे सैन्य नगरीशी येऊन ठेपले. तेव्हा परिमलेचें स्त्रीसैन्यही तयार होऊन युद्धासाठीं बाहेर निघालें. अर्जुनाला पाहून परिमला म्हणाली—'हे कुरुक्षेत्रांतील वीर अर्जुना, आता आपली प्रतिज्ञा सत्य कर, तूं आम्हाला वर नाहींतर युद्ध तरी कर.' हे ऐकून वीर चपापले, आणि स्त्रियांवर कसे बाण टाकावे अशा विवंचनेंत पडलें. इकडून परिमलेच्या स्त्रीसैन्यानें तर मदनाचें स्मरण करून अर्जुनाच्या सैन्यावर बाणाचा वर्षाव करण्यास सुरवात केली, व थोड्याच वेळात सैन्याची धुळदाण उडविली. वीर त्यांच्यांकडे टकमक पाहात, परंतु हातात शस्त्र घेण्यास मात्र कचरत असत. त्या स्त्रियांची सुंदर मुखकमले, गोंडस भुजदंड आणि कलशासारखें स्तन पाहून वीरांचें डोळे ताटकळून गेले त्यात मदनानेंहीं त्यांच्यावर मारा सुरूं केल्यामुळें त्यांचे धैर्य अगदींच सुटलें

इतक्यात मंदसुगंध वसंत वायूची झुळूक सुटली. मग काय? तें सर्व शस्त्रधारी वीर मूर्च्छितच झाले. वृषकेतु मात्र एकपत्निव्रताला चिकटून असल्यामुळें धैर्य धरुन लढूं लागला; परंतु कामवासनेनें त्याला लवकरच दूर पळवून लाविलें. इतर सैनिक लाज सोडून त्या स्त्रियांच्या मुखकमलाकडें दृष्टी लावून स्तब्ध राहिलें. अर्जुनही व्याकूळ होऊन गेला. तेव्हां परिमलेनें मंजुळ शब्दानीं त्याला सांगितलें, 'अहो महाराज, तुम्हाला यज्ञाचें खूळ लागले आहे तें टाकून द्या, आणि आम्हाला वरा, जे सुख स्वप्नामध्येंही दुर्लभ किंबहूना इंद्रादिकांनाही अलभ्य, तें आमच्या संगतीनें तुम्हाला मिळेल. व अनेक दिव्य भोगांची प्राप्ति होईल ती कां दवडीतां ? त्यावर अर्जुन म्हणाला, 'तुम्ही अनेक पुरुष भोगुन मग त्यांचा त्याग करतां यास्तव तुमचा विश्वास कोणीं धरावा ?' हे अर्जुनाचें निष्ठूर वचन ऐकून परिमलेला राग आला, आणि त्यानें अर्जुनावर मदन बाण सोडून त्याला मुर्च्छित केलें. इतर राजे तर कामानलानें व्याप्त होऊन 'आपण आता यांच्या संगतीतच राहू या' असें अर्जुनाला म्हणूं लागले. इतक्यांत अर्जुन सावध होऊन धनुष्याला बाण लावून त्या स्त्रियांवर सोडू लागला. तोंच, 'अर्जुना, त्यांच्याशी लढूं नकोस, ह्या कल्पान्ती कोणाला हार जावयाच्या नाहींत' अशी आकाशवाणी झाली. ती ऐकताच वीरांनी हातातली शस्त्रें खाली टाकली, आणि अर्जुन परिमलेला, 'तुझे मनोगत काय आहे' म्हणून विचारूं लागला. तिनें 'आम्हांला वरा' असें उत्तर दिले. ते सर्वांना मान्य झाले, नंतर तिनें अर्जुनाच्या गळ्यांत माळ घातली. मग अर्जुनानें तिला सागितले की, आम्हाला यज्ञाचें व्रत आहे, याकरितां आश्वमेध सिद्धीस गेल्यावर आम्ही तुमची मनः-कामना पूर्ण करूं, तोपर्यंत तूं आपल्या पांच लक्ष परिवारासह हस्तिनापुरास जा. हे ऐकून परिमलेला संतोष झाला, आणि अश्व अर्जुनाला परत देऊन ती आपल्या परिवारासह हस्तिनापुरास जाऊन धर्माला भेटली. धर्मानें त्यांना रहावयाला सुंदर मंदिरे देऊन त्यांची नीट बरदास्त ठेवली.

इकडे अश्व परत मिळाल्यावर सैन्यासह अर्जुन पुढें चालूं लागला असता वाटेंत त्याला बेट लागले. त्यांतील सर्व पुरूष व स्त्रिया आपले कानच पांघ-रीत असत यास्तव त्याला 'कर्णांबरद्वीप' म्हणत. हा चमत्कार पाहून सर्वजण आश्चर्य मानीत पुढें जाऊं लागले.

तो त्यांना यमखंड नावांचे वन लागले. तेथील सर्व प्राणिमात्र प्रातःकाळी झाडावर उत्पन्न होऊन माध्यान्ही तरुण होत, व सायंकाळीं मरण पावत. जी माणसें प्राण्यांचा वध करून कुटुंबाचे पोषण करितात. त्यांना असें उत्पति व प्रलय दररोज सोसावे लागतात.

## भीषण राक्षस

यमखंडाचा चमत्कार पाहून सैन्य पुढें चालूं लागले असतां, एका नगरीशी आले. तेथें एक पुरूष अनुष्ठानास बसला होता. त्याच्या कानांत गजशिरांची कुंडले व गळयांत मनुष्याच्या आंतड्याचे यज्ञोपवीत असून कपाळाला नररक्ताचे बारा तिलक लाविलेले होते. सैन्य तेथें गेले, व त्याला त्या नगरीची माहिती विचारूं लागलें 'प्रळयघंघाळाचा पुत्र भीषणराक्षस या नगरीचा राजा आहे.' असे सांगून त्या अनुष्ठानी पुरूषानें उलट सैन्याचीही माहिती त्याच्या पासून विचारून घेतली. मग तो धांवत धांवत नगरीत गेला. आणि भीषणाला म्हणाला,–' हे राक्षसाधिपते, आम्हीं तुमचें उपाध्याय अनुष्ठान करीत असता खंडतर दैवतें आम्हाला प्रसन्न झाली. आणि त्यांनीं तुमच्या वैऱ्यांना येथें ओढून आणिले. तुझ्या बापाला भीमानें मारिलें. त्या भीमाचा बंधु जो अर्जुन तो अश्वमेधाच्या घोड्याबरोबर सैन्य घेऊन फिरत असता, आम्ही तुमचे कुलगुरु म्हणून देवतामंत्रानें त्यांना इकडे आकर्षून आणिले आहे. तरी त्यांना त्वरित धरून येथें आण, म्हणजे सर्व राक्षसांची तृप्ती होईल.' हे ऐकून भीषणानें लगेच राक्षसांना श्यामकर्णाला धरण्याची आज्ञा केली. राक्षसांनी तसे करतांच पांडव सैन्य त्यांच्यावर धावून आले, आणि दोघामध्यें मोठे रणकंदन सुरूं झालें. त्यावेळी त्या विक्राळ राक्षसांना भिऊन पांडवसैन्य सैरावैरा पळूं लागलें. हे पाहून अर्जुन आश्चर्यानें चकित झाला. सैनिक भीतीनें पळत आहेत. असें पहातांच मारुतीनें राक्षस सैन्यावर चाल केली.. व त्यांना आपल्या पुच्छांत गुंडाळून गोफणीच्या दगडाप्रमाणें तो आकाशांत झुगारून देऊं लागला, तेव्हां जणूं काय रुद्रच खवळला कीं काय, असें वाटून सर्व राक्षस सैन्यासह पळत सुटलें, व गिरीकंदरी लपूं लागले. हा प्रकार पहातांच भीषणानें मायेनें सीतेचे रूप घेतलें, व तो मारुतीला हाक मारून मोठ्या काकुळतनें म्हणाला,–' हे हनुमंता, हा रावणाचा मामा मला छळीत आहेत. तरी मला लवकर सोडव. माझी उपेक्षा करूं नकोस.' हे सीतेचें करुणेचे शब्द ऐकुन

मारुतीला मोह पडला, आणि तो तिला सहाय्य करण्यासाठीं म्हणून धांवत गेला तेव्हां भीषणानें दूर अंतरावर जाऊन तेथे मायेनें एक सुंदर उपवन निर्माण केलें त्यांत बारा योजनें विस्तीर्ण असे एक सरोवर तयार केले व नानाप्रकारचें फुलपुष्पानीं दाटलेंले वृक्ष व वेली जिकडे तिकडे पसरविल्या अनेक जातींचे चित्रविचित्र पक्षी मधूर शब्द करीत उडया मारीत आहेता असे दाखविलें, मारुती तेथे गेला, तो एका पर्णकुटिकेत बसलेली एक सुंदर ऋषिपत्नी त्याच्या दृष्टीस पडली. हा देखावा पहाताच मारुति सीताशोक व युद्ध विसरला, आति तो सर्व प्रकार टकमक पाहात स्वस्थ उभा राहिला. इकडे अर्जुन आणि कृष्णपुत्र प्रद्युम्न हेही युद्ध सोडून या मायावी सुंदर स्थला-कडे आलें. तेव्हां भीषणानें आणखी मायेचा खेळ करून, त्या सरोवराभोवतीं देवतार्चन करीत असलेले अनेक ऋषि आमल्या शिष्यांना शास्त्र पढवीत आहेत. असा देखावा दाखविला. अर्जुन व प्रद्युम्न जवळ येताच ऋषिरूपी भीषणानें डोळे उघडून व हास्यवदन करून त्यांना तेथे येण्याचे कारण विचारलें अर्जुनानें आपली हकीगत सांगून म्हटले,—" आपल्यासारख्या पवित्र ऋषीचे दर्शन घेऊन पावन होण्यासाठी आम्ही येथवर आलो आहोत.' त्यावर भीषण म्हणाला,—'अर्जुना, तुझा पिता जो पंडू त्यानें आम्हाला पूर्वी यज्ञ-याग करुन फारच संतुष्ट केले होते. आतां तुम्हाला कांही इच्छा असल्यास मागून घ्या. ते दोघे बरें म्हणून कांहीं बोलणार तो मारुतीनें ही माया ओळखली व लागलीच त्यानें आकाशांत उठून भीषणावर उडी मारली मारुतीला पाहताच भीषण घाबरत पळत सुटला, मग तेथे कसले सरोवर आणि कसले उपवन, सर्व नाहीसे झाले. इतक्यांत अर्जुनानें राक्षसाला ओळखून प्रद्युम्नाला खूण केली, त्याबरोबर प्रद्युम्नानें बाण मारून त्याचा वध केला; व इतरही राक्षसांचा दोघानीं मिळून नाश केला. नंतर भीषणाचे नगर लुटून, तेथील सर्व संपत्ती त्यानी हस्तिनापुरांस पाठविली आणि घोडयाला सोडून ते पुनः सैन्यासह पुढें चालूं लागले.

# अध्याय १५ वा



## सुरथ व सुधन्वा याचे आख्यान

तेथून श्यामकर्ण निघाला तो चंपकपुराजवळ आला, तेथे हंसध्वज राजा राज्य करित होता. घोड्याला पाहताच दूतांनी हंसध्वजाला सर्व वर्तमान सांगितले. तेव्हां राजाने आपल्या सुमति नावांच्या प्रधानाला पुढे काय करावयाचे म्हणून विचारले, तेव्हा प्रधान म्हणाला,–'महाराज, वारु धरावा, म्हणजे अर्जुन युद्धाला येईल, व सुधन्वा त्याच्याशी लढू लागेल, अर्थात कृष्णही त्याच्या साहाय्याला येईल, आणि अनायासानेंच त्याची भेट होईल,' ही गोष्ट राजाला पटली, व त्यानें घोडा धरण्याचा हूकुम केला. आज्ञा होताच सेवकांनी घोड्याला धरले, त्यावेळी राजाचे सुरथ, सुधन्वा सुमन, आणि सुदय असे चार पुत्र परिवारासह युद्धास निघाले. त्यावेळीं सुधन्व्याची स्त्री म्हणाली,–'महाराज, मी ऋतुस्नात होऊन आज सोळावा दिवस आहे आणि आपण तर युद्धाला चालला?' स्त्रीचें भाषण ऐकून सुधव्याला संकट पडलें, व सारासार विचार करुन तो त्या रात्री स्त्रीसमागमे राहिला. दुसऱ्या दिवशी सुप्रभाती तो तयारी करून रणभूमीत गेला. आणि पित्यापुढे हात जोडून उभा राहिला, सुधन्वा उशीरानें आला, हे पाहून हंसध्वज राजाला अतिशय संताप आला. आणि त्यानें रागाच्या आवेशांत सुधन्व्याला तप्त तेलाच्या कढईत टाकण्याची आज्ञा केली. तेव्हां राजाची आज्ञा याप्रमाणें होतांच सेवकानी लगेच कढई तयार केली. तेव्हां सुधन्व्या पित्याला नमस्कार करुन कढईजवळ श्रीकृष्णाचे स्मरण करीत उभा राहिला. तेल कढू लागतांच राजदूतांनी त्याला उचलून कढईत टाकिलें परंतू चमत्कार असा कीं, सुधन्व्याला ते तेल थड जलाप्रमाणें लागले. सुधन्वा आनंदानें कृष्णभजन करीत असल्याचें राजानें तेलाची परिक्षा करण्याकरितां त्यात एक नारळ टाकिला.; पण तो तात्काळ फुटून वर आला तेव्हां हा 'काय चमत्कार आहे, असें हंसध्वजानें सुधन्व्याला विचारलें. त्यानें हे श्रीकृष्णाच्या भक्तीचें फळ आहे, असें त्यानें उत्तर दिले. त्यावेळी राजाला आनंद होऊन तो त्याला म्हणाला,–'कृष्ण जर तुझा सहकारी आहे, तर तू

अर्जुनाशी युद्ध कर' पित्याची आज्ञा होतांच सुधन्वा युद्धास निघाला. आणि अर्जुनाशी तुंबळ युद्ध करून त्यानें त्याचा पराभव केला. तेव्हां वृषकेतूने विडा उचलून सुधन्व्याला बाणांनी मुर्च्छित केलें. परंतू मावध होऊन तो पुनः उठला. तो प्रद्युम्नानें त्याच्यावर चाल केली. यण गुधन्वाचें वीर ऐकेनात. असें पाहुन अर्जुन पुढे सरसावला. थोडया वेळांत त्यानें सुधन्व्यास अर्जुनानें व अर्जुनास सुधन्व्याने याप्रमाणें एकमेकांनी एकामेकांस मूर्च्छित केले. अर्जुन कासावीस झालेला पाहून अनुशल्य सुधन्व्यावर अग्नीबाण टाकूं लागले परंतु सुधन्व्यानें ते तोडून टाकिलें व अर्जुनाचा रथ मोडून अर्जुनाला जर्जर केले तर नंतर सुधन्वा अर्जुनाला म्हणाला,'अर्जना तूं पण करून युद्ध कर.' तेव्हां अर्जुन म्हणाला.– तीन बाणानी तुझा शिरच्छेद करीन, त्यावर सुधन्वा म्हणाला.–'तुझें तीनहि बाण मी तोडून टाकीन आणि तसे त केलें तर माझे पुर्वज नरकांत पडोत. मग अर्जुनानेंही तशीच प्रतिज्ञा करून सुधन्व्यावर बाण टाकण्यास सुरुवात केली. त्या वेळीं कृष्ण अर्जुनाजवळ येऊन म्हणाला,–' अर्जुना, सुधन्वा आणि तूं दोघेही माझे सारखेच भक्त आहा. तेव्हां हा पण तुम्ही फार वाईट केला. आतां, तुमचें स्वसामर्थ्य काय असेल तें तुम्हींच प्रकट करा. तेव्हां ठीक आहे, असें म्हणून अर्जुनानें कृष्णावताराचें पुण्य घालून पहिला बाण सोडिलां सुधन्व्यानें तो तत्काल तोडून टाकिला, मग अर्जुनानें परशुरामावताराचें पुण्य जोडून दुसरा बाण टाकिला- पण सुधन्व्यानें कृष्णाचें स्मरण करून तोही तोडला. शेवटीं अर्जुनाच्या हातांत एक बाण राहिला, हें पाहून कृष्णानें शिव आणि ब्रह्मदेव यांचें स्मरण केलें. ते आल्यावर तिघांनीं मिळून ठरविले कीं, या वेळीं अर्जुनाचाच जय झाला पाहिजे. असें ठरवतांच सर्व देव अर्जुनाच्या बाणावर बसलें व कृष्णानें रामावतारीच्या अश्वमेधाचें पुण्य त्यावर घालून अर्जुनानें तो बाण सोडिला. तोही सुधन्व्यानें तोडून टाकिला, व आपला पण सिद्धीस गेला असे पाहून, दंड थोपटीत उभा राहिला. इतक्यांत तुटलेल्या बाणाचें एक अग्र, आकाशांत उसळले होतें तें खालीं आलें, व त्यानें सुधन्व्याचें शिर उडविलें. त्या वेळीं ' कृष्ण कृष्ण ' म्हणत असतांच, सुधन्वा भूमीवर पडला, आणि त्याच्या शरीरांतून ज्योति निघून तो श्रीकृष्णाच्या मुखांत शिरली.

# सुरथवध

सुधन्व्यासारखा महापराक्रमी व परम कृष्णभक्त असा पुत्र पडतांच, हंसध्वजाला अनिवार दु:ख झालें. नंतर सुधन्व्याचें शिर, शंकरानें आपल्या कंठमालेंत ओविलें मग सुधन्व्याचे गुण आठवून सर्वजण शोक करीत असतां रात्र झाली. व रणभूमीवर नाना प्रकारची श्वापदे येऊन प्रेतें भक्षण करूं लागलीं. दुसऱ्या दिवशीं सूर्योदय होतांच, सुधन्व्याचा बंधु सुरथ पित्याजवळ गेला, आणि प्रतिज्ञा करून म्हणाला,--' जर मी कृष्णार्जुनाला भूमीवर लोळविलें नाहीं, तर मी मातेच्या पोटी केवल पाषाणच जन्मलों असें मानावे.'-असें म्हणून गर्जना करीत तो युद्धास सरसावला. त्याला पाहून कृष्ण अर्जुनाला म्हणाला,--' आतां याच्यापुढें आपला टिकाव लागणें कठीण आहे.' कृष्ण असें बोलत आहे, तोंच दोन्हीं सैन्यें जवळ भिडून दारुण युद्ध सुरू झाले. त्या चकमकीत हंसध्वजाचें बहुतेक सैन्य नष्ट झाले, तेव्हां सुरथ आवेशानें अर्जुनाच्या रथावर चालून गेला, आणि अर्जुनाच्या सैन्याचा बराच संहार करून, त्यानें अर्जुनाला मूर्च्छित पाडिले, तेव्हां कृष्णानें रथ फिरवून मागे आणविला. थोडया वेळानें अर्जुन सावध झाल्यावर कृष्णानें त्यांस उत्तेजन देऊन पुनः रणभूमीवर आणिलें. अर्जुन आलेला पाहून सुरथ म्हणाला,--' अर्जुना, तुझी कालची प्रतिज्ञा आज तरी खरी करून दाखीव.' तेव्हां ' सूर्यास्ताच्या पूर्वी तुझें शिर छेदून टाकीन '--अशी प्रतिज्ञा अर्जुनानें केली. त्यावर ' मी आपलें रक्षण केलें नाहीं तर सर्व पापें मला लागोत.'-अशी उलट प्रतिज्ञा करून सुरथ लढावयास तयार झाला. कृष्णाचें स्मरण करून अर्जुनानें अग्निबाण सोडला; पण सुरथानें तो तोडून टाकिला. तेव्हां अर्जुनाने निर्वाणीचा दुसरा बाण त्यावर टाकिला. सुरथानें तो टाळावयाचे अनेक प्रयत्न केले; परंतु तो आवरेना. तेव्हां त्यानें मंगल-केतूचें स्मरण केलें, व त्यांना आपल्या बाणाच्या टोकावर बसविलें. नंतर ' अरे अर्जुना, आतां माझा बाण सांभाळ.'-असें म्हणून त्यानें तो बाण सोडला. सुरथाच्या धनुष्यापासून बाण सुटतांच त्या बाणांतून भस्मासूर, शंखासूर, आणि कालयवन असें प्रकट झाले, व त्यांनीं अर्जुनाच्या बाणावर असलेल्या ब्रह्मा-विष्णू महेशांना पळवून लाविलें. याप्रमाणें सुरथ विजयी झाला, तेव्हां अर्जुन विचारांत पडला. मग अर्जुनाच्या आज्ञेवरून हनुमानाने सुरथाचा रथ पुच्छात गुंडाळून आकाशांत उडी मारली; परंतु सुरथानें त्यावर मुष्टिप्रहार करून

त्याला मूर्च्छित केलें. व आपल्या रथावरील ध्वजस्तंभाशीं बांधून टाकिलें. ह्या प्रकार पाहतांच अर्जुन रथांतून उतरला व पळत सुटला. तेव्हां सुरथ त्याच्या मागें लागला. इतक्यांत कृष्णानें गरुडाला बोलाविलें. गरुडानें येतांच दोन्ही पंख पसरले, व तो सूर्याच्या आड उभा राहिला. त्यामुळें सूर्य दिसत नाहींसा होऊन सर्वत्र अंधार पडला. सूर्यास्त झालासें पाहून सुरथ कृष्णार्जुनाला म्हणाला,—'पहा माझी प्रतिज्ञा खरी झाली.'–असें बोलून त्यानें आपला रथ फिरविला. तो मागें वळत आहे, इतक्यांत कृष्णानें गरुडाला, बाजूला घ्यावयाला सांगितलें. गरुड बाजूला सरतांच सूर्य पुनः दिसूं लागला, व त्याबरोबर अर्जुनानें ब्रह्मशक्तियुक्त बाण सुरथावर सोडला. त्या वेळीं सुरथानें त्याला तोडण्यासाठीं अस्त्रें सोडिलीं; परंतु अर्जुनानें त्यांचें मध्येंच खंडन केलें. शेवटीं सुरथानें आपल्या बाणानें त्या शक्तीचे तुकडे केले; पण त्यांतील एक तुकडा आकाशांत उडून सुरथाच्या मानेवर पडला, व त्यायोगें त्याचें शिर धडापासून वेगळें झाळें याप्रमाणें दोन्ही पुत्र रणांत पडतांच हंसध्वज शोकाकुल होऊन धरणीवर पडला.

इकडे त्या दोघांच्या स्त्रियांना दुःस्वप्नें पडल्यामुळें चिताक्रांत होऊन ह्या दोघी एकमेकीजवळ येऊन स्वप्नाचा विचार करीत आहेत, तोंच सुरथाचा भुज त्यांच्या पुढें येऊन पडला. तो आपल्या पतीचा भुज, असें ओळखून सुरथाच्या पत्नीनें सहगमन करण्याचा निश्चय केला. इतक्यांत दूतांनींही सुरथ पडल्याचे वर्तमान अंतःपुरांत कळविलें. तेव्हां तेथें एकच हलकल्लोळ सुरू झाला, आणि त्या दोघी स्त्रिया सहगमनाच्या तयारीला लागल्या. पिवळ्या कांचोळ्या व पिवळी वस्त्रें नेसून वाद्यांच्या घोषांत अश्वारूढ होऊन त्या रणांगणावर आल्या मग त्यांनीं स्नानें केली व दानधर्मानें याचकांना तृप्त करून, धग पेटणाऱ्या अग्नींत उड्या टाकावयास त्या सिद्ध झाल्या. इतक्यांत आकाशवाणी झाली कीं सुधन्व्याची स्त्री उत्तरा गरोदर आहे, करितां तिने सहगमन करूं नये. हे शब्द ऐकतांच हंसध्वजानें तिची प्रार्थना करून तिला राहवून घतले, व सुरथाची स्त्री ज्वालंधरा अग्नींत उडी टाकून पतीला भेटण्यासाटीं स्वर्गास गेली. ह्या एकंदर प्रसंगानें हंसध्वज शोकाकुल होऊन बसला असतां कृष्ण, अर्जुन, नीलध्वज प्रत्यादि राजे त्याच्या जवळ गेले, व त्याचें सांत्वन करूं लागले. कृष्णानें

त्याला अलिंगन देऊन त्याच्या दोन्ही पुत्रांची स्तुति केली. आणि तो म्हणाला 'राजा, तुझ्या पुत्रांनीं आम्हांला युद्धयज्ञांत आज फारच संतुष्ट केलें. तरी आतां तूं शोक टाकून धर्मकार्याला मदत कर.' हें ऐकून हंसध्वज कृष्णाच्या चरणीं लागला, आणि नम्रतेनें म्हणाला, 'धर्मकार्यासाठीं माझा देह झिजेल, तर माझ्या भाग्याला पारावार राहाणार नाहीं.' असें म्हणुन त्यानें श्याम-कर्ण परत दिला व आपण अर्जुनाबरोबर निघाला. या प्रमाणें अर्जुनाला विजयी करून नंतर कृष्ण द्वारकेस गेला.



# अध्याय १६ वा

## बभ्रुवाहनाख्यान

हंसध्वजाला बरोबर घेऊन अर्जुन सर्व सैन्यासह घोडा घेऊन जात असतां तो मणिपुराजवळ आला, परंतु तेथे राजा कोण आहे. हे त्याच्या लक्षांत न आल्यामुळें त्यानें हंसध्वजाला त्याविषयी प्रश्न केला. तेव्हां हंस-ध्वज म्हणाला.–' येथें बभ्रुवाहन नांवाचा महाशूर राजा राज्य करीत असून या नगरींतील लोक मोठें कृष्णभक्त आहेत. घोड्याला धरिल्यास आपणाला मोठें कठीण पडेल,' या प्रमाणें त्यांचे भाषण चाललें आहे, तो बभ्रुवाहनाचे वीर नगराबाहेर आले होते, त्यांनीं लगेच श्यामकर्णाला धरून आपल्या राजाजवळ नेले. बभ्रुवाहनानें अश्वाच्या मस्तकावरील पत्रिका वाचून सर्व वृत्तांत मनांत जाणला, आणि तो प्रधानाला म्हणाला, ' अर्जुन माझा पिता आहे. तरी पुढें काय करावें ?' प्रधानानें उत्तर दिले, ' पित्यानें आरंभिलेलें कार्य पुत्राचेंच आहे तरी आपण त्यास अश्व परत देऊन त्यांना शरण जाणें हेंच इष्ट आहे.' हें ऐकून बभ्रुवाहनाला संतोष वाटला, आणि तो घोडा घेऊन आपल्या सर्व सैन्यासह अर्जुनाला भेटावयासाठीं निघाला. जवळ येतांच तो रथांतून उतरून पायींच अर्जुनाकडे जाऊं लागला त्याची पितृभक्ति पाहून सर्वजण प्रशंसा करून म्हणाले, 'पुत्र व्हावा तर बभ्रुवाहनासारखा व्हावा.' मग बभ्रुवाहनानें जवळ जाऊन अर्जुनाचे पाय धरिले. परंतु बभ्रुवाहनाचे तें कृत्य अर्जुनाला पसंत पडलें नाहीं. तो त्वेषानें त्याला म्हणाला, 'अरे,एक

बाणही न टाकतां तूं शरण येऊन घोडा परत देतोस, यावरून तूं माझा पुत्रच नव्हेस; ' असें म्हणून त्यानें त्याला दूर ढकलिलें. आपल्या मातेविषयीं पित्यानें काढलेले निंद्य शब्द ऐकून बभ्रुवाहनाचा क्रोध अनावर झाला, आणि अर्जुनाला जमिनीवर लोळविण्याची प्रतिज्ञा करून तो आपल्या सैन्यांत परत आला, मग धनुष्याचा टणत्कार करून व शंख वाजवून त्यानें सैन्याला इशारत दिली, व अर्जुनाबरोबर युद्ध करण्यास तो सिद्ध झाला. त्यावेळीं नानाविध शस्त्रांच्या खणखणाटानें रणभूमि गजबजून गेली व भयंकर संग्राम सुरू झाला. पांडवसैन्याकडून अनुशल्य प्रद्युम्न, हंसध्वज, यौवनाश्व, सुवेग, नीलध्वज, इत्यादि वीर एकामागून एक बभ्रुवाहनावर आले; परंतु तितक्यांनांही त्या एकटयानें कार्तिकेय बाण सोडून मूर्च्छित करून भूमीवर पाडिलें. तेव्हां अर्जुनानें छप्पन्न कोटि यादवांसह सर्व सैन्य बभ्रुवाहनाच्या सैन्यावर सोडलें. हें पाहून बभ्रुवाहनानें रागानें एक बाण मंत्रून अर्जुनाच्या सैन्यावर सोडिला. त्याबरोबर लक्ष कोटि बाण उत्पन्न होऊन पांडवसैन्यांत एकच कल्लोळ उडून गेला, व कृष्णाचे पुत्र आणि पांडवांकडील इतर वीर पटापट रणांगणांत पडले, एकटा प्रद्युम्न मात्र राहिला होता, तो वेगानें बभ्रुवाहनावर चालून आला. त्या दोघांचें दारुण युद्ध चाललें असतां, वृषकेतु सावध होऊन उठला आणि बभ्रुवाहनावर बाणांचा वर्षाव करून त्यानें त्याचा रथ तोडून टाकिला. मग बभ्रुवाहन दुसऱ्या रथांत बसला आणि त्याचें व वृषकेतुचे तुमुल युद्ध सुरू झालें. बभ्रुवाहनानें वृषकेतूला अनेक वेळां बाणानें सूर्यलोकी उडवून दिलें. तसेंच वृषकेतूनेंही शेकडों वेळां बभ्रुवाहनाला इंद्राला भेटण्यासाठीं अमरावतीस पाठवून दिलें. शेवटी बभ्रुवाहनानें एक महाभयंकर बाण सोडून वृषकेतूचें शिर उडविलें. तें अर्जुनाच्या जवळ येऊन पडलें. वृषकेतूचें शिर पहातांच अर्जुन मूर्च्छित पडला. थोडचा वेळानें सावध झाल्यावर अर्जुनानें गांडीव हातांत घेतलें, व 'आतां बभ्रुवाहनाचा निःपात करितों' असें म्हणून वेगानें त्याच्यावर चाल केली. त्यावेळी पितापुत्रांचा अपूर्व संग्राम सुरू झाला. अर्जुनानें अग्निबाण सोडून सर्व मणिपूर जाळण्याचा सपाटा चालविला; पण बभ्रुवाहनानें वरुणास्त्र सोडून अग्नीला विझविलें. इतक्यांत नीलध्वजराजाची स्त्री ज्वाला बाणरूपानें बभ्रुवाहनाच्या भात्यांत बसली होती, तो बाण त्यानें काढून अर्जुनावर सोडला. तो छेदण्यासाठीं अर्जुनानें केलेलें सर्व प्रयत्न व्यर्थ झाले.

शेवटीं तो अर्जुनाच्या कंठावर पडला. आणि त्यानें त्याचें शिर तोडून खालीं पाडलें. अशा प्रकारें बभ्रुवाहन विजयी होऊन वाद्यांचा घोषांत नगरांत परत आला. त्यावेळीं चारण लोक त्याचे यश गाऊं लागले; परंतु बभ्रुवाहनाच्या माता ज्या चित्रांगी व उलूपी यांना हें वृत्त ऐकतांच अनिवार दुःखानें मुर्च्छित होऊन भूमिवर पडल्या बभ्रुवाहनाला हा प्रकार समजतांच तो धांवत तेथें आला. त्याला पाहून चित्रांगी रागानें म्हणाली, 'जळो ! तुझें शौर्य तूं पुत्र नसून कुलांगार आहेस, तुझें तोंडही पाहूं नये.' असें अग्निप्रवेश करण्याकरितां उलूपीसह ती उठली, आणि शोकाक्रांत होऊन त्या दोघीही समरभूमीवर आल्या. तेथें आल्यानंतर त्यानीं अर्जुनाचें प्रेत शोधून काढिलें, व त्याला मिठी मारून त्या धाय मोकलून मोठ्यानें रडूं लागल्या. नंतर अग्निप्रवेश करण्यासाठीं त्यांनीं सेवकांना अग्नि प्रदीप्त करावयाची आज्ञा दिली. इतक्यांत उलूपीला स्मरण झालें कीं आपल्या माहेरी जीवकमणी आहे पूर्वी गरुड सर्वांचा वध करीं म्हणून आपल्या वडिलांनीं शंकराला प्रसन्न करून त्या-पासून ती मिळविला आहे. त्याच्या स्पर्शानें मेलेलीं माणसें पुनः जीवंत होतात. तो आणल्यास पतीला उठवितां येईल. हा विचार मनांत येतांच तिनें तो चित्रांगीस सांगितला आणि कुंडलिक नांवाच्या आपल्या एका नाग-सेवकाला पत्र देऊन जीवकमणि आणण्यासाठीं त्यांनीं त्याला पातालांत पाठ-विलें. परंतु आपणास परत यावयास बरेंच दिवस लागतील, व तितक्यांत कदाचित् अर्जुनादिकांचीं शरीरें नासून जातील, म्हणून कुंडलिकानें त्याच्या शरीरांवर विष ओकून ठेविलें व आपण मणि आणावयासाठीं विवरद्वारानें पातालांत गेला. तेथें गेल्यावर शेषाला पत्र देऊन त्यानें सर्व वर्तमान कळविलें आणि त्यापाशीं मणि मागितला. परंतु शेषाचा धृतराष्ट्र नांवाचा प्रधान, ' मनुष्य सर्पद्वेषी आहेत,' असें म्हणून मणि द्यावयास रुकार देईना. तेव्हां शेषानें कुंडलिकाला मणि न देतां परत पाठविला. त्यानें येऊन सर्व हकिकत बभ्रुवाहनाला सांगितली. त्यावेळीं उलूपी आणि चित्रांगी यांची निराशा होऊन त्यांनी धरणीवर अंग टाकिलें. मग बभ्रुवाहन सैन्याची तयारी करून पातालात गेला, आणि तेथें त्यानें शेषनगरीला वेढा दिला. तें पाहून सर्व सर्प भयचकित झाले. शेषानें कानावर हात ठेवले, व–'ज्यानीं मणि देऊ नको म्हणून सांगितलें, तेच आतां युद्ध करतील'–असें म्हणून स्वस्थ बसण्याचें ठर-विलें. त्याच्या प्रधानानें मात्र नागसैन्य सिद्ध करून बभ्रुवाहनाशीं युद्ध सुरुं

केलें. तेव्हां बभ्रुवाहनानें ते सर्प आहेत असें जाणून त्यांच्यावर गरुडबाण गृध्रबाण, नकुलबाण इत्यादि संहारक बाणांचा वर्षाव केला. त्यावेळीं सर्व सर्प घाबरून गेलें, व जागा सांपडेल तेथें लपूं लागले. हा प्रकार पाहून शेष बभ्रुवाहनाच्या भेटीला आला, व बभ्रुवाहनाला अलिंगन देऊन युद्ध बंद करविलें. वासुकीही सर्व-सैन्यासह तेथे येऊन बभ्रुवाहनाला भेटला, आणि बभ्रुवाहनाच्या इच्छेप्रमाणें तो जीवकमणि घेऊन मृत्युलोकीं यावयास निघाला परंतु त्यांचा प्रधान व प्रधानपुत्र यांनीं असा विचार केला कीं, अर्जुन जिवंत झाल्यास त्याचें व आपलें वैर वाढेल; आपण मणि दिला नाहीं हें कृष्णाला कळेल, आणि तो गरुडाला पाठवून आपला नाश करील. याकरितां त्याची कांहीं तरी तजवीज आधींच केली पाहिजे.' असें म्हणून ते उभयतां मृत्युलोकीं रणभूमीवर आले व त्यांनीं अर्जुन व वृषकेतु याचीं शिरें नेऊन समुद्रांत टाकिली. इकडे शेष परिवारासह मणिपुरास आला, त्यावेळीं त्याला पाहून चित्रांगी आणि उलूपी यांना संतोष झाला. नंतर ती अर्जुन व वृषकेतू त्यांची शरीरें पहाण्यासाठीं जवळ गेलीं, तों त्यांचीं धडे मात्र असून शिरें नाहींशीं झालेलीं त्यांच्या दृष्टीस पडलें.

इकडे अर्जुन व वृषकेतु पडलें. त्या वेळीं द्वारकेंत व हस्तिनापुरी त्यांच्या विषयीं कुंती द्रौपदी, भीम, रुक्मिणी इत्यादिकांना दुःख स्वप्नें पडूं लागलीं. तेव्हां कृष्ण लगेच त्या सर्वांसह गरुडारुढ होऊन मणिपुरास आला तेथें शेष आणि वासुकी यांना पाहून त्याचें मन सचिंत झालें. नंतर कृष्णानें सर्व वृत्तांत ऐकून घेऊन अर्जुन व वृषकेतूच्या शरीराकडे पाहिले, तो त्यांची धडें मात्र पडलेलीं असून शिरे नाहीत, असें पहातांच कुंतीच्या शोकास तर पारावार राहिला नाहीं. कृष्णाचे पुत्रही तेथें मरून पडले होते, त्यांच्या स्त्रियाही मूर्च्छा येऊन पडल्या. तेव्हां शेष कृष्णाला म्हणाला, 'देवा, आम्ही जीवकमणि आणिला आहे; परंतु शिरेच नाहींशीं झाल्यामुळें आमचा कांहीं उपाय चालत नाहीं.' तेव्हां कृष्ण त्यांना म्हणाला, ' भिऊं नका. आतां क्षणांत शिरें येतील पहा,' असें म्हणून कृष्णानें संकल्प केला कीं मी जर खरोखर ब्रह्मचारी असेन तर, ज्यांनीं शिरें चोरून नेली असतील, तर ते तत्काल मरून जावे व शिरें येऊन पडावीं' कृष्णानें असा संकल्प करतांच ते चोर सर्प मरून पडलें व शिरे आकाशमार्गानें तेथ आली. मग शेषानें जीवकमण्याच्या स्पर्शानें प्रथम वृषकेतूला

उठविले. नंतर अर्जुन आणि प्रद्युम्नादि कृष्णाचे पुत्र उठविले, तो प्रकार पहातांच सर्वत्र आनंदीआनंद झाला. मग बभ्रुवाहनानें कृष्णाला व इतर सर्व मंडळींना नमस्कार केला, आणि खाली पहात तो उभा राहिला. तेव्हां कृष्णानें बभ्रुवहानाच्या शौर्याची प्रशंसा करून त्यास प्रेमानें आलिंगन दिले. मग कृष्णानें विश्वकर्म्याला सांगून तेथें एक उत्तम नगर तयार करविलें, व तेथें दरबार भरवून शेषादिकांची अर्जुनाकडून पूजा करविली. चित्रांगीनें कृष्णाच्या सर्व स्त्रियांची पूजा करून त्यांचा सत्कार केला. व ती कुंतीच्या पाया पडली. मग बभ्रुवहानानें सर्व नगर शृंगारून सर्व राजांना उत्तम मेजवानी दिली. अशा रीतीनें त्यांनीं ती सर्व रात्र आनंदानें घालविल्यावर कृष्ण बभ्रुवाहनाला म्हणाला, आता तुम्ही धर्मकार्याला साहाय्य करून यज्ञ सिद्धिस न्यावा.' तेव्हां बभ्रुवाहन म्हणाला-'देवा, तू साहाय्यकारीं असतां व आम्ही तुझे दास असतां आम्हांला येवढा मान कशाला पाहिजे ?' याप्रमाणें कृष्णाचे गौरव करून बभ्रुवाहन धर्मकार्यास साहय करण्यास सिद्ध झाला. नंतर कृष्ण चित्रांगीला म्हणाला,- जशा द्रौपदी, सुभद्रा, माझ्या बहिणी आहेत. तशीच तूही आहेस तरी तूं हस्तिनापुरास जाऊन अश्वमेध पूर्ण कर' मग भीमाबरोबर त्या सर्वांना कृष्णानें हस्तिनापुरास पाठविलें आणि वाद्यांच्या घोषात घोडा सोडून सर्व सैन्य पूर्ववत् त्याचे मागून चालू लागलें.

---

# अध्याय १७ वा



## रामाचा अश्वमेध

बभ्रुवाहन आणि अर्जुन यांच्या युद्धाचा इतिहास ऐकून, जनमेजयानें विचारलें, 'मुने, याचप्रमाणें पितापुत्रांचा दुसरा एखादा संग्राम झालेला आपल्याला माहीतआहे काय? तेंव्हां वैशंपायन म्हणाला,-' होय, राजा श्रीरामचंद्र आणि त्याचे पुत्र लव-कुश यांच्यांमध्येही असाच प्रकार झाला होता. रामानें सीतेला लंकेहून आणविल्यावर कांही कालानें रजकाच्या निंदेवरून त्यानें तिचा त्याग केला. त्यावेळीं ती गरोदर होती. पुढें वाल्मिकि

ऋषीच्या आश्रमात ती असतांना तेथें प्रसूत होऊन तिला लव आणि कुश असे दोन पुत्र झाले. ऋषीच्या कृपेनें ते लवकरच शस्त्रास्त्र विद्येंत निपुण होऊन महापराक्रमी झाले. इकडे ब्रह्मराक्षस जो रावण, त्याचा वध केल्यामुळे घड-लेल्या ब्रह्महत्येच्या निवारणार्थ रामाने अश्वमेध करावयाचा ठरवून श्यामा कर्ण वारूला शृंगारुन सोडिले तो फिरता फिरतां वाल्मीकीच्या आश्रमापाशी आला, तेव्हा लवकुशानी त्याला धरिलें व त्याच्या बरोबर असलेल्या सैन्याचा पराभव केला, रामाला हे कळतांच तो घोडा सोडविण्यासाठीं स्वतः तेथें आला. त्यावेळीं लवकुशांनी, शत्रुघ्न, भरत, लक्ष्मण यांना रणांत लोळविलेलें पाहून, राम स्वतः युद्धास उभा राहिला. परंतु त्या कुमारांचा अभ्दुत परा-क्रम पाहून रामाला विस्मय वाटला, आणि त्यानें त्यांना तुमची मातापिता कोण म्हणून विचारलें त्यांनीं उत्तर केलें, आमची माता पतिव्रता सीतादेवी आहे; पण तिच्याशीं तुम्हांला काय करावयाचे आहे? युद्ध करावयाचे असेल तर करा, नाहीतर पळून जा. हे शब्द एकून राम युद्ध करू लागला. परंतु कुशानें थोडयांच वेळात त्याला मुर्च्छित पाडिलें. तेव्हां हनुमान त्याच्यावर धाऊन आला. पण त्यालाही कुशानें मूर्च्छित केलें. व त्याचें पुच्छ धरून त्याला सीतेजवळ ओढीत नेलें सीतेनें मारूतीला ओळखिलें. व आपल्या पुत्राच्या हातून मोठा अन्याय झाला असें वाटून तिला खेद झाला. इकडे रामचंद्रानें सावध होऊन आपल्या सैन्याला अमृतवृष्टीनें उठविले. आणि मग हार आली, असें समजून सर्वजण अयोध्योस परत आले. इकडे वाल्मिकी वरुण लोकास गेला होता. तो तिसऱ्या दिवशी परत आल्यावर त्याला हे वर्तमान कळलें तेव्हा तो लवकुश, सीता व आपला शिष्यवर्ग यासह घोड्याला घेऊन अयो-ध्येस गेला. तेथे सर्वांच्या भेटी होऊन नगरात मोठा उत्सव झाला. मग श्यामकर्णाचें यथाविधि हवन केल्यावर अश्वमेधाची सांगता झाली.

## ताम्रध्वजाची कथा

याप्रमाणे प्रसंगानुसार रामाच्या अश्वमेधाची कथा सांगून वैशंपायन पुढें म्हणाला, राजा, अर्जुन आणि कृष्ण श्यामकर्णाबरोबर जात असता रत्नपुर नांवाच्या नगराजवळ आले, तेथे नगराबाहेर दुसरा सुंदर लक्षणयुक्त श्यामकर्ण सैन्यासह त्याच्या दृष्टीस पडला. पडला. दोन्ही घोडे एकमेकास लाथाडू लागले. हा दुसरा श्यामकर्ण कोणाचा असावा, याच्या चौकशीसाठी

अर्जुनानें आपले दूत पाठविलें. त्यांनी जाऊन चौकशी केली. व अर्जुनाला परत येऊन सांगितलें कीं, ‘ मयूरध्वज नांवाच्या राजानें अश्वमेधासाठीं श्यामकर्ण सोडून त्याच्या रक्षणासाठीं आपल्या ताम्रध्वज नांवाच्या पराक्रमी पुत्राला पाठविलें आहे. व त्याचें हें सैन्य आहे.’ हें ऐकून कृष्ण अर्जुनाला म्हणाला, ‘पार्था, मयूरध्वजानें सहा अश्वमेध पूर्ण केले असून, सातव्यासाठीं हा श्यामकर्ण सोडिला आहे. त्याचा पुत्र ताम्रध्वज महापराक्रमी असून त्याची गांठ पडल्यास मोठा दुस्तर प्रसंग ओढवेल.’ कृष्णाचें भाषण ऐकून अर्जुनाला चिंता उत्पन्न झाली. इकडे ताम्रध्वजानेंही आपल्या प्रधानाकरवी अर्जुनाची सर्व माहिती विचारून घेतली. अर्जुनाचा पराक्रम ऐकून व प्रत्यक्ष श्रीकृष्ण त्याचा सारथि आहे, हे जाणून, ताम्रध्वजालाही चिंता उत्पन्न झाली. परंतु प्रधानानें उत्तेजन दिल्यावरून त्याने अर्जुनाच्या सैन्याबरोबर युद्धाला सुरुवात केली. दोन्ही सैन्यांत कांहीं वेळ तुमुल युद्ध झाल्यावर शेवटीं ताम्रध्वज कृष्णार्जुनावर चालून आला, आणि दोघांनांही धरून गरगर फिरवून त्यानें त्यांस लांब झोंकून दिलें. जमिनीवर पडल्यामुळें कृष्णार्जुनाला घेरी आली. इकडे आपल्याबरोबर लढावयास आतां कोणी वीर उरला नाहीं, असें पाहून ताम्रध्वज आपल्या सैन्याला माघारें बोलावून आपल्या नगरांत शिरला. मयूरध्वजानें आपला पुत्र विजयी होऊन आला, म्हणून मोठा आनंदोत्सव केला. परंतु ताम्रध्वजानें कृष्णार्जुनाची केलेली अवस्था जेव्हां पित्याला सांगितली, तेव्हां त्याला अत्यंत वाईट वाटलें, व ताम्र-ध्वजाचा धिक्कार करून तो म्हणाला, ‘अरे दुष्टा ज्याच्या संतोषासाठीं यज्ञ करावयाचा त्या कृष्णालाच तूं दुखविलेंस, तुला काय म्हणावें ?’

इकडे मध्यरात्रीच्या सुमारास कृष्णार्जुन सावध झाले, त्या वेळीं घडलेला एकंदर प्रकार पाहून अर्जुनाला तर फारच वाईट वाटलें. मग कृष्ण अर्जुनाला म्हणाला–, ‘बा पार्था, हा मयूरध्वज मोठा सत्त्वशील असून, श्रियाळासारखा महाभक्त आहे. त्याच्या सत्त्वाची परीक्षा पाहणें असल्यास चल तुला दाखवितों. असें म्हणून योगमार्गानें त्यांनीं आपलीं स्वरूपें बदलली, व नगरांत प्रवेश केला. त्या नगरीची नानाविध मनोहर रचना पाहात ते चालले असतां, कृष्णानें थोडी मजा करण्याचें मनांत आणून आपले प्रतिबिंब ठिकठिकाणीं उत्पन्न केलें. त्या वेळी स्त्रियांना आपले पति व पुरुषांना आपल्या स्त्रिया, कृष्णरूप दिसूं लागल्या. अशा रीतीनें चमत्कार दाखविल्या-

नंतर प्रातःकालच्या सुमारास कृष्ण व अर्जुन यांनी नदीवर स्नान केलें, आणि ब्राह्मणवेषानें ते गुरु व शिष्य होऊन पुनः नगरांत आले. लोक त्यांना पाहून नमस्कार करीत. तेव्हां ते त्यांना आशीर्वाद देत. अशा रीतीनें फिरत फिरत ते राजमंदिरापाशीं आले. त्यांना पाहातांच मयूरध्वजराजानें त्यांचें स्वागत करून षोडशोपचारें त्यांची पूजा केली, व त्यांच्या पायांशी लोटांगण घातलें. त्या वेळीं ब्राह्मणवेषधारी कृष्ण ओकसाबोकशी रडूं लागला. राजानें रडण्याचें कारण विचारतां, त्यानें उत्तर दिलें,– 'राजाधिराजा, माझा कुटुंबमेळा द्वारकेला आहे. तूं यज्ञ मांडलेला ऐकून तुजपासून कांहीं मिळावें, या हेतूनें शिष्य व एक पुत्र यांना घेऊन मी तुजकडे यावयास निघालों, पण तुझ्या सीमेवर येतों तों, एक वाघ माझ्यापुढें उडी मारून उभा राहिला, व आमच्यापैकीं माझ्या पुत्राला त्यानें धरिलें. तेव्हां काकुळतीस येऊन मीं त्याला म्हटलें,–'बाबारे, कृपा करून तूं माझ्या पुत्राला सोड, तूं मागशील तो दुसरा आहार मी तुला देईन.' हें ऐकून त्यानें उत्तर दिलें,–' ब्राह्मणा, या नगरीचा राजा जो मयूरध्वज त्याचें शरीर बत्तीस लक्षणांनीं युक्त असून, षड्रस अन्नानें पुष्ट झालेलें आहे. ते करवतानें कापवून उजवें धड जर तूं मला देशील, तर मी तुझ्या पुत्राला सोडीन.' वाघानें अशी मागणी केल्यामुळें, राजा, मी तुजकडे आलों आहे. तेव्हां माझ्या पुत्रास जीवदान देणें हे सर्वस्वी तुझ्या औदार्यावर अवलंबून आहे.' हें ब्राह्मणाचें भाषण ऐकून सर्वजण मोठ्या विचारांत पडले. परंतु राजाच्या शरीरांत मूर्तिमंत सत्त्व दाटलेलें असल्यामुळें, त्यानें ब्राह्मणाला रडें आवरण्याची विनंती करून तो म्हणाला,–' महाराज हें नाशिवंत शरीर जर विप्रकार्यी खर्च होईल, तर संसारांतील अघोर यातनांतून मी मुक्त होईन. ब्राह्मणा, तुझे मनोरथ मी पूर्ण करितों.' असे म्हणून त्यानें आपल्या सत्यवती नामक स्त्रीला व पुत्राला हाक मारून ब्राह्मणाचें अभीष्ट करण्याची तयारी करण्यास सांगितलें, आणि आपण सचैल स्नान करून पद्मासन घालून बसला. नंतर कृष्णाचें स्मरण करून स्त्रीपुत्रांना आपलें शरीर कापावयाची त्यानें आज्ञा केली. आज्ञेप्रमाणें त्याच्या साध्वी पत्नीनें व पितृभक्त पुत्रानें आपल्या हातांत करवत घेऊन तो राजाच्या मस्तकावर ठेविला. इतक्यात ब्राह्मण म्हणाला,– राजा, वाघानें आणखी असें सांगितलें कीं, शरीर करवततांना ओव्या म्हणाव्या व कोणीही

डोळ्यांतून अश्रू आणूं नसे.' हे ऐकून मयूरध्वजानें स्त्रीपुत्रांना आनंदानें ओव्या गावयास सांगितले. तेव्हा त्या सत्त्वधीर स्त्रीपुत्रांनीं करुणारस आळवून ओव्या म्हणण्यास सुरुवात केली.

## ओव्या.

जयजयाजी गोविंदा ॥ नमन तुज आनंदकंद ॥ फेडीं आमुच्या भवबाधा ॥ जन्ममरणाची॥१॥ हा मयूरध्वज वीर॥ अथिला सत्त्वाचा सागर॥ तुझाची आधार ॥ देवदेवा ॥ २ ॥ ऐसा तुझा सत्वधीर ॥ नाही क्षात्रियांमाजी शूर ॥ आता त्वां केला उद्धार ॥ बेचाळीशीचा ॥ ३ ॥ पाहतां इये सृष्टिमाजी ॥ ऐसा कोणी न देखो आजी ॥ जेणें देह विप्रकाजी ॥ अर्पण केला ॥ ४ ॥ तरी इथे अवघड संकटी ॥धांव पावगा जगजेठी ॥ चिरवास होवो वैकुंठी ॥ मयूरध्वजा तुम्हासी ॥५ ॥ शिवकांचीची श्रियाळ चांगुणा त्याही वधूनि आत्मनंदना ॥ शंकरासि दिधलें भोजना ॥ सत्वास्तव ॥ ६ ॥ परि आपले स्वशरिर॥ देवोनिया तोषवी विप्र ॥ ऐसा नाही नृपवर ॥ भूमंडळी ॥ ७ ॥ वर्णिता राया तव गुणासी ॥ करुणा उपजवे मानसी ॥ मायबापा ऋषिकेशी ॥ रक्ष रक्ष ॥ ८ ॥

याप्रमाणें ओव्या गाऊन ते राजाचे शरीर कर्वतीत असतांना, राजाचे डाव्या डोळ्याला अश्रू आले ते पाहून, ' रडणाराचें शरीर आम्हाला नको असें म्हणून ब्राह्मण जाऊं लागले तेव्हां मयूरध्वज त्यांना म्हणाला,— 'विप्रहो, या अश्रुपाताचें कारण सांगतो. ते कृपा करून ऐकून घ्या, उजवें धड ब्राह्मणाच्या उपयोगी पडल्यामुळे माझ्या मनाला संतोष तर झालाच; परंतू डावे धड व्यर्थ गेल्यामुळें त्याला वाईट वाटून त्या डोळ्यातून अश्रु आले.'—हें राजाचें सत्त्वस्थ भाषण ऐकून, कृष्ण अर्जुनाला हळूच म्हणाला,—' अर्जुना, पहा हा राजा, कसा मेरूप्रमाणें अढळ सत्त्वाचा आहे ? आतां प्रसन्न होऊन याला वरदान दिलें पाहिजे,—असें म्हणून त्यांनी लगेच विप्रवेष टाकून दिला, आणि कृष्णार्जुन–रूपानें तें प्रकट झाले, व ' इच्छित वर माग ' म्हणून देव राजाला म्हणाले. त्या नरनारायणांना पाहून राजाला अत्यानंद झाला, नंतर कृष्णानें राजाच्या शरीराला स्पर्श केला. त्याबरोबर तें पूर्वीपेक्षांही दिव्यरूप झालें. नंतर राजा कृष्णाच्या चरणीं लागला, आणि म्हणाला,—' देवा अंतसमयीं तूं मला भेटलास, यापेक्षां आतां दुसरें काय

मागावयाचें राहिलें आहे ? तुझें स्वरूप अखंड माझ्या हृदयकमलीं असावें एवढीच इच्छा आहे.'–त्या प्रसंगीं राजाचें हें अतूल सत्त्व पाहून आकाशांतून देवांनीं त्याच्यावर पुष्पवृष्टि केली; व वाद्यघोषानें सर्व पृथ्वी दुमदुमून गेली. मग रणांगणावर जाऊन कृष्णानें कृपादृष्टीनें सर्वांना उठविलें, आणि मयूरध्वजास तो म्हणाला,—' राजा, आतां तुम्हीं आम्हीं मिळून धर्माच्या यज्ञाला मदत केली पाहिजे.'–देवाचें म्हणणें ऐकून मयूरध्वजाला फार संतोष वाटला, आणि ' आज मी धन्य आहे ' असें म्हणून त्यानें आपण केलेलें सहा अश्वमेध कृष्णाला अर्पण करून, धर्मकार्यी देह लागो, असा संकल्प केला. नंतर दोन्हीं श्यामकर्ण आणून त्यांची पूजा केली, व त्यांना सोडून दिलें. नंतर मयूरध्वज आणि ताम्रध्वज यांसह कृष्णार्जुन त्यांच्याबरोबर पुढें चालले.

---

# अध्याय १८ वा



## रविऋषीची भेट

मागील अध्यायांत सांगितल्याप्रमाणें दोन्ही श्यामकर्णांच्या मागून सैन्यासह कृष्णार्जुन चालूं लागले असतां, त्यांना समुद्राची गर्जना ऐकू आली. तेव्हां सर्व वीर घाबरून म्हणूं लागले,—' आतां हे घोडे समुद्रांत शिरल्यास त्यांच्या मागून सैन्य कसें जाईल ?' परंतु श्रीकृष्णानें त्यांची शंका निवारून म्हटलें,—' वीरहो, जरी अश्व समुद्रांत शिरले, तरी आम्ही आंत जाऊन घेऊन येऊं. तुम्ही काळजी करूं नका.'–याप्रमाणें बोलत ते सर्वजण चालले असतां, दोन्ही घोडे एकमतानें एका सरोवरापाशीं आले. सरोवराभोंवतीं पर्णकुटिकेंत अनेक ऋषि बसलें होतें, व त्यांच्या मध्यभागीं तपोनिधी रविऋषी ध्यानस्थ होऊन आसनावर बसलेला होता. घोडे आवेशानें ऋषीजवळ गेले, आणि त्यांनीं आपलीं अंगे त्याच्या अंगाशी घांशिलीं. तेव्हां, न जाणो गुरूच्या ध्यानाचा भंग होईल, या भीतीनें त्याच्या शिष्यांनीं त्या घोड्यांना धरून, आश्रमांतील एका गुंफेत बांधून ठेविलें. हें पाहून कृष्ण म्हणाला,—' अर्जुना, अश्व परत मिळविण्यासाठीं ह्या ब्राह्मणांशीं युद्ध करणें इष्ट नाहीं.

तर त्यांची विनंति करूनच घोडे मागावे हें बरें.'–मग अर्जुन वृषकेतुला बरोबर घेऊन ऋषीच्या आश्रमांत गेला, आणि त्यानें त्या शिष्यांजवळ ऋषीची चौकशी केली. तेव्हां ते म्हणाले,—' हा आश्रम रविऋषीचा असून, आमचा तपोनिधी तेथें आसनावर बसला आहे, तो पहा '–त्या ऋषीच्या मांड्यावर दोन वृक्ष होते तें पाहून वृषकेतु अर्जुनाला म्हणाला,—' तात, आपण एवढी पृथ्वी फिरलों, परंतु असा चमत्कार कोठें पाहिला नाहीं. हें फल-पुष्पांनीं भरलेलें तरू या ऋषीच्या मांड्यांवर कसें आलें ?' तेव्हां या चमत्काराचा उलगडा व्हावा म्हणून अर्जुनानें कृष्णाचें स्मरण केलें. स्मरण करताच कृष्ण तेथें आले. तेव्हां अर्जुनानें कृष्णाला तो चमत्कार दाखवून त्याचें कारण विचारले. तेव्हां कृष्ण म्हणाला,—' हा महंत रविऋषी ब्रह्म-देवाप्रमाणें चतुर आहे, एकें दिवशीं तो पातालांत भोगावतीच्या स्नानासाठीं गेला असतां त्या नदींतील वृक्षांची दोन फलें त्याला मिळाली तीं घेऊन व तो आश्रमांत परत आला, आणि आपल्या शिष्यांना म्हणाला,–'आतां संध्यावंदन आटोपून या फळांचा आपण स्वीकार करूं.' असें म्हणून तो तीं फळें मांड्यांवर ठेवून आणि आचमन करून प्राणायाम करूं लागला. इतक्यांत त्याची पूर्ण समाधि लागुन राहिली. ध्यानभंग करूं नका' अशी शिष्यांना आज्ञा असल्य मुळें ते स्वस्थ बसले. मग वर्षाकाळ आल्यावर त्या फलांना मोड फुटून त्यांचीं मांड्यांवरच झाडें झालीं व कालानें यांना फळपुष्पेंही येऊं लागलीं, तरी अद्यापि ऋषि ध्यानस्थ आहेत. आतां तुम्ही याचें स्तवन करा,म्हणजे तो डोळे उघडील.'

कृष्णाच्या सांगण्याप्रमाणें अर्जुन व वृषकेतु मारवा राग आलापून ऋषीची अनन्यभावानें नानाविध स्तुति करूं लागले. तेव्हां कृष्णानें चैतन्य-रूपानें त्याच्या शरीरांत प्रवेश केला. अंगांत चैतन्य आल्याबरोबर ऋषीनें डोळे उघडले, आणि मांड्यांकडे पाहून विस्मयपूर्वक तो म्हणाला, 'अरे, एका क्षणांत हे तरु इतके कसे वाढले?' मग अर्जुन व वृषकेतु यांनीं त्याला नमस्कार केला, आणि ऋषींनीं त्यास हकीकत विचारल्यावरून, त्यांनीं घोड्याचा वृतांत सांगितला, व आपल्या शिष्यांनीं आमचा घोडा धरून ठेविला आहे, असे कळविलें. ऋषीनें विचारलें, 'तुमचा साह्यकारी कोण आहे ?' तेव्हां ते म्हणाले,–'आमचा साह्यकर्ता श्रीकृष्ण आहे.' असें सांग-

तांच त्याने विचार केला कीं, 'ज्याची आपण अखंड भक्ति करितों, तो साक्षात् परमात्माच यांचा हितकर्ता आहे, तरी त्याने दिलेल्या पादुका यांना दाखवाव्या.' असें मनांत आणून तो अर्जुनाला म्हणाला,–'अरे, श्रीकृष्णानें मला दिलेल्या पादुका मी पलीकडच्या गुफेंत ठेविल्या आहेत, त्या त्वरित घेऊन ये.' आज्ञेप्रमाणें अर्जुन गुफेजवळ जाऊन पादुका उचलूं लागला; परंतु कांही केलें तरी त्या त्याला उचलत ना. तेव्हा कष्टी होऊन तो तसाच ऋषीकडे परत आला. हे पाहून ऋषि म्हणाला, 'पार्था, अरे कळला तुझा पराक्रम, कृष्ण तुझा साहाय्यकर्ता आहे; म्हणूनच केवळ तुला जय मिळतो आहे, असें ऋषि बोलत आहे, तो कृष्ण तेथे प्रकट झाला, कृष्णाला पाहातांच ऋषीनें घोडे परत देऊन सर्वांचा गौरव केला.

वैशंपायन सांगतात, 'राजा, हा ऋषि म्हणजे प्रत्यक्ष शंकर असून अर्जुनाचा गर्व परिहार करण्यासाठीं ऋषिरूपानें अवतरला होता. अर्जुनानें शंकरालाही जिंकून त्यापासून पाशुपतास्त्र मिळविलें, तेव्हां त्याच्यासारखा दुसरा क्षत्रियच नाहीं, अशी जगभर ख्याति झाल्यामुळे अर्जुनाला गर्व झाला होता, तो नाहींसा करण्यासाठीं त्यानें हा खेळ केला. ऋषीचे शिष्य हे शंकराचे गणच होते; व पादुका ह्या खरोखर पादुका नसून कुंडलें होती.

## चित्रसेनगंधर्वाची भेट

नंतर सैन्याला चालू करून कृष्ण अर्जुनाला विचारून धर्माला सर्व मजकूर सांगण्यासाठीं पुनः हस्तिनापुरास गेला. इकडे अर्जुन सैन्यासह अनेक गिरिकंदरें आणि वनोपवनें ओलांडीत चालला असतां सर्व परिवार गंधर्व-राजाच्या वनाशीं आला, तेव्हां गंधर्वदूतांनीं ती हकीकत गंधर्व राजाला कळविली. तें वर्तमान ऐकतांच काय आहे हें पाहण्यासाठीं म्हणून तेथें गंधर्व जमले. परंतु ते सर्व अर्जुनाच्या वीरांना पाहून घाबरले, व म्हणाले;—' हे वीर जर कोपले तर आम्हांला दे माय धरणी ठाय–असें करून सोडतील.' तेव्हां त्यांचा राजा चित्रसेन त्यांना धीर देऊन म्हणाला,—' आपण यांना कांहीं युक्ति करून फजीत करूं या.'–असें म्हणून त्यानें कांही निवडक चोर अर्जुनाच्या सैन्यांत पाठविलें. त्या चोरांनी सैन्याला झोप आणिली व जेथे घोडे होतें तेथें जाऊन त्यांना घेऊन जाऊं लागले. त्या वेळीं घोड्यांनी खिंकाळून जमीन उकरून सैन्याला जागे करण्याचा प्रयत्न केला, परंतु तो

फुकट गेला. मग चोरांनीं त्या घोड्यांना च्यवन ऋषि तपश्चर्या करीत होता, त्या गुहेंत नेऊन ठेविलें, आणि सैन्यावरील झोंप काढून घेतली.

## च्यवन ऋषीचें सामर्थ्यं

कांहीं वेळानें ते सैनिक जागे होऊन पहातात, तो घोडे नाहींत. घोडे नाहीसें झाल्याचें पाहतांच त्यांचा शोध करण्यासाठीं ते निघाले, व फिरत फिरत च्यवन ऋषीच्या विवरापाशीं आले, इतक्यांत सूर्य उगवून प्रकाश पडला. मग अर्जुन कांहीं वीरांसह विवरांत शिरला. आंत गेल्यावर त्यांना च्यवनऋषि दिसला. त्याला पाहून हाच चोर असावा, असें वाटून ते सैनिक धरा, मारा, चोपा, असें ओरडूं लागले. त्यांच्या गडबडीनें ऋषीचा ध्यानभंग होऊन त्यानें डोळे उघडले. त्याबरोबर त्याच्या डोळ्यांतून अग्नि निघून त्यायोगें जवळ उभे असलेलें सर्व सैनिक जळून भस्म झाले. कांहीं मागें होतें ते पळून गेले. हा चमत्कार पाहतांच अर्जुनही परत फिरला व त्यानें सैन्य तयार केलें, इकडे ऋषि आसन सोडून पुढे आला, तों अर्जुनाचा सैन्यभार त्याच्या दृष्टीस पडला. मग त्यानें स्वसंरक्षणार्थ ब्रह्मा, विष्णु व महेश यांचें स्मरण करून म्हटलें,––' मी जर खरा सिद्ध ऋषि असेन, तर या शस्त्रास्त्रांनीं उलट मागें फिरून, सोडणारांसच मारावें.'–असा संकल्प केल्याबरोबर त्याच्या अगाध तपोबलामुळें, शस्त्रें उलटलीं व अर्जुनासह बहुतेक वीर भूमीवर मरून पडलें. तें पाहून च्यवन आश्चर्यभरित होऊन आपल्या गुंफेंत निघून गेला. आंत जाऊन पहातो, तों दोन्ही श्यामकर्ण वारू त्याच्या दृष्टीस पडले. त्यांना पाहून तो म्हणाला 'कोठचे हे घोडे आणि कोठचें हें सैन्य? आम्ही अनाथ गिरिकंदरी राहणारे असतां हे आमच्याकडे कां आले? असो. परंतु आपल्या कर्मानुसार त्यांना स्वशस्त्रांनींच मरण आलें. जे जसें कर्म करितात, तसें फळ मिळतें ' असा विचार करून तो पुनः ध्यानस्थ झाला.

इकडे अर्जुनाच्या सैन्यापैकीं जे थोडे वीर उरले होते, ते पळत पळत हस्तिनापुरास गेले, आणि त्यांनीं धर्माला हें भयंकर वर्तमान सांगितलें. श्रीकृष्ण तेथें होतेच. त्यांनीं दूतांना एकीकडे बोलावून सर्व वृत्तांत समजून घेतला, आणि या वर्तमानाचा स्फोट न करण्याबद्दल सांगून, ते द्रौपदीचें सांत्वन करण्यासाठीं तिकडे गेले. इतक्यांत आणखी कांहीं लंगडे पांगळे

झालेले वीर येऊन झालेला प्रकार सांगू लागले. तेव्हां सर्वजण शोक करूं लागले. परंतु कृष्णानें त्यांना आश्वासन देऊन सांगितलें कीं, 'मी त्यांना जाऊन घेऊन येतों, तुम्ही काळजी करूं नका.' असें म्हणून भीमाला बरोबर घेऊन कृष्ण च्यवनाच्या गुहेजवळ गेला, व तेथील सर्व अनर्थ पाहून त्या दोघांनीं विवरांत प्रवेश केला. त्यांचा मनोदय जाणून ऋषि म्हणाला, 'कृष्णदेवा, तूं आम्हांला दैवत मानतोस; परंतु तुझ्याच नेत्रांत अमृत आहे. माझें थोर भाग्य म्हणूनच तुझे चरण आपोआप माझ्या दृष्टीस पडले. आतां कृपावलोकनानें सैन्याला उठव.' ह्याप्रमाणें ऋषीनें सांगितल्यावर कृष्णानें अमृतदृष्टीनें अर्जुनासह सर्व वीरांना जिवंत केलें. मग सर्वजण पुनः ऋषीजवळ आले. तेव्हां अर्जुन च्यवनाची प्रार्थना करून म्हणाला,-'मुनि महाराज-क्षमा असावी, आमच्याकडून चुकीनें आपला महदपराध घडला, व त्याचें फलही आम्हांला मिळालें. परंतु आतां एक गोष्ट आपल्याला विचारावयाची आहे. आपल्या मस्तकावर ही वडाचीं पानें आहेत, याचें कारण काय तें कृपा करून सांगावें.' ऋषीनें उत्तर केलें,-'अर्जुना, संपूर्ण पृथ्वी फिरल्यामुळें नाना चमत्कार तुमच्या अवलोकनांत आले आहेत. आतां या वटपर्णांचा खुलासा वाटेंत तुम्हांला बकदाल्भ्य मुनि भेटतील त्यांच्यापासून होईल. पुढें, मार्ग मोठा बिकट आहे, तरी तुमच्या निर्वाणीं उपयोगी पडणाऱ्या कृष्णा-वाचून तुम्ही घोडे घेऊन पुढें जाऊं नका.'-असें सांगून व घोडे परत देऊन, ऋषि आपल्या गुंफेंत गेला, आणि कृष्णार्जुनही सैन्यासह घोड्यांना सोडून त्यांच्या मागून जाऊं लागले.

---

## अध्याय १२ वा



### श्यामकर्णाचा समुद्रांत प्रवेश.

वैशंपायन म्हणतात,-'राजा, मग कृष्णार्जुन दोन्ही श्यामकर्णासह मोठ्या वेगानें मार्ग आक्रमीत असतां, सरस्वती नगराजवळ आले. तेथें यमधर्माचा श्वशुर वीरवर्मा नांवाचा राजा राज्य करीत होता. त्याच्याशी

युद्ध होऊन अर्जुनाचें व त्याचें सख्य झालें. पुढें डाहाळ देशाच्या उपसिंग नामक राजाशीं असेंच युद्धानंतर त्यानें सख्य केलें. याप्रमाणें आणखीही कित्येक राजांशीं असेंच युद्धानंतर त्यानें सख्य केलें. याप्रमाणें आणखीही कित्येक राजांशीं युद्ध करून अर्जुन अनेक वनोपवनें हिंडला. श्रीकृष्ण त्याचा सारथि असल्यामुळें, सर्व राजे त्याला शरण येऊन साहाय्य करीत. अशा रीतीनें धवलगिरि, मयूरपर्वत, अगस्तिऋषीचा आश्रम, ब्रह्मगंगा, इत्यादि दुर्घट स्थानेंही त्यानें ओलांडिली. चंद्रहास राजाच्या पुण्यदेशांतही तो गेला. कृष्णानें त्याला या सर्व स्थानांची सविस्तर माहिती सांगितली. मग ते श्यामकर्णासह अमरावतीस गेले, व सूर्यनारायणास भेटले. तेथून पुढें शिवदर्शनासाठीं कैलासास गेले, नंतर कनकावतीस जाऊन अर्जुनानें सिद्ध-काला रणांत जिंकलें, आणि कुसुमावतीचा राजा साहध्वज याचा वध केला. पुढें ते वृंदापुर नगरास आले. तेथें दुंदुभी राजाशीं युद्ध करून कृष्णानें त्याला जिंकलें. याप्रमाणें सर्व पृथ्वी जिंकून अर्जुन मागे परतला.

वैशंपायन म्हणतात,–'राजा अश्वमेध दीक्षेचा काल वास्तविक एका वर्षाचा होता, परंतु एवढा मार्ग सैन्याला क्रमण करावा लागल्यामुळें, परत जावयाला त्याला तीन वर्षें लागलीं, या प्रसंगीं कृष्णानें वाटेंत अनेक ठिकाणीं तीर्थें स्थापन केलीं. त्यापैकीं मेरु पर्वतावरील पक्षतीर्थ आणि अनंतशयन तीर्थ, या दोन विख्यात तीर्थांवर स्नान करून तें सैन्य घोड्यांसह परतलें.

## बकदाल्भ्य ऋषीची भेट.

याप्रमाणें घोडे मागें परतून चालले असतां, पूर्वसमुद्राच्या तीरावर आले, व तेथें दोघेही समुद्रांत शिरले. हें पाहून सर्व वीरांना चिंता उत्पन्न झाली. अर्जुनही आतां काय करावें, असें म्हणत काळजींत पडला. तेव्हां कृष्णानें त्याला सांगितलें –'अर्जुना, आपण आतां कांहीं तरी उपाय करूं; व समुद्रांत जाऊन घोड्यांना शोधून आणू.' असें बोलून त्यांनीं सैन्याला बाहेर ठेविलें, आणि अर्जुन, मारुति, प्रद्युम्न, हंसध्वज, वृषकेतु आणि बभ्रुवाहन, यांना बरोबर घेऊन कृष्णानें रथांतून समुद्रांत प्रवेश केला. नंतर कृष्णानें पाण्याचें अभिमंत्रण केलें. त्याबरोबर तें अगदी स्तब्ध झालें व रथ त्यावर चालू लागलें. कांहीं अंतर गेल्यावर त्यांना एक बेट लागलें. ते फार मनोहर असून फार विस्तृत

असें होते. तेथे गेल्यावर त्यांना एक ऋषीचा आश्रम लागला. तेव्हां रथा-खाली उतरून सर्व जण पायीं चालू लागले. तेथें बकदाल्भ्यऋषी व त्याज-वळ दोन्ही श्यामकर्ण उभे असलेले त्यांच्या दृष्टीस पडलें, त्यांना पाहून सर्वांना आनंद झाला. त्या ऋषीच्या मस्तकावर वटपत्र ठेवलेले होते. व त्याच्या जटेंत अनेक पशुपक्षी घरें करून राहिली होती. त्याच्या मांड्यावर वारूळें वाढली असून त्याचें केश दूर अंतरापर्यंत पसरलें होते. तो आसनावर निर्विकल्प समाधि लावून ध्यानस्थ बसला होता. अशा त्या ऋषीजवळ जातांच कृष्णार्जुनादि सातही जणांनी त्याला नमस्कार करून त्याचा जय-जयकार केला. व कृष्णानें त्याच्या अंतःकरणांत चैतन्यरूपानें प्रवेश केला त्याबरोबर ऋषीनें डोळें उघडले, आणि त्यांच्याकडे पाहिले. कृष्णार्जुनांना पाहातांच ऋषीला समाधान वाटले. मग अर्जुनानें ऋषीस त्याच्या मस्त-कांवरील वटपत्राविषयीं प्रश्न केला. तेव्हां ऋषी म्हणाले, 'बाबा, हा देह नाशवंत असून संसारांत उत्पत्ति व संहार क्षणोक्षणीं चालले आहेत, ही जन्म-मरणाची येरझार म्हणजे आम्हांला मोठे दूषण आहे. अहो! लोमश, मार्कं-डेय इत्यादि महान् ऋषी आम्हां देखत नाहींसे झाले. हे शरीर केव्हा पडेल याचा नियम नाहीं. म्हणून घरदार न करतां वृष्टिनिवारणार्थ मस्तकावर वटपत्र धारण करून बसलो आहे. घरदार केल्यास स्त्रीपुरुषांचीं प्राप्ती होऊन त्यांचा प्रतिपाल व विवाहादि करितां करितां अपार दुःख होते, म्हणून आम्हीं हा एकांतवास पत्करला आहे. असो पण देवा, आता मजवर कृपा करून मला ज्ञानाचा उपदेश करा. तेव्हां कृष्ण म्हणाला 'मुनीश्वरा, तूंच प्रत्यक्ष धर्मस्वरूप आहेस. तूं आमच्या बरोबर चल, म्हणजे तुला पाहून युधि-ष्ठिराचा श्रमपरिहार होईल.' हे मर्मभेदक भाषण ऐकून ऋषि गर्भगळीत झाला. आणि गहिवरून प्रेमानें म्हणाला, ' हे नारायणा, ब्रह्मदेवाचा जसा गर्व तूं नाहींसा केलास, तसाच आज माझाही केलास. इतक्यात अर्जुनानें विचारलें, मुने, ब्रम्हदेवाचा वृत्तांत मला सांगा ! तेव्हां बकदाल्भ्य अर्जु-नाला सांगू लागला.:-

## ब्रह्मदेव-गर्वनिरसन

एकदां ब्रह्मदेवानें मजकडे येऊन वटपत्रासंबंधानें मला प्रश्न केला, आणि तुझी इच्छा काय आहे, म्हणून विचारू लागला. त्यावेळीं मला राग येऊन

मी त्याला म्हटले, 'अरे तूं मला काय देणार? माझ्या देखत तुझ्यासारखे वीस ब्रह्मदेव आजपर्यंत होऊन गेले.' मी असे बोलत आहे, तो वावटळ येऊन आम्ही दोघेही उडालो, व एका ब्रह्मांडांत येऊन पडलो. तेथे आठ मुखाचा ब्रह्मा सृष्टी उत्पन्न करण्याचें काम करीत होता. आम्हांला पाहून आश्चर्यानें त्यानें तुम्ही कोण? म्हणून आम्हाला विचारिले. तेव्हां ब्रह्मदेवानें उत्तर केलें 'मी सत्यलोकाचा नायक चतुर्मुख ब्रह्मा असून हा बकदाल्भ्य ऋषि माझा शिष्य आहे.' इतक्यात पुन्हां वावटळ सुटली, व आम्ही तिघेही तिसऱ्या ब्रह्मांण्डात जाऊन पडलो. तेथें बारा मुखाचा ब्रह्मा आमच्या दृष्टीस पडला. त्याला आम्हीं आपली हाकीगत सांगितली तो आम्हाशी गर्वानें बोलत आहे, तो पुन्हां वावटळ सुटली व आम्हीं चवथ्या ब्रह्माण्डात जाऊन पडलो. तेथें सोळां वदनांचा ब्रह्मा आमच्या दृष्टीस पडला. त्यालाही ब्रह्मदेवानें पूर्वीप्रमाणेंच आमची हकीगत सांगितल्यावर पुन्हां वावटळीनें आम्हांला उडवून बत्तीस मुखांच्या ब्रह्मदेवाशी आणून टाकिलें. याप्रमाणें उत्तरोत्तर दुप्पट मुखांचे अनंत ह्मे आमच्या दृष्टीस पडलें. शेवटी सहस्रशीर्ष, सहस्रनेत्र, अश- तेजोरूप आदिपुरूषाची भेट झाल्यावर आम्हीं पुन्हा तेथें आलो अर्जुना तो आदिपुरूष म्हणजे हा कृष्णच होय.'

याप्रमाणें कथा सांगून झाल्यावर कृष्णर्जुनानीं ऋषीस विनंति केली. मुने ही कथा सांगून आपण आम्हाला फार संतोष दिला. तरी आतां धर्माच्या यज्ञासाठीं हस्तिनापुरास आले पाहिजे ऋषीनें ते मान्य केले. मग श्रीकृष्णानीं त्याला रथात बसविलें व ते सातहीं जण समुद्रातून आपल्या सैन्याकडे परत आले, त्यांच्याबरोबर दोन्ही श्यामकर्णही होते. नंतर ऋषीला पालखीत बसवून सर्वजण वाद्यघोषांत सैन्यासह हस्तिनापुरास निघाले. वाटेत जयद्रथाच्या नगराशीं ते आल्याबरोबर तेथील लोक भयभीत होऊन गेले. जयद्रथाचा युद्धात वध झाल्यावर, त्याच्या प्रधानांनी त्याच्या जयवंत नामक पुत्राला राज्यावर बसविलें होते अर्जुनाच्या सैन्याची वार्ता ऐकतांच जयद्रथाची स्त्री दुःशीळा सभेत आली व आपल्या पुत्राला बरोबर घेऊन ती कृष्णार्जुनाजवळ गेली; आणि 'याचें रक्षण करा' असें म्हणून तिनें पुत्राला त्यांच्या पायावर घातले तेव्हां अर्जुन व श्रीकृष्ण तिला म्हणाले,– दुःशीळें, भिऊं नको. अर्जुन म्हणाला, 'तूं तर आमची बहीण आहेस. तुझे अहित

आम्ही यापुढें मनात तरी कसें आणू?' असें सांगून त्यानें जयवंताची राज्या॰ वर स्थापना केली, व दुःशीलेला अश्वमेघाचे आमंत्रण दिलें व ते ऐकून तिला हर्ष झाला, आणि ती पुत्रासह हस्तिनापुरास जाण्यासाठीं सैन्याबरोबर निघाली. मग कृष्णानें अर्जुनाला म्हटलें, आपण सर्व पृथ्वी फिरून अनेक राजांना जिंकलें; परंतु इतका काल धर्मराज वाट पाहुन फार कष्टला असेल. करिता मी पुढें जाऊन त्याला ही आनंददायक वार्ता सांगून धीर देतों. तूं सैन्यासह लवकरच ये असें म्हणून कृष्ण त्वरित हस्तिनापुराजवळ आला. त्यावेळीं धर्मादिक त्याला समोरे गेले, आणि त्याचा जयजयकार करीत त्यांनीं त्याला मिरवीत मिरवीत नगरांत आणिलें, व मोठा आनंदोत्सव केला. मग कृष्णानें अर्जुनाच्या दिग्विजयाची संपूर्ण हकीकत धर्माला सांगितली. अश्वमेधाला सुरुवात कशी झालों पुढें अनुशल्यानें कसें संकट आणलें तेथून घोडा सोडल्यावर गणपतीनें कशी मौज केली, इत्यादि प्रसंग कृष्णानें धर्माला सांगून, बकदाल्भ्याला यज्ञासाठीं आणल्याचेंही कळविलें. शेवटीं तो म्हणाला, 'धर्मा, अर्जुन विजयी होऊन येत आहे, त्याला आपण सामोरे जाऊं या.'

कृष्णाच्या सूचनेप्रमाणें अर्जुनाला आणण्यासाठीं सैन्याला सामोरे जाण्याची आज्ञा झाली, व सर्व नगर शृंगारण्यांत येऊन जिकडे तिकडे गुढ्या व तोरणें उभारिलीं. मग कुमारिकांना दधि, दूर्वा व पुष्पें देऊन हत्तीवर बसविलें; आणि दिवसा मशाली लावून सर्वजण धृतराष्ट्राला पुढें करून अर्जुनाला सामोरे चालले बरोबर अष्ट नायिका नृत्य करीत होत्या. द्रौपदी, देवकी रोहिणी, यशोदा, इत्यादि स्त्रियांही हत्तीवर बसून, छत्रचामरांसह जयजयकारानें ती मौज पाहाण्यासाठीं निघाल्या. इकडे अर्जुन गंगेच्या तिरी सैन्यासह उतरून व वेदघोषांत सर्व राजांसह स्नानें करून, ब्राह्मणांस दानें देत होता. तोंच कृष्ण, धर्म, इत्यादि मंडळी समारंभानें तेथें जाऊन पोंचली अर्जुनानें त्यांना व धृतराष्ट्राला नमस्कार केला. आणि भीम, नकुल, सहदेव कुंती व देवकी, या सर्वांनीं त्याला प्रेमानें आलिंगन दिलें. नंतर सभा भरवून अर्जुनानें बरोबर आणलेल्या राजांचीं कुळगोत्रें धर्माला सांगितलीं, व धर्मानें त्या सर्वांना आलिंगन दिलें. हा अपूर्व समारंभ पहाण्यासाठीं नगरांतील सर्व स्त्रीपुरुष तेथें जमले. याप्रमाणें समारंभ झाल्यावर सर्वजण हस्तिनापुरास आले. राजानीं आपापल्या सैन्याचे निरनिराळ्या ठिकठिकाणीं तळ दिले, व

धर्मानेंही त्यांची उत्तम प्रकारें बरदास्त ठेविली.

# अध्याय २० वा



## पूर्णाहुति

याप्रमाणें अर्जुनाची स्वारी विजयी होऊन आल्यावर, बकदाल्भ्य, व्यास आदिकरून अठ्यांयशीं हजार ऋषि हस्तिनापुरांत यज्ञासाठीं जमले. मग त्यानीं धर्माला स्वत: यज्ञभूमि शुद्ध करण्यास व सर्वांचा समावेश होईल असा विस्तृत मंडप बांधावयास सांगितलें. धर्मानें त्याप्रमाणें सुवर्णाची कुदळी घेऊन जमीन तयार केल्यावर ऋषींनीं ती अभिमंत्रून शुद्ध केली नंतर धर्मानें चंदनमिश्रित सडा-संमार्जन करावयास कुंतीला व देवकीला सांगितलें. त्यांनीं तसें केल्यावर बकदाल्भ्यानें यज्ञकुंड तयार केले. त्या यज्ञ-कुंडाचा उदरभाग व चारी कोन, चौसष्ट चौसष्ट विटांनीं बांधिले होते, व इतरही त्याचे सर्व भाग वेदविहित अशा विटांच्या संख्येनेंच तयार केले. कुंड तयार झाल्यावर त्यावर मंडप तयार करून त्यावर सुंदर पताका लाविल्या व त्याला आठ द्वारे ठेविली त्यांत एकंदर सात मोठे खण करून, तो पंच-वीस लक्ष स्तंभांवर उभारला होता. त्याचा विस्तार सव्वा योजन असून त्याच्या झालरीला सर्व रत्नेंच लाविलीं होतीं. याप्रमाणें मंडप तयार झाल्या वर त्यांत अकरा लक्ष कलश सोमवल्ली, ती कुटण्यासाठीं अनेक उखळया मुसळें चरुपात्रे इत्यादि यज्ञासामग्री आणून ठेविली. मुख्य आचार्यपद व्यासा लाच देऊन ब्रम्ह्याचें स्थान बकदाल्भ्याला दिले. वामदेवाला ऋत्विज् नेमिलें आणि गौतम, वसिष्ट, पराशर, अत्रि, भारद्वाज, जमदग्नि, कहोळ, आसुरि, सुमन, कौंडिन्य, जातुकर्णी, गालव, सौभरि, लोमश, इत्यादि तपोनिधि ऋषींनांही यथोचित अधिकार दिले. मग धर्मानें आठ द्वारपाल नेमून त्यांना आठ दिशांना ठेविलें. नंतर व्यासाच्या सांगण्यावरून चौसष्ट जोडपीं भागी-रथीचें जल आणण्यासाठीं कुंभ घेऊन निघालीं. त्यांत वसिष्ट अरुंधती, अत्रि अनुसूया, रुक्मिणी श्रीकृष्ण, सुभद्रा अर्जुन, अनिरुद्ध उषा, प्रद्युम्न रति, भीम

हिडिंबा, वृषकेतु नम्रंदती धर्मशीला, इत्यादि होतीं. मयूरध्वज लीलावती यौवनाश्व प्रभावती नीलध्वज मदनावती, अनुशल्य त्यांनी एकमेकांच्या पदराला गांठीं दिल्या होत्या. ही मौज पाहून नारदास कांहीं कळ लावावी असें वाटलें, व तो तसाच सत्यभामेकडे हें वर्तमान सांगण्यासाठीं गेला तो ही हकीकत तिला सांगतो आहे, इतक्यांत कृष्णानेंही तेथे प्रकट होऊन सत्यभामेच्या व आपल्या पदराला गांठ .मारिलीं, आणि तो तिच्या बरोबर भागीरथीचें पाणी आणावयास निघाला. मग नारदानें हा प्रकार जांबुवंतीला कळविला. पण तेथेहीं प्रकट होऊन कृष्णानें पूर्ववत नारदाची फजिती केली. याप्रमाणें सोळाही हजार कृष्णस्त्रियांशी लावालावी करण्याची नारदाची मसलत फुकट गेली. तेव्हां त्याला लाज वाटून तो निमूडपणें यज्ञमंडपात येऊन बसला. असो, ती चौसष्ट जोडपी भागीरथीवर गेल्यावर व्यासानें गंगोदकाचें अभिमंत्रण करून जलदेतांचीं पूजा केली. आणि मग सुवर्णकलश भरून सर्व स्त्रिया एकामेकाशीं थट्टा करीत मंडपाकडे परत आल्या. नंतर त्या पाण्यानें दोन्ही वारुंना स्नान घालून त्यांनी मंत्रोच्चारानें पूजा केली. धर्म व द्रौपदीं यांनी त्यांना यज्ञ स्तंभाशीं बांधिलें मग सर्व ऋषीब्राह्मणांना हत्ती घोडे, दासदासी गाई, बैल इत्यादि दानें दिली. ऋषीपूजा झाल्यावर श्यामकर्णांना समोर आणून, ऋषीनी, त्याना कोणती गति पाहिजे. असें विचारले. तेव्हा श्यामकर्णानें मान हालविली. ते पाहून सर्वांना आश्चर्य वाटले. तेव्हा नकुल म्हणाला. ‘अहो! घोड्यानें मान हालविण्याचे कारण मी सांगतो. ज्या ठिकाणी यज्ञभोक्ता श्रीकृष्ण प्रत्यक्ष आहे' त्याठिकाणी इंद्रचंद्रादि लोकाची किंमत काय? अच्युताच्या मानानें इतर लोक पतरूप होत, असें अश्वाचे मत आहे हे ऐकून व अश्वाला केवळ अढळपदच पाहिजे आहे असें पाहून सर्वांना बरें वाटले. मग यज्ञवेदी मंत्रानी सिद्ध केल्यावर बकदाल्भ्यानें खड्ग घेऊन क्षणभर उभे राहण्यास सांगितले, व अश्वाचा कान पिळला. त्याबरोबर त्याच्या कानातून रक्त न येता दुधाची धार सुटली. हा मंत्रप्रभाव पाहून सर्व विस्मीत झाले. मग बकदाल्भ्याने भीमाला खड्गानें अश्वाचा शिरच्छेद करण्यास सांगितलें. मग त्याप्रमाणें भीमानें एका झटक्यासरशी अश्वाचे शिर उडविलें. त्याबरोबर ते अग्निरूप होऊन आकाशांत गेलें, आणि त्याच्या धडातून ज्योतिरूप आत्मा निघून तो श्रीकृष्णाच्या मुखात शिरला व बाकीचे शरीर

कर्पूररुप होऊन तेथे राहिले. हा चमत्कार पाहून सर्वजण आश्चर्यचकित झाले नंतर व्यासप्रमुख ऋषीनी त्या कर्पूर राशीचे मंत्रपूर्वक अग्नित हवन केले. याप्रमाणें धर्माच्या अश्वाचे हवन झाल्यावर मयूरध्वजाच्या श्यामकर्णाचेही हवन झाले. नंतर सर्व देवतांना बलिदानानें संतुष्ट करून वेदमंत्रांच्या घोषांत धर्मानें पूर्णाहूती दिली.

याप्रमाणें यज्ञ पुरा झाल्यावर धर्मराज सर्व मंडळीसह रथांत बसून गंगानदीवर अवभृथस्न्नानानास गेला. तेथे भागीरथीच्या तिरी मोठे मंडप घालून सर्वांना उतरावयास जागा केली होतीं. सर्वांनीं भागीरथाच्या पवित्र जलात स्नानें केली. नंतर उत्तम वस्त्रें परिधान करून धर्मानें ऋषी ब्राह्मणानां दानें देऊन तृप्त केलें नंतर सोमवल्लीचा भाग घेऊन पुरोडशाचा अंशही कांहीं प्रत्येकानें ग्रहण केला. यज्ञाचा हा अपूर्व समारंभ पाहून देवांनीं आकाशांतून धर्मावर पुष्पवृष्टी केली, याप्रमाणें यज्ञातील मुख्य कार्यभाग आटोपल्यावर, धर्मानें सर्व ऋषीना त्याच्या इच्छित वस्तु दिल्या राजाना त्याच्या योग्यतेप्रमाणें अहेर केलें. आणि त्याच्या स्त्रियांना सौभाग्यद्रव्यें आणि शेवटी त्यानें कृष्णाची शोडशोपचारे पुजा करून अश्वमेधाचें सर्व पुण्य त्याच्या हातावर अर्पण केले.

एवढे झाल्यावर उत्तम भोजनाचीं तयारी करून नानाविध षड्रसयुक्त पक्वान्नाची पानें वाढिली, आणि सर्व ऋषी-ब्राह्मणांची प्रार्थना करून त्यांना भीमानें इच्छा तृप्त भोजन दिलें. सर्व ऋषी त्या सुग्रास अन्नाची वाखाणणी करुन ढेकरा देत होतें. भोजनविधी झाल्यावर त्यांना भीमाने कर्पूर, वेलदोडा लवंग इत्यादिकांनी युक्त असें तांबूल देऊन, वस्त्रादिकांनी त्यांची बोळवण केली. मग सर्व नगरात दवंडी पिटवून लहानथोर, पवित्र अपवित्र, हीन उत्तम इत्यादी सर्व प्राणीमात्राला शोधून आणून त्यानाही त्या स्वादिष्ट अन्नाचे भोजन दिलें.

## दोन ब्राह्मणांची कथा

याप्रमाणें अन्नसंतर्पण झाल्यावर धर्मानें राजसभा भरविली. नृत्य गीत सुरू झाले. नटनर्तकाचे वस्त्रालंकारी गौरव केले. असा आनंद चालत असतां दोन ब्राह्मण भांडत तक्रार घेऊन धर्माच्या सभेत आले, आणि प्रत्येकजण आपआपली तक्रार सांगू लागला, एक म्हणाला,-'यानें पलीकडे आम्हाला

जमीन दिली. ती नांगरीत असता त्यांस मला हें द्रव्य सापडले. हा त्याचा मालक आहे. पण त्याला मी देत असतां, तो घेत नाही.' दुसऱ्यानें उत्तर दिलें, 'मी याला क्षेत्र दिलें. त्याबरोबर त्यातील सर्व वस्तु दिल्या. तेव्हां त्यांत सापडलेले द्रव्य मी कसे घेऊ? 'अशा प्रकारें दोघेही आपली बाजू सांगू लागले तो प्रकार पाहून सर्व थक्क झालें. व हा काय प्रकार आहे असा विचार करूं लागले. तेव्हा कृष्णानें त्या दोघाना एकवीस वर्षें तसेंच रहावयास सांगून पाठवून दिलें. तेव्हां असे करण्याचे कारण धर्मानें कृष्णाला विचारिलें. तेव्हां कृष्ण म्हणाला,--' धर्मा, आतां एकवीस वर्षांनीं कलियुगाला आरंभ होणार आहे. कलियुगाला आरंभ झाला कीं, हे ब्राह्मण आपण होऊनच स्वस्थ बसतील. कलियुगांत लोक द्रव्यासाठीं एकमेकांचें प्राण घेऊन घेऊं लागतील. बापलेक एकमेकांशीं भांडूं लागतील; सशक्त दुर्बलांन नागवतील, अशीं नानाप्रकारची पापें होऊं लागतील.'-हें कलियुगाचें वर्णन ऐकून सर्व भयभीत झाले, व या घोर संकटापासून रक्षण करण्यासाठीं ते ईश्वराची प्रार्थना करूं लागले.

## मुंगुसाची गोष्ट

याप्रमाणें अश्वमेध निर्विघ्नपणें सिद्धीस गेल्याबद्दल सर्व राजे धर्माचा धन्यवाद गांऊं लागले. इतक्यांत एक मुंगुस तेथें आलें, व भोजनाच्या अन्न-रसाचे पाट वहात चालले होते, त्यांत लोळून सभेंत शिरलें. तेथें आल्यावर तें मनुष्यवाणीनें सर्वांस म्हणालें.–' अहो, धर्माची तुम्ही व्यर्थ स्तुति करितां. त्यानें हा यज्ञ केवल दंभानें केला आहे.'–त्या मुंगुसाचें शरीर अर्धे सोन्याचें होतें, तें पाहून व त्याचे हें निंदाप्रचुर शब्द ऐकून सर्वांना मोठें आश्चर्य वाटलें.

## शांतिरूप ब्राह्मणाची कथा

मग मुंगुस म्हणालें,—' गृहस्थहो, शेतांतून टिपून आणलेल्या सातूच्या पिठाचीही सर या धर्माच्या अश्वमेधांतील अन्नसंतर्पणाला यावयाची नाहीं. हें कसें म्हणून सभेंतील ऋषींनीं विचारलें असतां मुंगुस म्हणालें,--' कुरु-क्षेत्रांत शांतिरूप नांवाचा एक ब्राह्मण मोठा धर्मशील होता. त्याची सत्यवती नांवाची स्त्री, सुशील नामक पुत्र आणि सुशीला नांवाची सून हींहि त्याच्या प्रमाणेंच सत्वशील होतीं. शांतिरूप प्रत्यहीं साळीच्या शेतांत जाऊन जमिनीवर

पडलेले धान्याचे दाणें वेंचून आणी, व त्याजवर तीं चौघें निर्वाह करीत. असें चाललें असतां एकदा दुष्काळ पडून जिकडे तिकडे अन्नाची टंचाई झाली. शांतिरूप ब्राह्मणाचा दाणें वेंचून आणण्याचा क्रम चालला होता. परंतु दुष्काळ असल्यामुळें त्याला रोज पुरेसें दाणें न मिळतां, पांच सात दिवसांत मिळून एखाद्या दिवसाची सरासरी गुजराण होई. ,यांत जें कांहीं असें त्याचे चार विभाग करून व देवपितरांना भाग देऊन, ती माणसें अन्न सेवन करीत असत. अशा रीतीनें कांहीं दिवस चाललें असतां, त्यानीं एकदां चार शेर धान्य जमविले, व त्याचें पीठ दळून त्याचे चार रोडगे भाजलें. तेव्हां त्याचें सत्त्व पाहण्यासाठीं श्रीविष्णु ब्राह्मण रूपानें त्यांजवळ गेला. शांतिरूपानें त्याचा सत्कार करून आपल्या वांटणीचा रोडगा त्याला दिला. अतिथीनें तो खाऊन टाकिला, परंतु त्याची भूक शांत झाली नाहीं. तेव्हां सत्यवतीनें आपला भाग त्याला दिला. तो खाऊनही त्याची तृप्ति झाली नाहीं. मग त्या पुत्रानें व सुनेनेंही आपापले भाग अतिथीला अर्पण केले ते खाऊन वर पाण्याचा घोट घेतल्यावर मात्र त्याचें समाधान झालें. तेव्हां त्या चौघांनींही अतिथी तृप्त झाला असें पाहून आनंद व्यक्त करून त्याला नमस्कार केला. हें त्याचें सत्त्व पाहून विष्णू प्रसन्न झाला व त्यांना आपले खरें स्वरूप दाखवून विमानांत बसवून वैकुंठास घेऊन गेला. ते गेल्यावर त्यांनीं आंचवतांना चूळ टाकिली होती तेथें जाऊन मी लोळलों. तेथें पाणी थोडेसेंच उरलें परंतु तेवढ्यानेंही माझ्या शरीराला जितका स्पर्श झाला, तितकाच शरीराचा भाग सुवर्णमय झाला व बाकीचा तसाच राहिला. तोही सुवर्णमय करावा अशा बुद्धीनें मी या धर्माच्या यज्ञांतील अन्नरसांत येऊन लोळलों; परंतु माझें शरीर तसेंच राहिलें ! अर्थात् हा यज्ञ फुकट आहे.

मुंगसाचा हा वृत्तांत ऐकून सर्व प्रकार कृष्णानें मनांत जाणला व तेथें जमिनीवर त्यानें आपलें पाय धुतले. त्या पाण्यांत मुंगूस जाऊन पुनः लोळलें त्याबरोबर त्याचें उरलेलें शरीरही सुवर्णाचें झालें. इतक्यांत मुंगसाचें रूप गुप्त होऊन त्याचा तेजस्वी पुरुष झाला व इंद्रादि देवांनीं त्याला त्या रूपानेंच विमानांत बसवून स्वर्ग लोकीं गेलें. हा प्रकार पाहून सर्व सभा तटस्थ झाली.

## मुंगुसाचा पूर्ववृत्तांत

हा मुगूस कोण असावा व त्याला मनुष्यरूप कसें मिळालें, असा जनमेजयानें प्रश्न केला. तेव्हां वैशंपायन म्हणाले,--' राजा, पूर्वी जमदग्नीच्या कोपाची कथा तुला सांगितलीच आहे. हा क्रोध शेवटीं त्या ऋषीनें अगदीं सोडून दिला. तेव्हां जमदग्नीचा निर्धार सत्य आहे कीं नाहीं. हें पहाण्याकरितां क्रोधानें मुंगसाचें रूप घेतलें व जमदग्नीनें पितृश्राद्धासाठीं हविष्यान्न मिळवून दुधाची भांडी भरून ठेविली होतीं, ती उलथून टाकिलीं. परंतु हें पाहून जमदग्नी मुळीं सुद्धां रागावला नाहीं. त्यावेळीं क्रोध ओशाळला व आपण केलेल्या अन्यायाबद्दल आपल्याला शाप द्यावयास ऋषीला सांगूं लागला. जमदग्नी म्हणाला,--' अरे, तूं पितरांचा अपराधी आहे, माझा नव्हें. तरी तूं त्यांच्याकडे जा, म्हणजे ते तुला काय तें सांगतील.'-त्याप्रमाणें तो पितृलोकांस गेला. तेथें पितरानीं त्याचें वर्तमान ऐकून घेतल्यावर त्याला शाप दिला कीं,--' ज्या अर्थी मुंगूस रूपानें तूं आमचा अपराध केलास त्या अर्थी आतां तुं मुंगूसच होऊन रहा.' मग क्रोधानें उःशाप मागितला. तेव्हां पितरांनी सांगितलें की, 'धर्माचा अश्वमेध होईल,त्यावेळी सर्व राजे व श्रीकृष्ण यांचें तुला दर्शन होऊन तुझें मुंगूसपण फिटून, तूं दिव्यरूपानें स्वर्गास जाशील.' राजा, तोच क्रोध, या मुंगूसरूपांतून श्रीकृष्णाच्या कृपेनें मुक्त झाला.

यानंतर धर्मानें सर्व राजांची समारंभानें पाठवणी केली. नंतर श्रीकृष्णही कुंती व द्रौपदी यांना विचारून आपल्या परिवारासह द्वारकेस गेले. सर्व जण परत जातांना वाटेंत धर्माच्या कीर्तीचा घोष करीत होते. असें हें धर्माच्या अश्वमेधाचें वर्णन आहे. या कथा श्रवणानें दीर्घ आयुष्य व आरोग्य यांची प्राप्ति होते.

---

# अध्याय २१ वा



## धृतराष्ट्राचा वनप्रवेश

वैशंपायन जनमेजयाला म्हणाला, 'राजा, याप्रमाणे पांडवाना निष्कंटक राज्य मिळाल्यावर त्यांनीं विदूर, संजय इत्यादि आपल्या बांधवांसह धृतराष्ट्राच्या आज्ञेत राहून त्याचें पधरा वर्षेपर्यंत पालन केले. त्यांच्या अंतःपुरांतील सर्व स्त्रियाही गांधारीची सेवा करून तिच्या आज्ञेत वागत. कृपाचार्य आणि व्यास धृतराष्ट्राजवळ बसून त्याला नाना प्रकारच्या पुराणांतील कथा सांगत. धृतराष्ट्राला पुत्रवधामुळें अत्यंत दुःख झालेलें असल्यामुळें त्याला सर्वांनी गोड बोलून आनंदित ठेवावे, अशी धर्माची आज्ञा होती. भीमाला मात्र कौरवांच्या मागील अपराधांचें स्मरण होऊन त्वेष येत असे. तथापि धर्माला राग येईल, म्हणून तो कांही उघड बोलत नसे. याप्रमाणें सर्व प्रकारें धृतराष्ट्राची बरदास्त उत्तम ठेविली जात असल्यामळें तो पुत्रदुःख विसरून गांधारीसह समाधानानें राहूं लागला. असा क्रम चालला असतां एकदां भीमाचा राग अनावर झाला, व दंड थोपटून सर्व बांधवांसमोर तो म्हणाला, 'अहो, मी आपल्या ह्या बाहूंच्या जोरावर या आंधळ्याच्या पुत्रांना ठार केले. असा माझ्या बाहूंचा पराक्रम आहे.' धृतराष्ट्राच्या कानीं हे शब्द पडले तेव्हां त्याला फार वाईट वाटून त्यानें सर्व संबंधिजनांना जवळ बोलावून म्हटलें, 'अहो, तुमचा एवढा नाश माझ्यामुळें झाला. कपट करून मी दुर्योधनाला राज्य दिल्यामुळे मजवर हा प्रसंग ओढवला आहे, भीष्म, व्यास आणि कृष्ण यांचा बहुमोल उपदेश मी ऐकला नाहीं त्याचें हें फल आहे. तरी आतां मी गांधारीसह वनवासास जावयाचे ठरविलें आहें. त्यास तुम्ही अनुमोदन द्यावें.' धर्मानें उत्तर केलें, 'ताता, तुम्ही माझ्यासाठीं अनिवार कष्ट सोशिलेत; परंतु ते सफळ झाले नाहींत. धिक्कार असो माझ्या या जिण्याला ! आतां मीही सर्वसंगपरित्याग करून तुमच्या बरोबर वनांत येतो.' हें ऐकून धृतराष्ट्राचा शोक दुणावून तो मूर्च्छित पडला. इतक्यांस व्यास मुनि तेथें आले, आणि धृतराष्ट्राला सावध करून ते धर्माला म्हणाले, 'बा धर्मा, आतां धृतराष्ट्राला तपश्चर्येचाच काल आलेला आहे.तेव्हां त्याला

स्त्रीसह वनांत जाऊं देऊन बंधुवर्गासह तूं नीट राज्य करावे हेंच योग्य आहे.' याप्रमाणें व्यासांनीं आणखीही चार उपदेशाच्या गोष्टी धर्माला सांगितल्या. तेव्हां तो म्हणाला; 'मुने, तुम्ही आमचे मान्य गुरु आहां. तुमची आज्ञा आम्हांला प्रमाण आहे.' असें म्हणून तो धृतराष्ट्राजवळ आला, आणि त्याला वनांत जावयास रुकार देऊन म्हणाला, 'ताता, तुम्ही स्वस्थमनानें तप करावें आम्ही आपल्या सेवेस तत्पर आहोंत.' तें ऐकून धृतराष्ट्रानें त्याला नीतीनें राज्य करावयास सांगितलें. नंतर गांधारीसह सभेंत येऊन तो सर्व नागरिकांना उद्देशून म्हणाला, 'मी आतां गांधारीसह वनांत तप करण्यासाठीं जात आहें. तुम्ही सर्वांनीं धर्माच्या आज्ञेंत रहावें. म्हणजे तो तुमचें योग्य पालन करील. तो केवळ यमधर्माचा अवतार आहे. वनांत जावयाची व्यासानींही मला आज्ञा दिली आहे, तरी तुम्ही मला अनुमोदन द्या.' हें ऐकून सर्व लोक शोकाकुल झाले. कोणाच्यानें कांहीं उत्तरच देववेना. त्यावेळीं धृतराष्ट्रालाही मोठा गहिंवर आला. मग शाकल ऋषीनें तेथे येऊन चार गोष्टी सांगुन त्यांची समजूत केली. नंतर सर्वांची अनुमति मिळाल्यावर धृतराष्ट्र त्यांना निरोप देऊन, आपल्या मंदिरांत आला. मध्यरात्र झाल्यावर त्यानें विदुराला बोलावून भिष्मादिकांची श्राद्धें करण्यासाठीं त्याला धर्माजवळून द्रव्य आणावयास सांगितलें. निरोपाप्रमाणें धर्म द्रव्य देऊं लागला. परंतु भीमानें धृतराष्ट्राची मागचीं उणीं काढून धर्माची निर्भत्सना केली. तथापि धर्मानें द्रव्य देऊन विदुराला परत पाठविलें. तो द्रव्य घेऊन आल्यावर धृतराष्ट्रानें सर्व मृतबांधवांची श्राद्धें केलीं आणि ब्राह्मणांना गाई, शय्या अलंकार, दक्षिणा वगैरे देऊन संतुष्ट केले. याप्रमाणें दहा दिवस दानें केल्यावर त्यानें पांडवांना बोलावून सर्व नागरिकांसमोर ब्राह्मणांनीं सांगितल्याप्रमाणें स्मार्ताग्नीची पूजा केली; आणि मग तो गांधारीसह वनांत जावयास निघाला, त्या वेळीं सर्व हस्तिनापुर दुःखी झालें. धर्म कांपूं लागला भीम, अर्जुन, नकुल, सहदेव, विदुर, संजय, धौम्य, गौतम इत्यादिकांच्याही नेत्रांतून अश्रुपूर वाहूं लागलें. सर्वजण मार्ग चालूं लागले तेव्हां कुंतीही गांधारीचा हात धरून जाऊं लागली. तेव्हां द्रौपदी, उत्तरा, इत्यादि स्त्रियांनीं एकच हाहाःकार केला. कांहीं वेळानें धृतराष्ट्रानें सर्व नागरिकांना प्रेमानें निरोप देऊन मागें परतविलें. त्या दिवशीं कार्तिक शुद्ध पौर्णिमा होती. कुंतीनें धर्माला मागें परतावयास सांगितलें, व म्हणाली,—' धर्मा,

नकुल सहदेव मला अत्यंत प्रिय आहेत, त्यांचा नीट सांभाळ कर. कर्णाचीही प्रतिवर्षी आठवण करीत जा. तो सूर्यपुत्र असतां मी तुला त्याच्याविषयीं पूर्वीं कांहीं सांगितले नाहीं, हे मला आठवले म्हणजे माझें हृदय शतशः विदीर्ण होतें. तो तुमचा वडील बंधु आहे, त्याच्या नांवानें दानें दे.' हे कुंतीचे शब्द ऐकून धर्माला गहिंवर आला, व फार दुःख झाले. मग सर्व पांडवांनीं न जाण्याविषयीं मातेची पुष्कळ प्रार्थना केली; परंतु 'मला आतां गेलेंच पाहिजें' असें म्हणून ती पुढें चालूं लागली. जातां जातां धर्माला तिनें सांगितलें कीं, 'धर्मा, मला सुखोपभोगाची इच्छा नाहीं. मी आतां तप करून उत्तम लोकाची प्राप्ति करून घेईन. तुम्ही आतां परत जा, आणि राज्याचें उत्तम प्रकारें रक्षण करा.' हें ऐकून सर्वजण तिला नमस्कार करून मागें फिरले. मग धृतराष्ट्र भागीरथीतीरावर येऊन अग्निहोत्रादिक कर्में करूं लागला. दुसऱ्या दिवशीं तेथून निघून तो तीर्थविधि करण्यासाठीं कुरुक्षेत्रांत आला. तेथें त्याला भेटण्यासाठीं नारद, देवल आणि पर्वत, असे ऋषि आले. त्यांची कुंतीने पूजा केल्यावर त्यांनीं तेथें धृतराष्ट्राला नानाप्रकारच्या कथा सांगितल्या, नारद म्हणाला, 'राजा, पूर्वीं शतचित्य, भगदत्ताचा पिता शतलोमा, इत्यादि राजांनीं याच वनांत तप करून उत्तम लोकाची प्राप्ति करून घेतली. त्याप्रमाणें तुम्हांलाही या वनांत उत्तम सिद्धि मिळेल.' नंतर शतचं ऋषीनें कांहीं हकीकत सांगावयाची विनंति केल्यावरून नारद म्हणाला, 'मी स्वर्गामध्यें गेलों होतों. तेथें माद्रीसह पंडुराजा माझ्या दृष्टीस पडला. दुसरें तेथें मी ऐकिलें कीं, धृतराष्ट्राला अद्यापि तीन वर्षें आयुष्य असून तें संपल्यावर तोही कामचारी विमानांत बसून गांधारीसह कुबेर नगरीस जाईल.' हें वर्तमान ऐकून सर्व ऋषि संतोष मानून आपआपल्या स्थानीं निघून गेले. इकडे पांडव मात्र आपल्या वडिलांची चिंता करीत उद्विग्न चित्तानें राज्यकारभार पाहूं लागले.



# अध्याय २२ वा



## आश्रमवासिक पर्व.

## विदूराचा अंत.

गांधारी आणि कुंती यांसह धृतराष्ट्र वनवासास गेला असतां, एके दिवशीं सहदेव धर्मराजाला म्हणाला, 'बंधो, वडिलांची चौकशी करण्यासाठीं एकदां वनांत जावें, असें मला वाटतें.' हें त्याचें भाषण ऐकून धर्मराजा सैन्य सिद्ध करून सर्वांसह वडिलांना भेटावयास निघाला वनांत जाऊन धृतराष्ट्राच्या आश्रमाजवळ पोंचतांच, पांडवांनीं, कुंती, गांधारी व धृतराष्ट्र, यांना नमस्कार केला, आणि मग एकमेकांनीं एकमेकांना सुखदुःखाच्या गोष्टी विचारल्या. नंतर तेथें जमलेल्या अनेक ऋषींनीं विचारल्यावरून संजयानें त्यांना पांच पांडव व त्यांच्या स्त्रिया यांची पृथक् पृथक् ओळख करून दिली. संजयानें केलेलें वर्णन ऐकून ऋषी संतुष्ट झाले व त्यांनीं पांडवांची स्तुति केली. मग धृतराष्ट्रानें धर्माला विचारलें की, 'तुझी सर्व प्रजा व सेवक तुजवर अणुरक्त आहेत ना ? आणि तूंही त्याच्याशीं प्रेमानें वागतोसना ?' धर्म म्हणाला, 'ताता, तुमच्या कृपेंकरून मला सर्व सुख आहे. परंतु सध्यां विदूर कोठें आहे, व कोणत्या स्थितींत आहे, तें मला सांगा.' हें ऐकून धृतराष्ट्रानें त्याला सांगितलें;-'तो निर्जन अशा अरण्यांत तप करीत बसला आहे.' तें ऐकून धर्मानें त्याच्याकडे जावयाचें ठरविलें. त्याप्रमाणें तो विदुराजवळ गेला असतां, विदूर त्याला पाहातांच पळत सुटला. 'मी धर्म तुमच्या दर्शनासाठीं आलो आहें.' असें म्हणत धर्म त्याच्या मागून धांवत जाऊ लागला. परंतु विदूर कांहीं थांबला नाहीं. शेवटीं पळतां पळतां थकून विदुरानें जमिनीवर पडून प्राणत्याग केला. त्यावेळीं त्याच्या शरीरांतून एक तेजोगोल निघाला, तो धर्माच्या शरीरांत प्रविष्ट झाला. मग धर्म त्याच्या शरीराचें दहन करण्याची सिद्धता करूं लागला; पण इतक्यांत आकाशवाणी झाली कीं, 'धर्मा, विदुरानें योगमार्गानें प्राणत्याग केला आहे; तरी त्याच्या शरीराचें तूं दहन करूं नकोस' ही आकाशवाणी ऐकून विदुराचें प्रेत तेथें तसेंच ठेवून धर्म धृतराष्ट्राकडे आला, व त्याला त्यानें सर्व वृत्तांत सांगितला,

नंतर फलाहार करून तो रात्रभर तेथें त्याच्याबरोबर नाना प्रकारच्या गोष्टी करीत राहिला. दुसऱ्या दिवशीं व्यासऋषि कित्येक ऋषीसह तेथें आला, व धृतराष्ट्राला म्हणाला–राजा, आतां शोक टाकून कुंती व गांधारी यासह तूं तप कर. विदुरानें 'नुकतेंच योगमार्गाने देह विसर्जन केलेलें तुला माहीत आहेच' (अशी कथा भारतात आहे परंतु भागवतांत जसे सांगितलें आहे की. विदुर तीर्थाटनास गेला, आणि तेथें त्यांचा व मैत्रेयाचा संवाद झाला. तो भागवताच्या तिसऱ्या स्कंदात सांगितला आहे. विदूर हाही यमधर्माचा अवतार असून मांडव्य-ऋषीच्या शापामुळें तो विदूर झाला होता. ) [ ही कथा चवथ्या स्तबकांत आलीच आहे. ) धर्म व विदूर हे भिन्न नव्हते. म्हणून विदुराचे तेज धर्माच्या शरीरांत प्रविष्ट झाले.]

## व्यासांचा ज्ञानोपदेश

ही कथा एकून जनमेजय वैशंपायनास म्हणाला,–पांडव धृतराष्ट्रासह त्या वनांत असतां, व्यासानें त्यांचे अज्ञान कसे दूर केलें. व धृतराष्ट्र पुढे किती कालपर्यंत तेथें राहिला, हे कृपा करून मला सांगा' तेव्हां वैशंपयान म्हणालें,– 'राजा पांडवांनी धृतराष्ट्राला त्या वनात नानाविध अन्नें शय्या इत्यादि सर्व पुरविलीं व आपण स्वतः तेथें एक महिनाभर राहिलें. परंतु धृतराष्ट्र, गांधारी, द्रौपदी व सुभद्रा, यांचा पुत्राविषयीचा शोक कांहीं नाहीसा होईना. तेव्हां व्यास त्यांना म्हणाला,– अहो, मी आजपर्यंत केलेलें निरूपण फुकट गेले म्हणावयाचें हें ऐकून धृतराष्ट्राने त्याला सांगितलें,– 'ऋषे, तुझी धन्यता काय सांगू? तुझ्या दर्शनाने माझे अज्ञान दूर झालें. परंतु युद्धात मरण पावलेल्या वीरांना कोणती गति मिळाली, ते आम्हाला समजत नाहीं. व यांच कारणास्तव गांधारी, द्रौपदी, सुभद्रा व इतर राजस्त्रिया आज सोळा वर्षे झाली. तरी दुःख सोडीत नाहींत कुंतीही म्हणाली,–व्यासदेवा, मी कुमारी असता माझ्या पित्याच्या घरी एकदा दुर्वास ऋषि आले होते. माझी सेवा पाहून त्यांनीं संतुष्ट होऊन मला मंत्रदान देऊन सांगितलें कीं, ज्या देवतेचें तूं स्मरण करशील ती येऊन तुजशी रममाण होईल. व तुला महाशूर जसें पुत्र होतील. असा वर देऊन ऋषि निघून गेला असता, मी मंत्राची प्रतिति पहाण्यासाठीं सूर्यमंत्राचा जप केला. त्यापासून मला कर्ण झाला. तेव्हा मी

भयभीत होऊन त्याला तेथेंच टाकलें ; तो माझा कर्ण गेल्यामुळें माझाही शोक मला आवरत नाहीं' ही भाषणें एकून व्यास कुंतीला म्हणाला, –कुंती याचा दोष तुजकडे नाहीं देवचरित्र कोणासहीं कळावयाचें नाहीं. देवांना स्वकर्तव्य असे काहीच नाहीं. विधिनिषेध हे मनुष्यांना मात्र लागू आहेत. भवितव्य कधीं चुकावयाचें नाहीं हे कौरव पांडव मिळून, देव, असूर, पिशाच यक्ष, गंधर्व, गुह्यक इत्यादिकांचें अवतार होत. गंधर्वराजा हा धृतराष्ट्र होय मरूद्गण म्हणजे पंडुराजा, यमधर्म हा युधिष्ठिर व कलि हा दुर्योधन होय. द्वापाराने शकुनीचा आवतार घेतला व राक्षसांनी दुःशासनादि अंधपुत्रांच्या रूपाने अवतार घेतलें अर्जुन व श्रीकृष्ण हे प्रत्यक्ष नर-नारायण होत. भूमीचा भार हरण करून हे निजधामास जातील. व जे राहतील तेही क्रमाक्रमाने जावयाचेच आहेत. असो, आतां तुमचें दुःख नाहींसे होईल असें मी करतो.

## कौरव-स्त्रियांचा गंगाप्रवेश

असें भाषण करून व्यास त्या सर्व मंडळीला घेऊन भागीरथी तीरावर आला. संध्याकाळपर्यंत धृतराष्ट्रादि सर्वजण तेथें शोक करीत राहिलें. रात्रो व्यासाने गंगेंत स्नान करून सर्व मृत वीरांना आपल्या तपोबलानें तेथें बोलवून आणिले त्याप्रमाणें ते सर्व वीर आपआपल्या आयुधांसह वाहनांत बसून तेथें आले. भीष्म, द्रोण, द्रुपद, घटोत्कच, दुर्योधन, शकुनि जरासंध जयद्रथ, वृषसेन इत्यादि वीरांना पाहाण्यासाठीं व्यासाने धृतराष्ट्राला त्या वेळीं दिव्यचक्षु दिले मग सर्वांनी एकमेकांस अलिंगने देऊन ती सर्व रात्र सुखदुःखाच्या गोष्टी करण्यात घालविली. प्रातःकाल झाल्यावर ते वीर व्यासाच्या आज्ञेवरून पुन्हां अदृश्य झालें, मग व्यासानें उरलेल्या मंडळींस सांगितलें कीं, 'ज्याला स्वर्गाची इच्छा असेंल, त्याने या वेळीं गंगेत प्रवेश करावा. हे एकून शोक व मोह सोडून बहुतेक स्त्रिया पाण्यांत शिरल्या. नंतर धृतराष्ट्राचा शोक दूर होऊन तो शांतचित्त झाला.

## मृत वीर पुन्हां कसे दिसलें?

वैशंपायन म्हणाला,– राजा जनमेजया, हे वीर मृत असून ते पुन्हा कसें आले म्हणशील तर ऐक. शरीरे नष्ट झाली तरी कर्म नष्ट होत नाही. पंचमहाभुते व जीव ही नित्य आहेत. शरीर पंचभूतात्मक असून कर्मभोगाचा नाश होत नसल्यामुळें व्यासाला त्या वीरांना पुन्हां प्रत्यक्ष दाखविता आलें हे

ऐकून जनमेजयाला आपल्या पित्याला भेटण्याची इच्छा झाली, व त्याने व्यासाचें स्मरण केले तेव्हा व्यासाने जनमेजयाला परीक्षित राजाचीही पत्नीसह प्रत्यक्ष भेट करून दिली. नंतर वैशंपायन ऋषि राजाला पुढील कथाभाग सांगू लागलें.

## धृतराष्ट्रादिकांचा मृत्यु

वैशंपायन म्हणालें,– राजा धृतराष्ट्राचा शोक नाहींसा झाल्यावर त्यानें धर्माला परिवारासह परत हस्तिनापुरास पाठविलें तेथें आल्यावर त्यानें वधूसह दोन वर्षेपर्यंत मोठ्या कष्टानें राज्य केले. मग एकदां नारद सभेत आला असतां, धर्मानें त्याचे स्वागत केलें व कोठे आला म्हणून विचारले. म्हणून विचारलें. तेव्हा धृतराष्ट्राकडून आलो असें नारदानें सांगितलें. तेव्हा धर्म त्याचा वृतांत विचारू लागला. नारद म्हणाला, –'धर्मा, तुम्ही त्याच्या आश्रमातून परत आल्यावर धृतराष्ट्र कुंती, गांधारी व संजय असें गंगाद्वारी गेलें. व तेथे वायुभक्षण करून दारुण तप करू लागलें. मग एकदां धृतराष्ट्र भागीरथीच्या स्नानास गेला असतां, तेथे अरण्याला वणवा लागलेला दिसला. तेंव्हां सर्व पशुपक्षी तेथून पळून गेलें, परंतू धृतराष्ट्र अग्नि जवळ आला तरी अशक्तपणामुळें पळता येत नाही. असे पाहून योगी झाला, व संजयाला सांगून आपण मरावयास तयार झाला. हें अपमृत्यूचे मरण योग्य नव्हे असें त्याला संजयानें सांगितलें. परंतू त्यानें–हाच मार्ग होय, असे म्हणून संजयांची समजूत केली. त्याप्रमाणें संजय दूर गेल्यावर कुंती, गांधारी व धृतराष्ट्र ही तिघें मात्र तेथे उरलीं. मग त्यांनी हटयोगानें प्राणत्याग केला. हे पाहुन संजय गंगाद्वारी गेला व तेथून हिमालयावर जाऊन त्यानें तेथील ऋषीना धृतराष्ट्राची हकीगत सांगितली. तेव्हां ते ऋषि धृतराष्ट्र भस्म झाला होता तेथे आले, त्यांनी त्याची क्रिया केली; आणि मी तुम्हाला ती हकीगत सांगावयास आलो. हे वर्तमान ऐकून राजवाड्यांत हाहाःकार झाला. धर्म तर आपला धिक्कार करून घेऊ लागला, तेव्हां नारदानें त्याला सांगितले कीं,-' धर्मा, धृतराष्ट्र कांही व्यर्थ मरण पावला नाही. त्यानें मरणापूर्वी अनेक इष्टी करविल्या होत्यां. व ऋषीना उत्तरकार्यंहीं केलेले आहे. '' नारदाचें भाषण ऐकून धर्माने समाधान दर्शविलें. मग ऋषींना बोलावून धृतराष्ट्राच्या नांवानें गंगेवर उदकदान करून अनेक प्रकारचीं शय्या

भूषणें इत्यादि दानें दिली. याप्रमाणें बारा दिवसपर्यंत उत्तरकार्य करुन धर्म हस्तिनापुरास परत आला; व नारदही आपल्या ठिकाणीं निघून गेला. याप्रमाणें आश्रमवासिक-पर्वाची कथा येथें पूर्ण झाली.

---

# अध्याय २३ वा

## मौसलपर्व कथा

वैशंनपायन जनमेजयास म्हणालें,–' राजा, मौसलपर्वाची कथा भागवताच्या एकादम स्कंधांत सांगितल्याप्रमाणें पूर्वी पहिल्या स्तबकांत आलीच आहे तरी भारताचा क्रम साधण्यासांठी ती मी पुन: येथे संक्षेपानें सांगतो धृतराष्ट्राच्या मरणानंतर धर्मानें छत्तीस वर्षे राज्य केलें, नंतर द्वापारयुग संपून कलीला सुरवात झाली. तेव्हां त्याला अनेक विपरीत चिन्हे दिसूं लागली. झंझावात वाहू लागलें, विजा पडू लागल्या. व सूर्य-चंद्रांना खळी पडू लागल्या. अशा प्रकारें विपरीत चिन्हे होऊ लागलीं असतां, एके दिवशी त्याला मुसळाच्या योगाने सर्व यादवांचा संहार झाल्याचा वृत्तान्त कळला व धर्म आपल्या बंधूंसह मोठ्या विचारांत पडला,

## कृष्ण--पुत्रांना शाप व यादवांचा नाश.

हा वृत्तांत ऐकून जनमेजयानें यादवांचा नाश मुसळानें कसा झाला. व तें मुसळ कोणते, ते ऐकण्यांची इच्छा दर्शविलीं तेव्हा वैशंपायन म्हणाले, – 'राजा, धर्माच्या छत्तीसावे वर्षी विश्वामित्र व नारदमुनि द्वारकेस जाऊन तेंथील एका उपवनांत बसलें. इतक्यांत कृष्णाचे मुलगे तेथें खेळण्यासाठीं म्हणून आले, त्यांनी आपल्यापैकीं सांबाला स्त्रीवेष देऊन सजविलें. आणि ऋषीजवळ जाऊन, या स्त्रीला काय मूल होईल, म्हणून थट्टेनें विचारले. परंतु त्यांचें कपट पाहून, विश्वामित्राला राग आला, आणि तो त्याना शाप देऊन म्हणाला,–'दुष्टांनो, आमची थट्टा करतां, तर या स्त्रीला तुमच्या कुलांचा संहार करणारे असें एक मुसळ होईल. व तुमचा बलराम अंतकाळी समुद्रांत जाईल ' असा शाप देऊन ऋषी तेथून गेले. इकडे कृष्णाच्या पुत्रांनी

हें वर्तमान कृष्णाला कळविले. तेव्हा तो म्हणाला,–ऋषीवाक्य कधीही खोटें व्हावयाचे नाही ' असो. याप्रमाणें कांही काल लोटल्यावर सांबाला खरोखरच मुसळ झाले, त्याचा उग्रसेन आदिकरून यादवांनी चूर करून, उरलेला तुकडा समुद्रांत टाकून दिला. व जिकडे तिकडे डांगोरा पिटवून मद्यपान बंद करविलें. मद्यपान करील त्याला सुळी द्यावयाचे. असे ठरविल्यामुळें द्वारकेस कोणी मद्य पीत नाहीसा झाला. याप्रमाणें सर्व यादव मोठ्या सावधगिरीनें रहात असतां त्याचा दुष्ट काळ येऊन ठेपला, व त्याप्रमाणें उत्पात व अनेक दुश्चिन्हें होऊं लागलीं. उंदीर स्त्री–पुरुषांचें केश तटातट खाऊं लागले, कावळे घुबडासारखे ओरडूं लागले, पांढऱ्या व तांबड्या पायाचे पक्षी यादवांच्या घरावर येऊन बसूं लागले; गाईंना गाढवें होऊं लागली, यादवही एकमेकांचा अपमान करून पापाचरणी झाले, एकट्या रामकृष्णांनीं मात्र कोणाची अवज्ञा केली नाहीं. मात्र हे सर्व प्रकार पाहून, ' भारत युद्धांत कुरूचा क्षय झाला, तसा यादवांचा क्षय होणार ' असें त्यांना खास वाटले. मग कृष्ण एके दिवशीं सर्वांना म्हणाला,–" आज त्रयोदशी आहे, तरी आपण सर्वजण उद्यां पर्वणीला समुद्र–स्नानास जाऊं."–या रात्रीं यादवांवा नाना प्रकारचीं दुःस्वप्नें पडलीं; तरी पण, दुसरें दिवशीं ते सर्व रथांत बसून व बरोबर फराळाचें सामान यथेष्ट घेऊन कृष्णानें सांगितल्याप्रमाणें प्रभासतीर्थाजवळ स्नानास गेले. कृष्ण मात्र तेथून उद्धवासह दूर निघून गेला. कृष्ण बरोबर आला आहे, म्हणून ब्राह्मणांकरितां जें अन्न यादवांनीं तयार केलें होतें, तें सर्व कृष्ण गेला असें समजतांच त्यांनीं वानरांना देऊन टाकिलें आणि आपण मद्यमांस खाऊन, गाणें बजावणें नाचणें, इत्यादि गोष्टींत दंग झाले. इतक्यांत कृष्ण माघारा आला आणि तो व बलराम मिळून कृतवर्मा, युयुधान, आदिकरून यादवांना मद्यपानापासून निवृत्त करूं लागले. परंतु अगोदरच उन्मत्त झालेले यादव कांहीं ऐकतना. युयुधान कृतवर्म्याला हंसून त्याची निंदा करूं लागला. तसाच हार्दिक्य मदनाची निर्भर्त्सना करूं लागला. हें पाहून कृष्णाला राग आला. तेव्हां सात्यकीनें कृष्णाला स्यमंतक मण्याच्या गोष्टीची आठवण दिली, व कृतवर्म्यांचा वध करितों पहा, असें म्हणून त्यानें लागलेच त्याचें शिर उडविले; आणखीही कित्येकांचा तो संहार करणार, इतक्यांत कृष्णानें

त्याला अडविले. मग बराच गोंधळ होऊन, थोड्याच वेळांत कांहीं जणांनीं सात्यकीला ठार केले. तेव्हां कृष्णानें उठून त्या सर्वांना गदाघातानें यमसदनीं पाठविले. परंतु पुराणान्तरी अशी कथा आहे कीं, सांबाच्या पोटांतून निघालेल्या मुसळाला अंकुर फुटून त्याचे भाल्यासारखें तीक्ष्ण गवत झाले, व त्या गवतानें यादवांनीं समुद्र तीरावर एकमेकांचा संहार केला.

## बलरामाचें देहविसर्जन

मग अंक, शैनेयपुत्र, इत्यादि यादव कृष्णाला म्हणाले,—' अरे, तूं सर्वांना मारिलेस, तर आतां बलरामाकडे चल.'–त्यांनीं म्हटल्याप्रमाणें त्यांच्याबरोबर कृष्ण बलरामाकडे गेला. त्यावेळीं बलराम एका झाडाखालीं बसला होता तेथें गेल्यावर कृष्णानें दारुकास सांगितले कीं,—' तूं पांडवांकडे जाऊन यादवांचा क्षय झाल्याचें वर्तमान त्यांना सांग.'–त्याप्रमाणें दारुक पांडवांकडे गेला. इकडे कृष्ण बभ्रू नांवाच्या यादवाला म्हणाला,—' हा लुब्धकांचा तांडा दिसतो आहे, हे आपल्या स्त्रियांना पळवून नेतील, तरी त्यांचें तूं रक्षण कर. मी एकटाच बलरामापाशीं जातों ' असें म्हणून कृष्ण एकाकी बलरामाकडे आला. इकडे लुब्धकांनीं बभ्रूला मारून टाकिलें, तें पाहून कृष्ण बलरामाला म्हणाला,—' दादा, मी या स्त्रियांना द्वारकेस नेऊन ज्ञातीच्या स्वाधीन करितों.'–असें म्हणून तो स्त्रियांना घेऊन द्वारकेस गेला. व तेथील लोकांना त्यानें सांगितले—' अर्जुन येथें येऊन स्त्रियांना घेऊन जाईपर्यंत तुम्ही यांचें रक्षण करा. मी वनांत जाऊन बलरामाबरोबर तप करणार आहे. आतां, मला कांही या नगराकडे पाहावत नाहीं.' कृष्णाचें हें अप्रिय शब्द ऐकून, त्याच्या स्त्रियांनीं आकांत केला. तेव्हां कृष्णानें पुनः त्यांना सांगितलें कीं,—'अर्जुन तुमचें दुःख नाहींसें करील,'–असें सांगून तो वनांत गेला. तेथें बलराम आसनावर बसून, योगधारणा करित होता. त्या वेळीं त्याच्या मुखांतून एक श्वेतनाग बाहेर पडला. त्याला सहस्र फणा असून त्याचें शरीर अगदीं जठर होतें, कृष्णानें त्याजकडे पाहतांच, तो समुद्रांत निघून गेला. तेथें कर्कोटक, वासुकी, पृथुश्रवा, तक्षक, कुमुद, कुंजर, पुंडलीक इत्यादिक अनेक नाग येऊन त्याची स्तुति करूं लागले.

## कृष्णाचें देहविसर्जन

याप्रमाणें आपल्या बंधूचें प्रयाण पाहून, कृष्ण एकटाच इंद्रियें विरो-

धून त्या वनांत स्वस्थ पडून राहिला. तो कोणी निद्रिस्थ मृगच आहे. असें समजून अज्ञान लुब्धकानें त्याचा बाणानें वध केला. परंतु जवळ येऊन पहातो तों पीतांबरपरिधान केलेली व शंखचक्र गदापद्म धारण केलेली, परमात्म्याची चतुर्भुज मूर्ति त्याच्या दृष्टीस पडली, तेव्हां आपल्या हातून घोर अपराध घडला, असें वाटून व्याध कृष्णाच्या चरणीं लागला. परंतु कृष्णानें त्याचें समाधान करून नंतर देहविसर्जन केलें. तो स्वर्गास जाऊं लागला, तेव्हां अप्सरांनीं त्याला सामोरें येऊन त्याचा जयजयकार केला मग तो सर्व देवां-सह आपल्या स्थानीं निघून गेला. ( ही कथा भागवताच्या एकादशस्कंधांत आहे, व ती प्रथम स्तबकांतीं आली आहे परंतू भारतांत ती निराळ्या प्रकारची असल्यामुळें पुनः येथें संक्षेपानें सांगितली. )

याप्रमाणें कृष्ण निजधामास गेल्यावर, दारुक हस्तिनापुरास पोंचला व त्यानें सर्व हकीगत पांडवांना सांगितली. ती ऐकून त्यांना अतिशय दुःख झालें. नंतर अर्जुन दारुकाबरोबर तसाच द्वारकेस गेला त्याला पाहून, कृष्णाच्या स्त्रियांनीं एकच कल्लोळ केला. व अर्जुनालाही आता काय करावे. अशीं चिंता उत्पन्न झाली. परंतु रुक्मिणी व सत्यभामा यांनीं त्याचें समाधान केले वसुदेव तर पुत्रवियोगामुळें दुःखसागरांत बुडूनच गेला होता. अर्जुन त्याच्या पाया पडला, तेव्हां त्याला उठवून तो म्हणाला,– 'अर्जुना, आतां आमचा सर्व नाश झाल्यामुळें, मला जगण्याची इच्छा नाहीं, सात्यकीसारख्याच्या हातूनच जेथें नाश झाला. तेथे दोष तरी कोणाला द्यावयाचा? आमच्या नाशाला ब्रह्मशापच कारण झाला. गांधारीचें वचनहीं खरे झालें. कृष्णानें येथून जातेंवेळीं मला सांगितले कीं, अर्जुन येथें येऊन गेल्यावर, समुद्र द्वार-केला बुडवून टाकणार आहे तरी अर्जुना हीं रत्नें व स्त्रिया यांचे तूं आता रक्षण कर' मी आता प्राणत्याग करणार.' त्यावर अर्जुन म्हणाला,–'मला यादवविरहीत झालेल्या या भूमीकडें पाहावत देखील नाहीं. तरी काळच फिरल्याकारणानें मी या स्त्रियांना इंद्रप्रस्थास घेऊन जातो, असें म्हणून तो दारुकाला घेऊन सर्व स्त्रियांच्या घरीं गेला. व त्यांना म्हणाला,– समुद्र आतां द्वारका नगरीला बुडवून टाकणार आहे, तरी तुम्ही सर्वांनी इंद्रप्रस्थास जावे. तेथे मदनाचा नातू जो व्रज, त्याला तुमचा राजा करणार आहो, असें म्हणून तो रात्रभर द्वारकेतच राहिला. दुसरे दिवशीं वसुदेवानें पुत्रदुःखानें प्राण त्याग केला, त्यामुळें सर्व नगरी हळूहळून गेली, मग देवकी, रोहिणी

इत्यादि वसुदेवाच्या तेरा स्त्रियांनी चंदनकाष्ठे जमवून उत्तम जागी चिता प्रज्वलित केली. व अग्न्यारोहण (सतीचा शास्त्रविधि)करून, त्या सती गेल्या त्याचें उत्तरकार्य द्वारकेच्या लोकांनी केले. मग ते कृष्ण व बलराम जेथें पडलें होते तेथ गेलें, व त्यांच्या देहाचेही त्यांनी दहन करून, उत्तरकार्य केलें, (भागवतांत कृष्ण देहासह निजधामास गेला, व रुक्मिणीनें तत्काल प्राणत्याग केला असे आहे.)

## यादव-स्त्रियांचें इंद्रप्रस्थास गमन

नंतर सातवे दिवशीं त्या सर्व शोकग्रस्त स्त्रिया, नगरवासी लोक व कृष्णाचा पणतू आणि अनिरुद्धाचा पुत्र वज्र, या सर्वांना घेऊन अर्जुन इंद्रप्रस्थास निघाला. सर्वजण बाहेर पडल्यावर समुद्रानें त्यानें सांगितलें,की 'अहो, ही सर्व रत्नें माझी आहेत, तरी ती सर्व तुम्हीं येथें ठेऊन जावे' हा अद्‌भुत चमत्कार पाहून, सर्वांनी ती रत्नें तेथेच टाकिली. वाटेनें जात असतां, एकदा अर्जुन त्या स्त्रियांचें रक्षण करीत होता. इतक्यात भिल्लांची एक टोळी तेथें आली, व ते त्या स्त्रियांना लुटूं लागले. अर्जुन भिल्लांना दरडावून त्यांच्यावर बाण टाकू लागला. पण सर्व बाण संपलें तरी भिल्ल कांही आवरत ना मग अर्जुन त्याच्यावर अस्त्रांचा प्रयोग करू लागला. पण त्यांचा पण काहीं उपयोग होईना. शेवटी भिल्लांनी अगणित द्रव्य व कित्येक स्त्रिया पळवून नेल्या हें पाहून अर्जुन खिन्न होऊन उरलेल्या स्त्रियांसह इंद्रप्रस्थास गेला. तेथें गेल्यावर त्यानें वज्राला राज्याभिषेक करवून उरलेला यादव परिवार त्याच्या स्वाधीन केला. अक्रूराच्या स्त्रियांनी त्यासेळीं सरस्वती नदीत प्रवेश केला. व दुसऱ्या कित्येक स्त्रियांनी अग्नी प्रवेश केला.

(हो कथा पद्मपुराणात निराळया प्रकारे सांगितली आहे. अर्जुनानें यादवांना नगराजवळ आणिल्यावर त्यांना तेथेच बाहेर ठेऊन आपण एकटा राममंदिरात गेला तेथें त्यानें द्वारकेचा सर्व वृत्तांत धर्मादि बंधूंना सांगितला कुंती त्यावेळीं भोजनास बसली होती, ती हें दुःखाचें वर्तमान ऐकून बाहेर आली व अर्जुनाला कृष्ण निजधामास गेल्याची वार्ता सत्य काय, म्हणून तिनें विचारले अर्जुनानें 'होय' म्हणतांच तिनें प्राण सोडला. तेव्हां पांडवांना महादुःख झालें. धृतराष्ट्र व गांधारीं त्यावेळीं वनात गेलेलीं होती.)

## व्यासांचा अर्जुनाला उपदेश

हा अनर्थ पाहून अर्जुन व्यासाच्या आश्रमात गेला. तेव्हां व्यासानें त्याला कुशल वृत्त विचारले. पण तो व्यग्रचित्त असल्यामुळें काहीच न बोलता खिन्न वदनानें उभा राहिला. तेव्हां व्यास त्याला म्हणाला,–'अरे तूं असा खिन्न कां? काय तुझ्या हातून कोणीं नपुंसक, किंवा ब्राह्मण यांची हत्या झाली की काय? अर्जुनानें उत्तर दिले,–'माझा प्रियसखा कृष्ण स्वर्गास गेला, व प्रभासतीर्थावर सर्व यादवांचा क्षय झाला! माझे बाण व अस्त्रे फुकट जाऊन माझ्याबरोबर असलेल्या स्त्रियांना भिल्लांनी लुटिलें म्हणून आतां हा प्राण ठेवावा असें मला वाटत नाही' अर्जुनाचें हे भाषण ऐकून व्यासानें त्याला सांगितले ''अरे हे सर्व ब्राह्मणशापामुळें झालें. कृष्ण व तू मिळून भूमीचा भार हरण करून गोब्राह्मणांवर उपकार केलेंत; परंतु पुढचा प्रकार सर्व काळाचा खेळ आहे. त्याबद्दल शोक करून काय उपयोग? तसेंच तुझ्यासारख्याला आत्मघात अनुचित होय.' व्यासानें याप्रमाणें अर्जुनाचें समाधान केल्यावर तो हस्तिनापुरास परत येऊन धर्मादिकांस भेटला. नंतर सर्वांनीं जमून विचार केला कीं, आतां द्वापारयुग संपून कलियुग सुरूं झाले, तरी आतां येथें रहाणें योग्य नाहीं.

जनमेजया, याप्रमाणें ऋषींनी सांगितलेली मौसल-पर्वाची संक्षिप्त कथा आहे. विस्तार भयास्तव ती संक्षेपानें तुला सांगितली. आतां पुढें प्रास्थानिक-पर्व आहे.

---

# अध्याय २४ वा



## प्रास्थानिक पर्व

वैशंपायन म्हणाले.––'' राजा, यादवांचा क्षय झाला, आणि कलियुग सुरूं झालें, असें जाणून पांडवांनीं प्रयाण करण्याचा विचार ठरविला. धर्म म्हणाला,—' अर्जुना, आपलें वैभव अनुकूल कालानें प्राप्त झालें होतें; पण आतां बिपरीत काळ आला आहे. आतां मोक्षमार्गाचें अवलंबन करणें

इष्ट आहे.'–हें म्हणणें सर्वांना मान्य होऊन त्यांनीं परिक्षितीला राज्याभिषेक केला, व सुभद्रेला––'तुझ्या नातवाला हस्तिनापुरचें व कृष्णाचा पणतू जो वज्र त्याला इंद्रप्रस्थीचें राज्य दिले आहे.'–असें सांगून तिचें त्यानीं सांत्वन केलें. याप्रमाणें निरवानिरव करून, धर्मानें ऋषींना बोलाविलें, व बलरामादिकांचीं श्राद्धें करून मार्कंडेय, भारद्वाज, याज्ञवल्क्य, इत्यादि ऋषींना वस्त्रे, भूषणें, अश्व, गज इत्यादिकांचीं दानें दिलीं, व उरलेली संपत्ति परिक्षितीच्या स्वाधीन केली. नंतर सर्व प्रजांना बोलावून त्यानें आपला मनोदय त्यांना कळविला. तो ऐकून प्रजेला अत्यंत दुःख झालें. धर्मानें भूषणें टाकून विभूति व वल्कले धारण केली. द्रौपदी, भीम, अर्जुन, नकुल व सहदेव यांनींही तसेंच केले! आणि एका श्वानासहवर्तमान मोठ्या अनंदानें त्यांनीं आपलें प्रयाण सुरू केलें. परंतु नगरांतील लोकांना मात्र फार दुःख झालें. ते म्हणाले,––'या धर्मराजाची धन्य आहे. यानें आमचें पुत्राप्रमाणें पालन केलें. आमची संकटें दूर करून आम्हाला यानें अतिशय सुख दिले. खरोखर हा धन्य होय, नाहींतर इतर राजे व्यर्थ प्रजेला पीडा करून नरकाचें साधन करीत असतात.'–मग पांडवांनीं नैष्ठिक यज्ञ करून समुद्रांत स्मार्ताग्नि टाकिल्यावर सर्व नगरवासी लोक मागें फिरले. उलूपी गंगेंत प्रविष्ट झाली. लागले. अनेक पर्वत नद्या, वनें इत्यादि टाकून तें चालले असतां त्यांना मूर्तिमंत अग्निनारायण दृष्टीस पडला. त्यानें अर्जुनाला त्याप्रमाणें सांगितलें कीं,––'मीं तुझ्या कृपेनें सर्व खांडववनाचें भक्षण केलें. आतां,गांडीव येथेंच ठेवून पुढें जा.'–हें ऐकतांच अर्जुनानें अक्षय्य-भात्यासह गांडीव वरुणासाठीं जलांत टाकिलें तेव्हां मोठा भीषण शब्द होऊन अग्नि अंतर्धान पावला. नंतर पांडव तेथून पश्चिमेकडे समुद्रतीरीं गेले. तेथें समुद्रांत बुडालेल्या द्वारकेला पाहून, त्यांनीं तिला नमस्कार केला व गहिंवरून ते उत्तर दिशेकडे कडे वळले, आणि हिमालय ओलांडून समुद्राच्या पुलिनावर आलें.

## कलिची माया

पुराणांतरीं असें सांगितलें आहे कीं,––परिक्षितीला राज्य दिल्यावर त्याची व्यवस्था करण्यासाठीं पांडवांना सात दिवस तेथे रहावें लागले. परंतु कलियुग सुरू झालेलें असल्यामुळें सर्व पदार्थ अपवित्र झालेले पाहून, त्यांनीं तेथें अन्नोदक मात्र घेतलें नाहीं. तथापि कलियुगाचा थोडा तरीं वारा त्यांना

लागलाच. राज्याची व्यवस्था झाल्यावर क्षुधार्त होऊन तें वनांत चालूं लागले असतां, कलीनें विचार केला कीं,--' या पांडवांनीं माझा अपमान केला आहे. त्यांनीं माझा अवतार जो दुर्योधन त्याला सहपरिवार ठार करून त्याचें राज्य घेतलें; व आतां मी स्पर्श करीन म्हणून उपवास व्रत स्वीकारून तसेंच चालले आहेत. तरी यांचा सूड आतां घेऊं. असें म्हणून नदीच्या तीरावर त्यानें एक मायावी मळा रचिला तो पाहून धर्माला फार भूक लागलेली असल्यामुळें तो त्यांत शिरला. तेथें चिबडें पुष्कळ होतीं, परंतु राखणवाला मात्र तेथें कोणी दिसेना. तेव्हां हीं फळें फुकट कशीं घ्यावीत, असा विचार करून धर्मानें आपली सोन्याची अंगठी तेथें ठेवून त्यांतील सहा चिबडें तोडून घेतलीं. इतक्यांत कली म्हाताऱ्या माळणीच्या रूपानें तेथें आला, व फळें तोडलेलीं पाहून तिनें मोठा आकान्त सुरू केला. तेव्हां धर्म तिला म्हणाला,--' बाई माळणी, आम्ही कोणाची वस्तु द्रव्य दिल्याशिवाय घेत नसतों. या फळांचें मोल म्हणून ती पहा तेथें अंगठी ठेविली आहे, ती घे.'-हें ऐकून कलीनें अधिकच आकान्त केला. तो म्हणाला,--' तूं धर्म खास नव्हेस. तूं माझ्या बाळांचा वध केलास !'-हें ऐकून धर्म झाळींत पाहूं लागला तों तीत मुलांचीं कापलीं मस्तकें दिसलीं.'-तें पाहून त्यानें जमिनीवर अंग टाकिलें. इतक्यांत हा आरडाओरडा ऐकून भीम व अर्जुन तेथें आले. तो-यानें माझ्या बाळांना मारिलें-असें म्हणून माळीण अधिक ओरडूं लागली. भीमानें विचार करून पाहिलें, तो ही खरी माळीण नसून कली आहे, असें त्याला समजलें. मग त्यानें चार तडाके देऊन तिला उभी केल्यावर कलीनें माळिणीचें रूप टाकून आपलें खरें रूप धरिलें. इतक्यांत तेथील मळा वगैरे सर्व नाहींसें झालें. नंतर कली धर्माच्या पाया पडूं लागला. तेव्हां धर्म म्हणाला.-' आज आपण फळें खाल्ली नाहींत त्यामुळें मोठाच अनर्थ टळला.'-असें म्हणून कलीला जावयास आज्ञा देऊन पांडव पुढे चालू लागले.'-( ही कथा भारतांत नाहीं. ) असो; मग पांडव तेथून बदरिकाश्रमास आले, व तेथून ऋषींची आज्ञा घेऊन हिमालया-वर गेले. तेथें ती सातहीजण थंडीनें मरण पावलीं, असें पुराणान्तरी सांगितलें आहे. ( परंतु त्यांना थंडीची मुळींच बाधा झाली नाहीं, असें भारतांत म्हटलें आहे.)

## भीमादि पांडवांचें निधन

हा वालुकाप्रदेश उलटून पांडव पुढें मेरुवर चढू लागले. चढतां चढतां प्रथम द्रौपदी तेथे मरून पडली. तेव्हा भीम म्हणाला,–' ही महापतिव्रता असून का पडली बरे?' धर्माने उत्तर केले, ही अर्जुनाची विशेष पक्षपाती होती; त्या पापामुळे तिचा येथे असा शेवट झाला असे बोलून तें पुढे चालू लागलें. तो सहदेवही पडला. त्याचे कारण भीमानें विचारलें तेव्हा धर्म म्हणाला,–' मी ज्ञानी आहे असा गर्व झाला होता. त्यामुळे तो पडला.' नंतर कांही वेळाने नकुलही पडला. तेव्हाही त्याचे कारण भीमाने विचारलें. तेव्हां धर्म म्हणाला,'आपण फार रूपवान आहो, असा त्याला अभिमान झाला होता. त्या पापामुळें त्याची अशी अवस्था झाली. ' त्याला टाकून कृष्णाचे चिंतन करीत उरलेली मंडळी पुढें चालूं लागली. इतक्यांत अर्जुनही मरून जमिनीवर पडला. तेव्हां भीमानें विचारल्यावरून धर्मानें त्याचें कारण सांगितलें कीं ' यानें सर्व शत्रु मारण्याची प्रतिज्ञा केलीं होती. त्यामुळें उत्पन्न झालेल्या अभिमानानें याची ही दशा केली.' असें बोलून ते पुढें जाऊ लागले. तो भीमही खाली पडला. परंतु त्याचा प्राण लगेच गेला नाही. आपल्या पतनाचें कारण भीमानें विचारलें. तेव्हा धर्म म्हणाला, –' अरे तू फार खादाड असून दुसऱ्याचा अपमान करीत होतास, या पापामुळें तूं पडलास.' असे सांगून श्वानासह त्वरेनें पुढे जाऊ लागला. पुराणान्तरी असें म्हटलें आहे कीं, हिमालयावरुन चालतांना धर्माला थंडी सहन न होऊन त्याला हुडहुडी भरली. तेव्हा नारद त्याच्याजवळ येऊन म्हणाला,–'अरे तूं देहासह स्वर्गास गेलास तर तुझें बंधू व कांता भेटतील, आणि येथेच जर पडलास, तर तीही तेथून परततील. यासाठी देहासह स्वर्गात जाण्याचा उपाय तुला मी सांगतो. भीमाची अर्ध काया वज्रकवचाची आहे. ती मागून घेऊन तू धारण कर म्हणजे तुला थंडीची बाधा व्हावयाची नाही, व तू स्वर्गास जाऊन पोहचतील.' परंतु धर्माला न पटून तो तसाच पुढें चालू लागला. तेंव्हां भीमानें आपलें वज्रकवच घेण्याविषही त्याची विनवणी केली. व वज्रकवच काढून त्यानें धर्माला दिलें. मग धर्माने ते अंगावर घालून तो चालू लागला.

# धर्माचा स्वर्गात प्रवेश

असो, याप्रमाणें श्वानासह चालता चालतां धर्म स्वर्गाच्या द्वाराशी येऊन पोहोचला, तेथें इंद्र वाद्यांसह त्याला सामोरा आला, व म्हणाला,–'धर्मा, हा रथ तयार आहे, यावर बसून चल. धर्मानें उत्तर केले, 'हे देवेंद्रा-माझ्या बधूवांचून व द्रौपदीवाचून मी एकटयानें स्वर्गभुवनात जावे हे मला योग्य दिसत नाही.' हे ऐकून इंद्र म्हणाला,–'अरे ती तर तुझ्या आधीच स्वर्गात येऊन पोहचली आहेत. देवांनीं त्यांना विमानातून पूर्वींच येथें आणलें आहे आता तूं मात्र शरिरानें स्वर्गात चल. परंतू श्वानासह यावे असें जर तुझें मनात असेल तर तें मात्र होणें नाही. याला येथें सोडूनच रथांत बसलें पाहिजे.' धर्मानें उत्तर दिलें. 'देवा, सेवकांचा त्याग केल्यानें महापाप लागते. यास्तव मी या श्वानाला कसा सोडू ?' इंद्र म्हणाला,–' युधिष्ठीरा, जोपर्यंत तूं या श्वानाचा त्याग केला नाहीस, तोपर्यंत तुला देवलोक प्राप्त होणार नाही. अरे, तूं बंधू व स्त्री यानाही टाकलेस, मग या श्वानाला मात्र कां टाकीत नाहीस?' धर्मानें उत्तर केले,–देवेंद्रा, ऐक, ती मेली म्हणून त्यांना टाकणें सहजच ओधास आलें. परंतू हे श्वान मला शरण आलेलें आहे. शरणगताला अभय न देणारे ते महापापी जाणावे' हे धर्माचे उत्तर ऐकून इंद्राला संतोष झाला. व तो म्हणाला,–'हा धर्मरूपी केवळ ईश्वर आहे. धर्मा, पूर्वीं द्वैतवनात बंधु मृत झाले असतां यमधर्माच्या प्रश्नाची उत्तरे देऊन तूंच त्यांना उठविलेस व सर्वांचा उद्धार तूंच केलास.' असें बोलून इंद्रानें त्याला स्वर्गास नेले. तेथें नारद म्हणाला,–' राजा, तूं मोठा कीर्तिमान व पवित्र असून तुझ्यासारखा राजा स्वर्गातहीं कोणी नाही. तुझ्या भक्तीमुळें या श्वानालाही स्वर्गवास घडला, हें नारदाचे भाषण ऐकून धर्मानें आपले बंधुजन कोठे आहेत हे दाखविण्याविषयी इंद्राची प्रार्थना केली तेव्हां इंद्र त्याला म्हणाला,–' धर्मा, ते सर्व आपआपल्या कर्मानुसार स्थानें पावले आहेत. तुला स्वर्गप्राप्ति झालीं असूनही तुझा मनुष्यस्वभाव जात नाहीं, याचें मात्र मला मोठें आश्चर्य वाटतें.' हें इंद्राचें शब्द ऐकून धर्म म्हणाला. ' देवेंद्रा, मला द्रौपदी व बंधु याशिवाय येथें मुळींच राहवत नाही.' धर्माचा आग्रह पाहून इंद्रानें त्याची इच्छा पूर्ण करण्याची आपल्या दूतांना आज्ञा केली.

येवढी कथा ऐकून जनमेजय वैशंपायनास म्हणाला, ' मुने, पांडव प्रस्थान करून महापंथानें स्वर्गास पोचले. हें तूं मला सांगितलेस, पण त्या महापंथाची कथा मला ऐकण्याची इच्छा आहे.' राजाची विनंति ऐकून वैशंपायनानें त्याला स्वर्गमार्गात कोणकोणते देश, नगरें, वनें लागतात, ती सांगितली. त्याला केदारकल्प म्हणतात, हे पूर्वी शंकरानें कार्तिकेयास सांगितले होतें.

---

# अध्याय २५ वा



## केदारकल्प--वर्णन

वैशंपायन म्हणाले, ' राजा कार्तिकेयानें मोठ्या उत्सुकतेनें शंकराला म्हटलें, ' मी अज्ञान बालक आहे, तरी दीनांचा उद्धार करण्यासाठीं मला केदारकल्पाचें वर्णन सांगा.' कार्तिकेयाची ही विनंति ऐकून शंकराला संतोष झाला व तो म्हणाला, ' मुला, केदारकल्पाची त्रैलोक्यहितकारिणी कथा मी तुला सांगतो. ही कथा ज्रे भक्तिभावानें ऐकतात, त्यांचें पाप नष्ट होऊन त्यांनां अंतीं शिवलोकाची प्राप्ति होते. जो या कथेचें पठन करितो, त्याची जन्ममरणाची येरझार चुकते ज्या स्थलीं हा कल्प आहे, तेथील अनेक तीर्थावर ब्रह्मा, विष्णु, महेश हे नित्य वास करतात. जे कोणी सज्ञानी किंवा अज्ञानी पुरुष केदारेश्वराचें पूजन करितात, ते महापुण्यवान होतात. पूर्वी हिमालयानें देखील याच मार्गानें पुण्य संपादन केले. याचा महिमा देवांना देखील कळत नाहीं. असा हा केदारकल्प अत्यंत दुर्गम आहे. कारण तेथें मी घोर अशा स्वरूपानें वास करितों. जे पुण्यात्मे धैर्यवान असतात तेच मात्र या मार्गानें जाऊं शकतात. वास्तविक चौऱ्यांशीं लक्ष जीवयोनींना याचेपासून भय बाळगावयास नको. कैवल्याची प्राप्ति याच मार्गानें होते. केदारमार्ग म्हणजे स्वर्गास जावयाची शिडीच होय. गोवध, ब्रह्महत्या मातृहत्या, पितृहत्या, बालहत्या, अगम्यागमन, अभक्ष्यभक्षण, असत्य भाषण इत्यादि पापें करणारांनींही या केदारमार्गाचा अवलंब केल्यास त्यांना नरक

वास टळून ते मुक्त होतात. पाण्याच्या बुडबुड्यासारखा मनुष्य क्षीणायुषी होऊन, पूर्वकर्मानुसार पुन: जन्म घेतो. परंतु तो आपली स्थिति जाणून, या केदारकल्पमार्गानें माझे भुवनी आला म्हणजे येथें चौदा मन्वतरे रहातो. केदारकल्पाचें नांव तोंडानें उच्चारलें, म्हणजे सवत्सरात केलेल्या पापांचा क्षय होतो. कुंभ-संक्रातीस केदारेश्वराचें दर्शनास जे जातात ते ब्रह्मरंद्र भेदून शिवलोकास पोचतात, ज्याना त्याचें दर्शन होऊन येथील रतकुंडात स्नान घडते. ते देवाच्या कोटी वर्षेपर्यत शिवलोकी वास करतात, व विष्णू-बरोबर विपुल ऐश्वर्य भोगतात. जो भक्तिपूर्वक केदारनाथाचें देवालय स्थापन करितो. त्याला तर अखड स्वर्गवास प्राप्त होतो. असें हे केदार-कल्पाचे माहात्म्य आणखीं सांगू लागल्यास फार विस्तार होईल.

हे ऐकून, कार्तिकेयानें केदारकल्पाचा शास्त्रोक्त मार्ग सांगण्याविषयी प्रार्थना केली. तेव्हां शंकर त्याला सांगू लागले,–' आश्विन महिनातल्या शुद्ध पक्षांत शुद्ध तिथी पाहून मुमुक्षुनें श्राद्ध करून, मोक्षमार्गास निघावे. प्रथम भद्रकलिकेचे दर्शन करावें आणि मग उपवासयुक्त जागरण करून रुद्रेश्वरतीर्थास जाऊन तेथे क्षौर करावे. मालाधरतीर्थावर जाऊन तेंथें गंगेत स्नान करावे. व तेथील केदारेश्वराचे दर्शन घेऊन, उत्तर दिशे-कडे वळावे, तेथे शिवगण भक्ताचे रक्षण करीत असतात. त्यांना वंदन करावे. येथें मृत्यूची बाधा क्षणभरही होत नाहीं, मनुष्याच्या हितासाठीं मी हे गण उत्पन्न केले. जे स्थान, यक्ष, देव, किन्नर यानांही दुर्लभ ते मी सहज आपल्या भक्तांना देतो. असो; पुढे गेल्यावर मंदाकिनी गंगेचें अत्यंत निर्मल व पवित्र उदक लागते. त्यात स्नान करून, देवपुजा व तर्पण करावे; म्हणजे पितर वरदान देतात. या मंदाकिनीतीर्थाचे दक्षिणेस रेतकुंड नांवाचे तीर्थ आहे. त्याच्या दर्शनानें सर्व पातकांचा क्षय होतो. तेथे शुद्ध होऊन त्या तीर्थाला त्रिवार वंदन करावे, व दोन्ही हातानीं त्यातील उदक त्रिवार घेऊन प्यावे, म्हणजे शिवस्वरुपाची प्राप्ती होते,

हे ऐकून कार्तिकेयाला आश्चर्य वाटले; व त्यानें रेतविद्येचा उपदेश करण्याविषयीं शिवाची विनंती केली. तेव्हां शिव त्याला तो सांगू लागले.

## श्लोक

दशबिन्दुसमायुक्ता ओंकारद्वय संयुता ।
अकाराश्च त्रयः सन्ति रेतेतं विद्येति सोच्यते ॥ १ ॥

आद्यन्ते प्रणवाः सन्ति रकारं मध्यतेद्वयः ।
क्षकारे करकारेऽस्मिन्नेवं षडक्षरा स्मृता ।। २ ।।

क्षकारे करकारे द्वे क्षकारे कुरुते यदा ।
एवं शादक्षरैर्युक्ता रेतोविद्येति सोच्यते ।। ३ ।।

अशी रेतविद्या कार्तिकेयाला सांगून शंकर म्हणाले,--' या रेतमंत्रांनें जो त्या रेतकुंडांत स्नान करितो त्याला केदार दर्शनाच्या दसपट पुण्य लागतें. या कुंडांतून पात्र भरून जल घ्यावें, व पुढें गौरीदेवी आहे. तिच्यापाशीं जाऊन जलाभिमंत्रण करून तिची षोडशोपचारारें पूजा करावी. आतां यापुढील मार्ग ऐक. आघाडा आणि तांदूळ अथवा श्यामक (दर्भ), घेऊन अघोरमंत्रानें जलाचें अभिमंत्रण करावें, व चरु शिजवून त्याचे भाग करावेत. पहिला देवाला देऊन दुसरा भाग अग्नीला अर्पण करावा, आणि तिसरा गौरीला देऊन चवथा आपण स्वतः भक्षण करावा. हे भाग उदकाबरोबर देऊन गौरीला नमस्कार करावा, आणि ' जय माते जगज्जननि, तूं त्रिविध पाप हरण करून भवसागरांतून तारणारी आहेस,' अशी तिची स्तुति करावी. तेथून शंभर बाणाच्या अंतरावर ईशान्येस अर्धचंद्राकृति शिला आहे; तिचें ऊर्ध्वगामिनी असें नांव आहे. या शिलेला प्रदक्षिणा करून, पुढें उत्तरेकडे पन्नास धनुष्याच्या अंतरावर हत्तीच्या आकाराची शिला आहे तिला प्रदक्षिणा करून उत्तरेकडे हजार धनुष्यें जमीन टाकावी. म्हणजे नाना वर्णखचित असें शिवलिंग लागतें. त्या लिंगाला अघोर मंत्राचा जप करून स्पर्श करावा, व मग बीजाक्षरासह सर्व अघोरमंत्राचा जप करावा, म्हणजे शीतबाधा मनुष्याला होत नाहीं. यापुढें तीनशें धनुष्यें अंतर टाकल्यावर लोकपालपुरी लागते. तेथें उत्तम धवलारें ( मंदिरें ) असून अनेक चित्र-विचित्र सुंदर गोपुरेंही ( मनोरें ) आहेत. बाजूला सरस्वती नदी वहात असून, त्या ठिकाणीं ब्राह्मणकुलें रहातात. त्या ठिकाणीं सरस्वतीचें पाणी घेऊन, त्यानें तेथील पशुपतीची पूजा करावी. त्याच्या उत्तरेस इंद्रानें स्थापिलेलें अर्धकोश लांबीचें भूतेशाचें देवालय आहे. त्या ठिकाणीं अनेक सुंदर पदार्थ असून पुढें सरस्वतीचें रम्य तीर आहे. तेथें स्नान करून शिवाचें पूजन करावें, व एक रात्र जागरण करावें. नंतर सरस्वतीच्या तीरानें स्वर्णभूमिकेस जाऊन, तेथें विष्णुस्थापित लिंग आहे. त्याचीं पंचोपचारें पुजा करावी.

त्या ठिकाणीं देवकन्या रहात असून भेरी मृदंगाचे शद्ब होतात. त्याच्या उत्तरेस सर्पराज वासुकी व वैरोचन हे सपरिवार रहातात. तेथील नागकन्या नानाभूषणांनीं युक्त व विशाल नेत्रांच्या आहेत

## सिद्धांचा प्रवास

शंकर कार्तिकेयाला म्हणाला,—' स्कंदा, याच मार्गानें पूर्वीं जे योगी जन गेलें होतें, त्या सिद्ध ऋषीचें परमपवित्र चरित्र तुला आता सांगतीं· नैमिषारण्याचे महायोगी या मार्गानें जात असतां, या नागकन्यांना पाहून त्यांन फार विस्मय वाटला. त्यांच्या नगरांत काष्टांच्या स्थानीं हस्तिदंताची योजना केलेली होती तें पाहून, व त्या सुंदर नागकन्या पाहून, ऋषि आश्चर्यभरित झालें असतां, त्यांची स्वामिनी ऋषींची प्रार्थना करून म्हणाली,—' अहो, तुम्हीं या शंभर कन्या घेऊन त्यांच्याशीं इष्ट भोग भोगीत येथें रहा. तुम्हांला आम्हीं उत्तम वस्त्रें व षड्रस पक्वान्नें देऊं ?'-हें ऐकून सिद्धी म्हणालें,—' आम्हांला भोगांचें मोठें भय वाटतें शंकराशिवाय आम्हांला कसलीही गरज नाहीं.'–त्यावर नागकन्यांची स्वामिनी त्यांना म्हणाली,—' ऋषीहो, तर क्षणभर येथें राहून देवांनाही दुर्लभ अशीं अमृत फलें भक्षण करा, म्हणजे तुम्हांला उत्कृष्ट ज्ञान होईल.'–अशा अनेक रीतीनीं नागकन्या सिद्धांना मोह पाडूं लागल्या; परंतु ते आपलें उद्दिष्ट सोडीनात. नंतर शूलपाणीचें स्मरण करून सिद्ध पुढें जाऊं लागले; व सुवर्णभूमीस जाऊन पोंचले. त्या ठिकाणीं एक रम्य नगर त्यांना दिसलें. त्यांत चित्रविचित्र गृहें व उपवनें असून पश्चिमेस एक अपूर्व वाटिका होती. त्यांत कोहळ्याची स्वच्छ फलें असून त्यांतून अमृतासारखा रस गळत असतो. त्या ठिकाणीं एक रात्र राहून, स्वप्नांत जें फल खावयाचा दृष्टान्त झाला, तें घेऊन त्या सिद्धांनीं त्याचे दोन भाग केले. एक भाग देवांना देऊन, दुसरा त्यांनीं भक्षण केला. तेथून पुढें गेल्यावर एक स्वयंभू शिवलिंग लागलें. त्याची त्यांनीं शास्त्रोक्त पूजा केली. भेरी, शंख, इत्यादि वाद्यांनीं देवही त्याची पूजा करितात. तेथील देवांगणा सुस्वाद अन्नें व फलपुष्पें तेथें नित्य आणतात. तेथें एक रात्र जागरण करावें. रात्रीच्या अखेरीस शंकर स्वप्नांत येऊन, भक्तांचे सर्व मनोरथ पुरवून त्यांचा उद्धार करितो. दशभुज व शूलपाणी असा तो नीलकंठ वृषभारूढ होऊन, सिद्धांना स्वप्नांत दर्शन देतो. त्या ठिकाणच्या

उत्तरेस एक फलवृक्ष आहे. स्नान करून त्याचें एक फल घ्यावें, व अर्धे देवांना देऊन अर्धे आपण खावें, म्हणजे तत्काल दिव्य कांति प्राप्त होते. त्याचप्रमाणें रुद्रासारखा पराक्रम व जातिस्मरता ( पूर्व जन्मींचें स्मरण राखण्याची शक्ति ) हीहीं त्यायोगें प्राप्त होऊन दिव्य देहानें त्रैलोक्यांत संचार करण्याची शक्ति येते, व विषयांविषयीं वैराग्य उत्पन्न होतें. शंकर म्हणाले, यापुढें गेल्यावर सिद्धांना शंखपाळनगर लागलें. त्याची रचना अपूर्व असून आंतील जमीन सोन्याची आहे. आंत ठिकठिकाणीं रम्य उद्यानें असून. ती नानाप्रकारच्या फलवृक्षांनीं व पुष्पवृक्षांनीं शोभिवंत झालेलीं आहेत त्यांवर अनेक प्रकारचे पक्षी मंजुल शब्द करीत असतात. बाजूला मोक्षदायिनि सरस्वती वहात असून तिच्या तिरावर दहा गावेपर्यंत शंखपाळाचें नगर आहे. हें देवानें आपल्या भक्तांसाठीं मुद्दाम निर्माण केलें आहे. त्याचा राजा शंखपाळ मोठा धार्मिक असून अति भाग्यवान् व पराक्रमी आहे. त्याचा रत्नजडित राजवाडा अर्ध योजन लांब आहे. त्याच्या घरीं जावें, असा सिद्ध विचार करीत आहेत तों त्यांना वाटेंत अनुपमेय स्थिति आढळली. बेगा नदीच्या वाळवंटावर पांच लक्ष सुंदर राजकन्या आपल्या सख्यांसह क्रीडा करीत होत्या. त्यांचें सौंदर्य पाहू। कित्येक सिद्ध मूर्च्छित पडले. राजकन्या त्यांना म्हणाल्या, 'ऋषीहो, तुमच्या दर्शनानें आज आम्हीं धन्य झालों. तुम्ही कोठून आलां तें सांगा. आमच्याजवळ अनेक दिव्य पदार्थ आहेत, त्यांचा उपभोग घेऊन तुम्हीं येथें स्वस्थ रहा. पुढचा मार्ग फार कठीण आहे, तो उल्लंघून तुमच्यानें जाववणार नाहीं.' हें ऐकून सिद्ध म्हणाले,—' अहो, भोगापासून शेवटीं पतनच व्हावयाचें. भोगसुख हें जन्ममृत्यूला कारण आहे. कितीही सुख मिळत असलें, तरीं आम्हाला तें नको. आम्हांला एक शिवच पाहिजे आहे.' असें म्हणून ते सिद्ध पुढच्या मार्गाला लागले.

# अध्याय २६ वा



## केदारकल्प–वर्णन, पुढें चालू.

शंकर कार्तिकेयाला म्हणाले,—'कुमारा, राजकन्यांना सोडून सिद्ध पुढें चालूं लागल्यावर त्यांची परीक्षा पहाण्यासाठीं मी वृद्ध ब्राह्मणाचें रूप धरून त्यांना वाटेंत गांठलें, व तुम्हीं कोठून आला आणि तुम्हांला कोठें जावयावें, असें त्यांना विचारलें. त्यांनीं उत्तर दिलें.–' आम्ही मृत्युलोकांहून आलों असून आम्हांला शंकराच्या दर्शनाला जावयाचें आहे. तो त्रिभुवनाचा स्वामी असून मोक्षदाता आहे.' हे ऐकून मी त्यांना म्हणालों,–'अहो तुम्हीं लाखों वर्षें असे फिरलां, तरीही त्या शंकराचें दर्शन तुम्हाला व्हावयाचें नाहीं. तो देवांनांहीं अगम्य असून शेषालाही त्याचें वर्णन करवणार नाहीं. ' यावर ते सिद्ध म्हणाले,–'तो चंद्रमौलि शंभु स्वर्ग–मृत्यु–पातालांत जेथें असेल तेथें आम्हांला जाणें आहे.' मी म्हणालों,–' अहो, तुमच्या त्या शंभूचें रूप तरी कसें आहे तें ऐकूं द्या.' सिद्धांनी उत्तर केलें,–'विप्रा, त्याला पांच शिरें व दहा भुजा असून त्याच्या हातांत नित्य त्रिशूल असतो. नंदी त्याचें वाहन असून तो नीलकंठ नेहमी भस्माचें लेपन करतो. व्याघ्रचर्म हेंच त्याचें वस्त्र असून तो मस्तकावर जटा धारण करितो. त्याचें दर्शन आम्हांला झालें नाहीं, तर आमचा देह पडल्याचीहि क्षिति आम्हांला नाहीं.' हें सिद्धाचें भाषण ऐकून मी एकदम गुप्त झालों, आणि सिद्धही मला नमस्कार करून उत्तरमार्गानें पुढें चालूं लागले. इतक्यांत इंद्र नृसिहरूप धरून, त्यांनां घाबरविण्यासाठीं त्यांच्या वाटेंत आला. त्याला पाहून सिद्ध भयभीत झाले; पण नृसिंहानें मनुष्यवाणीनें त्यांना–'तुम्ही कोठून आलां, व कोठें जावयाचें'–असें विचारलें. सिद्धांनीं उत्तर दिलें,–'आम्हीं मृत्युलोकाहून आलेले असून, आम्हाला शिवलोकास जावयाचें आहे.' नृसिंह म्हणाला,–'अहो, कसला हा शिवलोक घेऊन बसलांत! मला फार भूक लागली आहे. त्यासाठीं मला हा आयताच आहार ईश्वरानें पाठवून दिला.' हें ऐकून सिद्धांनीं धीर धरून, अघोर मंत्राचा जप केला. त्याबरोबर इंद्र नृसिहरूप टाकून, आपल्या खऱ्या रूपानें तेथें प्रकट झाला, व त्यांना म्हणाला,–'मी तुम्हांला प्रसन्न झालों आहे. तर

तुम्हांला पाहिजे तो वर मागा.' सिद्धांनीं उत्तर केलें,–'आम्हांला शिवलोकीं जाईपर्यंत कांहीं विघ्न न होवो एवढेंच दे.' 'तथास्तु' म्हटल्यावर सिद्ध पुढें चालूं लागले. वाटेंत त्यांना चंद्रवेग नदीच्या मध्यभागीं अनुपम रचनेची एक हवेली दिसली. तीत अत्यंत सौंदर्ययुक्त अशा कन्या होत्या. त्यांनीं त्या सिद्धांना पाहून त्यांना कुशलप्रश्न विचारले, व तेथें रहाण्याविषयीं त्या त्यांना आग्रह करूं लागल्या; परंतु त्यांनीं पूर्वीप्रमाणेंच उत्तर देऊन, आपला मार्ग धरिला. पुढें चंपका नामक अप्सरेचें मंदिर त्यांना लागलें. तेथें येऊन सिद्धांनीं तिला तिच्या ऐश्वर्याचें कारण विचारले. तेव्हां ती म्हणाली,–'मीं केदारेश्वराचें पूजन करून गंगेचें स्नान केलें, त्या पुण्यामुळें मला हें ऐश्वर्य प्राप्त झालें.' पुढें हे चंपकभुवनही टाकून ते सहस्र योजनें गेल्यावर त्यांना एक भयंकर पर्वत लागला. तेव्हां ते अघोर मंत्राचा जप करीत पुढें चाललें. वाटेंत त्यांना कांही ऋषि लागले. व ते त्यांना तेथें राहून उत्तम भोग भोगा, म्हणून सांगू लागले. परंतु 'शंकराशिवाय दुसरें कांही आम्हांला नको' असें म्हणून ते पुढें जाऊ लागलें. थोडया वेळानें त्यांना-एका सोन्याच्या खांबास खाली तोंड करून बांधलेला. एक ऋषि दिसला' सिद्धांनी त्याला त्याच्या अवस्थेचें कारण विचरलें असतां. त्यानें सांगितले,– 'मी मृत्युलोकी असताना कधीहीं विष्णूभजन व दानयज्ञ इत्यादि केले नाहीं. तेणेंकरून ही अवस्था मला ही प्राप्त झाली आहे. हें ऐकून सिद्धांनीं पुन्हा त्याला विचारले की,– 'यातून तुझी मुक्तता तरी केव्हां होईल?' तेव्हां तो म्हणाला 'एक कोटि सिद्ध स्वर्गास जातील व लक्ष चांद्रायणें घडतील तेव्हां मला मुक्ति मिळल,' हे एकून सिद्ध पुढे चाललें, तो एक निर्जन असें गृह त्याना लागले, व ते आपणच त्यांना राहावयास सांगू लागले. हा चमत्कार पाहून तें तसेंच आणखी चालू लागलें, तो एका अरण्यात अन्नपाण्याशिवाय भ्रमण करणारा एक ऋषि त्यांना भेटला, अशा रीतीनें उपाशी फिरण्याचे कारण काय? म्हणून सिद्धांनी त्याला विचारलें तेव्हां त्यांनी सांगितलें की,– मी लहान पणी अज्ञानानें शंकराचें लिंग उपटिले होते, त्या पापाचे हें फल होय मग सिद्धांनीं त्यांना विचारलें, कीं, यातून तू मुक्त कधीं होणार? तेव्हा ऋषि म्हणाला 'कोटी सिद्ध स्वर्गास जातील, तेव्हां उपयुक्त म्हणून शिवलिंग फुटके तुटके कसेंही असलें, तरी तें चाळवू नये. हें एकून सिद्ध पुढें गेले. तेव्हां त्यांना सुंदर नगर लागलें. तेथील राजाचा धाक सर्व त्रैलोक्याला

होता सिद्ध त्या नगरांत गेलें. तेव्हां तेथील सुंदर राजकन्या, त्यांना आपल्या जवळ रहा आणि स्वर्गातील भोगाहूनही उत्तम असा भोग भोगा, म्हणून सांगू लागल्या, पण त्याचें म्हणणें मान्य न करितां तेथून पुढें गेलें. तो कांहीं गंधर्व वाद्यें घेऊन अप्सरांसह त्यांच्या पुढें आलें, व त्यांना नमस्कार करून म्हणाले,- 'सिद्धहो,आमच्या विमानांत बसून देवलोकास चला' तेव्हां आम्हास तुमच्या विमानाशी कांहीं कर्तव्य नाहीं, असें सांगून सिद्ध उत्तर दिशेकडे जाऊ लागलें. तेथें एक सदा फलदायी वृक्ष, व घृत, मधु आणि पायस यांच्या नद्या होत्या त्या ठिकाणी घोषवती नांवाची तपस्विनी होती, तिची स्तुति करून सिद्ध मार्ग क्रमीत असतां, ती घोषवतीही त्यांना दिव्य भोग भोगून तेथें राहण्याचा आग्रह करू लागली. तिलाही पूर्वी प्रमाणेंच उत्तर देऊन सिद्ध निघाले. नंतर तीन गांवे गेल्यावर अमृतवाहिनी गंगा त्यांच्या दृष्टीस पडली. तीत स्नान करून व अघोरमंत्र जपून ते पुढें गेले, कैलासभुवन त्यांना दिसून आले. ते सर्व सुवर्णमय असून सहस्त्र गांवे उंच व तीस सहस्त्र गांवे विस्तृत आणि सूर्यासारखे प्रकाशमान होते. तेथें शंकर गंगेसहित रहातो. तेथील देवांगना सुंदर व दशभुजायुक्त आहेत. ती शंकराची भव्य मूर्ति पाहून सिद्धांना आज आपण तापत्रयांतून सुटलो असें वाटलें. नंतर तेथील ऋषींनी त्यांना तिन्ही देवाकडे जाणारें मार्ग दाखविले; व कोणत्या देवाच्या स्थानी कोणतें भोग आहेत. तेंही सांगितले. ते म्हणाले,- "ब्रह्मलोकीही सर्वजण चतुर्मुख असून अप्सरांशी भोग भोगितात व विमानांतून फिरतात. तेथील भोग भोगून झाल्यावर प्राणी मृत्युलोकी चक्रवर्ती राजाच्या जन्मास येतो. विष्णू-लोकींही सर्वजण चतुर्भुज व शंखचक्रगदापद्म धारण करणारें असून तेथें दोन लक्ष गजगामिनी व मदोन्मत्त स्त्रियांशी भोग भोगून मृत्युलोकी आल्यावर जातिस्मर होऊन चक्रवर्तिपदाला पोचतो, व शेजटी स्वर्गास जातो. याप्रमाणें शिवलोकाचें फल एकून सिद्धांनी तिकडचा मार्ग धरिला. तेथें त्यांनी एका नगरांत तेजःपुंज त्रिशूलधारी अशा चंडेश्वराचे दर्शन घेतलें तेव्हां तो म्हणाला अहो तुम्ही केदारदर्शन, गंगास्नान आणि विश्वेश्वरपूजन केल्यामुळें तुम्हांला मी प्रसन्न झालों आहे, असें तो सांगत आहे, तो त्यांना चौफेर महाविशाल नगरें दिसली, ती कोणाची म्हणून त्यांनीं विचारलें असता चंडेश्वर म्हणाला, पूर्वीची ही इंद्राची अमरावती, पश्चिमेची ज्योतिष्मती व दक्षिणेची तेजस्विनी

असून उत्तरेची नगरी कुबेराची होय' या नंतर ते सिद्ध कैलासाच्या शिखरावर निघाले तें शंभर योजनें विस्तीर्ण व नाना रत्नांनीं सुशोभित झालेलें आहे. तेथे शिवालयात प्रत्यक्ष नीलकंठ ध्यानस्थ बसला होता, त्याच्यावर कुबेर चवरी वारीत होता, चंद्रानें छत्र धरले होते, आणि नंदी व चंड द्वारपालाचें काम करीत होते. वायु त्याजपाशी वीणा वाजवीत होता, त्याच्या जिव्हाग्री चारी वेद, व उदरांत त्रिभुवन असून त्यानें भस्म लेपन केलें होतें त्याचें आयुध खट्वांग असून हातात व कंठात मुंडमाला शोभत होत्या. त्या भक्तवत्सल, कृपाळू सेदांनांहीं अगम्य व स्मरणमात्रेकरून भक्ताला भवसिंधूतून पार पाडणाऱ्या अशा शंभूला पार्वतीसह पाहतांच स्त्रियांनीं त्याच्या चरणीं लोटांगण घालून त्याची अकने प्रकारे स्तुति केली. त्या देवाधिदेवाला पाहून सिद्धाच्या मनांतील सर्व संदेह फिटला. मग शंभूने प्रसन्न होऊन त्यांना वर दिल्यावर ते इंद्रासह विष्णुलोकीं गेले. तेथील वर्णन कोण करणार! तेथें गेल्यावर सिंहासनावर बसलेल्या चतुर्भुज व वैजयंती धारण करणाऱ्या विष्णूला पाहून सिद्धांनीं त्याला प्रेमानें नमस्कार केला. तेव्हां कौस्तुभधारी शारङ्गधर असा तो कमलापति विष्णु त्यांना देवांसह येथेंच आनंदानें रहा, असें म्हणूं लागला. पण सिद्ध म्हणालें,–'देवा, तुझ्या स्मरणानें आम्हांला मुक्ति मिळत असतां या भोगांत पडून काय फल? तुझ्या दर्शनानें आमच्या संचिताचा क्षय होऊन आम्हीं आज कृतार्थ झालों.' मग विष्णूनेंही त्यांना प्रसन्न होऊन वर दिल्यावर ते पुढें ब्रह्मनगरीकडे चालले. त्या नगरीला उपमा द्यावयाला दुसरी नगरीच नाहीं. तेथें सिंहासनावर ब्रह्मदेवाला पाहून, सिद्धांनी त्याला साष्टांग प्रणिपात केला, ब्रह्मदेवानेही त्यांना कृपाळू होऊन वर दिला; मग ते यमपुरीस गेले. तेथें यमानें त्यांना कुशलप्रश्न विचारून सांगितलें कीं, 'मी तुम्हावर प्रसन्न झालों आहे; ' तरी इच्छित वर मागा! ' हें ऐकून, सिद्धांनीं नरकांत पडलेल्या प्राण्याची मुक्तता करावयास सांगितलें. यमानें तत्काल त्याप्रमाणें केलें नंतर रुद्राच्या आज्ञेवरून. सिद्ध या ठिकाणीं अढळपद पावून परममुक्त झाले. कारण तेथें द्वैताचा प्रकारच नाहीं.'

ही सिद्धांची कथा सांगून, शंकर कार्तिकेयाला म्हणाला,–कुमारा, हे परम रहस्य आजवर कोणास कळले नव्हतें. या केदारकल्प मार्गाने जाऊन योगी अढळपद पावतात. ज्याला शिवपदाची इच्छा असेल, त्यानें याच मार्गानें जावें. कार्तिकेया, आतां आणखी कांहीं गोष्टी तुला सांगतों. त्या ऐक

कृतयुगांत कर्मानें मुक्ति मिळत असे, म्हणून तेव्हां केदारकल्पाची गरज नव्हती. त्रेतायुगांत मात्र आठ लक्ष सिद्ध त्या मार्गानें जाऊन मुक्त झाले. द्वापारांत तीन लक्ष योगी मुक्त झाले व कलींत एक लक्ष झाले. ही कथा कलीचें पाप नाहींसें करणारी मोक्षदायिनी, व परम पवित्र आहे. हिचें श्रवण करणारास गंगास्नानाचें पुण्य घडतें; व पुनः अधःपात होत नाहीं. हिच्या श्रवणानें, ब्रह्महत्या, गुरुद्रोह इत्यादि पापांचा नाश होतो. तूं भक्तीनें केदार-कल्प विचारिलास, पण त्यानें सर्व मानवाचें हित झालें आहे. या केदार-कल्पाविषयीं कोणी संशय धरूं नये. कारण संशयानें पतन होतें.' ही कथा ऐकून कार्तिकेयानें शंकराला नमस्कार केला. वैशंपायन म्हणतो, 'राजा पांडवही याच मार्गानें गेले. आतां स्वर्गारोहण पर्वाची कथा ऐक,'

---

# अध्याय २७ वा



## स्वर्गारोहण पर्व

वैशंपायन जनमेजयास पुढील कथाभाग सांगूं लागला तो म्हणाला,– 'राजा, धर्मानें, बंधु व स्त्री यांची भेट करून घेण्याचा आग्रह धरिल्यावर इंद्राच्या आज्ञेनें त्याचे दूत धर्माला स्वर्गातील सर्व ठिकाणें दाखवूं लागले. तेथें राजा दुर्योधन भानुमतीसह एका उच्चासनावर बसला होता. त्याला पाहून क्रोध आला व तो दुतांना म्हणाला,–'या दुर्योधनामुळें आम्हां सर्व बांधवांचा निःपात झाला. यानेंच द्रौपदीला सभेत अपार कष्ट दिले. त्याला पाहाण्याची माझी इच्छा नाहीं मला माझ्या बंधूंकडे घेऊन चला.'–हें ऐकून तेथें नारद होता, तो धर्माला म्हणाला,–'अरे धर्मा, येथें तर सर्व देवगंधर्व दुर्योधनाची पूजा करीत आहेत. यानें समरांगणांत देह ठेविल्यामुळें याला हें स्थान मिळालें आहे. आता याशीं व्यर्थ वैर करूं नकोस. द्रौपदीला क्लेश झाले ते द्युतामुळें झाले. आतां त्यांच्याबरोबर येथें स्वर्गभोगाचें सुख घे,' धर्मानें उत्तर दिलें, 'ज्याच्यामुळें सर्वांचा नाश झाला, त्याला ही गति मिळाली, तेव्हां कर्णादि माझे बंधु कोठे आहेत?"

दुसऱ्या पुराणांत दुर्योधनाला स्वर्गवास झाला असें सांगितलें नाहीं. त्यांत म्हटले आहे कीं, धर्माला वाजत गाजत इंद्रानें आणलेला पाहून सर्व देव त्याला पाहावयासाठी जमले. त्या वेळीं तो गजर, नरककुंडांत पडलेल्या दुर्योधनानें ऐकिला, व काय आहे, म्हणून तो वर मान करून पाहूं लागला दुसरेही प्राणी धर्माकडे पाहूं लागलें तेव्हां कित्येक त्याच्या केवळ दर्शनानें मुक्त होऊन व कित्येक त्याची स्तुति करून तरुन गेले. पण दुर्योधनाने अरें,माझा शत्रु आला, असें म्हणून द्वेषानें कुंडांत बुडी मारिली म्हणून त्यांचा उद्धार झाला नाहीं.

धर्माचा प्रश्न ऐकून इंद्रदूत त्याला त्याच्या बंधुकडे घेऊन गेले. वाटेंत त्याला अंधार, दुर्गंधि, मांस, रुधिर, प्रेते, अस्थि इत्यादि लागून अनेक प्राणी दुःख भोगीत असलेले दिसले पुढें गेल्यावर त्याला नरकांची रांग कढत पाण्याची नदी, लोहरसाची कढई, इत्यादि यातनायंत्रें आढळली त्यांत अनेक प्राणी दुःख भोगीत होते. तेथील प्रकार पाहून व दुर्गंध सहन न होऊन धर्माला मुर्च्छा येऊं लागली, तो मागें वळूं लागला; पण इतक्यांत तेथें दुःख भोगणारे प्राणी त्याला म्हणालें,–'राजा क्षणभर उभा रहा तुझ्या पवित्र दर्शनानें आमचे क्लेश आम्ही क्षणभर विसरतो,तरी आम्हांवर कृपा कर. –त्यांचीं हीं दीनवचनें ऐकून धर्मानें त्यांना तुम्हीं कोण म्हणून विचारिले.तेव्हां ते म्हणाले,––' अरे, आम्ही भीम, कर्ण, अर्जुन, नकुल, सहदेव, धृष्टद्युम्न, द्रौपदी इत्यादि आहोत.'–हें ऐकून धर्माला विस्मय वाटला, आणि तो म्हणाला,––' अहो, यांनीं असें कोणतें पाप केलें, म्हणून यांना अशा यातना होतात, व दुर्योधनानें असें कोणतें पुण्य केले म्हणून त्याला स्वर्ग मिळाला ? मी स्वप्नांत आहे कीं भ्रमांत आहे ? –असें म्हणून दुःखित स्वरानें तो दूतांना म्हणाला,––' तुम्हीं येथून जा, यांना येथें टाकून मला स्वर्गांत यावयाचें नाहीं.'–हे ऐकून दूतांनी जाऊन इंद्राला तसें कळविलें. तेव्हां यमधर्मादि सर्व देव एकत्र जमून धर्माकडे आले. त्या वेळीं सर्व अज्ञान दूर होऊन तेथील सर्व यातना जेथच्या तेथें नाहींशा झाल्या, व दुर्गंधीच्या ऐवजी उत्तम सुगंधि वायु वाहूं लागला. मग इंद्र धर्माचें समाधान करून त्याला म्हणाला,— "धर्मा, आम्हीं सर्व देव तुजवर प्रसन्न झालो आहों तरी तूं इकडे ये. मनांत राग धरूं नकोस. अरे, राजे लोकांनी नरक अवश्य पहावें. जो अतिशय पातकी असतो, तो मात्र अपार दुःख कष्ट भोगतो. परंतु

पुण्यवान् असतो तो आपलें थोडेसें पाप भोगून टाकितो. म्हणूनच तुला आम्हीं प्रथम पापाचें फल भोगावयास लाविलें. 'अश्वत्थामा पडला' असें असत्य भाषण तूं केलेंस व त्यामुळें गुरूचा वध झाला, त्या पापामुळें बंधुवर्ग व द्रौपदी यांच्या मिषानें तुला नरकाचें दर्शन करविलें. आतां तूं स्वर्गात ये. व आपल्या बंधूंना भेटून त्यांच्यासह स्वर्गाचा उपभोग घे.'–याप्रमाणें इंद्रानें धर्माला उपदेश केल्यावर यमधर्म त्याला म्हणाला, –'बा युधिष्ठिरा, तुजवर मी अनेक प्रकारें संतुष्ट झालों आहे. प्रथम यक्षप्रश्नाच्या वेळीं तूं मला संतुष्ट केलेस, पुढें बंधु व स्त्री मरण पावलीं त्यावेळींही तूं धैर्य सोडिलें नाहींस, आणि शेवटीं बंधूसाठीं नरकांतही रहावयास तयार झालास. या कारणामुळें तूं आतां पूर्ण पवित्र झाला आहेस. राजानें नरक अवश्य पहावा म्हणून इंद्रानें ही केवल माया रचिली होती. तुझे बंधु व स्त्री नरकाला कदापि योग्य नाहींत. असो, आतां इकडे येऊन गंगास्नान कर.'-यमाचें भाषण ऐकून धर्मानें गंगेवर जाऊन स्नान केलें, त्याबरोबर त्याचें पार्थिव स्वरूप जाऊन त्याला दिव्यरूप प्राप्त झालें, आणि देवांच्या स्तुतीच्या घोषांत तो उच्चासनावर बसला. ( इतर ग्रंथांत असें सांगितलें आहे कीं असत्य भाषणाच्या पापामुळें धर्माला इंद्रानें नरक दाखविलें मात्र ते दाखविल्यावा त्याच्या डाव्या पायाचा अंगुष्ठा गळून पडला, आणि मग त्या देहानेंच त्याला बंधुवर्ग व द्रौपदी यांचें दर्शन झालें. )

याप्रमाणें देवगणांसह धर्म स्वर्गात गेला असतां, त्याला श्रीकृष्णही मूर्तिमंत तेथें दिसला. त्याच्या हातांत शंखचक्रादि आयुधें असून अर्जुन त्याची चरणसेवा करीत होता. इतरही जे वीर युद्धांत मरण पावले होते, तेही त्याला तेथें दिसले. त्यांनीं धर्मासमोर येऊन त्याची पूजा केली. मग इंद्र धर्माला म्हणाला,–'धर्मा, हो द्रौपदी स्वर्गलक्ष्मी असून अयोनिसंभव अशी ती द्रुपदाच्या यज्ञात प्रादुर्भूत होऊन तुमची भार्या झाली. शंकरानें तिला निर्माण केलें. द्रौपदीचें पांच पुत्र गंधर्व होत धृतराष्ट्र हा गंधर्वांचा राजा होय. कर्ण हा सूर्याचा पुत्र व तुझा वडील भाऊ. हे सर्व वीर साध्य मरुद्गण व त्यांचे अवतार होत, हा तिकडे अभिमन्यू चंद्राप्रमाणें शोभतो आहे पहा, हा तुझा पिता पांडू, कुंती व माद्रीसह बसला आहे. हा वसुगणांत बसलेला भीष्म पहा द्रोण तिकडे बृहस्पतीजवळ बसला आहे, आणखीही तुमचे सर्व वीर गंधर्वांच्या पक्तीत बसले आहेत.'

एवढे ऐकल्यावर जनमेजय म्हणाला ,-'ऋषें, भीष्म व द्रोण आदिकरुन सर्वजण स्वर्गात कोठें राहिलें तें मला सांगा.' तेव्हां वैशपायन म्हणाला,–'राजा, परशुरामानें जे ऋषींना सांगितले तेच मी तुला सांगतो. भीष्म हा वसूमध्यें राहिला. द्रोण बृहस्पतीजवळ आणि कृतवर्मा व हार्दीक्य हे यादव मरुग्दणाच्या आश्रयानें राहिले. धृतराष्ट्र कुबेराच्या शरिरात प्रविष्ठ झाला; व कुंती व माद्री यांसह पांडू प्रत्यक्ष इंद्रपदी एकजीव होऊन गेला. विराट, द्रुपद, धृष्टद्युम्न भूरिश्रवा, उग्रसेन, कंस हे मुख्य राजे व वीर विश्वदेवाच्या शरिरानें मिळून गेले. अभिमन्यू चंद्रात व कर्ण सूर्यात विलीन झाले. याप्रमाणें इतर कौरव ब राक्षसही उत्तम गतीला पोहचलें. राजा, जे भोग काढून पुनः पृथ्वीवर जन्म घेतात. असो, शेवटी इंद्रानें धर्माला सांगितले कीं 'धर्मा, प्रत्यक्ष भगवान व शेष यांपीं कृष्ण व बलरूपानें पृथ्वीचा भार नाहीसा केला आहे. कृष्णाच्या स्त्रिया ह्या सर्व अप्सरा असून आणि दुर्योधनाचें सहाय्यकर्ते सर्व वीर येथें यक्ष गुह्यक, गंधर्व, इत्यादिकांची मिळून गेले आहेत, ऋषी म्हणाले 'जनमेजया, याप्रमाणें कुरूपांडवाची कथा तुला मी संक्षेपानें सांगितली. नारायणानें अवतार घेऊन भूभार हरण करण्यासाठी हा सर्व खेळ केला. त्याचे गुण वर्णन केल्यास अनेक महापापाचा क्षय होतो. तेथें तुझ्या ब्रह्महत्येची कथा काय? '

येथें स्वर्गारोहण पर्व संपले. आता एतद्वितीय पुराणोक्त कथा दुसऱ्या मधुकर कवि यांनी सांगितल्या आहेत.

---

# अध्याय २८ वा



## पांडवविषयक पुरांणांतरीच्या कथा---कलीची गोष्ट

वैशंपायन जनमेजयास म्हणाला, 'राजा, पूर्वी अश्वत्थाम्यानें सोडलेल्या ब्रह्मास्त्रापासून गर्भांत असलेल्या परिक्षीत राजाचे कृष्णानें रक्षण केल्याचे तुला सांगितलेच आहे. पुढें धर्मानें प्रयाण करते वेळीं, त्याला राज्य देऊन त्याची व्यवस्था करण्याकरितां तो बंधूसह कलियुगाचें सात दिवस

तेथेच राहिला. वज्रालाही त्यांनी उरलें सुरले यादव स्वाधीन करून मथुरेचा राजा केले. (भारतांत इंद्रप्रस्थाचें राज्य त्याला दिले असें म्हटलें आहे) आणि सुभद्रेला त्याप्रमाणें सांगून तिला वज्राचें नीट रक्षण करावयास सांगितले. यानंतर पांडवाचें स्वर्गारोहण झाल्यावर इकडें परिक्षीतराजानें राज्य सुरु करून अनक शत्रूचा पराभव केला. व मोठी किर्ती मिळविली. सर्व राजे त्याला कारभार देऊ लागलें. मग त्यानें विजययज्ञ केला, तेव्हा कलीनें तेथें प्रवेश केल्यामुळें राजाला राज्यमद व लोभ झाला. तेव्हां तो मनांत विचार करून आपल्या स्वभावांत हा बदल कां झाला ? याचें कारण शोधूं लागला इतक्यात नारदानें तेथें येऊन त्याला कलीची सर्व हकीगत सांगितली. तेव्हां परिक्षीतराजाला राग येऊन तो कलीचा शोध करीत निघाला. वाटेत त्याला गोमिथुन आढळले. त्याच्याबरोबर त्यांना एक पुरुष थापटीत होता, व एक वृद्ध ब्राह्मण चालत होता. थापटणारा मनुष्य पापी व हीन असल्यामुळें हाच कलि असावा असा निश्चय करून राजा खड्ग घेऊन त्याच्यावर धांवला. तेव्हां कलि त्याला शरण जाऊन म्हणाला, 'राजा, मला देवांनी आज्ञा देऊन पाठविलें आहे. मजकडे कांही बोल नाही. कृपा करून आतां मला पृथ्वीवर रहावयास जागा दे, तूं सांगशील तेथेच मी राहीन.' हें ऐकून परिक्षीत राजाला दया येऊन तो म्हणाला, 'मी सांगेल त्यारीतीनें तूं रहा. पण हा वृद्ध कोण? व तूं या गाईला थापटात कोठे नेत आहेस ? वृद्ध ब्राह्मणानें त्याला उत्तर दिलें, 'मी धर्म असून ही गोरुप पृथ्वी थकल्यामुळें मीं तिच्या पाठीवरुन एकाच पायावर चालत आहे.' त्यावर परिक्षीत कलाला म्हणाला, 'अरे, तूं गाई व ब्राह्मण यांना पृथ्वीवर राहू दे, त्यांना क्रोधानें थापटूं नकोस. तुला रहावयाला मी जागा नेमून देतो' असें म्हणून त्यानें मद्य, द्युत, ऋण ( कर्ज ) आणि वारांगना या चार ठिकाणीं कलीच्या चार चरणांची स्थापना केली, व शरीराला सुवर्णात खेळावयास जागा दिली. अशी व्यवस्था लावल्यावर परीक्षित् घरी आला नंतर कांहीं दिवसांनीं कलीच्या गुणानें त्याचें अंतःकरण भरून गेलें असतां, तो रानांत शिकारीस गेला. तेथें त्याला ऋषीचा शाप होऊन तो सर्पदंशानें मृत्यु पावल्याची कथा आठव्या स्तबकांत सांगितलीच आहे.

## दुसरी कथा—भारतयुद्ध महात्म्य

वैशंपायन म्हणाले,—' राजा, आतां तुला भारत युद्ध महात्म्याची दुसरी कथा सांगतों. जनमेजया, कुरुक्षेत्रांत पांडव-कौरवांचीं सैन्यें लढण्यास सिद्ध झाली असतां, कृष्ण पांडवांना म्हणाला;—' हा युद्ध चमत्कार पहाण्यासाठीं मंदोदरीसह बिभीषणाला तेथें आणावें. असें म्हणून त्यांना आणावयास भीमाला लंकेस पाठविले. भीमानें तेथें जाऊन बिभीषणाला युद्ध पहावयास बोलाविलें, मंदोदरीला हें कळतांच ती म्हणाली,—' भीमा तुमचें सैन्य तरी किती आहे!' भीमानें उत्तर केलें. ' कौरवांचें अकरा अक्षौहिणी आणि आमचें सात अक्षौहिणी मिळून एकंदर अठरा अक्षौहिणी सैन्य सिद्ध झालें आहे. तरी युद्ध चमत्कार पहावयास तुम्हीं लवकर चलावें.'–भीमसेनाचें भाषण ऐकून मंदोदरीला हंसू आलें, व ती म्हणाली,—' अरे, एवढीं तर रावणापुढें वाजंत्रें वाजत होतीं. राम-रावणाच्या युद्धांत तर एकट्या रामाचें अठरा पद्में वानर-सैन्य असून, रावणाच्या सैन्याची गणतीच झाली नाहीं. तें युद्ध पाहून माझी तृप्ति झाली आहे.'–हें ऐकून भीम म्हणाला,— ' तुम्हांला यावयाचें नसेल तर मला परत जावयाची आज्ञा द्या.'–मंदोदरीनें त्याला स्नान व भोजन करून जावयास सांगितलें. त्याप्रमाणें तो एक तळयावर स्नान करावयास गेला असतां, तेथें पाय निसटून तो पाण्यांत बुडाला– तेव्हां जवळ असलेल्या कोळयांनीं त्याला तर ओढून काढिलें, व मंदोदरी जवळ आणिले. त्याची हकीकत ऐकून, मंदोदरी म्हणाली,—' भीमसेना, अरे तें तळें नव्हें. रामानें कुंभकर्णाला मारिलें; तेव्हां त्याच्या कपाळाची करवंटी तेथें पडली, तीत सांचलेलें पाणी आहे. तूं त्यांत बुडालास, तर आतां तुम्हीं लढणार तें काय ? असें म्हणून मंदोदरीनें भीमाला भोजन घालून त्याची पाठवणी केली. भीमानें कुरुक्षेत्रास येऊन, ती सर्व हकीकत कृष्णादिकांस सांगितली,

भीम गेल्यावर इकडे मंदोदरीच्या दोन्ही ओठांना कुष्ठ भरलें, याचें कारण असें कीं, तिनें राक्षस युद्धाची स्तुति करून भारतीय युद्धाची निंदा केली व त्या सैन्याला रावणाच्या वाजंत्र्यासमान मानिलें.पुढें भारतयुद्ध सुरू झाल्यावर असा चमत्कार झाला कीं, भीम, कौरवांच्या गजसैन्यावर चालून गेला, व त्यांतील कित्येक हत्तींना ठार करून कित्येकांना त्यानें आकाशांत फेंकून

दिलें. त्यांतील कांहीं अद्यापि फिरत आहेत, इतक्यांत कृष्णानें भीमाला सांगितलें कीं,-'कांहीं हत्ती फेकून लंकेचा तट पाडून टाक. त्याप्रमाणें भीमानें हत्ती फेकिले असतां ते लकेच्या बुरुजांवर आपटून तट पडूं लागला, व सर्व लंका गडबडून गेली. तेव्हां बिभीषण राक्षसांना घेऊन, काय प्रकार चालला आहे म्हणून पाहाण्यासाठीं बाहेर आला. तें आश्चर्य पाहून तो चकित होतो आहे, तो मंदोदरीही तेथें आली. तिला तो तट पडलेला पाहून कंप भरला आणि तिच्या हातांतील अमृताची कुपी खालीं पडली. मग बिभीषणानें राक्षस पाठवून, हे हत्ती कोठून येतात त्याचा शोध करविला. तेव्हां राक्षसांनीं शोध करून त्याला सांगितलें, कीं.-"भीमसेन कुरुक्षेत्रावरून हे हत्ती फेकीत आहे." हें ऐकून मंदोदरीला आश्चर्य वांटलें, व ती म्हणाली,-'मी अनेक युद्धें पाहिलीं. परंतु हा अपूर्व चमत्कार कोठें दिसला नाहीं, ज्याचा एवढा पराक्रम त्या भीमसेनाची धन्य होय, तसेंच मी भारतीय युद्धाची निंदा केलेली ऐकून, आम्हांला हा चमत्कार दाखविणारा कृष्ण परमात्माही धन्य आहे.' असें उद्गार तिच्या तोंडून निघाल्याबरोबर तिचें सर्व कुष्ट नाहींसें झालें असा भारत युद्धाचा महिमा आहे.

ही कथा ऐकून जनमेजय म्हणाला,-'मुने, हें सर्व ठीक आहे; परंतु तूं मघां सांगितलेंस कीं,-'भीमानें फेकिलेले हत्ती अजून आकाशांत भ्रमण करीत आहेत. हें मात्र मला खरें वाटत नाहीं.' असें तो म्हणत आहे. इतक्यांत व्यास तेथें प्रकट होऊन त्याला म्हणाला,-'अरे, अज्ञानपणें व्यर्थ ऋषि-निंदा करून पाप कां ओढतोस ?' असें सांगून व्यासानें मंत्रोच्चार केल्याबरोबर एक सुकलेलें हत्तीचें प्रेत, जनमेजयाजवळ येऊन पडलें. तें पाहून त्याला आश्चर्य वाटलें, व तो व्यासाला शरण गेला. जनमेजयानें पूर्वजांची अवगणना केल्यामुळें त्याला अठरा ब्राह्मणांची हत्या घडली, पण भारत संपूर्ण ऐकिल्यावर ती नष्ट झाली. ती अशी-त्यानें आरंभी काळ्या वस्त्रांत काळे तीळ बांधून ठेविले होते, ते एक एक पर्व संपल्यावर एक एक मूठ उजळ होत गेले तसेंच प्रत्येक पर्वाच्या शेवटीं दहा हात वस्त्र पांढरें होऊन, एक एक मेलेला ब्राह्मणहि जीवंत होऊन उठे. त्याचप्रमाणें त्याच्या एक एक अंगाचें कुष्ठही नाहींसें झालें. त्या अंगांचा क्रम ऐक. नखांपासून खेटापर्यंत एक अंग, तेथून गुढग्यांपर्यंत दुसरें, मांड्यांच्या सांध्यापर्यंत तिसरें तेथून कोंपर, भुजा व हात मिळून तीन अशीं एका बाजूचीं सहा अंगें झालीं

याप्रमाणें दुसऱ्या बाजूचीं सहा मिळून बारा झालीं. पुढें कमरेपासून नाभी-पर्यंत तेरावे अंग, नाभीपासून हृदयापर्यंत चौदावें, व तेथून कंठापर्यंत पंध-रावें, कंठापासून मुख सोळावे व नाकाच्या दोन नाकपुड्या हें सतरावें अंग झालें. शेवटीं वरच्या केशापर्यंत अठरावें अंग होय. यांपैकीं सतरा अंगाचें कुष्ठ नाहीसें होऊन गजभ्रमण खोटें मानिल्यामुळें कुष्ठ मात्र तसेंच राहिलें, व अठरावा ब्राह्मणही जीवंत होईना. त्याचप्रमाणें एक हात वस्त्रही शुभ्र झालें नाहीं. मग व्यासानें मंत्रप्रभावानें हत्ती पाडून त्याचा भ्रम दूर केला, व भारत श्रवण केल्यामुळें सर्व अंगें कुष्ठमुक्त होऊन अठरावा ब्राह्मणही उठला.

याप्रमाणें सर्व ब्राह्मण उठल्यावर जनमेजयानें त्यांना प्रेमानें अनेक दानें दिली व यज्ञ समाप्त करून सर्पांना सोडून दिले, ब्राह्मणांचीही बोळवण करून त्यांना निरोप दिला आणि मग तो सैन्यासहवर्तमान हस्तिनापुरास परत आला. (कित्येक पुराणांत सांगितलें आहे कीं जनमेजयाचें सर्पसत्र पिपीलिका गिरीवर झालें, एका पुराणांत तर ते अहिवंत पर्वतावर झाल्याचें सांगितलें आहे. दुसऱ्या एका पुराणाप्रमाणें या सत्राची समाप्ति भागीरथी-तीरावर झाली.) वैशंपायन म्हणतो,-'राजा, याप्रमाणें बदरिकाश्रमांत परा-शरानें ऋषींना कथा सांगितल्या, या भारतकथांच्या श्रवणानें सर्व पापें नष्ट होऊन मोक्षही मिळतो.' मधुकर कवि म्हणतो, 'मी आठव्या स्तबका-पासून येथपर्यंत भारताच्या आधारानें व नाना पुराणांचीं मतें घेऊन हा प्राकृत ग्रंथ रचिला आहे. तशीच पुढील कथाही मी सांगणार आहें, ती श्रोत्यांनीं एकाग्र चित्तानें ऐकावी,'

---

# अध्याय २३ वा

## गीतामाहात्म्य

### प्रथमाध्याय

सर्व भारत आणि नानापुराणांतरींच्या कथा ऐकून जनमेजयाचा सर्व

संदेह नाहीसा झाला. परंतु अनेक कथा अनेक ऋषींनीं सांगितलेल्या असल्या मुळें तेवढया सर्व अंतःकरणात ठसणें कठीण, असें वाटून तो वैशंपायनाला म्हणाला मुने तुझ्यासारखा वक्ता मिळाल्यामुळें मला एक प्रश्न विचारावासा वाटतो. मीं अनेक कथा ऐकल्या, तरी आतां शेवटी ज्याच्या योगानें संसार-बंधन तुटेल व स्थैर्य येईल, असा विद्वन्मान्य उपाय मला सांग हे ऐकून वैशं-पायन म्हणाला–'राजा, तूं मोठाच बिकट प्रश्न केलास. चित्ताला स्थैर्य येण्याला सर्वशास्त्रमय अशीं जी गीता, ती योग्य साधन आहे. ती कृष्णानें वेदवेदांगाचें मंथन करून अर्जुनाचा भ्रम दूर करण्यासाठीं त्याला सांगितली भीष्मपर्वाच्या प्रसंगात ती मी तुला सांगितलेली आहे तिचें माहात्म्य देवहि वर्णन करितात. तें गीतामाहात्म्य पद्मपुराणात व्यासानें जे सांगितलें तेंच तुला सांगतो.'

राजा, मूळ पार्वतीनें शंकराला महात्म्य सांगण्याची विनंति केली तेव्हां शंकर तिला म्हणाला–'पार्वति,पूर्वीं लक्ष्मीनेंही नारायणास हाच प्रश्न केला होता. ती म्हणाली, देवा या क्षीरसागरांत मूर्तिमंत त्रैलोक्य तुमच्या पाशी असतां ऐश्वर्याविषयीं तुम्ही इतके उदासीन कां असतां ? त्यावर नारा-यणानें उत्तर दिले. हें स्त्रिये, मी आत्मध्यानात निमग्न होऊन व तत्त्वाकडे दृष्टि लावून परात्पर असें जे महेश्वराचें तेज, त्याचे चिंतन करीत असतो. खरोखर मी निद्रित नाहीं. या महेश्वराच्या आश्चर्यानेंच मी सर्व जग व्यापून राहिलो आहे. व्यासानें वेदशास्त्रांचे मंथन करून गोतारचना केली. तिचा स्वीकार करून महानंदांत गर्क झाल्यामुळें मी तुम्हाला निद्रितसा भासतो" नारायणाचें भाषण ऐकून लक्ष्मी म्हणाली, "देवा,तुम्हीच सर्वांचे ध्येय असतां त्या गीतेचे ध्यान करतां; तरीं तीत असे कोणत्या स्वरुपाचे निरूपण आहे. ते सांगा'

शंकर पार्वतीला सांगतात, 'लक्ष्मीचा प्रश्न ऐकून नारायण पर आणि अपर असा दोन प्रकारचा आत्मा आहे. या पर व अपराच्या पलीकडचा साक्षी व निर्गुण असें जें माझें शिवस्वरुप त्या माझ्या दिव्यमूर्तिचें निरूपण गीतेत केलें आहे. संसारात विषरूप असा जो माझा पाश बंध आहे, तो या गीतेंच्या अभ्यासानें तूटून जातो. हे नारायणाचें वचन ऐकून लक्ष्मीनें त्याला इतिहास प्रधान असें गीतेचें माहात्म्य विचारलें. तेव्हां नारायण म्हणाला. पहिले पांच अध्याय ही गीतामूर्तिचीं पांच मुखे असून, पुढचें दहा अध्याय हे तिचें हात

सोळावा अध्याय उदर आणि सतरावा अठरावा हें त्या गीतामूर्तीचें चरण होत.अशी अष्टादशाध्यायात्मक ईश्वराची वाङमय मूर्तिच आहे. तिच्या एका अध्यायाचे किंबहूना अर्ध्या श्लोकांचे पठण करणाराहि संसारदुःखापासून मुक्त होतो.

## श्लोक

अत्राध्ययं तथा चार्धं श्लोकं श्लोकार्धमेव च ।
अभ्यासति सुमेधा यो मुच्यते भवसागरात् ॥१॥

## सुशर्म्याची कथा

एका दुष्टबुद्धि व पापात्म्य ब्राह्मणाच्या कुलांत सुशर्मा नांवाचा पुरुष जन्मास आला. तो जपजाप्य किंवा अतिथिपूजन यापासून आलिप्त राहून सदैव विषयासक्त आणि कृषिकर्मांत व्यग्र असे. एकदा तो रानात पानें आणावयास गेला असतां, एका आश्रमाजवळ त्याला कालसर्पानें दंश केला तेव्हां तो मरण पावला व नरकयानना भोगल्यावर तो बैलाच्या जन्मास आला. त्याला एका पंगूनें घेऊन अर्जुनाकडे नेलें. व वेताच्या छडचा मारून नाचवूं लागला याप्रयाणें त्याला नाचवीत असता एकदा तो बैल मूर्छा येऊन डोळें फिरवून जमिनीवर पडला. त्याच्या तोंडालाही फेसही आला, परंतू तेथें खेळ पहावयास जमलेल्या अनेक लोकांपैकी कोणीही त्याला आपले पुण्य द्यावयास तयार न झाल्यामुळें त्याचे प्राणोत्क्रमण होईना. तेव्हां तेथें एक वेश्या आली. व तिनें आपलें पुण्य त्याला दिले त्याबरोबर तो मरण पावला. मग यमदुतांनी त्याला यमलोकीं नेऊन यमाच्या पुढें उभे केले तेव्हां यम म्हणाला, हा गणिकेनें दिलेल्या पुण्यामुळें पवित्र झाला आहे, तरी याला सोडून द्या, दूतांनी त्याला सोडल्यावर तो एका उत्तम कुळांत जन्मास येऊन जातिस्मर झाला. पुढें मोठा झाल्यावर तो त्या गणिकेच्या घरीं जाऊन तिला म्हणाला 'तूं मला पुण्य दिलेस तें कसले होते?' वेश्या म्हणाली हा माझा पोपट दररोज जे श्लोक म्हणतो तें पवित्र समजून त्याच्या श्रवणाचे पुण्य मी तुला दिले नंतर दोघेही त्या श्लोकांची माहिती शुकाला विचारू लागला, तेव्हां शुक म्हणाला मी पूर्वजन्मी मोठा शास्त्रोक्त ब्राह्मण होतो. परंतु इतर पंडितांचा मी फार द्वेष करीत असें त्या दोषास्तव मरणानंतर मी शुकाच्या जन्मास आलो. मग मला एका ऋषीनें बाळगिले त्याच्या घरी मी गीता श्रवण करीत असे.

तो ऋषि, गीतेचा पहिला अध्याय आपल्या मुलाला पढवीत असता मलाही तो पाठ झाला. पुढें मला चोरांनी चोरून तुजकडे दिले. मी या प्रथमाध्यायाचा रोज पाठ करीत असतो ?

हे शुकाचे भाषण ऐकून वेश्या व ब्राह्मण या दोघांनाही आनंद झाला. व त्यानी गीतेच्या पहिल्या अध्यायाची मनापासून स्तुति केली. मग ती दोघेही नित्य या अध्यायाचें पठन करूं लागलीं. असे प्रथमाध्यायाचें माहात्म्य विष्णूनें लक्ष्मीला व पुढें शंकरानें पार्वतीला सांगितले.

## दुसऱ्या अध्यायाचें महत्म्य

दक्षिण दिशेस पुरंदर नामक नगरांत देवशर्मा नांवाचा वेदशास्त्रज्ञ ब्राह्मण रहात असें. तो यज्ञ करून अतिथीचा सत्कार करी व त्यांना अन्नोदक दानानें तृप्त करी. त्याप्रमाणें देव, पितर, यांचेही तो नित्य संतर्पण करीत असे परंतु त्याला शांति मिळेना. म्हणून शांति प्राप्त होण्याकरितां तो साधु सेवा करूं लागला. याप्रमाणें बराच काल गेल्यावर एके दिवशीं त्याच्या घरीं परम ज्ञानी व मुक्तसंग असा योगी आला. त्याची दृष्टी नासाग्री लागलेली असून तो आनंदांत तल्लीन झालेला असे. देवशर्म्यानें त्याची पूजा करून त्याला शांतीचा उपाय विचारला. तेव्हां योगी म्हणाला,–' सोपानपुरांत मित्रवंत नांवाचा एक धनगर आहे, तो तुला हा उपाय सांगेल.'–देवशर्म्यानें तें ऐकल्यावर लगेच सोपानपुरचा मार्ग धरिला तेथें गेल्यावर त्याला फार सुंदर वन आढळलें. त्यांत सुगंधि वायु वहात असून ते सर्व वन भ्रमरांच्या गुंजारवानें अगदीं गजबजून गेले होते, त्यांत गेल्यावर देशवर्म्याला तेथें एका मोठ्या शिलेवर बसलेला मित्रवंत दिसला. त्याला पाहून देशवर्म्याला परम आनंद झाला, मित्रवंताजवळ सर्व प्राणी वैरभाव टाकून प्रेमाने रहात असत हें सर्व पाहून देवशर्मा हात जोडून त्याच्याजवळ गेला आणि म्हणाला,-मित्रवंता, या संसारांत आत्मज्ञान होऊन उपदेश कर.'– हे ऐकून मित्रवंतानें शांति मिळेल, असा उपाय जाणण्याची मला इच्छा आहे, तरी कृपा करून. मला उपदेश कर.' हें ऐकून मित्रवंतानें क्षणभर विचार करून उत्तर दिले, पूर्वी प्रतिष्ठान नामक नगरांत दुर्धर नामक विद्वान ब्राह्मण होता. तो त्रिविक्रम नामक राजाची सेवा करून व उदरभरणासाठी दुष्टप्रतिग्रह घेऊन रहात असे. कालेकरून तो मृत्यु पावल्यावर यमदूतांनी त्याला अनेक नरक भोगवून

शेवटीं दुर्वृत्त ब्राह्मणाच्या कुलांत त्याला पुनः जन्मास घातले. तेथेंही जन्मांतरींच्या संवयीमुळें तो दुष्टपरिग्रह घेऊं लागला. पुढें त्यानें एका अधम कुलांतील कन्येशीं विवाह केला. कांहीं दिवसानीं ती स्त्री यौवनारूढ झाल्यावर तिला आपल्या पतीचा भिक्षुकपणा सहन न होऊन ती परपुरुषासक्त झाली, आणि अभक्ष्यभक्षण करूं लागली. पुढें काहीं कालानें दोघेंही मरण पावलीं परंतु त्याचें वैर कायम राहिल्यामुळें अनेक नरकयातना भोगल्यावर तो ब्राह्मण वाघाच्या जन्मास गेला, व त्याची स्त्री शेळी झाली. मग पूर्व जन्माला स्मरून तो वाघ शेळीला खावयासाठीं धावून आला असतां, शेळी प्राणरक्षणास्तव पळत पळत नदीतीरावर आली. इतक्या सुमारास मीही आपल्या शेळ्या तेथें नेल्या. ती शेळी नदीवर आल्याबरोबर निर्भय होऊन उभी राहिली त्याप्रमाणें वाघही तिच्या मागून नदीवर आल्यावर क्रूरपणा टाकून शांत झाला. मग शेळी त्याला म्हणाली, ' अरे, येथें येऊन उगाच कां बसलास? आतां माझें मांस भक्षण कर,' वाघानें उत्तर दिले, ' अगे, तुझा मृत्यु जवळ आला होता; परंतु या ठिकाणीं आल्याबरोबर माझी वृत्ति अगदींच पालटून गेली. तरी याचे कारच मला सांग.' तिलाही तें कारण समजेना. म्हणून ती दोघें मला मित्रवंताला त्याचें कारण विचारूं लागली. पण ब्राह्मणा, मलाही कांहीं तें समजेना. तेव्हां आम्हीं तिघेही एका वृक्षाखालीं गेलों असतां, त्या वृक्षावर एक वानर बसला होता, त्याला असे होण्याचें कारण आम्हीं विचारलें तेव्हां तो म्हणाला, येथे जरा पलीकडे त्र्यंबकेश्वराचें ज्योतिर्लिंग आहे, तेथें पूर्वी सुकर्मा नांवाचा एक सुज्ञ ब्राह्मण शिवाची उपासना करीत असे एकदां त्याच्याकडे एक अतिथि आला त्याचें स्वागत व पूजन करून सुकर्म त्याला म्हणाला त्र्यंबकेश्वरा, मला कर्माचें मूळ माहीत नाहीं. त्याचें ज्ञान व्हावें म्हणून मी शंभूची सेवा करीत असतों. त्या पुण्यामुळें आज तुझें दर्शन झालें. तरी तें ज्ञान तूं मला सांग.' हें ऐकून अतिथि ऋषीनें संतुष्ट होऊन त्याला ज्ञानोपदेश केला व तेथील शिलेवर गीतेचा दुसरा अध्याय लिहून त्याचें पठन करावयास त्याला सांगितलें व आपण गुप्त झाला. तेव्हांपासून सुकर्मा नित्य त्या दुसऱ्या अध्यायाचा पाठ करूं लागल्यामुळें त्याला ज्ञान होऊन या वनांतील सर्व प्राणी निर्वैर झाले. व त्यांना क्षुधा व तृषा यांची बाधा होत नाहीं झाली. ब्राह्मणा, वानराचें भाषण ऐकिल्यावर मी शेळी व वाघ यांना बरोबर घेऊन त्या शिलेजवळ जाऊन दुसऱ्या अध्यायाचें पठन करूं लागलों त्या-

मुळें मी असा तपस्वी झालों आहे. तरी, ब्राह्मणा, तूहीं ह्या अध्यायाचें नित्य पठन करीत जा, म्हणजे तुला ज्ञानप्राप्ति होऊन शांति मिळेल.

## तिसऱ्या अध्यायाचें मांहात्म्य

विष्णु लक्ष्मीला म्हणाले, ' पूर्वी जनस्थानीं जट नांवाचा एक कौशिक गोत्री ब्राह्मण आपल्या कर्माचा त्याग करून उदीम धंदा करीत असे. तो परदारासक्त व मद्यपी होऊन द्युत खेळे,व चोरीही करीत असे,एकदां याज्ञिकांचें कार्य करून तो उद्योगासाठीं बाहेर गांवी गेला, व तेथून अगरबत्त्या, चवऱ्या, कस्तुरी इत्यादि जिन्नस घेऊन तो आपल्या गांवी यावयास निघाला. वाटेत रात्री अंधार पडला असतां, चोरांनी त्याला ठार मारुन त्याच्याजवळ असलेले द्रव्य व माल नेला, ब्राह्मण मेल्यावर पूर्वीच्या पापामुळें ताम्रमुखी, क्रूर व कृशशरिराचा असा ब्रह्मराक्षस होऊन तो हिंडू लागला. इकडे त्याचा धमात्मा नांवाचा धर्मशील पुत्र, बापाचा शोध करीत असतां,जडाच्यां स्नेह्यांनीं त्याला त्याची हकीगत कळविली. तेव्हां त्यानें फार शोक केला. शेवटी विचार हरण करून पित्याचीं उत्तरक्रिया करून तो काशीस जावयास निघाला. वाटेत जात असतां ज्या वृक्षाखाली त्याच्या चोरांनी मारिलें होतें, त्या झाडाखालीं त्यानें मुक्काम केला. आणि संध्यावंदन उरकून गीतेच्या तिसऱ्या अध्यायाचा जप केला, त्याबरोबर आकाशांत प्रचंड शब्द होऊन, त्याचा पिता भयंकर पिशाच्च रूपानें त्याच्यापुढें येऊन उभा राहिला. धर्मात्मा त्याला पाहुन भयानें गांगरून जात आहे. इतक्यांत सर्व आकाश घंटायुक्त विमानांनी युक्त होऊन देव, गंधर्व व ऋषीं यांसह त्याचा पिता पीतवस्त्र परिधान करून एक विमानात बसलेला त्याच्या दृष्टीस पडला. त्याला नमस्कार करून धर्मात्म्याला हा काय चमत्कार आहे, म्हणून त्याला विचारले. तेव्हां त्याचा पिता म्हणाला –'मुला, तूं गीताध्यायाचा जप केल्यामुळें, मी ह्या घोर दुःखापासून मुक्त झालो. तुला त्यामुळे काशीयात्रेचें पुण्य आपोआपच मिळाले आहे, तरी तूं आता घरीं जा. हे ऐकून धर्मात्मा पित्याला म्हणाला,–' पित्या, आणखी कांही आज्ञा असल्यास सांगावीं. तेव्हा पिता म्हणाला,–' पुत्रा, ज्या पुण्येंकरून तूं माझा उद्धार केलास, त्याच पुण्याच्या योगानें आपल्या कुलात जें कोणी असेंच पतित झाले असतील त्यांचा तूं उद्धार कर. म्हणजे तें यातनातून सूटन विष्णुलोकांस जातील.' पित्याची आज्ञा मान्य करून व त्याचा

आशिर्वाद घेऊन, धर्मात्मा घरी गेला. व पित्याच्या उपदेशाप्रमाणें नित्य चित्तानें तिसऱ्या अध्यायाचा जप करून त्याचें पुण्य सर्वांना दिले. तेव्हां विष्णूदूत यमलोकास गेले. व आम्हाला विष्णूनें येथे पाठविलें आहे. असें म्हणून त्यांनी विष्णूचा निरोप कळविला. मग त्याप्रमाणें यमानें त्या सर्व दुःख भोगीत असलेंल्या प्राण्याना घेऊन, तो विष्णूलोकांस गेला. तेथे शेष नारायणवर विराजमान झालेल्या अनेक कोटीसूर्यांच्या कीर्तीनें युक्त अशा श्रीविष्णूला नमस्कार करुन यमानें त्याचे स्तवन केले, तो म्हणाला, जगद्गुरो, तूं सर्व विश्व निर्माण करूनही स्वतः निर्भय राहिला आहेस चारी वेद तुझ्या मुखापासून उत्पन्न झालें असून तूं विश्वव्यापक व मोठ्या मोठ्या योग्यानाही अगम्य असस, तूच दैत्यदानवांचा नाश करून साधु रक्षण करतोस. विश्वाची उत्पत्ती, रक्षण लय तूच करतोस. तूं आनंदाचा सागर असून परम प्रेमळ व भयानक आहेंस. सत्व रज तम या तिन्हीं गुणाच्या पलीकडे तुझे स्वरुप असून कोणालाच ते दिसत नाही, तुझ्या अनंत गुणाचें वर्णन करणें अशक्य असल्यामुळें, शेवटी सर्वांना मौनच धारण करावे लागतें, हे देवाधिदेवा, तुझ्या आज्ञेवरुन या पाप्याना नरकातून सोडवून येथें आणले आहे. ही स्तुति ऐकून विष्णू मधुरवाणीनें म्हणाला, हें श्राद्धदेवा गीतेचा तिसरा अध्याय जे कोणी पठण करतील त्यांचा पुर्वजांचा तू असाच उद्धार कर तुजवर सर्व विश्वाचा भार आहे खरा पण या नियमाप्रमाण तुही वागत जा. जशी विष्णूची आज्ञा ऐकल्यावर यम धर्मात्माच्या पूर्वजाना विष्णू-लोकी सोडून परत आपल्या स्थानी निघून गेला. अशी कथा विष्णूनें लक्ष्मीला व शंकरानें पार्वतीला सांगितली.

---

## अध्याय ३० वा



### गीतामाहात्म्य-पुढे चालूं

विष्णू लक्ष्मीला म्हणाले, पूर्वी भागीरथीच्या तीराजवळ वाराणसी नगरीत भरत नांवाचा ब्रह्मचारी, विष्णूची भक्ति करून गीतेच्या चतुर्थी

अध्यायाचा जप करीत असें, त्याच्या तपामळे तेथील सर्व प्राणी निर्मत्सर झालें होतें, एके दिवशी ब्रम्हचारी देवदर्शनार्थ बाहेर निघाला असतां वाटेत दोन बोरी त्याला आढळल्या. त्याच्या छायेत विश्रांतिसाठी बसून त्यानें गीतेच्या चतुर्थाध्यायाचें पठण केले. त्याबरोबर असा चमत्कार झाला की त्या बोरी उलथून पडल्या. आणि त्यातून दोन कन्या निघून पाया पडू लागल्या. व त्याला म्हणाल्या,–' हें धर्मशील ब्राह्मणा, तुझ्या प्रसादानें आज आमची मुक्तता होऊन आम्ही कृतार्थ झालों. ' हें ऐकून भरतानें त्याचे पूर्वीचे वृत त्याना विचारले. तेव्हा त्या म्हणाल्या,–'मने, पूर्वीं गोदावरीच्या तीरावर छिन्नपाप नावाचे पुण्यप्रद तीर्थ होते. तेथे सत्यतपा नांवाचा तपस्वी उग्र तपश्चर्या करीत असे.तो उष्णकाली पंचाग्निसाधन, पावसाळयात वृष्टी सहन, व हिवाळयात उदकवास करीत असे. त्याचें हे दुष्कर तप पाहून इंद्राला हा आपलें स्थान घेतो की, काय अशी भीति पडली, व तो त्याच्या तपाला विघ्न आणण्याचा विचार करू लागला. मग एकदा त्यानें आम्हाला बोलावून, सत्यतप्याचे तपोबल नष्ट करण्याची आज्ञा केली. त्या आज्ञेप्रमाणें आम्ही इतर अप्सरांसह सत्यतप्या-जवळ आलो. आणि सुस्वर स्वगांवर गाऊन नृत्य करावयास आरंभ केला. आपला हा छलवाद पाहून सत्यतपा रागावला, आणि त्यानें आम्हाला शाप दिला कीं तुम्ही दोघी गंगेच्या तीरावर बोरी होऊन रहाल शाप ऐकून आम्ही त्याचे पाय धरिलें, व त्याची प्रार्थना करून म्हटले [illegible] खरोखर अपराध नाहीं. इंद्राच्या आज्ञेवरून आम्ही येथें आलो, हें ऐकून सत्यतप्याला दया आली, आणि त्यानें आम्ही उःशाप दिला की, भरत येऊन तुम्हाला मुक्त करील.त्याप्रमाणें महाराज, तुम्ही आज येथें येऊन व गीता चतुर्थाध्यायाचा जप करून आमचा उद्धार केला. अशी आपली हकीगत सांगून त्या अप्सरा त्या अध्यायाचा जप करीत निघून गेल्या. असे हे चतुर्थाध्यायाचें महात्म्य आहे.

## पंचमाध्यायमहात्म्य

मद्रदेशांत पुरुकुत्स नामक नगरांत, पिंगल नांवाचा ब्राह्मण रहात असे. त्यानें आपला कुलाचार सोडन संगीताअध्ययन केलें त्यायोगेचें राज. सभेंत त्याला मान मिळून तो गर्विष्ठ झाला. आणि परदारासक्त होऊन, राजाला

लोकांची छिद्रें सांगू लागला. त्यानें एका हीन कुलातील कन्येशी विवाह केला तीही परपुरूषासक्त होऊन पतीला विघ्नसमान मानी. एके दिवशी पति निजला असतां तिनें त्याचा शिरच्छेद केला. व प्रेत घरांत पुरून टाकिले, याप्रमाणें तो मेला असतां यमदूतांनी त्याला दीर्घकाल नरकांत टाकून शेवटी गिधाडाच्या जन्मास घातलें. इकडे त्याची स्त्रीही भगंदर रोग होऊन मरण पावली, व भयंकर नरक भोगून त्याच रानांत एक पोपटी होऊन फिरू लागली. एके दिवशीं त्या गृध्रानें तिला पहाताच पुर्वीचे वैर स्मरून तिजवर झडप घातली, व तिला नखांनी फाडून टाकिले. तेव्हां पाण्यानें भरलेली एक करोटी खाली होती, तींत ती छिन्नभिन्न होऊन पडली, गृध तिच्या मागून धांवत आला व तोही थकल्यामुळें तेथेच मरून पडला, याप्रमाणें त्या नरकपालांतील पाण्यात स्नान घडल्यामुळें यमदूतांनीं त्यांना यमापुढें नेलें. तेव्हां यम म्हणाला– 'अहो, याचें सर्व दुष्कर्म क्षय पावले आहे, आतां यांना जो लोक पाहिजे असेल तेथे नेऊन पोचवा, हे ऐकून ते स्वत: यमाला म्हणालें. महाराज, आमचें येवढें पाप असतां, आम्हास उत्तम लोकास पाठविण्याचें कारण काय? त्यावर यमानें उत्तर दिलें. याचे कारण असें कीं, पुर्वी गंगेच्या कांनी बिदु नावाचा ब्राह्मण वासनात्याग करून गीतेच्या पाचव्या अध्यायाचा जप करीत असे. त्याला मरणोत्तर उत्तम लोकांची प्राप्ती झालीं, त्याचे कपाल येथें पडले होतें. त्यातील पाण्यात अंतकाळीं स्नान झाल्यामुळे तुमच्या पापाचा क्षय होऊन तुम्हाला इष्टलोकांची प्राप्ती व दिव्य भोग मिळालें आहेत, असे सांगून यमानें त्यांना विष्णुलोकी पाठवून दिलें,

## षष्ठाध्यायमहात्म्य

गोदावरींच्या कांठी प्रतिष्ठान नांवाचें पवित्र नगर होते. तेंथे पिप्पलेश्वर नांवाचें शिवाचें एक स्थान होते. त्या ठिकाणीं गोदावरीचें पाणी कमलांचें पराग त्यांत पडल्यामुळें तें सुगंधि झाले होते. अशा त्या रम्य ठिकाणी मलय पर्वतावरील शीतल वायु वहात असे ज्ञानश्रुति नावाचा तेथील राजा कर्णापारखा दाता असून त्याने यज्ञांन देवांना संतुष्ट केले म्हणून देव त्याला वरदान देण्यासाठी हंसरूपानें त्याच्याकडे जावयास निघाले. वाटेंत येतांना यातील काही हंस म्हणालें हा ज्ञानश्रुति राजा, यज्ञ करून इंद्रपदही घेईल. त्यावर दुसरे हंस बोलले 'खरें पण रैभ्यमुनि त्याच्याहून मोठा तपस्वी

आहे. याप्रमाणें हंसामध्ये झालेले संभाषण राजानें ऐकिलें. आणि लगेच आपल्या सारथ्याला रैभ्य मुनिचा शोध करावयास पाठविले. सारथ्यानें मणिकेश्वरी रैभ्य होता, त्याचा शोध करून राजाला येऊन कळविलें तेंव्हां ज्ञानश्रुति मोठ्या उत्साहानें त्याला भेटावयास गेला. तेथें गेल्यावर त्याला नमस्कार करून राजानें विचारिलें. महाराज आपण कोणत्या तपाचें आचरण करिता ? रैभ्यानें उत्तर दिलें राजा मी गीतेच्या सहाव्या अध्यायाचा जप करितो, त्याच्या प्रभावानें देवांनाही मी आधीन करून घेतलें आहे. रैभ्याचें भाषण ऐकून ज्ञानश्रुतिनें त्याला गुरु समजून त्याच्या चरणाचें वंदन केलें आणि त्याच्यापासून त्या अध्यायाचा उपदेश घेऊन त्याच्या प्रभावानें तो पहिल्याहूनहि श्रेष्ठ झाला. याप्रमाणें षष्ठाध्यायाचें महात्म्य सांगून शंकर पार्वतीला सप्तमाध्यायाचें महात्म्म सांगू लागला

## सप्तमाध्याय महात्म्य

पाटलीपुत्र नामक नगरांत शंभुकर्ण नांवाचा ब्राह्मण रहात असे. त्यानें वैश्यवृत्ति स्वीकारून अपार द्रव्य मिळविलें, व राजे लोकांना अनेक मेजवान्या दिल्या. परंतु देव पितरांचीं मात्र त्यानें कधीं पूजा केली नाहीं. एकदां तो कोणाच्या विवाह प्रसंगानें दुसऱ्या गांवीं गेला असतां. तेथें रात्रीं शयनावर काल सर्पानें दंश केल्यामुळें तो मरण पावला. मरणोत्तर तो यमलोकीं गेला, व तेथें कृतकर्मांबद्दल अनेक यातना भोगून शेवटीं आपल्या द्रव्यराशीं जवळ सर्प होऊन राहिला. याप्रमाणें बराच काल गेल्यावर त्यानें आपल्य मुलांच्या स्वप्नांत जाऊन त्यांना या द्रव्याची माहिती दिली. परंतु बहुतेक मुलांनीं प्रातःकालचें स्वप्न खरें नव्हें, असें ठरविलें. एक पुत्र मात्र आपल्या स्त्रीला घेऊन स्थान शोधीत गेला. त्याला तें वारूळ सांपडल्यावर तो आंत खणूं लागला. त्याबरोबर आंतील सर्प फूत्कार करून बाहेर आला, आणि मनुष्यवाणीनें त्याला म्हणाला,—'अरे तूं कोणाचा कोण ? व माझें द्रव्य काय म्हणून घेत आहेस ?'—मुलानें उत्तर दिलें, 'महाराज, मी तुमचा मुलगा आहे.'—सर्प म्हणाला,—'मुलगा असलास, तर मला या दुष्ट योनींतून मुक्त कर.'—हें ऐकून मुलानें त्याला त्याच्या मुक्तीचा उपाय विचारला. तेव्हां तो म्हणाला,—'मुला, माझा श्राद्धदिवस येईल त्या दिवशीं तूं गीतेच्या सातव्या अध्यायाचें श्रवण व पठण कर, म्हणजे मीं मुक्त होईन.' हें ऐकून तो मुलगा

द्रव्य घेऊन घरीं आला, व पित्यानें सांगितल्याप्रमाणें सप्तमाध्यायाचा जप करतांच त्याचा उद्धार झाला.

## अष्टमाध्याय महात्म्य

दक्षिण देशीं आमर्दक नगरांत भावशर्मा नांवाचा ब्राह्मण होता. तो मद्यमांस भक्षक, स्त्रीलंपट व दुराचारी होता. एकदां अभक्ष्य भक्षणामुळें अजीर्ण होऊन तो मरण पावला, व ताडाच्या वृक्षाचा त्याला जन्म आला. असें झालें असतां एक ब्रह्मराक्षसाचें जोडपें छायेसाठीं ताडवृक्षाखालीं येऊन बसलें. हें ब्रह्मराक्षसाचें जोडपें पूर्वजन्मीं ब्राह्मण होतें, पण नीच जातीकडचा प्रतिग्रह घेऊन, त्याबद्दल पुरश्चरण न केल्यामुळें तीं ब्रह्मराक्षस झालीं होतीं. तेथें आल्यावर त्यांतील स्त्रीने पुरुषाला विचारिलें,—' आपली या पिशाच्च योनींतून सुटका केव्हां होणार ?'-ब्रह्मराक्षसानें उत्तर दिलें,— ' ब्रह्मज्ञानाशिवाय आम्हांला मुक्ति मिळावयाची नाहीं, अध्यात्मज्ञान चांगलें होईल तेव्हांच उत्तम लोकाची प्राप्ती होते.'-हें ऐकून स्त्रीनें विचारिलें,— ' हें ब्रह्म म्हणजे काय ?'-हें शद्व ती बोलते आहे तों, असा चमत्कार झाला कीं, तिच्या तोंडून जे शद्व निघाले, त्यांनीं गीतेच्या आठव्या अध्यायाच्या प्रथम श्लोकाचें ' किं तद्ब्रह्म किमध्यात्म ' असें चरणार्थ झालें, व तो ताडवृक्ष कडाडून पडून त्यांतून एक ब्राह्मण निघाला. दिव्य देहधारी तो ब्राह्मण पुढें उभा राहिला असतां, पुनः त्या स्त्रीनें ' किं तद्ब्रह्म किमध्यात्म ' असा प्रश्न विचारिला. त्याबरोबर त्या ब्रह्मराक्षसांनांही दिव्य देह प्राप्त होऊन, त्यांना स्वर्गास न्यावयासाठीं विमान आलें. नंतर तो ताडवृक्षांतून बाहेर पडलेला भावशर्मा ब्राह्मण वाराणसी क्षेत्री गेला, व तेथें त्या श्लोकाचा जप केल्यामुळें तो आपल्या पूर्वजांसह अंतीं वैकुंठ लोकीं गेला. असा हा आठव्या अध्यायाचा महिमा आहे.

## नवमाध्याय माहात्म्य

नर्मदा नदीच्या कांठीं माधव नांवाचा ब्राह्मण स्वर्गप्राप्तीच्या इच्छेनें यज्ञ करीत असतां, त्यातील बोकड मनुष्यवाणीनें त्याला म्हणाला,—' अरे यजमाना, क्षणिक स्वर्गसुखाला भुलून, तूं ' अहिंसा परमो धर्मः ' या महातत्वाला विसरतो आहेस. अरे, पूर्वी मीहि तुझ्यासारखा ब्राह्मण होतो. तेव्हां मी पुत्र व आरोग्य यांच्या इच्छेनें बलिदान केलें असतां, बली दिलेल्या बोक-

डाच्या परमसाध्वी मातेनें मला शाप दिला कीं,--' तुला पशुयोनि प्राप्त होईल.'-त्याप्रमाणें प्रथम वानर व मग श्वान होऊन आणि अपार दुःखें भोगून, शेवटीं हा बोकड झालों आहे.'-हें बोकडाचें भाषण ऐकून माधवानें त्या बोकडाला सुखप्राप्तीचें साधन विचारिलें. तेव्हां बोकड म्हणाला,--' कुरुक्षेत्राजवळ पुरी नांवाच्या नगरांत चंद्रवर्मा नांवाचा राजा राज्य करीत होता. तो एकदां सूर्यग्रहण प्रसंगीं लोहाचा पुतळा एका ब्राह्मणाला दान देत असतां, त्या पुतळचानें मनुष्यवाणीनें त्या ब्राह्मणाला म्हटलें,--' ब्राह्मणा, लोभानें तू मला दान घेतो आहेस, पण माझा प्रताप सहन करण्याचें सामर्थ्य तुला आहे ना ? नाहींतर व्यर्थ पातकांत पडून मरशील.'-ब्राह्मणानें त्याचें म्हणणें मान्य केलें, व राजापासून त्या पुतळचाचें त्यानें विधियुक्त दान घेतलें. दानविधि आटोपल्याबरोबर त्या पुतळयांतून दोन भयंकर स्त्री-पुरुषें बाहेर पडलीं. तेव्हां त्यांना पाहून सर्वच भयानें कांपूं लागले. परंतु ब्राह्मणानें गीतेचा नववा अध्याय तत्काल जपल्यामुळें, त्यातील अक्षरां इतकें देवदूत तेथें उत्पन्न झाले, व त्यांनी त्या भयंकर स्त्रीपुरुषांना तेथून पळवून लाविलें. तेव्हां हा काय चमत्कार आहे, असें राजाने विचारल्यावरून ब्राह्मण म्हणाला, -' अहो ! हीं घोर स्त्री-पुरुषें म्हणजे निंदा आणि द्वेष होत. गीतापाठामुळें तीं नाहींशी झालीं.-असा नवव्या अध्यायाचा महिमा आहे.

## दहाव्या अध्यायाचा महिमा

शंकर पार्वतीला म्हणाले,-'गिरीजे, एकदां कैलासाच्या पठारावर नाग पंचकाच्या वनांत मी एका शिळेवर बसलो असतां, एकाएकी मोठा शब्द होऊन पर्वतावर असा एका काळचा रंगाचा पक्षी माझ्यापुढे येऊन उभा राहिला. त्यानें दिव्य कमल बरोबर आणिले असतां, ते मला अर्पण केलें. तेव्हां मी त्याला तूं कोण? म्हणून विचारलें असतां, तो म्हणाला, मी ब्रह्म-देवाचें वाहन हंस असून मानससरोवराहून येत असता वाटेत सौराष्ट्र देशांत कमलवन लागले. त्यातील कमलें घेऊन आकाशांत उड्डाण केले असतां माझें शरीर काळे होऊन मी जमिनीवर पडलो. हा काय प्रकार आहे असें म्हणून मी मनात विचार करीत आहें. इतक्यात त्या कमलातून कोणी मनुष्यवाणीनें मला म्हणाला, 'अरे, तूं माझ्या स्थानीं मला घेऊन जाशील, तर मी त्याचे तुला कारण सांगेन, हे ऐकून मी त्या कमलाला घेऊन पुनः सरोवरावर

आलो, तेथे कमलदेवता होती ती मला म्हणाली, 'तूं माझा अपमान करून उडालास, त्यामुळें तुझे शरीर काळें होऊन तू खाली पडलास, मी पुर्वी ब्राह्मणाची पत्नी असून सारिकेला शिकविताना पतिसेवेत माझ्या हातून अंतर पडले त्यामुळें 'तू सारिकाच होशील' असा पतीनें मला शाप दिला, त्याप्रमाणें मी सारिका झालें असतां एका ब्राह्मणकन्येनें मला पाळून गीतेचा दहावा अध्याय शिकविला. त्या पुण्येकरून मी अप्सरा झाले, व या सरोवरात जलक्रीडा करुं लागले. तेव्हां दुर्वास ऋषी तेथे आला असतां, मी नग्न असल्यामुळे पंच कमलमय पद्मिनीचा देह मी धारण केला तें पाहून ऋषीनें मला शाप दिला, कीं, 'शंभर वर्षं येथें असाच रुपाने रहा.' ती शंभर वर्षे आतां भरलीं. असे म्हणून व मला कमल देऊन ती स्वर्गांत गेली, हे कमल मी तुम्हांला दिलें. असें म्हणताच हंस पुन. शुभ्र झाला. व ब्रह्मलोकी गेला असे दहाव्या अध्यायाचें महात्म्य आहे.

---

# अध्याय ३१ वा



## गीता माहात्म- पुढे चालू

शंकर पार्वतीला म्हणाले,–'पार्वती, आतां तुला गीतेच्या अकराव्या अध्यांयाचें माहात्म सांगतो, प्रणिता नदीच्या तिरीं मेघकर नांवाचें एक नगर आहें. तेथे एक गीतापाठक ब्राह्मण रहात असे. सिंहस्थी एकदां तो तीर्थयात्रेला निघाला असतां एका शून्य गृहात आपल्या सोबत्यांसह विश्रांतिसाठी राहिला. तेथे रात्री एक राक्षस आला. व त्यानें त्या प्रवाशांना खाऊन टाकिले पण ब्राह्मण गीतापाठक म्हणून त्याला वगळिलें. तें घर राक्षसाचें असून, तो तो नित्यश: प्रवाशांना असेच खात असे; परंतु या ब्राह्मणाला त्यानें वगळिल्यामुळें गांवातील लोकांना आश्चर्य वाटलें, व त्यानीं त्या ब्राह्मणाला राक्षसाची हकिगत सांगितली. ते म्हणाले, 'या गांवात पूर्वी एक शेतकरी असे. त्यानें परोपकार म्हणून कसा तो केला नाहीं. तेव्हां एका तापस्यानें त्याला, तूं येथेच राक्षस होऊन रहाशील.' असा शाप दिला. शाप ऐकून, तो त्या

तपस्व्याच्या चरणी लागला असतां, तपस्व्यानें सांगितलें, गीतेचे अध्ययन करणारा कोणी येऊन विश्वदर्शन नामक अकराव्या अध्यायाचा जप करून सात वेळा उदक मंत्रील व तुजवर प्रोक्षण करील. तेव्हां तूं यातून मुक्त होशील. ग्रामस्थानें असे सांगितलें असतां ब्राह्मण म्हणाला,–असें आहे तर निश्चयानें मी या राक्षसाचा उद्धार करीन. असें म्हणून मंडळी गेल्यावर त्या ब्राम्हणानें अभिमंत्रीत उदक राक्षसावर शिंपून त्याचा उद्धार केला. असा अकराव्या अध्यायाचा महिमा आहे.

## बाराव्या अध्यायाचा महिमा

दक्षिण देशात करवीर नगरात महालक्ष्मीचें मंदीर आहे. तेथें याज्ञीक ब्राम्हण येऊन त्यानें महास्त्रोतात जगन्मातेचें स्तवन केलें. तेव्हां देवीनें संतुष्ट होऊन ब्राह्मणाला वर मागावयास सांगितलें, तेव्हा तो ब्राम्हण म्हणाला हे जगज्जननी जगन्मातें माझा पिता अश्वमेध करीत असतां अकस्मात मृत्यू पावला. त्यामुळें यज्ञ अपुरा राहिला. पुढें त्याचें प्रेत मी तेलात घालून ठेविलें. आणि यज्ञ पुढे चालूं केला, पण इतक्यात यज्ञिक अश्वच नाहीसा झाला. मातें, आतां जर तूं मला प्रसन्न झाली आहेत, तर माझा अश्व परत आणून दे.' हें ऐकून देवी म्हणाली, 'अरे, माझ्या द्वारी एक तपस्वी आहे, तो माझ्या वरानें तुझे सर्व मनोरथ पूर्ण करील.' देवांचें भाषण ऐकून ब्राह्मणानें त्या तपस्व्याकडे जाऊन त्याची प्रार्थना केली. तेव्हां तपस्व्यानें आपल्या मंत्रबलानें इंद्राला ओढून खालीं आणिलें, व ब्राह्मणाचा घोडा परत देवविला. ही त्याची मत्रविद्या पाहून ब्राह्मण तपस्व्याला म्हणाला, 'मुने, हें सामर्थ्य पाहून तुम्ही माझ्या पित्यालाही जिवंत कराल असें वाटतें. असे म्हणन ब्राह्मण त्या तपस्व्याला घेऊन आला, व तपस्व्यानें मत्रोदक शिंपून ब्राह्मणाचा पिता जिवंत केला. मग ब्राह्मणानें तो मत्र तपस्व्याजवळ मागितला. तो म्हणाला, 'अरे, मी नित्य गीतेचा बारावा अध्याय जपत असतों, त्याचाच हा सर्व प्रभाव आहे.'

## तेराव्या अध्यायांचें महात्म्य

बाराव्या अध्यायाचें महात्म्य सांगितल्यावर शंकर पार्वतीला म्हणाला

तुंगभद्रा नदीच्या काठी हरिपूर नावाचें नगर आहे. तेथें हरि दीक्षित नावाचा ब्राह्मण रहात असे. त्याची स्त्री अत्यंत जारिणी असे. एकदा ती परपुरुषावर आसक्त होऊन वनात गली असतां, तिचा जार तिला तेथेंच निद्रित ठेवून तेथून पळाला. इकडे ती स्त्री तेथें निजली असतां, एका वाघानें येऊन तिला खाऊन टाकिले. मग यमलोकी तिनें नरकयातना भोगल्यावर ती चाडाळणाच्या जन्मास आली. परंतु काहीं पूर्वपुण्यामुळें, तिला मागील जन्मीचें स्मरण मात्र राहिले होतें. त्यामुळें, एकदा ती देवीच्या दर्शनास गेली असतां तेथें देवशर्मा नावाचा ब्राह्मण गीतापाठ करीत होता. तेथे त्याच्यापासून तेरावा अध्याय तिच्या कानीं पडला. अध्यायाचें श्रवण घडताच, त्या चाडाळणीचा उद्धार झाला. असा हा तेराव्या अध्यायाचा महिमा देवांनाही अगम्य आहे.

## चवदाव्या अध्यायाचा महिमा

काश्मीर देशांत शौर्यवर्मा नांवाचा एक राजा होता. त्याच सिंहलदेशांतील विक्रमवेताळ नांवाच्या राजाचा फार स्नेह होता. एकदां शौर्यवर्म्यानें एक सुंदर अश्व व दोन श्वान स्नेहास्तव विक्रमवेताळाकडें पाठविलें विक्रमवेताळाला त्या भेटीनें संतोष झाला. एकदां तो त्या अश्वावर बसला व श्वानांना बरोबर घऊन शिकारीस निघाला. रानांत शिरल्यावर त्याला एक ससा दिसला. त्याला धरावयासाठीं राजानें कुत्री सोडली. धांवतां धांवतां एका तापसाच्या झोपडीशीं तो ससा चिखलांत पडला व कुत्रीही त्याच्या मागून पडली. इतक्यात त्या दोघांनाही न्यावयास विमान आलें व त्यांत बसून तीं स्वर्गलोको गेली हें पाहून राजानें त्या तापसाला असें होण्याचें कारण विचारले. तेव्हा तापस म्हणाला, ‘राजा, या चिखलाच्या खळग्यांत पाय धुवून मी दर दिवशी गीतेच्या चवदाव्या अध्यायाचें पठण करीत असतो. त्या पाण्यामुळें ही स्त्रीपुरुषें उद्धारून गेली. हा ससा पुर्वी ब्राह्मण होता, व कुत्री त्याची पत्नी होती. ती जारिणी असल्यामुळें तिच्या पतीने तिला जिवे मारिलें. या पापास्तव ती पशु योनींत जन्मून माझ्या चरणादकानें आज त्याचा उद्धार झाला.

## पंधराव्या अध्यायाचें महात्म्य

पूर्वी गौड देशांत कृपाणनृसिंह नांवाचा शमदमयुक्त असा राजा होता, त्याच्या शबरभीरुंड नामक सेनापतीनें राज्याचा लोभ धरून राजाला ठार मारावयाचा विचार केला. पण इतक्यांत महामारीचा रोग उत्पन्न होऊन, तो सेनापति मरण पावला व अशा रीतीनें त्याच्या दुष्टबुद्धीचें फळ त्याला मिळालें. मग आपल्या कर्मानुसार यातना भोगून शेवटीं तो सिंधु देशांत घोड्याच्या जन्मास आला. त्याला एका सौदागरानें घेऊन कृपाणनृसिंहालाच विकिलें. राजा त्या घोड्याला पाहून फार संतुष्ट झाला. मग एकदां त्यावर बसून रानांत तो शिकारीस गेला असतां तृषाक्रांत होऊन एका वृक्षाखालीं विश्रांतीकरितां बसला. इतक्यांत असा चमत्कार झाला कीं, गीतेच्या पंधराव्या अध्यायाचें श्लोकार्धं लिहिलेलें एक पान राजाच्या जवळ येऊन पडले, राजा ते घेऊन वाचूं लागला. इतक्यांत एक विमान आकाशांतून तेथें आलें. आणि तो अश्व दिव्यदेहधारी होऊन त्यांत बसून स्वर्गास गेला. हें पाहून राजाला नवल वाटलें व त्यानें एका ऋषीला त्या अश्वाचा पूर्वीचा इतिहास विचारला. तेव्हां ऋषि म्हणाला, -'राजा, हा तुझा पूर्वींचा सेनापति असून दुष्ट बुद्धीस्तव घोडा झाला होता. तो आतां पंधराव्या अध्यायाच्या श्लोकार्धामुळें आज सद्गति पावला.' असें या पंधराव्या अध्यायाचें महात्म्य शंकरानें पार्वतीला सांगितलें.

## सोळाव्या अध्यायाचें महात्म्य.

गुर्जरदेशी सौराष्ट्र नांवाच्या नगरांत वज्रबाहु नांवाचा राजा होता. तो मोठा कीर्तिमान् असून त्याच्यापाशीं इंद्राच्या ऐरावतासारखा एक उत्तम जातीचा अरिमर्दन नांवाचा हत्ती होता. एकदां तो बंधांतून सुटून माहूताला अनावर झाला. तेव्हां प्रजेला त्याच्यापासून उपद्रव होऊं नये म्हणून, राजानें सैन्याला आज्ञा करून सर्व मार्ग रोखून टाकिले. इतक्यांत त्या गांवांतील एक ब्राह्मण तीर्थावरून स्नान करून त्या रस्त्यानें येत होता. हत्ती त्याला मारील म्हणून सैनिक त्याला पुढें जाऊं देत ना. परंतु त्याचें न ऐकतां तो ब्राह्मण गीतेच्या सोळाव्या अध्यायाचा पाठ करीत निर्भयपणें हत्तीजवळून गेला हें पाहून राजाला फार विस्मय वाटला, व त्यानें त्या ब्राह्मणाला, हत्ती इतका शांत होण्याचें कारण विचारलें. ब्राह्मणानें उत्तर दिलें, 'मी गीतेच्या

सोळाव्या अध्यायाचा पाठ अखंड करित असतों, त्याचा हा सर्व प्रभाव आहे.' ब्राह्मणाचें भाषण ऐकून राजाने त्याला दक्षिणा दिली, व त्याच्यापासून सोळाव्या अध्यायाचा उपदेश त्यानें घेतला. तेणेंकरून त्याची सर्व कामना पूर्ण झाली.

## सतराव्या अध्यायाचा महिमा.

याप्रमाणें षोडशोध्यायाचा उपदेश घेतल्यावर तो वज्रबाहुराजा मोठ्या मदोन्मत्त हत्तीसही क्षणार्धात आटोक्यांत आणू लागला, तें पाहून त्याच्या दुःशासन नांवाच्या सरदारानेंही अभिमानानें मदोन्मत्त हत्तीला आवरण्याची प्रतिज्ञा केली; पण त्यानें गीताध्यायाचा अपमान केल्यामुळें हत्तीनें त्याला मारून टाकिलें. मेल्यावर पुढें तो सिंहलद्विपांत हत्तीच्या जन्मास आला; पण त्याला गीतेचा अपमान केल्याचें स्मरण मात्र राहिलें होतें. पुढें मोठा झाल्यावर वज्रबाहूचे सेवक सिंहलद्विपांत गेले असतां त्यांनीं त्याला धरून आणिलें. राजानें त्याला कांहीं दिवस आपल्यापाशीं ठेवून नंतर परलोकप्राप्तीच्या हेतूनें त्याला एका ब्राह्मणाला देऊन टाकिलें. त्या ब्राह्मणानें त्याला मालव देशाच्या राजाला विकलें. तेथें त्याला मोडशीचा विकार झाला. राजसेवकांनी त्याला बरें करण्याचे अनेक उपाय केले; परंतु कांहीं उपयोग होईना. शेवटीं तो हत्तीच मनुष्यवाणीनें त्यांनां म्हणाला, 'अहो, गीतापठण करणारा कोणी ब्राह्मण असेल, तर तो मात्र मला तारील. माझ्या रोगावर दुसरा कांहीं उपाय चालावयाचा नाहीं.' हें ऐकून एका गीतापाठकाला तेथें आणिलें. त्यानें सतराव्या अध्यायाचा जप करून हत्तीचा उद्धार केला.

## अठराव्या अध्यायाचें महात्म्य.

मेरुपर्वताच्या शिखरावर सर्वांत सुंदर अशी अमरावती नांवाची नगरी विश्वकर्म्यानें निर्माण केली आहे. तींत तेहतीस कोटी देव रहात असून त्यांच्या मध्यभागीं सिंहासनावर इंद्र विराजमान होत असे एकदां विष्णूचे दूत एका पुण्यपुरुषाला घेऊन तेथें गेले. त्याला पाहिल्याबरोबर इंद्र सिंहासनावरून खालीं पडला. मग त्या दूतांनीं त्या पुरुषाला सिंहासनावर बसविलें व इंद्राणीही त्याच्या अंकावर येऊन बसली. ह्या इंद्रासनावर बसलेला पाहून इंद्राला आश्चर्य वाटलें, आणि तो आपला सभा, फेडूर

घेण्याकरितां क्षीरसागरीं विष्णूकडे गेला. तेथें गेल्यावर तो विष्णूची स्तुति करून त्याला म्हणाला, 'रमाकांता, मी शंभर यज्ञ करून इंद्रपद मिळविलें असतां, मला बाजूला टाकून आपण कोणाला इंद्रपद दिलें? आणि असें त्यानें पुण्य तरी काय केलें?' हें ऐकून विष्णु म्हणाला; 'इंद्रा, गीतेच्या परम पवित्र अशा अठराव्या अध्यायाचें तो नित्य पठण करीत असल्यामुळें, त्याला इंद्रपदाची प्राप्ति झाली. तूंही त्या अध्यायाचें पठण कर, म्हणजे तुला सायुज्य पद मिळेल.' विष्णूची आज्ञा ऐकून इंद्र गोदावरीच्या तीरीं आला आणि तेथें एका गीतापाठक ब्राह्मणापासून त्यानें गीतेचा उपदेश घेऊन, सायुज्य पदाची प्राप्ति करून घेतली.' याप्रमाणें लक्ष्मीला नारायणानें गीतेचें माहात्म्य सांगितलें, व तेंच पुढें शंकरानें पार्वतीला संक्षेपानें सांगितलें. हें गीताख्यान संसारदुःखाचा नाश करून जडजीवांचा उद्धार करणारें आहे. तें सर्व विद्यांचें रहस्य, अविद्येचें निर्मूलन करणारें, विवेकवल्लीचें मूल आणि देवांचें विश्रांतिस्थान आहे. सनकादिक ऋषींच्याही मनाचें यानें रंजन होऊन याच्या पाठानें कालाच्या दूतांचीही त्रेधा उडते. वैशंपायन ऋषि सांगतात, 'राजा, तूं मला संसारापासून मुक्त होण्याचें साधन विचारिलेंस, तें हें सर्व दुःखें दूर करणारें असें भगवंताच्या मुखांतून निघालेलें गीताशास्त्र आहे. याच्याच श्रवणमननानें सनकादिक मुनि ज्ञानी झाले. यासाठीं गीतेचें अध्ययन व पठन अवश्य करावें. परंतु गुरूवांचून त्याचें यथार्थ ज्ञान होत नसल्यामुळें, ज्ञानधन अशा गुरूपासून त्याचा उपदेश घ्यावा.' असें सांगून वैशंपायनानें मनांत व्यासचरणांचें चिंतन करून क्षणमात्र आत्मसुखाचा लाभ अनुभविला, व थोडावेळ स्थिर राहून तो जनमेजयाला म्हणाला,–'राजा तूं मला श्रीकृष्णाच्या वंशांत त्याच्या मागें कोण राहिलें असें विचारिलेंस, आणि या तुझ्या प्रश्नाच्या अनुसंधानानें कैवल्यपदाची शिडीच अशी ही भवतापनाशिनी कथा तुला मी सांगितली. ही सर्व त्या श्रीकृष्णाचीच लीला होय. षड्रिपूंचा निहंता आणि सकलसुखांचा दाता, असा जो भगवान् कृष्ण त्याचा जयजयजकार असो.'

मधुकर कवि म्हणतो, ' जनमेजयराजा आणि वैशंपायनऋषि यांचा संवादरूप व प्रेमवल्लीचा कंदच असा हा कथाकल्पतरू ग्रंथ, श्रीकृष्णकृपेनें येथें पुरा झाला. '

# अध्याय ३२ वा



## ग्रंथसमाप्ति.

मधुकर कवि श्रोत्यास म्हणतो, वैशंपायनानें आनंददायक अशा अनेक कथा सांगून जनमेजयाची तृप्ति केल्यावर त्यानें त्या ऋषीचें आसन, पाद्य, अर्घ्य आचमन, वस्त्र, अलंकार, गंध, पुष्प इत्यादि षोडशोपचार साहित्यानें पूजन केलें आणि त्याचा जयजयकार करून व हात जोडून त्याला तो म्हणाला, 'मुने, तुमच्या कृपेनें आज मी कृतकृत्य झालो. धन्य माझीं मातापिता आणि धन्य मी त्यांचा पुत्र. कां की, मला तुमच्यासारखा गुरु मिळाला. तुमच्या प्रसादानें हरिकथामृताचें मला यथेष्ट पान करावयास मिळाले. अष्टादश पुराणें व भारतादि इतिहासमय अशा व्यासवाणीरूप कामधेनूचें आम्हां श्रोत्यांसाठीं तुम्ही दोहन करून कथामृत काढिले. त्या गुह्य कथा, देव, दानव, शेष व गंधर्वादिकांनांही दुष्प्राप्य असतां, तुझ्या कृपेनें त्यांचा मला सहज लाभ झाला.' अशी राजानें नानाप्रकारे स्तुति करून तो वैशंपायनाच्या चरणीं लागला असतां मुनीने त्याला प्रेमानें आलिंगन दिले, आणि आसनावर बसवून तो त्याला म्हणाला ' राजा, मीहि आज धन्य झालों. कारण तुझ्यासारखा परीक्षक व प्रेमळ शिष्य किंवा श्रोताही दुर्लभच होय. तुझ्या कृपेनेच माझी वाणी कृष्णचरणी एवढा विलास करावयास समर्थ झाली. आजपर्यंत ती गुप्त होती; परंतु तूंच प्रश्नप्रसंगानें तिला व्यक्त रूपाला आणिलेस. उत्तम वक्ता व प्रेमळ श्रोता, याची पूर्वसंचितामुळेंच अवचित गांठ पडते. ती सहसा दुर्लभ होय. ''

याप्रमाणें एकमेकांनी एकमेकांची स्तुति केल्यावर दोघांनाही आनंदाचें भरते आले, व त्यामुळें दोन घटिका त्यांच्यानें कांहींच बोलवले नाहीं नंतर वैशंपायन जनमेजय राजाचा निरोप घेऊन बद्रिकाश्रमीं व्यासाकडे जावयास निघाला. त्याला पोचवावयासाठी राजाही सर्व सैन्यासह त्याच्याबरोबर निघाला. सर्व नगर शृंगारुन जिकडें तिकडे वाद्यघोष सुरू झाला. नगराबाहेर गेल्यावर वैशंपायनानें राजाला मागे परतावयास सांगितले. त्याप्रमाणें परतून तो नगरांत परत आला, आणि उत्तम प्रकारें प्रजेचें पालन करुन

आणि पराक्रमानें आपल्या शत्रूंना जिंकून, आपलें पूर्वीचें राज्यही त्यांच्यापासून त्यानें परत घेतले.

## ग्रंथमहात्म्य आणि फलप्राप्ति

मधुकर कवि म्हणतो, जनमेजयराजा व वैशंपायन ऋषि यांच्या प्रसादानें या सर्व कथाकल्पतरूंतील कथा प्राणिमात्राला सुबोध होऊन त्यांचें हित झालें आहे. माझे गुरु श्रीकृष्ण कवि याज्ञवल्क्य यांनी अनेक मतांतरे घेऊन प्रथम सात स्तबकांची रचना केली. त्यानंतर हे पुढील सात स्तबक, मी ज्या कथा पाहिल्या किंवा ऐकिल्या होत्या, त्याच्या आधारानें रचिलें. पहिल्या सात स्तबकांची ओवीसंख्या वीस हजार असून पुढच्या सातांची त्याहून किंचित कमी आहे. अशा रीतीनें मी हा ग्रंथ पूर्ण केला. या ग्रंथाची योग्यता फार मोठी असून शेषालाही तिचें यथार्थ वर्णन करतां यावयाचें नाही, मग मी प्राकृत कवीनें काय बोलावे? जडजीवांच्या उद्धारार्थ केवळ परोपकारासाठी साक्षात नारायण वेदव्यासाचा अवतार झाला अष्टादश पुराणांचा कर्ता असा तो सत्यवतीपुत्र त्रिकालज्ञानी व सामर्थ्याचा महामेरु होय. त्यानें रचलेल्या पुराणांपासून उपदेश घेऊन अनेकांनी आपलें हित करून घेतले. अप्पयादीक्षित चंपूकार आणि मोरोबा पराडकर इत्यादि मोठमोठे कविश्रेष्ठ त्यांच्या श्रवणानेंच तरून गेलें. त्या भारत कथेच्या आधारानें प्राकृत जनांच्या उद्धारासाठी हा संक्षिप्त ग्रंथ मी केला. अठराभार वनस्पतीत ज्याप्रमाणें कल्पवृक्ष श्रेष्ठ, तसा ग्रंथामध्यें हा कथाकल्पतरु श्रेष्ठ होय चंद्र जसा नक्षत्रांत विष्णु जसा द्वादशादित्यांत अथवा पर्वतांत ज्याप्रमाणें महामेरु व समुद्रांत ज्याप्रमाणें क्षीरसागर, तसा प्राकृत ग्रंथांत हा कथाकल्पतरु होय. किंबहुना नद्यांत जशी पापनाशिनी गंगा, देवांत जसा श्रीरंग, वृक्षांत तुलसी, धातूंत जसे सोनें, वस्त्रांत ज्याप्रमाणें पीतांबर, फुलांत जसें कमल, पेय द्रव्यांत जसें अमृत, त्याप्रमाणें ग्रंथात हा कथाकल्पतरु ग्रंथ आहे. अन्य ग्रंथांना याची सर कदापि यावयाची नाही. अनेक शास्त्रें धुंडाळून हिंपुटी झाल्यावर ज्या कथांचा अंत लागला नाही त्यांचा यांत संग्रह केला आहे या ग्रंथाला पाहिल्यावर दुसऱ्या ग्रंथानें वाचकांचें समाधान व्हावयाचे नाही. याच्या श्रवणानें नवविधा भक्ति उत्पन्न होऊन, तीमुळें ज्ञान व ज्ञानापासून वैराग्य प्राप्त होते, व मोक्षमार्ग खुला होऊन जन्ममरणाची येरझार

चुकते. याच्या श्रवणानें सर्व कामना पूर्ण होऊन, यश, आयुष्य, विद्या, आरोग्य इत्यादिकांची वृद्धि होते, व अंती कैवल्यपदाची प्राप्ति होते.

## कविवृत्त

हा ग्रंथ मयूराचल पर्वतावरील एका विख्यात ठिकाणी पूर्ण झाला. या स्थानाची सर अनेक पर्वतानांही यावयाची नाही. या पर्वतावरील गडाप्रमाणें अष्टकुलाचलांवरही अष्टभोगाचा मेळ नाही. सुवर्णमेरूची तीन शिखरेही याच्या खालींच होत. कारण त्याची अधिष्ठात्रे देव, ब्रह्मा, विष्णु व महेश, हे त्रिवर्ग होऊन या गडावर पूजोपचार घ्यावयास राहिले आहेत. या पर्वतांच्या विशाल कडयांकडे नजरेनें पहावत नाहीं. काळेकुट्ट भिंतीसारखे अति ऊंच असे ते कडे पाहून घेरींच येते. त्याच्यावरील गडांच्या पोंकळी जणुं काय, विश्वकर्म्यानेंच बांधिल्या सारख्या अभंग व वज्रमय आहेत. त्याच्या भोंवती अश्वत्थ वृक्षांच्या रांगा असून त्याच्या श्वेत, पीत, कृष्ण, हरित, पिंगट इत्यादि अनेक वर्णखचित पल्लवांमुळें, त्यांना अवर्णनीय शोभा आलेली आहे. गडाच्या तटावर पंचरशी अभंग तोफा लावलेल्या असून आंत मोठमोठे मदोन्मत हत्ती वावरत असतात. या गडावर अनेक प्रकारच्या औषधी वनस्पती आहेत. मोठमोठ्या शिला सहज वर उचलण्यासाठी येथें यंत्रेंही ठेविली आहेत. तटाच्या आंत भिंतीला लागून गडाचें रक्षण करणाऱ्या सैनिकांचीं घरें असून तें शूर गडी रात्रंदिवस तेथें पहारा करीत असतात. त्यांच्या मध्यभागीं इंद्राच्या मंदिराप्रमाणें मनोहर असा राजमहाल आहे. येथील गडकरी कुलीन, सदाचारी आणि कट्टे स्वामिभक्त आहेत गडावर रहाण्यासाठीं तेथे अमृतसमान मधुर पाण्याचें तलाव, टाक्या व विहिरी बांधलेल्या असून, धनधान्यादि पदार्थांचा तेथे भरपूर पुरवठा आहे.

या पर्वताच्या तीन शिखराच्या मध्यभागीं उत्तरेच्या बाजूला विस्तृत पठार असून तेंथे वटिका नांवाचीं नगरी आहे. तिच्या पूर्वपश्चिमेस मोठे कडे असल्यामुळें, त्याच्यामध्ये दक्षिणेस व उत्तरेस, वज्राप्रमाणें कठीण अशा काळ्या पाषाणाच्या अभंग चिऱ्याचें तट बांधिलें आहेत. या तटाच्या आंत आणखी दक्षिणोत्तर तट असून त्याच्या दरवाज्यापाशी कौशल्याची कमाल केलेली आहे.त्याच्या आत आणखी लहान पोकळी असून तिच्या भिंती अश्वत्थवृक्षाच्या

किंवा नागवेलीच्या पानाप्रमाणें हारीनें चिरें रचून बांधिलेल्या आहेत. या पोकळीच्या मध्यंतरी ठिकठिकाणचें मार्ग रोखण्यासाठी तोफा लाविलेल्या आहेत, व तिला ठिकठिकाणीं बुरुज केलेले असून ते जणूं इंद्राच्या भीतीनें लपून बसलेले पुत्रच आहेत कीं काय, असें वाटते. या नगरीला चार दरवाजे असून, त्यांतून येण्याचा मार्ग बिकट करण्यासाठीं प्रत्येकांत तीन तीन पोट दर- वाजे केले आहेत. दरवाजांची द्वारें लोहबद्ध असून त्यांना दोन्ही बाजूंनीं बळकट असें लोखंडाचे अडसर लाविलेले आहेत. प्रत्येकांत सशस्त्र व हुषार द्वाररक्षक ठेविलेले असून परिक्षेवांचून मुंगीचाही आंत शिरकाव होत नाहीं. प्रत्येक दरवाजावर गणपति, हनुमान् आणि चंडी यांची स्थापना केलेली असून, या देवता स्वसामर्थ्यैंकरून नगराचें रक्षण करितात. तटाचें रक्षण करण्यासाठीं भालेवाले, बाणकरी वगैरे अनेक प्रकारचे शस्त्रधारी लोक ठेविलेले आहेत. या वाटिका नगरांत ठिकठिकाणीं अमृतप्राय उदकानें भरलेलीं तळीं, टाक्या वगैरे बांधिलेलीं असून त्यांत कित्येक ठिकाणीं फार कुशल रचना केली आहे या नगरांत ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र, इत्यादि अठरापगड जातींच्या लोकांची घरें सरमिसळ, परंतु कौशल्यानें बांधिलीं आहेत. त्यांत पूर्व व पश्चिम भागांत ब्राह्मणांच्या आळचा असून त्यांत शुक्ल, मुळे, दीक्षित, जोशी, पाठक, पंडित, अग्निहोत्री, आवसथ्य, बडवे वैद्य, पंत इत्यादि नाना उपनांवांचे व शाखांचे चारी वेदांचें अध्ययन करणारे ब्राह्मण रहातात. येथील क्षत्रिय, शूर अशा राजकुलांतील असून पराक्रमानें तर जणू देवादिकाचे अवतारच वाटतात. त्यांचे चौसोपी वाडे भयामुळें इतर लोकांना पहावत देखील नाहींत. या नगरांत सर्व लोक आपआपल्या धर्मानें वागून नित्य नैमित्तिक कर्माचें अनुष्ठान करितात. वृद्ध तरूण समस्त लोक, अनेक कला, विद्या व शास्त्रे, यात पूर्णता पारंगत आहेत, पैशाचा व्यापारही येथें उत्तम चालतो. सोनार, सराफ, रत्नपरीक्षक, शिंपी, रफूकार, इत्यादी अनेक प्रकारचे धंदेवाले लोक येथें असून तें आपआपले धंदे मोठ्या कौशल्यानें चालवितात तेथील बाजारात देशदेशींच्या उत्तमोत्तम वस्तु, खाद्य, पेय, हिरें, पांचू, माणके, उत्तम उत्ताम वस्त्रें, चातुर्याचे व कारागिरीचे जिन्नस यांचा व्यापार चालतो. इतर विविध धंद्याचे लोकहि पुष्कळ आहेत. नगराच्या मध्यभागी चावडी असून तिच्या चोहोबाजूस नानाविध

पदार्थांची दुकानें ओळीनें लागलेली आहेत. या नगरीत ठिकठिकाणी हरि-कीर्तनें, पुराणें, इत्यादि नित्य चालत असतात. येथें रुक्मिणीसह कृष्ण व बलराम, राम-सीता-लक्ष्मण, सूर्यनारायण, सोमेश्वर, हरिहर,इत्यादिकांची देवालये कुशल कामगारानी बांधिलेलीं असून त्यात नित्य भजन, सप्ताह, आरत्या, इत्यादिकांचा गजर चालत असतो. तेथे राजापासून रंकापर्यंत कोणी कोणाचा धिक्कार न करितां भक्तीनें देवदर्शनास येतात. या वाटिका नगरांत राजकुमारांचीं सुंदर मंदिरें, अश्वशाळा गजशाळा, असून त्यांत अमौलिक गुणांचे हत्ती घोडे ठेविलेले आहेत. राजवाडयाच्या द्वारावर दोन पाषाणांचे प्रचंड हत्ती ठेविले असून त्याच्या आधारानें भोंवतीं पोंवळी केलेली आहे, त्यांत अनेक बुरूज व ठिकठिकाणीं मनोरे उभारलेले आहेत. पोंवळीच्या आंत फरासखानें व शस्त्रागारें असून त्यांत डेरे राहुटयांचें सामान व खड्गे, कटयारी, बंदुका, इत्यादि अनेक प्रकारचीं तेजस्वीं हत्यारें ठेविलेलीं आहेत वाडयासमोर त्रिकाल सुस्वर वाद्यें वाजत असून कालमान समजण्यासाठीं घंटेचें घडयाळ केलेलें आहे. सायंकालीं दक्षिण उत्तर बाजूला असलेल्या शिकारखान्यांतून हत्ती सिंह वगैरेना फिरावयास काढितात. अशी या राजवाडयाची अपूर्व रचना केलेली आहे.

राजवाडयाच्या आंत अनेक तळघरें असून त्यांवर चांगली जमीन केलेलीं आहे. भिंतीवर नाना रंगांत काढलेलीं कुशल कारागिरांच्या हातचीं उत्तमोत्तम सुंदर चित्रें आहेत. दक्षिणेकडील नक्षी चोवीसखणी भागात एक पाषाणाचा एक हत्ती केलेला असून, त्यावर राजसिंहासन मांडिलेलें आहे. जवळ वस्त्रें व द्रव्यें यांची मोठी भांडारे असुन पूर्वेच्या बाजूला राजस्त्रियांचे सुंदर महाल आहेत. त्यांच्यापुढें वृक्षवाटिकांतून अनेक पुष्पवेलीची मनोहर रचना केलेली असून ठिकठिकाणीं पाणी उडविण्याची कारंजी केलेलीं आहेत ही बाहेरून दिसणारी स्थिति मी वर्णन केली; आंत आणखी किती अपूर्व रचना आहे ती सांगतां येणें शक्य नाहीं. कारण त्याच्या आंत मुंगीचाही प्रवेश व्हावयाचा नाहीं, तेथें माझा तो काय पाड? या राजवाडयाच्या उत्तर भागांत स्वत: छत्रपति महाराजांची स्वारी रहात असून, दक्षिण भागांत त्यांचा बंधु जयदेवराव राहतो. पाठीकडच्या बाजूस राणीमहाल असून त्यांत राजाची मातुश्री रहात असते. राजा अन्नोदकादि पदार्थ मात:श्री-जवळून घेत असून तिच्या तैनातीस त्यानें अनेक विश्वासू चाकर ठेविलेले

आहेत. हा राजा प्रद्युम्नाचा ज्येष्ठ चिरंजीव असून, त्याचें नांव बहिरामशाह आहे. तो राजा सर्वांचा सल्ला घेऊन नीतीनें राज्य करीत आहे. त्याच्या सभेंत चतुःशास्त्रवेत्ते पंडित सदैव धर्मचर्चा करीत असतात. त्यांच्या जवळ अनेक ऋषीप्रणीत कथांचा संग्राहक अशा या कथाकल्पतरु ग्रंथाचे स्तबक मी पूर्ण केले. कल्पभेदानें ऋषींच्या मतांत भेद झाले, त्यांचाच यांत संग्रह केल्यामुळें याला कथाकल्पतरू असें नांव दिलें. अशा रीतीनें हा चवदा गुच्छांचा (स्तबकांचा) वृक्ष (कल्पतरू) मी विस्तारिला आहे. याचे चवदा स्तबक या मुख्य शाखा, अध्याय या उपशाखा आणि ओव्या व पाद ह्या ढिऱ्या व पानें होत. असा हा कथाकल्पतरू जोमानें वाढून फलयुक्त झाल्यामुळें संसारांत तापलेल्या पांथस्थांना विश्रांतीचें स्थान झाला आहे.

असो, आतां हा चवदावा स्तबक पूर्ण झाला. पुराणरूप समुद्र उपसतांना कोठें कांहीं शब्दबिंदु राहिला असेल तर त्याबद्दल गुणग्राहक सज्जन मला क्षमा करतीलच. ग्रंथाच्या शेवटीं मी ज्या स्थानाचें वर्णन केलें आहे, त्याबद्दल सुज्ञ वाचक मला दोष देणार नाहीत, मी या ग्रंथासंबंधानें अभिमानानें बोलावें इतकी माझी थोर बुद्धि नाहीं. भ्रमर ज्याप्रमाणें अनेक कमलांतून मध जमा करितो, त्याप्रमाणें मी ऐकिलेल्या कथांचा एक सग्रह केला आहे. ऋषिप्रणीत शास्त्रे, पुराणें, इत्यादि अनंत आहेत त्याचा आदि किंवा अंत कोणाला सांपडणार? परंतु ज्याच्या योगानें मनांत सद्‌बुद्धि आणि परमेश्वरभक्ति उत्पन्न होईल, असा मुख्य तात्पर्यार्थ काढून भक्तासाठीं अनुभवोपयोग्य असा हा ग्रंथ प्राकृत भाषेंत मी रचिला आहे. श्रीकृष्णाच्या कृपाप्रसादानें व त्याचें स्तवन करून म्या मधुकर कवीनें कथाकल्पतरूचा कळस चढविला. कृष्ण याज्ञवल्य किंवा मधुकर निमित्तमात्र करून परमात्म्यानें स्वतःच आपलें चरित्र कथन केलें आहे.

विक्रम संवत् सोळाशे ऐशीं (१६८०) आणि शालिवाहन पंधराशें पंचेचाळीस (१५४५) रुधिरोद्‌गार संवत्सर, विजयादशमी, सोमवार, पुन-

वसु नक्षत्र, सिद्धियोग, बालवकरण, या योगावर चंद्र मकरस्थीं असतां राज-सन्निधी हा ग्रंथ पूर्ण झाला. याची फलश्रुति सांगतांना सरस्वतीही भागेल. सर्वजण या ग्रंथाचें वंदन करून सायुज्जता मागतात. असा ग्रंथ मी श्रीकृष्ण चरणीं अर्पण केला आहे.

श्रीगोपालकृष्णार्पणमस्तु.

स्तबक चौदावा समाप्त

# उपसंहार



## धर्माचा व नीतीचा संबंध, आणि पुराणवाचनानें होणारें नीतिवर्धन.

कथाकल्पतरुच्या चौदाही स्तबकांचें भाषांतर आतां पुरें झालें. तें वाचून भाविक लोकांना तर आनंद होईलच, परनु केवळ मजेखातर म्हणून वाचणारांसही त्यापासून बोध व करमणूक झाल्यावांचून रहाणार नाही. कल्पतरु म्हणजे इच्छिलेली वस्तु देणारा दिव्य वृक्ष. प्रस्तुत ग्रंथ कथांचा कल्पतरु आहे, म्हणजे त्यांत साधारणत; सर्व पुराणांतील महत्त्वाचा कथा-भाग आलेला आहे. आमच्या पुराणांत केवळ कथांचा संग्रह नसून तत्त्वज्ञान व धर्मविचार यांचाही संग्रह आहे. किंबहुना पुराणांचा उद्देशच मुख्यत: केवल कथा सांगण्याचा नसून मनुष्याला पुरुषार्थाच्या मार्गाची दिशा दाख-विण्याचा आहे. ही दिशा दाखविण्यांत केवळ रूक्ष उपदेशानें काम भागाव-याचें नाहीं, व अज्ञ मनुष्याच्या मनावर त्याचा कांहीं ठसाही उमटावयाचा नाहीं, हे जाणून आमच्या पुराणकर्त्यांनीं इतिहासाचा उपयोग करून म्हणजे प्रत्यक्ष उदाहरणें दाखवून धर्माचा, व नीतीचा उपदेश करण्याचा प्रयत्न केला आहे. उद्देश एवढाच कीं, प्रत्यक्ष उदाहरणानें सांगितलेल्या गोष्टींचा मनावर सुपरिणाम व्हावा, पुराणश्रवणाचा प्रघात अलीकडे बराच कमीं झाल्यामुळें, त्याच्या अभ्यासानें निदान ऐकण्यानेही काय परिणाम होतो, हें आज कित्येकांना कल्पनेनेही समजणार नाहीं. पाश्चात्य विद्येच्या तार्किक शब्दजालांत सांपडल्यामुळें आमच्यांतील पुष्कळ लोकांची श्रद्धा उडत चालली आहे. या अश्रद्धेचा परिणाम काय होत आहे, हें स्पष्ट करून सांग-ण्याची आवश्यकता नाहीं. एक गोष्ट नाहीशी केल्यास तिच्या जागीं तिचें काम भागविणारी दुसरी योग्य तजवीज जर केली नाहीं, तर त्याचा परि-णाम बराच वाईट होत असतो. पुराणांच्या श्रवणानें अज्ञ लोकांच्या मनांत अंध:श्रद्धा उत्पन्न होऊन, त्यांची तार्किक बुद्धि कुंठीत होते व ते उन्नतीच्या खऱ्या मार्गातून दूर होतात, असें कित्येकाचें मत आहे. परंतु सूक्ष्म दृष्टीनें पाहिल्यास त्यांत नीतीचा पुष्कळ समावेश केलेला आहे, असें आपणांस आढ-

ळून येईल. नीतिभ्रष्ट झालेला माणूस मनानें व शरीरानें कितीहि बलवान् असला तरी तो कवडीमोलाचा होय, असें एका तत्त्वज्ञान्यानें म्हटले आहे. आणि तें सर्वथैव सत्य आहे. मनुष्याचें जीवित नीतीवर अवलंबून आहे, अनीतीचें आचरण करणारा पुरुष शेवटपर्यंत यशस्वी झाला, असें उदाहरण क्वचितच् मिळेल अनीतीचा शेवट दुःखातच व्हावयाचा,ही गोष्ट सूर्यप्रकाशाइतकी स्पष्ट आहे. याप्रमाणें आपल्या उन्नतीस अत्यावश्यक अशी जी नीति तिची वाढ कशी करावी व ती राखावी कशी? हा प्रश्न आहे. धर्म कल्पनांत पाप, पुण्य. स्वर्ग नरक इत्यादिकांच्या साहाय्यानें श्रद्धाळू मनुष्यांना नीतिमार्गाला लावणें सुलभ होतें. परंतु धर्माचा उपदेश करणारेच कित्येक वेळां नीतिभ्रष्ट झाल्यामुळें अज्ञानी लोकांच्या श्रद्धेचा फायदा घेऊन ते त्यांना धर्मांच्या नांवाखालीं वाटेल तें सांगतात. व आपली तुंबडी भरून घेण्यासाठीं कित्येक वेळां ते या अज्ञानीं लोकांना धर्माच्या नांवानेंच नीतिभ्रष्ट करितात. परंतु हा प्रकार चिरकाल राहुं शकत नाहीं. युरोपखंडांत चारपांच शतकांपूर्वी धर्माधिकाऱ्यांनी धर्माच्या नांवाखालीं अनन्वित प्रकार केले खरे, परंतु त्यामुळें लवकरच प्रतिक्रिया होऊन या धर्माधिकाऱ्यांना आपल्या अधिकाराला आणि अब्रूलाही मुकावें लागलें. आपल्या देशांतहि कित्येक वेळां प्रकार झाला आहे व आमच्या पुराणांत जर कांहीं वाईट भाग असेल तर तो असल्या कालाची खूण होय. परंतु ज्याप्रमाणें युरोपखंडांत कित्येक ठिकाणीं नीतिभ्रष्ट धर्मगुरुंची सत्ता झुगारुन दिल्यावरही मूळधर्मग्रंथांचें महत्त्व कायमच राहिलें, त्याप्रमाणें आमच्या पुराणांचे एकंदर स्वरूप अद्यापिही महत्त्वाचें राहिलें आहे. पुराणांतील कित्येक भाग त्याज्य नाहींत. असें आम्हीं म्हणत नाही; पण त्याचें कारण निराळें असल्यामुळे, एकंदर पुराणें मात्र त्याज्य ठरत नाहीत. पुराणांतील त्याज्य भाग काढून, त्यांच्या लोकोपयोगी आवृत्त्या काढणें हे देशांतील विद्वानांचें कर्तव्य आहे, व तें केल्यास जनसमूहाला उत्तम वळण लावण्याचें श्रेय त्यांना मिळेल. पुराणें मूळ संस्कृत भाषेंत असल्यामुळें, साधारण लोकांना तीं असून–नसून सारखींच. त्यांत बरा किंवा वाईट भाग काय आहे, हे समजावयास ती अगोदर कळली पाहिजेत ही उणीव दूर करण्याकरितां, आमच्या महाराष्ट्रांतील साधुसंतांनीं व कवींनीं पुष्कळ प्रयत्न केले, व त्यांचा उपयोगही पुष्कळ झाला

एकोणिसाव्या शतकाच्या आरंभापर्यंत होऊन गेलेल्या मराठी कवींनी

संस्कृत पुराण ग्रंथाचें भांडारच फोडून त्याचा आबालवृद्धांस लाभ करून दिला. श्रेष्ठ पुरुषांच्या कथा श्रवणानें मन पवित्र होतें अशी आमची प्राचीन कालापासून समजूत असून पुराणांची उत्पत्ति देखील याच समजुतींमुळें झालेली आहे.

कोणत्याही पुराणाचा आरंभ पाहिल्यास ही गोष्ट सहज दिसून येईल. महाराष्ट्रांतील कवींनीं याच समजुतीचा उपयोग करून लोकांना सन्मार्गास लावण्याच्या उद्देशानें संस्कृत पुराणें प्राकृतांत आणण्याचा उपक्रम केला. त्यांचे ग्रंथ भाविकपणें व प्रेमळपणें लिहिलेले असल्यामुळें, साधारण जनसमूहाची त्यांवर श्रद्धा बसली आणि जिकडे तिकडे त्यांच्या वाचनाचा परिपाठ सुरू झाला व लोकांना सन्मार्गाचें वळण लागलें. हरिविजय, पांडवप्रताप, रामविजय इत्यादि प्रासादिक ग्रंथांचें वाचन घरोघरीं अगदीं अलीकडेही चालूं होतें. अद्यापिही कित्येक वृद्ध स्त्रियांना पुराणांतील बहुतेक गोष्टी चांगल्या अवगत आहेत व या व्यासंगाचा त्यांच्या आचरणावर झालेला सुपरिणामही चांगला दिसून येतो. परंतु नवीन पिढींतील स्त्रिया व व पुरुष यांच्यांत नमूद केलेल्या कारणानें अश्रद्धा उत्पन्न झाल्यामुळें, या ग्रंथांवरील भर कमी होऊन शृंगारिक कादंबऱ्या व गोष्टी यांवर तो वळला आहे. परंतु ही स्थिति हितकर नव्हे.

वर सांगितलेंच आहे कीं एखादी गोष्ट वाईट आहे असें वाटून ती काढून टाकतांना तिचें पूर्वींचें चांगलें कार्य करणारी दुसरी गोष्ट सुरू केली नाहीं, तर प्रसंगीं वाईट परिणाम होण्याचा संभव असतो. शाळेंत बरोबर शिक्षण होत नाहीं, म्हणून मुलाला घरीं शिक्षक न ठेवितां तसाच मोकळा सोडला, तर त्याचा काय परिणाम होतो हें सांगण्याची विशेष आवश्यकता आहे असें नाहीं. पुराणांची असंबद्धता दाखवून कांहीं विद्वन्मन्यांनीं तरुण पिढीची धर्मश्रद्धा दूर केली, परंतु तिच्या जागीं नीतीला पोषक अशा दुसऱ्या कोणत्याहि गोष्टीची योजना न करितां उनाड मुलांप्रमाणें त्यांना तसेच सोडून दिल्यामुळें, शून्यांतःकरण होत्साती आमची ही तरुण पिढी केवळ पाश्चात्य तर्कवादाचा अवलंब करून राहिली. कांहीं पाश्चात्य तत्त्ववेत्ते म्हणतात "मनुष्याच्या नीतिवर्धनाला व समाज-बंधनाला धर्माची कांहीं गरज नाहीं. झालें. आमचे अश्रद्ध झालेले तरुणही त्यांची री ओढून धर्मकल्पनांना झुगारून देऊं लागले. हल्लींची पालटलेली कौटुंबिक स्थिति

आणि तिचे चालू असलेले दुष्परिणाम यांच्या मुळाशीं हा पूर्व परंपरागत कल्पनांचा त्याग आहे ही गोष्ट सूज्ञ व विचारी माणसास आतां चांगली स्पष्ट दिसूं लागली आहे. हरबर्ट स्पेन्सर सारख्या तत्त्ववेत्त्यांना नीतीनें वागावयास धर्म कल्पनांची कदाचित् गरज नसेल व सर्व लोकानांही तसेंच वागावयास काहीं हरकत नाहीं, असेंही त्यांना वाटत असेल. परंतु आम्ही पूर्वीच्या कल्पनांवरील श्रद्धा अंध म्हणून सोडून या धर्महीन पाश्चात्य तत्त्ववेत्त्यांच्या वचनावर जी श्रद्धा ठेवितों, ती तरी विचारपूर्वक आहे. काय? नाही ही दुसरी श्रद्धाही अंधच आहे. कारण तीप्रमाणें वागताना वस्तुस्थितीचा आम्हीं नीटसा विचार केलेला दिसत नाहीं. वस्तुस्थिति अशी आहे की, स्पेन्सरप्रमाणें सर्व जनसमूहाला समाजरचनेची यथायोग्य कल्पना येणें शक्य नाहीं व त्यामुळें त्याच्या श्रद्धेला हात घातल्यास त्याचा दुष्परिणाम झाल्याशिवाय कधींही रहाणार नाहीं. ही गोष्ट लक्षांत घेऊनच भगवान् श्रीकृष्णानीं 'न बुद्धिभेदं जनयेत् अज्ञानां कर्मसंगिनाम्' म्हणजे कर्मावर आसक्ति ठेवणाऱ्या अज्ञलोकांचा बुद्धिभेद करूं नये, म्हणून सांगितलें आहे. परंतु आमच्यांतील कित्येक विद्वानांनीं पुराणें म्हणजे सर्व शिमगा असें ठरवून बुद्धिभेद केला आणि त्याच्या दुष्परिणामाविषयीं मात्र ते बेफिकीर राहिले. जुनी परंपरा गेली, आणि तिच्या ठिकाणीं नवीन चांगली गोष्ट कांहीं आली नाहीं. तरुणांचें रिकामें अंतःकरण वाटेल त्या विचारांना थारा देऊं लागलें. विचाराबरोबर आचार थोडाबहूत असतोच. त्याप्रमाणेंच आमच्या तरुणांचाही आचार झाला आणि त्यामुळें कित्येक ठिकाणीं अनर्थ घडून आले.

पण आमच्या महाराष्ट्र कवींना भाविकपणा जागृत करण्याची आवश्यकता वाटल्यामुळें त्यांनीं संस्कृत पुराण-भांडार जनसमूहाच्या भाविक मनोवृत्ति जागृत करण्यासाठीं प्राकृतात आणिलें, व त्याचा इष्ट परिणाम होऊन, वर सांगितल्याप्रमाणें या प्राकृत ग्रंथाच्या वाचनाचा परिपाठ जिकडे तिकडे सुरू झाला. परंतु अलीकडे हा पाठ मोडून त्याच्याऐवजीं पाश्चात्य पद्धतीच्या तरुणांना मूर्ख करून सोडणाऱ्या प्रेम कहाण्यांना बहर आला आहे. या प्रेम कहाण्यांनींही कित्येक अल्लड तरुण बिघडून गेल्याचीं उदाहरणें सांपडूं लागलीं आहेत, व त्यामुळें त्यांच्या दुष्परिणामाकडे लोकाचें लक्ष थोडें थोडें लागूं लागलें आहे.

गोष्टी वाचण्याचा परिपाठ सुरू झाला, त्याचा फायदा घेऊन कित्येकांनीं, त्यांच्यापासून नीतिबोध होऊन मनाचें रंजनही होईल अशा गोष्टी प्रसिद्ध करण्याचा स्तुत्य उपक्रम सुरू केला, व आम्हींहि ही लोकांची अभिरुचि जाणून पूर्वींच्याच पुराणकथा गोष्टीरूपानें भाविक वाचकांना सादर करण्याचा विचार केला. सुदैवानें सर्व पुराणांचा सारभूत अशा ह्या कथाकल्पतरूकडे आमचें लक्ष गेलें व तोच आम्हीं सरळ गद्यरूपानें साग्र असा वाचकांना सादर केला आहे.

## कथाकल्पतरुचे स्वरुप

कथाकल्पतरु हा ग्रंथ फारच मोठा असून त्याचे पूर्वार्धं आणि उत्तरार्ध असे दोन मोठे भाग आहेत. या प्रत्येक भागांत पुनः आणखी सात सात स्तबक (पोटभाग) आहेत. पूर्वार्धाचा कर्ता कृष्ण याज्ञवल्क्य नांवाचा ऋषि असून त्यानें आपली थोडीशी हकीकत स्तबकाच्या शेवटी दिलेली आहे. तीवरून पाहतां या कवीच्या पित्याचें नांव अंबऋषि आणि मातेचें कमलजा असें होतें. याचें गोत्र कौंडिण्य असून हा विष्णूचा भक्त होता. कृष्ण याज्ञवल्क्यानें आपला हा पूर्वार्धं नाशिक शहरीं लिहिला. सात स्तबक पूर्ण झाल्यावर या कवीचे देहावसान झालें आणि मग त्यानें ठरविलेल्या धर्तीवर पुढील सात स्तबक त्याचा शिष्य मधुकर कवि यानें लिहिले. गोदावरीच्या उत्तरेस बागुल देशांत मयूर मामक पर्वताच्या पठारावर वाटिका नगर होतें तेथे सोमवंशी राठोड कुलांतील बहिराम नांवाचा राजा राज्य करीत असे. शके १५४५ रुधिरोद्गार नाम संवत्सरी विजयादशमीला मधूकरानें हा ग्रंथ पूर्ण केला. या मधुकरानें बहिरामाच्या राजधानीचें फारच भपकेदार वर्णन केलें आहे. मधुकराला राजाश्रय चांगला असावा, असें त्यानें केलेल्या बहिरामाच्या स्तुस्तीवरून दिसतें. या कवीच्या बापाचें नांव शिवराम होतें. कृष्ण याज्ञवल्क्यानें दाखवून दिलेल्या मार्गानें हा कथाकल्पतरु ग्रंथ मी पुरा केला. असें प्रत्येक स्तबकाच्या उपसंहारांत मधुकरानें म्हटलें आहे.

पूर्वार्ध आणि उत्तरार्ध मिळून या कथाकल्पतरूचे एकंदर चवदा स्तबक आहेत, व त्या चवदा मिळून एकंदर ग्रंथाची ओवी संख्या ३८७७१ इतकी आहे. म्हणजे संस्कृत भारतासारखाच महाराष्ट्र भाषेंत हा ग्रंथ प्रचंड झाला आहे.

संस्कृत भारतांत मूळ २४००० श्लोकात्मक असून पुढें वैशंपायन आणि सौति यांनीं त्याचें पठण करतांना त्याचा लक्ष श्लोकात्मक विस्तार केला असें म्हणतात. खुद्द भारतीय युद्ध आणि कौरव पांडवाचा इतिहास सोडून, भारतात ज्या अनेक कथा व उपकथा आलेल्या आहेत, त्यांचा भारताशीं प्रत्यक्ष संबंध काही नाही. अरबी भाषेंतील सुरस व चमत्कारिक गोश्टींत ज्याप्रमाणें एक दुसऱ्याला गोष्टी सांगतो आहे, अशा सदर्भानेंच सर्व कथा जुळवून आणलेल्या आहेत, त्याप्रमाणेंच महाभारतांतहि वनपर्व, शांतिपर्व वगैरे पर्वांतील कथा आलेल्या आहेत. या कथा सांगणारानें आपल्याला माहीत असलेंली सर्व कथानकें एकत्र करण्याच्या हेतूनें व त्यायोगें आपली कीर्ति वाढावी या इच्छेनें, त्या ठिकाणी संकलित केल्या असाव्या, असें म्हणाययास हरकत नाहीं. आमच्या कथाकल्पतरुच्या कर्त्यांनीं सांगून सवरूनच हा उद्देश मनांत धरिलेला आहे. सर्व पुराणांत आलेल्या व इतरही ऐकिलेल्या प्राचीन प्राचीन कथा महाराष्ट्र वाचकांसाठी एकत्र कराव्या अशाच हेतूनें कृष्ण याज्ञवल्क्य आणि मधुकर यांनीं आपल्या ग्रंथाची रचना केलीं आहे. या ग्रंथात भारत, रामायण, भागवत भविष्योत्तर, स्कंद, पद्म, गरुड नारद, अग्नि इत्यादि पुराणांतील कथा त्यांनीं फार चांगल्या प्रकारें गोविल्या आहेत व जेथें एकाच कथेची भिन्न स्वरूपे आढळतात, तेथें तेथें त्यांनीं कोणत्या पुराणांत कोणतें मत आहे, याचाही निर्देष केला आहे.

या प्रमाणें सर्व ऐकिलेल्या व वाचलेल्या गोष्टी एकत्र करून, एवढा मोठा ग्रंथ लिहिणें हें बरेंच अवघड काम आहें. पण तें या दोन कवींनीं बऱ्याच चांगल्या रीतीनें तडीस नेलें आहे, त्यांचा हा समग्र कथाकल्पतरु ग्रंथ जवळ जवळ महाभारताएवढा होईल असे असतांही त्यांत भारत, रामायण व इतर पुराणें यातील कथा ज्या अर्थीं त्यांत आणल्या आहेत, त्या अर्थी या कवींना कित्येक ठिकाणी फारच संक्षेप करावा लागला आहे. या संक्षेपामुळें तीं स्थळें बरीच दुर्बोध झाली आहेत.

अनेक ग्रंथातील कथा एकत्र करावयाच्या असल्यामुळे, जसा कित्येक ठिकाणी आमच्या कवींना संक्षेप करावा लागला, त्याप्रमाणें कित्येक ठिकाणीं ग्रयाचा अनुरोध चुकू नये, म्हणून व गोष्टीचीं निरनिराळीं स्वरूपें दाखविण्यासाठीं त्याना द्विरुक्तीही करावी लागली आहे. परंतु विस्तारभयास्तव त्यांनीं बहुतेक ठिकाणी पुनः आलेलीं कथा अगदी थोडक्यास आटपती घेऊन

ती पूर्वी ज्या ठिकाणी येऊन गेलीं असतील, त्या स्थलाचा निर्देष केला आहे.

हा ग्रंथ दोन कवींनी मोठ्या प्रयासानें लिहिला. अनेक पुराणांतील कथा एकत्र आणावयाच्या हें काम प्रयासाचें आहे.मधुकरानें संस्कृत पुराणांशिवाय आणखी प्राकृत ग्रंथ धुंडाळले होते, असें त्यानें चवदाव्या स्तबकात सांगितले आहे. त्या ग्रंथापैकी नामा पाठक नांवाचा कोणा कवीचा अश्वमेध म्हणून ग्रंथ होता. याशिवाय तेलगू भाषेतच असाच ग्रंथाचा संग्रह असल्याचे ऐकून मधुकरानें दुभाष्याच्या साहाय्यानें त्यातील कथाही अवगत करुन घेतल्या, याप्रमाणें मिळविता आल्या तितक्या कथा मिळवून या दोन कवींनी कथाकल्पतरू हा सर्व कथासंग्रहात्मक असा प्रचंड ग्रंथ तयार केला.

या कथा सुसंबद्ध रीतीनें सांगता याव्या. म्हणून पुराणाच्या रीतीस अनुसरून आमच्या कविनीं आरंभापासून जनमेजय राजा वैशंनपायाला कथा विचारीला आहे व वैशंनपायन त्यांची उत्तरें देत आहे. असे दाखविलें आहे; पण एकंदरीनें पहाता हा प्रकार मोठा मौजेचा झाला आहे. तो कसा हे आठव्या स्तबकावरून चांगले कळून येईल. आठव्या स्तबकांपासून म्हणजे उत्तरार्थ आरंभापासून भारत कथेला मुळापासून सूरवात झाली आहे यांच्यापुर्वी पुर्वाधातही भारतांतील अनेक कथा प्रसंगोत्पात आलेल्या आहेत आता उत्तराधींत ज्या भारताला सूरवात करून अठराही पर्वें सांगितली आहेत. ते भारत, पराशर ऋषीनें दुसऱ्या ऋषीला सांगितले होते. त्यातही जनमेजय वैशंपायनाचा संवाद व जनमेजयाच्या सर्पसत्राची कथा आलेली आहे. इतकेच नव्हे, तर या चवदाव्या स्तबकांत सांगितल्याप्रमाणें पराशरोक्त भारतातही जनमेजयानें वैशंनपायनापासून भारत ऐकल्यावर त्याचें कुष्ठ व ब्रह्महत्या यांचा परिहार झाल्याचे सांगितलें आहे; हे बरेच चमत्कारीक दिसते, परंतु व्यासांनी जनमेजय जन्मास येण्यापूर्वीच अंतर्ज्ञानानें त्याचा वृत्तांत भारतांत लिहिला, असें खुद्द वैशंनपायाच्या तोंडानें सांगून आमच्या कवीनें हा चमत्काराचा उलगडा केला आहे.

आमच्या कवीनीं आपल्या कथा कोठून घेतल्या आहेत यांचे दिग्दर्शन मागे केलेच आहे. भविषोत्तर पुराण, स्कंदपुराण, पद्मपुराण, गरुडपुराण, नारदपुराण, अग्निपुराण, भागवत, रामायण, भारत हे संस्कृत, नामा पाठकांचा प्राकृत अश्वमेघ आणि तैलंगणातील एक कथासंग्रह. यांचें उल्लेख

कथा सांगताना आमच्या कवीनी स्पष्ट केलें आहेत, याशिवाय वेद, उपनिषदे आणि स्मृति यातीलहीं मतलब घेतल्याचे त्यानी सांगितले आहे.

अशा प्रकारचा हा विस्मृत ग्रंथ असल्यामुळें त्यात अनेकविध विषयही आलेलें आहेत. पुरांणातील कथा, धर्मज्ञान तत्वज्ञान, समाजशास्त्र, सृष्टीचमत्कार असे अनेक प्रकार आलेंले वाचकांना आढळतील या सर्वाचे सोपपत्तिक विवेंचन करू म्हटल्यास मोठाच विस्तार होईल. याशिवाय तो विषय कथाकल्पतरुच्या वाचकांस कदाचित रूक्षही वाटेल. परंतु ग्रंथाचे महत्व व विशेषत: असले ग्रंथ जपून ठेवण्याचे महत्व नीट ध्यानांत येण्यासाठीं व कथाकल्पतरूच्या भाविक वाचकांनाही थोडाचा विचार करण्याचीं संवय व दिशा लागावी यासाठीं, त्यांचे थोडेसे दिग्दर्शन करणें आवश्यक आहे.

## पुराण-कथा

या ग्रंथात आलेल्या ज्या पुराणकथा आहेत,त्यांचें सामान्यत: दोन वग करिता येतील.पहिल्या वर्गात ज्यांना खरोखर ऐतिहासिक मानावयास हरकत नाही अशा कथा येतील. व दुसऱ्यात दंतकथांचा व सकृद्दर्शनी तरी असंभाव्य वाटणाऱ्या कथांचा समावेश होईल. या ठिकाणी एवढे मात्र सांगितलें पाहिजें कीं, कोणत्या कथा कोणत्या सदरांत घालावयाच्या, हे मात्र वाचकांनी आपल्या तर्कांप्रमाणें ठरविलें पाहिजे. कारण ज्या गोष्टी घडून गेल्याला हजारों वर्षें झाली. व ज्यांचें वर्णन तोंडातोंडी येतां येतां अनेक वेळा बदललेले असल्याचाही संभव आहे. त्याविषयी खात्रीलायक विधान करणें जरा धोक्याचें आहे. तरी पण सामान्यतः पांडवांची कथा, रामाची कथा, नलदमयंतीची कथा, इत्यादिकांना ऐतिहासिक आधार असलाच पाहिजे, अशी मनाची स्पष्ट भावना होते. या कथांतही अभ्दुत भाग अनेक आहेत. पण थोड्याच कालापूर्वी होऊन गेलेल्या व ज्याचें वंशज अद्यापि हयात आहेत, अशा तुकारामादि साधूंच्या प्रचलित चरित्रातहीं असें अभ्दुत वाटणारें भाग आहेत. असे अभ्दुत भाग असले म्हणजे ती सर्वच काल्पनिक आहे.असे समजण्याचें मुळींच कारण नाही. या कथातील अभ्दुत भागाचा अर्थ आपल्याला दिसतो.तसा नसण्याचा संभव आहे.व शिवाय अभ्दुत भाग वगळलें तरी कथेच्या नायकाला त्यापासून कमीपणा येईल असेही नाहीं. तुकाराम सदेह स्वर्गास गेला. ही गोष्ट तुकारामाच्या चरित्रातून गाळली म्हणजे त्यामुळें तुकारामा-

विषयी आमचीं आदर बूद्धी कमी होते, असा मुळीच प्रकार नाहीं. त्यांचप्रमाणें राम, कृष्ण, इत्यादि पुरुषांची खरीं योग्यता त्यांच्याविषयी सांगितलेल्या कित्येक अभ्दुत गोष्टींवर मुळीच अवलंबून नाही. कृष्णाचें पराक्रम त्याचा तत्त्वोपदेश, त्याची व्यावहारिक कर्तबगारी इत्यादिकामुळेंच तो अलौकीक अतएव ईश्वरांश होय, असे वाटून त्याच्याविषयी आदरबुद्धी उत्पन्न होतें बारा कोस आग्नि गिळुन टाकणें अनेक रुपांनी प्रादुर्भुत होणें इत्यदि अभ्दुत गोष्टीनी त्याची योग्यता वाढणें किंवा कमीं होणें शक्य नाही. तेव्हां केवळ अभ्दुत गोष्टींच्या साहचर्यावरून पांडवादि पौराणिक पुरुष केवळ काल्पनिक होते असें म्हणणें युक्तिला धरून मुळीच व्हावयाचें नाहीं. त्यांची किर्ती आज इतक्या हजारो वर्षे या भरतखंडात जी दुमदुमून गेली. आहे. व त्यांना ईश्वराचें अवतार म्हणून जो मान आज सर्वत्र मिळत आहे. तो पूर्णपणें परंपरागत असून त्याच्या मुळाशी त्यांचे ऐतिहासिक अस्तित्वच आहे, ही गोष्ट अगदी स्पष्ट आहे.

आतां राम, कृष्ण, पांडव इत्यादि पुरुष ऐतिहासिक आहेत असे कबूल केलें, तरी पुराणांत चालते बोलतें? म्हणून जे वर्णिलेले देव, दानव असूर, नाग, इत्यादि योनीतील पुरूष आहेत तेही सर्व ऐतिहासिकच की, काय, असा कोणी प्रश्न विचारील. या प्रश्नाचेंहीं उत्तर आम्ही होय असेच देणार इतकेच नव्हे तर इतर माणसांप्रमाणेंच हे सर्वही उत्तम सुधारलेल्या स्थितित होते. रावणाच्या लंकेचे वर्णन, नाग लोकांचें वर्णन, इंद्राच्या अमरावतीचे वर्णन, ही आजच्या पॅरिस, लंडन सारख्या रम्य व अफाट शहरांच्या वर्णनालाही लाजविणारी आहेत असें असल्यामुळें नाग किंवा तक्षक म्हणजे फणा असलेला सरपटणारा साप असें समजण्याचे कांही कारण नाही. ही सर्व निरनिराळ्या जातींच्या लोकांची नांवें असून या जातींमध्ये वारंवार राजकीय कारणावरून कलह व युद्धें होत असत, हें खरे असणें संभवनींय आहे.

नाग, असूर, यक्ष, किन्नर इत्यादि त्या वेळचे कमी अधिक सुधारलेलें लोक आमचे पूर्वच जे आर्य त्यांच्याशीं प्रसंगोपात कलह करीत आणि त्यांच्या सामर्थ्यांप्रमाणें कित्येक वेळां पराजय पावत. त्याच्यांत ऊंच डोंगरावर चांगली सुरक्षित जागा पाहून मोठे मोठे किल्ले बांधण्याची चाल होती. व त्या किल्ल्यावर बंदोबस्तहि उत्तम प्रका-

रचा होता. या आर्येतर अनेक जातींपैकी कांही लोक आर्यांहून कमी सुधारलेले व कांही कलाकौशल्याच्या बाबतीत आर्यांपेक्षां बरेच अधिक सुधारलेले लोक होते. ते आर्यांची मोठमोठीं नगरें, उपवनें पाहून थक्क होत आणि कित्येक वेळां ते आर्यांशी युद्ध करीत. अधिक सुधारलेल्या लोकांसंबंधानें आर्यांनाही कौतुक वाटून ते त्यांना मान देत. परंतु प्रसंग पडल्यास ते त्याच्याशीं युद्ध करीत. यक्ष, गंधर्व, आणि देव या कोटी आर्यांपेक्षां अधिक सुधारलेल्या होत्या. त्यांच्यात शस्त्रास्त्रें युद्धकला, इत्यादिकाचे ज्ञान बरेच उच्च दर्जाचे होते. त्यामुळें त्यांच्याशी युद्धप्रसंग आल्यास आर्यांचा पुष्कळ वेळां पराभव होत असे. चित्रसेन गंधर्वानें दुर्योधनाचा सहज पराभव केलेला वाचकांना स्मरत असेलच. असे जरी होते तरी आर्यलोक फार मेहनती, कुशाग्रबुद्धीचे व कसाही प्रसंग आला तरी धैर्यानें त्यातून पार पडण्याचा प्रयत्न करणारे असल्यामुळें ते या गंधर्वादिकाशी स्नेह करून त्यांची विद्या प्राप्त करून घेत असत, हल्ली ज्याप्रमाणें उद्योगी व धाडशी लोक इंग्लंड जर्मनी, अमेरिका, जपान इत्यादि सुधारलेल्या देशांत तत्त्वज्ञान, कलाकौशल्य, उद्योगधंदे यांचे ज्ञान करून घेण्यासाठीं जाऊन व तेथें मोठे कष्ट सोसूनही त्या कला अवगत करून आपल्या देशाची स्थिति सुधारण्याचा प्रयत्न करीत आहेत. त्याप्रमाणें तेव्हाचे आर्यही या गंधर्व, देव, इत्याहि लोकांत ( देशांत ) जाऊन तेथे मोठ्या मेहनतीनें कलाकौशल्याचे ज्ञान संपादन करीत. पांडव वनवासांत असतांना कौरवांशीं पुढें होणाऱ्या युद्धांत आपणाला कोणत्या उपायानें जय प्राप्त होईल याचा विचार करीत होते. तेव्हां व्यासानें अर्जुनाला शंकराकडून पाशुपत नांवाच्या अस्त्राची प्राप्ति करून घ्यावयास सांगितलें, व अर्जुनानें त्याप्रमाणें कैलासलोकीं जाऊन मोठ्या प्रयासानें शंकरापासून तें प्राप्त करून घेतलें. याच सुमारास तो युद्धकलेची आणि आणखी शस्त्रास्त्रांची माहिती करून घेण्यासाठीं इंद्रलोकींहि गेला होता. आतां ज्याप्रमाणें इंग्लंडादि सुधारलेले देश कलाकौशल्यातील खरें रहस्य परकीय लोकांना होतां होईल तितकें स्पष्ट करून सांगत नाहींत, त्याप्रमाणेंच तेव्हांही स्थिति होती. म्हणूनच अर्जुनाला शंकरास प्रसन्न करून घेण्याला एवढे श्रम पडले. या देशोदेशींच्या संबंधात आणखी एक गोष्टहीं आजच्या स्थितीशीं जुळण्यासारखी आहे. आपल्या इकडून जे विद्यार्थी मोठमोठे गहन विषय

शिकण्यासाठीं इंग्लंडादि देशांत जातात. त्यांना तेथें आपल्या कार्यापासून परावृत्त होण्यासारखे मोहाचे प्रसंग अनेकवार येतात. यांचीं उदाहरणें नांवें घेऊन सांगण्याचें कारण नाहीं. एवढेंच सांगितलें म्हणजे पुरें आहे, कीं कित्येक तेथील युवतींच्या प्रेमपाशांत बद्ध होतात, तर कित्येकांनीं तो मोह तोडल्यामुळें त्यांच्या रोषास ते पात्र होतात, व केलेल्या उद्योगाचें फल मिळण्याच्या कामांत त्यांना व्यत्यय येतो. कित्येकांना मोह न तोडवल्यामुळें ते तेथील स्त्रियांशीं विवाहसंबंध करतात व त्यामुळें त्यांना त्यांच्या समाजांतील रहस्यें अधिक समजून येऊन आपला कलादिकांचा अभ्यास उत्तम रीतीनें तडीस नेण्यास ते समर्थ होतात. अनेक वेळां मोठमोठ्या अडचणीच्या प्रसंगी या स्त्रियांचें त्यांना सहाय्य होतें. प्राचीन भारतीय आर्यांमध्येंही अशा गोष्टी घडत असत भीमाची नागलोकीं झालेली व्यवस्था, त्याचप्रमाणें अर्जुन इंद्रलोकीं गेला असतां उर्वशीचें मन मोडल्यामुळें तिच्याकडून त्याला मिळालेला शाप ही या गोष्टींचीं उदाहरणें होत.

आतां गोष्टींसारख्या वाटणाऱ्या ज्या दंतकथा व सकृद्दर्शनीं असंभाव्य वाटणाऱ्या कथा, यांविषयीं थोडें विवेचन करूं. कर्कोटक सर्प व नल राजा, कृष्णाच्या पुत्रांना झालेलें मुसल, व त्यापासून यादव कुलाचा झालेला नाश, समुद्र मंथनाची कथा, वामनाचा शरीरविस्तार, दधीची ऋषीपासून देवांना मिळालेलीं शस्त्रें, दुर्वास आणि सुदर्शन, भागीरथीचें पृथ्वीवर येणें, प्रेतभक्षक वैदर्भ राजाची कथा चौदाव्या स्तबकांतील अश्वमेधपर्वांतील अर्जुनादि वीर अनेक वेळां मृत झालेले असतां पुन: जीवंत झाल्याच्या कथा, पुढें व्यासानें गांधारी आदिकरून स्त्रियांना दाखविलेला युद्धचमत्कार, कलीचे खेळ, इत्यादि गोष्टी सकृद्दर्शनीं तरी असंभाव्य वाटतात. या कथा म्हणजे अगदीं निरर्थक आहेत असें कोणी म्हणणार नाहींत. त्या प्रत्येकींमध्यें कांहीं तरी नीतितत्त्व गोविलेलें आहे. या दृष्टीनें त्याचें महत्त्व सर्वजण मान्य करतील; पण कित्येक 'एवढाच त्यांत ग्राह्यांश आहे' असें म्हणून त्यांना पंचतंत्र किंवा इसापनीति यांच्या पंक्तीस बसवितील. असें जरी बरेच लोक असले, तरी यांपैकीं जरी सर्व नाही, तरी कांहीं गोष्टींचा उलगडा नवीन वाढत्या शास्त्रीय व तत्त्वज्ञान विषयक शोधांवरून होणारा आहे. शाप देणें व वर देणें, आणि

त्याप्रमाणें पुढें प्रकार घडून येणें, या गोष्टी पुराणांत सर्वत्र आढळतात, व हेंही कांहीं तरी कल्पनासाम्राज्यांतील भारूड आहे, असें कित्येकांना वाटतें. परंतु आजच्या ज्ञानाच्या स्थितींतही कित्येक अनुभवांवरून व नवीन मानसशास्त्र विषयक शोधांवरून हे प्रकार म्हणजे निवळ थोतांड नव्हे, त्यांत सर्वत्रच नसला तरी सत्याचा बराच अंश आहे, असें वाटण्याला आम्हांला सबळ कारण मिळतें. आज जे आपणापैकीं कित्येक पदवीधर लोक आहेत, त्यांच्या मनाची स्थिति मोठी चमत्कारिक झालेली आहे. एखादी गोष्ट विसंगत दिसली कीं, ती खोटी म्हणून तिचा कित्येक एकदम त्याग करितात, व कित्येक तर एकदम तिच्यावर श्रद्धाही ठेवतात. परंतु त्याविषयी बारीक शोध करण्याची बुद्धि असणारे फारच थोडे. सत्य हुडकून काढावयाचें म्हणजे अंधश्रद्धा किंवा अविश्वासपूर्वक हेळसांड, यापैकीं कांहींच उपयोगाचें नाहीं. प्रत्यक्ष दिसणाऱ्या गोष्टी लक्षपूर्वक अवलोकन करून त्या पुनः पुनः तशाच घडतात कीं काय, हें पाहून त्यांवरून कार्यकारणभावाचा शोध केला पाहिजे. भाविक व श्रद्धाळु लोक ज्या गोष्टींवर श्रद्धा ठेवतात व दैविक म्हणून मानतात, त्या गोष्टी तरी खरोखर घडून आल्या कीं नाहीं, हें प्रथम पाहिलें पाहिजे. मग त्या गोष्टींचें कारण कांहीं अद्‍भुत आहे, कीं नित्य सृष्टि-व्यापारातलें कांहीं आहे, याचा उलगडा करावयाचा. अडाणी लोकांमध्यें देवाला कौल लावणें, भुताटकी उठविणें, भुतांच्या साहाय्यानें आजार बरे करणें, वगैरे अनेक प्रकार आपण पहातों. या प्रकारांत काहीं मनुष्यांवर प्रत्यक्ष परिणाम जो घडतो तो आपल्याला नाकबूल करून चालावयाचें नाहीं. पण त्याचें खरें कारण ते अडाणी लोक ज्याप्रमाणें म्हणतात तसेंच ते आहे असेंही नाही. औषधोपचार केल्यावाचून केवळ धूप अंगाऱ्यानें या अडाणी लोकांना पुष्कळवेळा गुण येतो हा आमचा अनुभव आहे. परंतू आम्हाला तसा गुण स्वतःला येत नाही, असाही त्याच्या बरोबरीचा अनुभव आहे. त्यातून सत्य कसे काढावयाचें, भूतयोनीं, खरोखरीच कोणी आहे कीं काय, व त्यापासून मनुष्याला अपाय होतो की काय, हा प्रश्न निराळा आहे. त्याचा विचार करावयास आपल्या लहानशा उपसंहारात अवकाश नाही, परंतू 'यो यश्रद्धः स एव सः ' म्हणजें ज्याची ज्या गोष्टीवर श्रद्धा असते तो तन्मय होतो. असें भगवद्‍गीतेंत सांगितले आहे. त्याचा विचार केला असता, व अलिकडील हिप्नॉटिझम, मेस्मेरिझम

वगैरे मानस-शास्त्रविषयक गोष्टीचें प्रत्यक्ष चमत्कार जमेस घेता श्रद्धावाव मनुष्याच्या मनावर, ज्याच्यावर त्याची श्रद्धा असतें त्या मनुष्याच्या इच्छा-शक्तिचा बरा किंवा वाईट परिणाम होतो. ही गोष्ट कळून येतें. व अडाणी लोकांत चालू असलेल्या या प्रकाराचें रहस्य लक्षात येतें.

हीच गोष्ट शाप आणि वर यांनाहीं लागू आहे. मनुष्यांमध्यें स्थूल शक्तिच्या पलीकडे अशीं सूक्ष्म० शक्ति आहे, आणि प्रयत्नानें तिचा पूर्ण विकासही त्यास करितां येऊन ईश्वराशी तन्मय होऊन जाता येतें, हीं गोष्ट भारतीय वाङ्मयाचे थोडेंबहुत परिशीलन करणारास परिचित आहे. यालाच आपल्याकडें योगही संज्ञा आहे. आपल्या इच्छाशक्तिला योग्य वळण देऊन तिचा हळूहळू विकास केल्यास कमी इच्छाशक्तिच्या माणसाला कसें वश करून घेता येतें. हा चमत्कार मुंबईसारख्या शहरांत आता सर्वांस माहित झालेला आहे. आमच्या पुराणांत आलेले ऋषी सदाचारानें व पवित्रपणा-मुळें मोठी मान्यता पावलें होतें. त्यामुळें त्याना पहाताक्षणी पहाणाऱ्याच्या मनांत पूज्यबुद्धी उत्पन्न होत असें, व तेही आपल्या कमावलेल्या इच्छाशक्तिचा लागेल तसा उपयोग करीत नसल्यामुळें प्रसंगविशेषी ती त्याच्या स्वाधीन पूर्णपणें असे. अर्थात आपले क्वचित प्रसंगी प्रिय किंवा अप्रिय करणारास ते आपल्या शक्तिच्या जोरावर त्याचे इच्छित पुरवून संतुष्ट करित किंवा शाप देऊन शासन करीत. यांत विलक्षण वाटण्याजोगे कांही नाही.

या दृष्टीनें विचार केल्यास व्यास, नारद, कृष्ण इत्यादि योगींद्र त्रिभु-वनांत कसा संचार करीत असत, याची वाचकांना कल्पना करता येईल. म्हणजे हे योगी पुरूष आपल्या स्थूल शरिरानेंच सर्वत्र जात असत असे नव्हे. लिंगदेह किंवा कारणदेह यांनी ते अति दूरच्या प्रदेशांत संचार करीत आणि त्या ठिकाणी मिळालेले अनुभव त्याच्या सामर्थ्यामूळें त्याच्या स्थूल शरिरांत पुन: प्रविष्ट झाल्यावरहि आठवत असत. आपण साधारण माणसेही अनेक प्रसंगी स्थूल देह सोडून सूक्ष्म देहानें संचार करीत असतो.

---

० योगशास्त्र हें सत्य आहे याबद्दल विवेचन करण्याचें वास्तविक कारण नाहीं. पाश्चात्य देशांत क्लेअर व्हॉयन्स म्हणून जें एक शास्त्र अलीकडे निघालें आहे, त्यांतील प्रयोगांवरूनही योग शास्त्राची सत्यता पटण्या-सारखी आहे.

परंतू या भ्रमणात पाहिलेल्या गोष्टी मात्र आपल्या कमी सामर्थ्यामुळें आपल्या स्थूल शरिरांतील मेदूंत उतरत नाहीत, व त्यामुळें आपल्या जागृत स्थितीत त्याची आम्हाला आठवण रहात नाही; परंतू योगमार्गानें आपल्या मनःशक्तिचा विकास केल्यास या

(टीप-पान ६४९ वरून चालू)

+इच्छाशक्ति वाढवून तिचा चांगला किंवा वाईटही उपयोग करून घेतां येतो. यांपैकीं वाईट मार्गाला आमच्याकडे वाममार्ग असें म्हणतात. भवभूतीच्या मालती माधव नाटकांत वर्णिलेली कपालकुंडला आणि अघोर हीं वाममार्गी असून, त्यांतीलच सौदामिनी ही योगिनी होती. याच मार्गांना इंग्रजींत व्हाइट मॅजिक आणि ब्लॅक मॅजिक असें म्हणतात. पाश्चात्य देशांत अलीकडे या विषयाकडे कांही मोठ्या शास्त्रज्ञांचें लक्ष लागले आहे.

मनुष्यामध्यें अदृश्य अशी शक्ति वास करीत असून प्रयत्नानें तिचा विकास करितां येतो, ही गोष्ट पाश्चात्य देशांत आतां पुष्कळांस माहीत झाली आहे, आणि अशा प्रकारच्या शक्तीचें अद्भुत चमत्कार अलीकडे त्यांच्या ग्रंथांतून व मासिक पुस्तकांतून वाचावयासही मिळतात. आपल्या इकडे आतां सर्वांस माहीत झालेली प्रसिद्ध विदुषी ॲनिबेझंटबाई व दुसरे लेंडबीडर नांवाचे गृहस्थ यांनी सूक्ष्म दृष्टीच्या साह्यानें द्रव्याचें परीक्षण करून परंतु ऑकल्ट केमिस्ट्री (अतीन्द्रिय रसायन शास्त्र) म्हणून पुस्तक लिहिले आहे. त्यांत प्रयोग करून आजवर जी द्रव्यें रसायन शास्त्रज्ञांना समजली, त्याहून कांहीं अधिक त्यांना आढळून आली. या शिवाय या विषयावरचे इंग्रजी ग्रंथ पहाणारास आणखी कित्येक चमत्कार समजून येतील.

मनुष्याच्या स्थूल शरीराप्रमाणें आणखी सूक्ष्म शरीरें आहेत व स्थूल शरीरापासून त्यांना दूरही रहातां येतें, इत्यादि गोष्टी पाश्चात्य देशांत शोधकांनीं अलीकडे सिद्ध केल्या आहेत. आमच्यामध्यें मनुष्याहून श्रेष्ठ दर्जाच्या व विशिष्ट शक्तीच्या ज्या कांहीं योनि मानिलेल्या आहेत, त्या काल्पनिक नसून खऱ्या आहेत; असेंही या शोधकांचें म्हणणें आहे. व विचाराअन्ती तें कबूल करणें कोणालाही भाग पडेल. मात्र त्या दृष्टीनें त्याचा विचार केला पाहिजे.

गोष्टी साध्य होतात, अशाबद्दल आमच्या प्राचीन योगग्रंथांत+ प्रमाणें आहेत, व त्यांच्या सत्यतेबद्दल आम्हाला शंकाही वाटत नाहीं.

यौगिक शक्तीनें अतींद्रिय गोष्टींचें ज्ञान होतें; परंतु तें ज्ञान स्थूल शरीरांत उतरल्यावर तें व्यावहारिक शद्बांनीं म्हणजे संकेतानें मात्र सांगत येते. हा संकेत भिन्न कालीं व भिन्न पुरुषांचा भिन्न झाल्यास एकाच गोष्टींचें त्यांनी दिलेलें वर्णन भिन्न भिन्न होईल. कित्येक अतींद्रिय गोष्टींसंबंधानें जीं भिन्न भिन्न मतें आढळतात, ह्याचें हेंच कारण होय. म्हणूनच विचारी पुरुषांनीं आपल्या तर्कशक्तीचा उपयोग करून अनेक ऋषिमतांची एक-वाक्यता करण्याचा प्रयत्न केला.

अतींद्रिय गोष्टीचें वर्णन देतांना आणखी एक मौज होत असते. ती अशी कीं, त्या गोष्टी स्थूल शद्बांनींच सांगाव्या लागत असल्यामुळें, कित्येक वेळां त्या ऐकणारास अगदींच समजत नाहीत. मग कांहींजण त्यांना असं-भाव्य म्हणतात व कांहीं कविकल्पनेच्या भराऱ्या समजतात. कित्येक ठिकाणीं एकादी दुःसाध्य गोष्ट वाटेल ती त्यानें करण्याचा प्रयत्न करून संकटांत पडूं नये, एकढ्यासाठीं ती काहीं गुह्य सांकेतिक शद्बांनीं सांगितलेली असते. अशा शद्बांचें ट-स ट, प-स प, असें भाषांतर करून, वाचकांपुढें ठेविल्यास कित्येक वेळा अगदीच चमत्कारिक व वाईट परिणाम होण्याचा संभव असतो

टीप—काळजी किंवा रोग यांच्यामुळें ज्ञानतंतूवर पडणाऱ्या ताणाच्या योगानें उन्मादवायू होऊन माणूस कांहीं तरी वेडगळ बोलूं लागतो किंवा त्याला ज्या गोष्टीचा हव्यास असेल तिच्याविषयीं बडबड करितो. परंतु इच्छा शक्तीच्या जोरावर ज्ञानतंतूंना अशाच प्रकारचा ताण दिल्यास त्यामुळें मनुष्याचे अंगीं अतींद्रिय गोष्टी जाणण्याचें सामर्थ्य येतें. केवळ झोंप लागणें ही अगदीं साधी गोष्ट आहे. परंतु बाह्यतः झोंपेसारखी वाटणारी जी समाधि-स्थिति तींत प्रवेश करण्याची शक्ति म्हणजे केवळ अनुपम होय. दोन्ही स्थितींत साम्य आहे, पण पहिली अगदीं साध्या कारणांनीं घडून येतें आणि दुसरी कमावलेल्या इच्छाशक्तीमुळें घडून येतें, एवढेंच काय तें. या इच्छा-शक्तीचें ज्ञान ज्याला झालें, आणि निश्चित व पुढें दिसणाऱ्या गोष्टी घडवून आणण्याकडे तिचा ज्याला उपयोग करतां येतो, तोच योगी होय.'

आपण याचें एकच उदाहरण घेऊं. गोरखपंथी योगशास्त्राच्या ग्रंथांत एक वचन आहे. तें असें. ' गोमांसंभक्षयेन्नित्यं पिबेच्च मधुवारुणीम् ' याचें सकृद्दर्शनीं दिसणारें भाषांतर करून आम्हीं आपली लेखणी विटाळवीत नाहीं, खरा अर्थ मात्र देतों. तो असा :—' गोमाता म्हणजे द्विधा केलेली व म्हणून द्विदल झालेली जीभ, आणि वारुणी म्हणजे मस्तकांतील एका वरुण नामक स्थानापासून, स्रवणारें अमृत. द्विदल जिव्हा कंठभागाकडे ऊर्ध्व करून, समाधि स्थितींत राहिल्यानें क्षुधेचें निवारण होतें व अमृत स्रावानें तृषेचें निवारण होतें.' अशा प्रकारें गुरु आपल्या शिष्याला या गोष्टींचा उपदेश करीत आहे, असा वरील वचनाचा अर्थ आहे. गुरुमुखाव्यतिरिक्त कोठें तरी हें श्लोकार्ध कानीं पडल्यास आमचे पूर्वज अत्यंत नीच अशा मार्गाचें अवलंबन करीत होते, अशी चटकन् कोणाची भावना होईल. परंतु गुह्य शद्बांनीं कांहीं दुर्घट गोष्टी वर्णन केलेल्या असतात, हें ज्याला माहीत आहे, तो भलताच विचार मनांत न आणतां आपल्याला त्या गोष्टींचें यथार्थ ज्ञान करून देणारा भेटेपर्यंत तो स्वस्थ राहील. ऋषि वचनांची चिकित्सा करूं नये, अशी जी आमच्या भाविक लोकांत समजूत आहे, तिच्या मुळाशीं तरी हेंच तत्त्व आहे.

असो. येथवर केलल्या विवेचनावरून आमच्या पुराणांत जो अद्‌भुत अथवा असंभाव्य वाटणारा भाग आहे, त्याचा थोडा तरी खुलासा कथाकल्पतरूच्या वाचकांना होईल अशी उमेद आहे. या कथांपैकीं कित्येक अस्सल ऐतिहासिक आहेत. तत्कालीन रीतिभाति, निरनिराळ्या लोकांच्या कमी अधिक सुधारणा, देशोदेशीचें परस्पर संबंध, यांची योग्य कल्पना मनांत आणिल्यानें त्यांतील सर्व भागांचा उलगडा होईल. इतर कांहीं गोष्टी सांकेतिक शद्बांनीं किंवा गुह्य शद्बांनीं सांगितलेल्या असल्यामुळें त्यांचें यथार्थ ज्ञान करून देणारा कोणी भेटेपर्यंत त्या तशाच ठेवणें हा उत्तम मार्ग होय. कित्येक आपल्या दृष्टीनें अशक्य वाटणाऱ्या गोष्टी यौगिक शक्तीनें अगदीं शक्य आहेत, हें वर दाखविलेंच आहे. तात्पर्य पौराणिक गोष्टींचा उलगडा करणाऱ्या या तीन किल्यांचा यथावकाश उपयोग करून वाचकांनीं आपली जिज्ञासा तृप्त करून घ्यावी.

आतां पौराणिक कथांचा उलगडा करणाऱ्या आणखी एका किल्लीचें विवेचन करावयाचें आहे. पुराणांतील कित्येक कथा थेट वेदांपासून चालत

आलेल्या आहेत, इंद्रानें केलेला वृत्राचा वध, प्रजापतीनें केलेल्या आपल्या कन्येचा अभिलाष,दक्षकन्या व चंद्र यांचा संबंध,वामनाचीं तीन पावलें. हरिश्चंद्राची कथा, एकत, द्वित आणि त्रित या बंधूंची कथा, हिरण्यकशिपुसारख्या राक्षसाला खुबीनें मारण्याची कथा या व इतर अनेक कथा वेदसंहिता किंवा ब्राह्मणें यांतून आलेल्या आहेत. परंतु वेदांतासून पुराणापर्यंत येतांना त्यांत पुष्कळ फेरफार झालेले आहेत. मूळ हरिश्चंद्राची ऐतरेय ब्राह्मणांतील कथा आणि कथाकल्पतरुत सांगितलेली कथा, यांत फारच फरक आहे. भागवत पुराणांत मात्र ब्राह्मणांतील कथेप्रमाणेंच ही कथा सांगितली आहे. या कथात उत्तरोत्तर कसेकसे फेरबदल होत गेलें, हें पहाणें मोठें मनोरंजक आहे. परंतु तसें करण्यास पुरेसा अवकाश या लहानशा उपसंहारांत नाहीं. यासाठीं त्याचें दिग्दर्शन येथें थोडक्यांतच करू.

मूळ वेदांत ज्या कथा आलेल्या आहेत, त्याही अनेक प्रकारच्या असाव्यात त्यांतील कांहीं गोष्टी ऐतिहासिक आहेत, कांहीं सृष्टिवर्णनावरून रूपकानें सांगितल्या आहेत, कित्येकींत इतिहास व रूपक यांचे मिश्रण झालें आहे, व कित्येक आध्यात्मिक गोष्टीही रूपकबद्ध करून इतिहासरूपानें मांडिल्या आहेत. या रूपकबुद्ध कथा पुढें कालान्तरानें दंतकथांच्या स्वरूपानें एका पिढीपासून दुसऱ्या पिढीपर्यंत तोंडातोंडी चालत गेल्या, व शेवटीं कोणी ऋषीनी त्या सूक्तरूपानें एकत्र केल्या, असें कित्येकांचें म्हणणें दिसतें! व तें युक्तीला सोडून आहे असें नाहीं. या दंतकथा एका पिढीपासून दुसऱ्या पिढीकढे जातांना त्यांत कित्येक वेळां इतिहासाचेंहि मिश्रण झालेले असण्याचा संभव आहे. व त्यामुळेंच रामायणासारख्या कित्येक कथांचा रूपकपर अर्थ लावण्याची कित्येकांना बुद्धि झाली. रामायणाची सर्व कथा रूपक म्हणून आपल्या प्रसिद्ध रामदासकृत रामाच्या आरतीत सांगितलें आहे. तींत आत्मबोध झाला असतां अहंकाराचा नाश होतो, म्हणजेज रामरावणाचा वध करतो, असा भाग आणिलेला आहे. कोणत्याही स्वभावाच्या माणसांमध्यें किंवा प्राण्यामध्यें झालेला हरएक प्रकारचा व्यवहार, अशा कांहीं रूपकावर बसवितां येईल. शिवाजीचीही कथा अशाच रीतीनें सोडवितां येईल. पण एवढ्यावरून त्याची कथा ऐतिहासिक नव्हे असें जसें म्हणतां येत नाहीं, त्या प्रमाणेंच रामाची कथाही मूळ ऐतिहासिक नव्हे असें म्हणतां येत नाहीं. तरी पण मूळ इतिहास घडून हजारों वर्षें झाल्यावर

तो कोणी सांगावयास लागला असतां, त्यांत कांहीं गोष्टी रूपकानें येण्याचा किंवा त्यांत त्याहूनही प्राचीन कालापासून चालत आलेल्या कित्येक दंत-कथांचें मिश्रण होण्याचा संभव असतो. याच दृष्टीनें रा. लोकमान्य टिळक यांनी आपल्या 'आर्यांच्या मूलस्थानावरील ग्रंथांत रामायणाच्या कथेचा उलगडा केलेला आहे. तो वाचकांनीं पहावा. त्यांत हनुमान् व सूर्य यांची कथा, रावणाचीं दहा तोंडें, दशरथ हें नांव, इत्यादि गोष्टी मूळ वेदांपासून चालत आलेल्या दंतकथांवरून सुचल्या असाव्या व रामायणांतील मुख्य भाग ऐतिहासिक असावा, असें त्यांचें म्हणणें आहे.

या दृष्टीनें विचार केल्यास या कथाकल्पतरूंतील अनेक कथांचें मूळही चाणाक्ष वाचकांना सृष्टचमत्कारवर्णनाशीं नेऊन भिडवितां येईल. सातव्या स्तबकांत चंद्राच्या कलाविषयीं एक कथा आली आहे, तिचा दुसऱ्या कोणत्याही रीतीनें चांगला उलगडा करितां येईल असें वाटत नाहीं.

त्यांत---' अरुण भाजून जाईल, या भीतीमुळे सूर्य एक महिना अस्ताचलावर जाऊन राहिला व पृथ्वी तितक्या अवधींत मुळींच उगवला नाहीं,' असें म्हटलें आहे. या गोष्टीचा रा. टिळक यांच्या उत्तर ध्रुवावरील आर्यांच्या वसतिस्थानाच्या उपपत्तीनें मात्र उलगडा होणार आहे. सूर्य क्षितिजाखालीं अनेक दिवस राहूं शकतो. ही गोष्ट उत्तर ध्रुवापासून मिळाल्यावर पुढें त्या कल्पनेचा अनेक ठिकाणीं उपयोग केला असण्याचा संभव असतो. उदाहरणार्थ त्याच स्तबकांत १५ व्या अध्यायांत पतिव्रता सुमतीची कथा आली आहे, तीत ती आपल्या पतीला मस्तकावर घेऊन रात्रौ एका सुळाजवळून जात असतां तिच्या पतीचा त्याला धक्का लागला, व सुळावरील मांडव्य ऋषीनें धक्का लावणारा मनुष्य सूर्योदय होण्याबरोबर मृत्यु पावेल.' असा शाप दिला येथपर्यंतची कथा आतापर्यंत केलेल्या विवेचनावरून चांगली समजण्यासारखी आहे. पण पुढें त्या पतिव्रतेच्या धाकामुळें सूर्य दहा दिवस मुळीं उगवलाच नाहीं, असें जें म्हटलें आहे, त्याचा मात्र उलगडा रा. टिळकांच्या उपपत्तीशिवाय व्हावयाचा नाहीं नाही. म्हणजे सूर्याचें एका दिवसाहून अधिक काल क्षितिजाखालीं रहाणें शक्य कोटींतील आहे, ही कल्पना स्पष्ट रीतीनें जरी कदाचित् पुराण रचनेच्या काळीं माहित नसली, तरी तिचा उगम खऱ्या सृष्टिचमत्कारांत आहे, यांत कांहीं शंका नाहीं.

पतिव्रतेचा प्रभाव दाखविण्याचा जो कवीचा उद्देश, तो अशा कल्पनेच्या अभावी सिद्धीस गेला हें खरें, पण जर त्या कवीला सूर्य एका दिवसाहून अधिक कालपर्यंत क्षितिजाखाली रहाणें ही गोष्ट शक्य वाटली नसती, तर पतिव्रतेचें सामर्थ्य त्यानें त्यानें दुसऱ्या कोणत्याही रीतीनें दाखविलें असतें. परंतु सुमतीच्या प्रभावामुळें खरोखरच सूर्य दहा दिवस उगवला नाहीं कीं काय ? हा प्रश्न अगदी निराळा आहे. सुमतीला मांडव्याचे शापशद्ब ऐकूं आले, व आपल्या पतीला त्याप्रमाणें मृत्यु येणार, हें तिच्या भाविक मनाला खात्रीपूर्वक वाटलें. येथपर्यंतचा भाग खराखुरा ऐतिहासिक असण्याला कांहीं हरकत नाहीं. याच्या पुढें दंतकथेच्या आधारावर तिचा प्रभाव दाखविण्याचा प्रयत्न केला, असें मानणें योग्य दिसतें. तात्पर्य एकढेंच कीं, ज्या गोष्टी सुकृद्दर्शनीं असंभाव्य वाटतात, त्या जरी त्या विशिष्ट गोष्टींच्या संबंधानें विचार करितांना असंभाव्य असल्या, तरी त्या मुळांत तशा नसून कांहीं तरी सृष्टिचमत्कारांपासून उत्पन्न झालेल्या दंतकथांच्या आधारावरच कवीनें आपल्या कथानकांत जुळवून दिलेल्या असतात, आणि म्हणूनच कथाकल्पतरूंतील अशा गोष्टी वाचकांनीं कांही तरी कविकल्पना म्हणून झुगारून न देतां त्यांचें मूळ शोधण्याचा त्यांनीं प्रयत्न करावा, अशी आमची विनंती आहे.

## पुराणांचें साधारण स्वरूप

विष्णूपुराणांत पुराणाची व्याख्या दिली आहे ती अशी :—

सर्गश्च प्रतिसर्गश्च वंशो मन्वंतराणिच ।
वंशानुचरितं चैव पुराणं पंचलक्षणम् ।।

"सृष्टि, प्रतिसृष्टि ( कांहींजण प्रतिसर्ग याचा अर्थ सर्गाच्या उलट म्हणजे लय असा करतात ) वंश, मन्वंतरें आणि इतिहास या पांच लक्षणांनीं जें युक्त तें पुराण होय." या पुराणांचा कर्ता व्यास असून, युगायुगांच्या प्रारंभीं तो पुराणांची नवी आवृत्ति रचितो. चालू युगांत तो

पराशराचा पुत्र कृष्ण द्वैपायन या नांवानें प्रसिद्ध आहे. त्यानें अठरा पुराणें÷ आणि अठरा उपपुराणें ०लिहिलीं. या पुराणांत फार प्राचीन कालाचा इतिहास दिलेला असून, ह्या कालीं विश्वानी घटनास्थिती आतांच्याहून फार भिन्न होती, स्थूल दृष्टीला अदृश्य अशा प्रदेशांचें त्यांत वर्णन असल्यामुळे, आधुनिक शास्त्रीय ज्ञानांतील कल्पनांच्या स्वरूपाच्याच कल्पना त्यांत असतील, असें मानणें योग्य होणार नाहीं. योगसिद्धींचा विकास झाला, म्हणजे पुराणांत विश्वाचें जें चित्र काढिलें आहे, तेंच आधुनिक भौतिक शास्त्रांनीं काढिलेल्या चित्रांपेकीं पुष्कळ बरोबर आहे असें आढळून येतें. +

## धर्मज्ञान

याप्रमाणें कथाकल्पतरूंत आलेल्या पुराणातील कथांचा त्रोटक विचार झाला. आता त्यातील धर्मज्ञान व तत्त्वज्ञान याविषयी थोडासा विचार करूं: धर्मांचा विचार करतांना अतींद्रिय गोष्टीशींच संबंध यावयाचा असल्यामुळें त्यांतील रहस्यांच्या खरे खोटेपणाचा निर्णय करण्याचें साधारण मनुष्य धाडस करणार नाहीं, व आम्हींही तसें करींत नाहीं, पण कोणकोणती धर्ममतें य कथाकल्पतरुंत आली आहेत. याचा थोडक्यांत विचार करून त्या मतांचा आमच्या समाजावर कसा परिणाम झाला आहे. हे मात्र कित्येक ठिकाणी आमच्या अल्प समजुतीप्रमाणें सांगण्याचा आम्हीं प्रयत्न करतो.

कोणत्याही धर्मामध्यें तत्त्वज्ञान म्हणजे मूलभूत कल्पना. त्या मूलभूत कल्पनांशी जुळतील असे आचार, आणि या कल्पनांचे आणि आचारांचे स्पष्टीकरण करण्यासाठीं कथा (पुराणें) ही तीन अंगे असतात. आमच्या

---

÷ अठरा पुराणांचीं नांवें :—१ ब्रह्मपुराण, २ पद्मपुराण, ३ विष्णुपुराण, ४ शिवपुराण, ५ भागवतपुराण, ६ नारदपुराण, ७ मार्कंडेयपुराण ८ अग्निपुराण, ९ भविष्यपुराण, १० ब्रह्मवैवर्तपुराण, ११ लिंगपुराण १२ वराहपुराण, १३ स्कंदपुराण, १४ वामनपुराण, १५ कूर्मपुराण, १६ मत्स्यपुराण, १७ गरुडपुराण आणि १८ ब्रह्मांडपुराण.

० अठरा उपपुराणांचीं नावें :—१ सनत्कुमार, २ नरसिंह, ३ बृहन्नारदीय, ४ शिवरहस्य, ५ दूर्वास, ६ कपिल, ७ वामन, ८ भार्गव, ९ वरुण १० कालिका, ११ सांब, १२ नंदी, १३ सूर्य, १४ पराशर, १५ वसिष्ठ, १६ देवी भागवत, १७ गणेश आणि १८ हंस.

आर्यावर्तातील सनातन धर्मामध्येंही हीं तीन अंगे उत्तम रीतीनें पोषित केलेलीं आहेत. मंत्रसहिता, त्यांचें स्पष्टीकरण करणारीं ब्राह्मणें, आणि तत्त्वविचारांनी परिपूर्ण अशी उपनिषदें, हे तीन भाग मिळून होणारी श्रुति हा या सनातन धर्मांचा मूळ पाया होय. श्रुती खालोखाल सनातनधर्माचे प्रमाण ग्रथ स्मृति होत. या विषयीं मनूनें म्हटले आहे:-

श्रुतिस्तु वेदो विज्ञेयो धर्मशास्त्रं तु वै स्मृतिः ।
ते सर्वार्थेष्वमीमांस्ये ताभ्यां धर्मो हि निर्बभौ ॥

वेद म्हणजे श्रुति, आणि धर्मशास्त्र म्हणजे स्मृति यांच्यापासूत धर्माचा प्रादुर्भाव असल्यामुळे. कोणत्याही विषयासंबंधानें त्याबद्दल शंका घेऊं नये.

या स्मृतीत विश्वाची उत्पत्ति, वर्णाश्रमधर्म, राजधर्म, स्त्रीधर्म पुनर्जन्म इत्यादि विषयाचे विवेचन केलेले आहे. स्मृतीच्या खालच्या पायरीचें प्रमाण ग्रंथ म्हणजे पुराणे व इतिहास होत. या इतिहास पुराणाला भागवतात पांचवा वेद म्हटले आहे. वेदांगे ज्या प्रमाणें वेदाचे स्पष्टीकरण करण्यासाठी लिहिली आहेस, त्याप्रमाणें पुराणेंही असल्यामुळे त्यांचा अभ्यास करणें अगत्याचे आहे. या विषयी याज्ञवल्क्य स्मृतींत म्हटले आहे.

पुराणन्यायमीमांसा धर्मशास्त्रांगमिश्रिताः ।
वेदाः स्थानानि विद्यानां धर्मस्य च चतुर्दश॥
इतिहासपुराणाभ्यां वेद समुपबृंहयेत ।

"पुराणें, न्याय, मीमांसा, धर्मशास्त्र, आणि सहा वेदांगे, यांसह चार वेद मिळून चौदा, ही विद्या आणि धर्म यांची स्थानें होत. इतिहास आणि पुराणें यांच्या साहाय्यानें वेदांचें विवेचन करावें.

या प्रमाणें आमच्या सनातन धर्माचा पाया आहे. कथाकल्पतरुमध्येंहीं हे सर्व विषय आलेले आहेत. पहिल्या स्तबकाच्या अखेरीस महाप्रलय आणि विश्वोत्पति याबद्दल विवेचन केले आहे, त्याप्रमाणें पुन्हां सहाव्या स्तबकांत, तेराव्या स्तबकांतही विश्वोत्पत्तीबद्दल कथानुरोधानें विवेचन केलें आहे. सहाव्या स्तबकाच्या सातव्या अध्यायांत याविषयी वेगवेगळ्या हकीगती दिलेल्या आहेत. तेराव्या स्तबकांत मोक्षधर्म प्रकरणांत सर्व प्रकारच्या तत्त्तज्ञानाचा संक्षेपानें विचार केलेंला आहे. परब्रह्माचें स्वरूप, त्याच्या प्राप्तीचे मार्ग, आणि मुक्तिविचार, हेही विषय सहाव्या स्तबाकच्या ११|व्या अध्ययांत आले आहेत. पुढें सातव्या स्तबकात ब्रह्मांडाची हकीगत, चार युगांची

माहिती, अवतारमीमांसा, चारी वर्ण व त्यापासून पुढें झालेल्या अनेक जाती, चार आश्रमांची माहिती, इत्यादि विषयांचा ऊहापोह केलेला आहे. तात्पर्य श्रुति,स्मृति आणि पुराणें यांतील बहुतेक विषय संक्षेपानें या कथाकल्पतरूंत आलेले आहेत.

पुनर्जन्माची कल्पना, चार वर्ण आणि चार आश्रम यांचें यथोचित आचार, विचार, आणि प्रयत्नानें ईश्वरस्वरूपांत शेवटी लीन होऊन जाणें, इत्यादि कल्पना आमच्या धर्मांत मुख्य असुन त्यांचा जोपर्यंत समाजावर योग्य पगडा होता, तोपर्यंत समाजव्यवस्था उत्तम रीतीने चालली होतीं. हें प्राचीन इतिहासावरून उघड दिसते, नीतिसंवर्धनाला या कल्पना अत्यंत अवश्य असून त्यांच्या अभावी समाज विस्कळीत झाल्यावांचून रहावयाचा नाहीं. विविक्षित परिस्थितीत विशिष्ट मनोवृत्तीनें प्रेरित होऊन एखादा समाज कांहीं विशिष्ट कार्यं घडवून आणण्यांस समर्थ होईल, परंतु चिरकालिन सुव्यवस्था अशा रीतीनें लागणें शक्य नाहीं. धर्म आणि निति यांच्या बंधनांनी बांधलेला समाजच चिरकाल नांदून खऱ्या सुखाचा मार्ग शोधून काढील, म्हणूनच सूज्ञ लोकांचें सारे लक्ष, धर्म, आणि निति यांची समाजवरील बंधनें दृढ करण्याकडे लोकांचें सारे लक्ष धर्म आणि नीति यांच्या स्मृतिकार आणि व्यास वाल्मीकादि सदासर्वकाल लागलेले असते. मन्वादिक पुराणकार आणि इतिहासकार त्याप्रमाणें अगदी अर्वाचीन काळचें आमचें महाराष्ट्र कविमंडळ यांनीं याच बुद्धिनें प्रेरित होऊन समाजाचे लक्ष नीति आचाराकडे ओढून घेण्याचे आंपआपले परी प्रयत्न केले परंतू कालांतरानें हा एकदा उमटलेला ठसा अस्पष्ट होऊं लागतो. व म्हणून कोणत्याना कोणत्या उपायाने तरी तो पुन्हां जागृत करणें अवश्य असते कथाकल्पतरूचाही उद्देश तोच आहे. आणि आम्हीहि तो मराठी वाचकांना सुलभ करून देण्याला याच हेतुनें प्रेरित झालों.

या कथाकल्पतरू ग्रंथांत अनेक धर्ममार्गाचे विवरण आले आहे प्रेमळ भक्तिनें ईश्वर कसा वश होतो, सत्याची कास धरुन गेल्यानें शेवटी जय कसा मिळतो, पितृभक्तिने पुत्राला काय मिळते, साध्वी स्त्रियांचे निःसीम पतिप्रेम हे केवढ्या सामर्थ्याचे मूळ आहे. इत्यादि गोष्टी, द्रौपदी हरिश्चंद्र इत्यादिकांच्या कथांवरून भाविक वाचकांना चांगल्या कळून येतील, व यांच्या मनावर नीतीचा उत्तम ठसा उमटल्यावांचून रहाणार नाहीं.

## यज्ञ आणि व्रतें.

या व्यवहार धर्माखेरीज कथाकल्पतरूमध्यें प्रस्तुत आपल्या समाजांत प्रचलित असलेल्या अनेक व्रतनियमांच्या मुळ उत्पत्तीच्या कथाही दिलेल्या आहेत. प्राचीन काळच्या समाजांच्या आचारांत ज्याप्रमाणें यज्ञांचें प्राधान्य होते, त्याप्रमाणें आर्वाचीन काळीं व्रतनियमांना धार्मिक आचारामध्यें प्राधान्य मिळालेलें आहे. व्रताचें मूळही यज्ञांतच आहे. यज्ञ हा आमच्या धर्मातील प्रधान अंग आहे इतकेंच नव्हे, तर त्याची कल्पनाही मोठी उदात्त आहे. इह-परलोकांची उत्पत्ति यज्ञापासूनच असून यज्ञाच्या योगानेंच त्या लोकांचें धारण होतें. 'यज्ञ न करणाराला हा लोक मिळत नाही, मग परलोक कसा मिळणार? ' श्रुति, स्मृति पुराणें, तशींच षड्दर्शनें यांत या यज्ञाची महती गाऊन ज्ञानोत्पत्तीच्या पूर्वी याच मार्गाचें अवलंबन केलें पाहिजे, असें सांगितलें आहे. ऋग्वेदांतील प्रसिद्ध पुरुषसूक्तांतही सृष्टयुत्पत्तिकालीं, देव, साध्य, ऋषि, इत्यादिकांनीं पुरुषयज्ञ केल्यावर त्या पुरुषाच्या हवन केलेल्या चतुर्थ भागापासून सर्व स्थावरजंगमात्मक विश्व निर्माण झाल्याचें वर्णन आहे. प्रजापतीनें प्रजा निर्माण करतांना त्यांच्याबरोबर यज्ञही निर्माण केला. ( भ. गी. ३, १० )

यज्ञांतील सारभूत कल्पना म्हणजे दुसऱ्याच्या हितासाठीं आपलें जीवितदान करणें ही होय. जीवनकलेचा विकास ज्या तत्वानें होतो तें तत्वही हें जीवितदानच होय. म्हणूनच मनुष्याची अंतिम उन्नतीही आत्मयज्ञ केल्यानें म्हणजे आत्मार्पण आणि सर्व कर्माचें अर्पण परमात्माला केल्यानें होते असें सांगितलें आहे. 'तूं जें कांहीं करशील, जें भक्षण करशील, जें तप करशील, जे हवन करिशील, जें देशील, जें कांहीं करिशील, तें सर्व मला अर्पण कर, म्हणजे त्या कर्माच्या शुभ किंवा अशुभ फलांपासून तूं मुक्त होशील' ( भ. गी. ९, २७, २८)

ह्या यज्ञरूप तत्त्वाचा व्यापार अगदीं जड कोटीपासून तो अत्युच्च प्रकारांच्या जीव कोटीपर्यंत सारखा चालला आहे. सर्वांत जड म्हणून मानलेली जी कोटि, ती धातु, मृत्तिका, दगड यांत आढळून येते. परंतु या जड कोटींतील वस्तूंच्या यज्ञामुळेंच ( पृथक्करणामुळेंच ) वनस्पतीरूप जीवकोटीचा प्रादुर्भाव होतो. लहान सहान वनस्पतींच्या यज्ञामुळें ( खतादि

रूपानें ) मोठमोठ्या सुंदर वृक्षांचा विकास होतो, आणि वृक्षादिकांच्या फलमूलादिकांचा यज्ञ होऊन प्राणिशरीराचा प्रादुर्भाव होतो. याच्यापुढें कमी जोरदार प्राण्यांच्या यज्ञानें उच्चतर जातीच्या प्राण्यांचा विकास होत असतो. परंतु मनुष्याच्या मनोवृत्तींच्या वाढीबरोबर त्याची समदुःखसुखी अशा इतर प्राण्यांविषयींची सहानुभूति वाढत जाऊन, त्याला आपलें शरीर विकसित करण्यासाठीं इतर प्राण्यांचा यज्ञ करण्याचा कंटाळा येतो. आपल्यामध्यें असलेल्या दैवी तत्वाचा विकास करावयाला आत्मयज्ञच केला पाहिजे, इतरांचा आपल्यासाठीं यज्ञ केल्यानें हें काम भागत नाहीं, असे कालान्तरानें त्याला कळतें; आणि मग कृष्णानें सांगितल्याप्रमाणें तो आत्मयज्ञ करितो, व निवृत्तीच्या परम पदास जाऊन पोंचतो. याप्रमाणें प्रवृत्ति आणि निवृत्ति अशा दोन्ही मार्गांच्या साहाय्यानें मनुष्याचा आत्मा विकास पावतो. प्रवृत्तिवर तो आहे तोंपर्यंत तो इतरांपासून एकसारखा कांहीं तरी घेत असतो, आणि निवृत्तिवर गेला म्हणजे तो आपल्याजवळ असलेलें इतरांना द्यावयास लागतो.

यज्ञाचा मूळ उद्देश आत्मविकास करणें हा असल्यामुळें, मनुष्याला हळू हळू असें समजलें कीं, केवल बाह्य विषयांच्या यज्ञानें मन पवित्र होणें कठीण असून, या यज्ञापेक्षां अंतःकरणाचा यज्ञच श्रेष्ठ होय. "द्रव्यमय यज्ञापेक्षां ज्ञानयज्ञच अधिक श्रेयस्कर आहे." (भ. गी. ४, ३३) तसेंच सर्वांच्यापेक्षां अहिंसा, हाच श्रेष्ठ यज्ञ होय. याविषयीं महाभारताच्या अनुशासनपर्वांत म्हटलें आहे.

सर्वयज्ञेषु वा दानं सर्वतीर्थेषु चाप्लुतम् ।
सर्वदानफलं चापि नैतत्तुल्यमहिंसया ।
तहिंस्रस्य अपोक्षय्यमहिंस्रो यजते सदा ॥

"सर्व यज्ञांत केलेलें दान, सर्व तीर्थांत केलेलें स्नान, सर्व प्रकारच्या दानांचें पुण्य, या सर्वांनाही अहिंसेची योग्यता येणार नाहीं. हिंसेपासून अलिप्त राहिलेला पुरुष अक्षय्य तप करितो आणि नित्य यज्ञ करीत असतो ( असें समजावें )" अशी यज्ञाच्या कल्पनेची उत्क्रांति होऊन अहिंसेच्या कल्पनेंत तिचें पर्यवसान होतें. सर्व यज्ञांचें अंतिम फल म्हणजे द्वैताची भावना नष्ट होऊन परब्रह्माशीं

तादात्म्य पावणें हे होय. यज्ञ कल्पनेच्या उत्क्रान्तीचीं हीं सर्व स्वरूपें कथाकल्पतरूंत सांगितलीं आहेत. तेराव्या स्तबकांत यज्ञाची माहिती सांगून अहिंसेचेंही महात्म्य उत्तम प्रकारे कथारूपानें वर्णिलें आहे. यज्ञांत पशुहिंसा करावी कीं न करावी, याविषयीं या स्तबकांच्या तेराव्या अध्यायांत संवाद आला असून.ऐकोणतिसाव्या अध्यायांत अहिंसेचें श्रेष्ठत्व दाखविले आहे. हिंसाप्रधान यज्ञ हे मनुष्याच्या प्रवृत्ति मार्गावरील स्थितींतच शक्य असतात. आणि तो खोल विचार करूं लागल्यावर त्याचें वैयर्थ्य त्याला कळून येईल. तो आत्मयज्ञ करून मोक्ष प्राप्तीच्या म्हणजे निवृत्तीच्या मार्गावर वळतो. ही सहज गोष्ट होय. उत्क्रांतीच्या वाटेवरील ही स्थिति आहे. अर्थातच कोणालाही असले हिंसाप्रधान यज्ञ आवडणार नाहींत. मनुष्य ब्राह्य विषयांवरून मन फिरवून आपल्या अंतःकरणांत पाहूं लागला, म्हणजे त्याला यज्ञाचे उच्च स्वरूप समजतें. यज्ञ केलाच पाहिजे, त्याशिवाय विकास व्हावयाचा नाहीं, हें तत्त्व त्याला यथातथ्यानें कळूं लागतें; आणि म्हणूनच मग तो आपल्या स्वतःच्या मनोवृत्तींचा यज्ञ करूं लागतो. अशा मानसयज्ञाचा प्रकार या ग्रंथांत दिलेला आहे. त्यात आत्मा हा यजमान, श्रद्धा ही यजमानपत्नीं, इंद्रियें हे ऋत्विज्, मन्यु (क्रोध) हा पशु इत्यादि प्रकारची यज्ञ सामग्री सांगितली आहे. हाच यज्ञ सर्वांत श्रेष्ठ होय आणि हिंसा व इतर वस्तूंच्या साहाय्यानें होणारें यज्ञ म्हणजे बुडत्या होड्या होत,त्यांच्या साहाय्यानें आत्मज्ञानाची प्राप्ति करून घेतां येणें शक्य नाहीं कारण ते पुनः जन्ममरणाचीच जोड करून देणारे होत; असें श्रुतींत म्हटलें आहे.

आत्मज्ञानाची श्रेष्ठता स्थापित करण्यासाठीं जी ही प्रसंगवशात् यज्ञाची निंदा आली आहे, ती अर्थातच प्रवृत्तिपर यज्ञांची आहे; मूळ यज्ञाचा नव्हे परंतु जगाचा व्यवहार प्रवृत्तिपर असून योग्य तयारीच्या अभावीं निवृत्तिमर्गाचा अवलंब केल्यास कोणताच पुरुषार्थ खरोखर साध्य होत नाहीं थट्टेला मात्र तो कारण होतो. म्हणूनच आमच्या तुकाराम, रामदास आदि करून संतानी परमार्थाबरोबरच प्रवृत्तीचीही स्तुति केली आहे. "आधीं प्रपंच करावा नेटका मग घ्यावें परमार्थविवेका" हें रामदासांचें वचन आणि "आशा मारुनीयां जयवंत व्हावें तेव्हांचि उठावें सर्वांतुनि नाहीं तरी सुखें असावें संसारीं फजिती दुसरी करू नये' हीं तुकारामाचीं वचनही याच तत्वाला अनुलक्षून आहेत. परंतु हा विवेक सदा सर्वकाल मनुष्याला

रहात नाहीं, म तो पुष्कळ वेळां आपल्या अधिकाराबाहेरची कामें हाती घेतो, आणि फजिती पावतो. वेदनिर्दिष्ट यज्ञातील हिंसा पाहून त्याविषयी जो तिटकारा आला, त्याला तिकालींच सुरुवात होऊन बौद्ध धर्माम त्याचें पर्यवसान झालें. परंतु यज्ञ वाईट ठरल्यावर त्यांत विवेकाच्या अभावामुळे म्हणजे हिंसाविषयक तिटकाऱ्याच्या अनिवार्य जोरामुळें, यज्ञाच्या विरुद्ध जी लाट उसळली, तिच्या योगानें यज्ञाच्या मूळ कल्पनेंलाच धक्का बसला. परंतु यज्ञाची कल्पना आत्मविकासाला अत्यंत अवश्य असल्यामुळें, जेव्हां ही लाट फिरली, म्हणजे बौद्ध धर्माचा ऱ्हास होऊन पुनः वेदधर्माची म्हणजे सनातन धर्मीची उत्कर्षस्थिति आली, त्यावेळीं येऊन गेलेल्या लाटेंतील ग्राह्य भाग घेऊन त्याची यज्ञाच्या कल्पनेशी सांगड घालण्यासाठी आमच्या धर्माचार्यांनी पूर्वींच्या अनेक बारिक सारिक यज्ञांच्या ठिकाणीं प्रस्तुत चालू असलेल्या व्रतनियमांची स्थापना केली. धर्माच्या आचार्यांचें हें कामच आहे. एका प्रकारची स्थिति जाऊन दुसऱ्या प्रकारची त्या ठिकाणीं येऊं लागली, म्हणजे तो एका प्रकारचा युगाचा पालटच होय. अशा युगाच्या आरंभीं आमचे व्यास, लोकसंग्रह करण्यासाठी प्राचीन व चालू परिस्थितीची सांगड घालण्यासाठीं पुराण रचना करितात. या पुराण रचनेच्या वेळीं मागील यज्ञांच्या ठिकाणीं व्रत नियमांची स्थापना करून यज्ञाचें मूळ तत्त्व जें दान, त्याला अबाधित राखण्याचा प्रयत्न केला, म्हणून सकृद्दर्शनीं व्रतांचा उगम जरी प्रत्यक्षपणें श्रुतींत आला नाहीं,, तरी त्याचें मूल, श्रुतिविहित अशा यज्ञाच्या कल्पनेंतच असून नवीन युगाच्या पालटलेल्या स्थितीला अनुरूप अशा रूपानें तें व्यासांनी पुराणांत दाखविलें आहे. आणि ज्याप्रमाणें ब्राह्मण नामक श्रुतिग्रंथांत यज्ञाचें मूळ सांगण्यासाठीं कथा सांगितल्या आहेत,त्याचप्रमाणें या व्रताच्या उत्पत्तीच्या कथाहि व्यासांनीं पुराणांत ग्रथित केल्या.

येथपर्यंत केलेल्या विवेचनावरून कथाकल्पतरूत आलेल्या कथांची उत्पत्ति, त्यांतील सारासार भाग, त्यांत आलेला धर्मविचार, व व्रतनियम यांविषयीं वाचकांस थोडीबहुत तरी कल्पना येईल. आतां यांतील तत्त्वज्ञानाचा अल्पसा विचार करू.

जगाची उत्पत्ति कोणी केली? आपण कोण? कोठून आलो, आपलें खरें स्वरूप काय व आपले पर्यवसान कशांत होणार? इत्यादि प्रश्नाचीं उत्तरें देण्यासाठी तत्त्वज्ञानाचा अवतार झालेला आहे. वेदसंहितात ज्याप्रमाणें मंत्र

किंवा यज्ञप्रक्रिया यांवर विशेष जोर असतो. त्याप्रमाणें श्रुतिचा शेवटचा भाग जो उपनिषदे किंवा वेदांत, त्यामध्ये तत्वज्ञानाचा जोर दिलेला आहे. जग निर्माण कसें झाले, त्यात एकच तत्व आहे कीं अनेक आहेत, मनुष्याचीं अवस्था काय होते, आत्मा हा कोण त्याचें स्वरूप काय, त्याचा व देहाचा संबंध कोणता, परमात्म स्वरूपाची ओळख कशी करून घ्यावयाची, या प्रश्नांचा उपनिषदांत विचार केलेला असतो. उपनिषदांनंतर असल्या प्रकारच्या प्रश्नांचा विचार पुढें षड्दर्शनांत केलेला अहे. कपिलमुनीचें सांख्य-दर्शन, पतंजलीचें योगदर्शन गौतम आणि वैशेषिक दर्शनें, जैमिनीची पूर्व-मीमांसा आणि बादरायण व्यासाची उत्तरमीमांसा ऊर्फ वेदान्त, ही तीं सहा दर्शनें किंवा तत्वविचार करणारीं शास्त्रें होत. या शास्त्रांतील मतलबही कथाकल्पतरूंत कथानुरोधानें आलेला आहे.

सहा दर्शनांचा नीट अभ्यास केल्यानें मनुष्याला पूर्ण ज्ञान होतें. न्याय आणि वैशेषिक दर्शनांत तर्कशास्त्रावर विशेष जोर असल्यामुळें, त्याच्या अभ्यासानें मनुष्याला आपल्या बुद्धिशक्तीचा योग्य उपयोग करतां येऊ लागतो. विश्वाची स्थूल रचना अशी आहे? व अनुभवसिद्ध ज्ञानावरून योग्य प्रकारें अनुमान कसें करावें? हें ही यांच्या अभ्यासानें समजूं लागतें. विश्वाच्या उत्क्रान्तीचा क्रम सांख्यज्ञानानें कळून, योगाच्या अभ्यासानें मनुष्याला आपल्या स्वतःच्या शक्तीचा विकास त्वरेनें कसा करावा, हें समजून येतें. पूर्वमीमांसेच्या अभ्यासानें कर्ममार्गाचें महत्त्व कळून दृश्य जगाला अदृश्याचें साहाय्य कसें होते हें कळते. वेदांतांतील मुख्य तीन पंथ असून त्यांतून कोणत्या तरी पंथाचा आज हिंदुस्थानांत स्थानपरत्वें अंमल आहे. अद्वैत, विशिष्टाद्वैत आणि द्वैत हे ते मुख्य पंथ असून शंकराचार्य रामानुजाचार्य आणि मध्वाचार्य असे या पंथांचे प्रवर्तक होत. प्रत्येकानें उपनिषदें, भगवद्गीता आणि व्यास-(बादनारायण) प्रणीत वेदांतसूत्रें हे आपल्या मताचे अधारभूत प्रमाणग्रंथ मानिले आहेत, व त्यांनीं भाष्यें लिहिली आहेत या तीनही मतांच्या अभ्यासानें मनुष्य आपण ब्रह्माहून निराळें आहों, या कल्पनेपासून (द्वैत) निघून आपण त्याचे अंश आहों व त्यांत आपपल्याला मिळून जातां येईल या कल्पनेवर येतो (विशिष्टाद्वैत) आणि शेवटी आपण सदासर्वदा ब्रह्ममयच आहों, मात्र अविद्येच्या पडद्यामुळें आपलें सत्यस्वरूप

आपल्याला दिमत नाहीं. या कल्पनेशीं (अद्वैत) तो येऊन पोंचतो. म्हणजे ह्या एकाच तत्त्वज्ञानाच्या तीन पायऱ्याच समजावयास हरकत नाहीं.

याप्रमाणें षड्दर्शनें हीं आर्यभूमींतील भव्य अशा तत्त्वज्ञानरूपी इमारतीचे भाग असून, वेदांत हा त्यातील अत्युच्च कळस होय. कळस वर चढविण्यासाठीं ज्याप्रमाणें खालच्या भागाची आवश्यकता असतेज, त्याप्रमाणें वेदांतज्ञानाला सर्व शास्त्रांचा पाया पाहिजे. तसेंच ज्याप्रमाणें कळस उंच असल्यामुळें, दुरून त्या इमारतीचा निर्देश करतांना त्याच्याकडेच बोट दाखवितात, त्याप्रमाणें या आर्यभूमींत तत्त्वज्ञानाचा विचार करितां सर्वांचें लक्ष या वेदांताकडे वेधून रहातें. म्हणूनच आमच्या पुराणांत, साधुसंतांच्या ग्रंथांत व इतरही सर्वत्र वेदांतच प्रामुख्यानें आढळून येतो. कथाकल्पतरूंतही वेदांतविचारच विशेषेंकरून आलेला असून इतर शास्त्रांतील महत्त्वाचे असे त्याचे पोषक भाग आले आहेत. तेराव्या स्तबकाच्या पंधराव्या अध्यायांत योग व सांख्य, यांविषयीं उल्लेख आलेले आहेत. पण अर्थात्‌च ते फार संक्षिप्त आहेत. कर्ममार्गाची मीमांसा करणारें जें जैमिनीचें पूर्व मीमांसादर्शन तें जरी पूर्वमीमांसा या नांवानें स्पष्ट वर्णिलेलें नाहीं, तरी त्यांतील मुख्य मतें जीं आहेत, त्यांचा तेराव्या स्तबकांत व इतरही ठिकाणीं अनुवाद केलेला आहे.

कथाकल्पतरूंत अनेक पुराणें, श्रुति स्मृति,भारतादि इतिहास यांतील कथा आलेल्या असल्यामुळें, अर्थातच त्या सर्वांमिळून कित्येक हजार वर्षांचा इतिहास त्यांत आलेला आहे. परंतू हा इतिहास अर्वाचीन इतिहासावरील पुस्तकांत रचिल्याप्रमाणें कालानुक्रमानें दाखविलेला नसून, त्यांतील एकंदर गोष्टी कोणत्यातरी क्रमानें आलेल्या आहेत.तरी पण एकंदर ग्रंथाच्या वाचनानें प्राचीन परंप, लोकस्थिति, धार्मिक आचार, याविषयींचीं पुष्कळच माहिती आपणाला मिळणार आहे. समाजाच्या अगदीं कनिष्ठ स्थितीपासून अत्युच्च स्थितीपर्यंत कशी उत्क्रांति होत होत गेली हें या ग्रंथांतील कथांच्या सूक्ष्म वाचनानें कल्पतरुच्या वाचकांस कळून येणार आहे. समाजाला कोणत्या गोष्टी अनिष्ट व कोणत्या इष्ट हें हळूंहळूं कळून आल्यामुळें, त्या प्रकारचें विधीं किंवा निषेध वेळोवेळीं करण्यांत आले. शुक्राचार्यांनी मद्यपानाविषयी केलेला निषेध विवाहसंबंधीं विधीं किंवा निषेध हीं उदाहरणें याची होत

अशा क्रमाक्रमानें समाज हळूहळू उत्क्रांतीचा मार्ग आक्रमीत गेला. कोणतीहि गोष्ट एकदम स्वर्गातून पडल्यासारखी आयतीं उत्तम स्थितीतच कांही आढळून येत नाही. विवाहकालाची कालमर्यादाही आजच्यासारखी संकुचित नाहीं. तसेच कित्येक वेळा अनुरुप पति न मिळाल्यामुळें स्त्रिया अविवाहीत असतात. ही गोष्ट समाज जरी मान्य करित होता, तरीं तीं एकंदरीत अनिष्टच वाटत होतीं, असें दिसतें. (सातव्या स्तबकात १५ व्या अध्यायातील सुमति चरित्र पहा) थोडक्यात सांगावयाचें इतकेच कीं या कथांना एक प्रकारचें ऐतिहासीक महत्व असून त्यावरून आर्यांच्या समाजातील कित्येक हजार वर्षांची परिस्थिती स्थूल मानानें तरीं कळून येते.

ऐतिहासिक महत्वाप्रमाणेंच या कथाचें धार्मिक दृष्टचाही महत्व आहे भाविकपणें हा कथा वाचणाराच्या मनांत धार्मिकबुद्धी सहज उत्पन्न होईल. वाईटाचा परिणाम केव्हाहीं वाईटच होतो, व सदाचाराच्या योगानें कित्येक जरी प्रथम दुःख सोसावे लागलें, तरी शेवटी त्यामुळें केवढे तरी सुख प्राप्त होत असते· या कल्पनेंचा मनावर न जाणताही असल्या ग्रंथाच्या वाचनानें पगडा बसतो. व तो फार हितकर असतो आपणही कोणती गोष्ट केली तरीं तिचे फल मिळाल्याशिवाय रहात नाही ही गोष्टहीत्यामुळे मनावर ठसते. हरिश्चंद्राची सत्यनिष्ठता, रामाचे एकपत्नित्व, भरताचें बंधुप्रेम, भीमादि पांडयाचा धर्मांविषयीचा आदर, द्रौपदी, सीता, सुमति इत्यादिकाचा स्त्रियाचें पतिप्रेम प्रल्हादाची व ध्रुवांचीं अचलनिष्ठा. विश्वामित्रांचा दृढनिश्चय, वसिष्ठाचीं शांति, रावणदुर्योधनादिकांचा हट्ट व त्याचें परिणाम हनुमंताची स्वमीनिष्ठा कृष्णाचे भक्तवात्सल्य, वृंदा आणि अहिल्या यांचें पातिव्रत्य व ते नष्ट करण्यापासून विष्णू व इद्र याच्यासारख्या पुरुषाकरिता धटलेंलीं अद्दल-इत्यादि गोष्टी मनाला चटक लावणाऱ्या मोठचा बोधपर आहेत, अनितीचा शेवट केव्हां कसा झाला तरी वाईटच होतो, यास्तव आरंभी दुःख झाले तरीं सदाचार मार्गच स्वीकारणें हिताचें आहे. हे उत्कट रींतीनें कळून आल्यावर वाईट मार्गाकडे प्रवृत्ती कां होईल ? यास्त या उत्तम नीतींकथांचे श्रवण व पठन आपल्या मुलामुलींकडून, बंधुभगिनींकडून व स्त्रियांकडून करुन घेऊन, त्याच्यां मनावर अत्युत्तम नीतिचा व बोधाचा ठसा उमटवून, त्यां

समाजाचे उत्तम घटक बनविण्याच्या कामी सर्वांना या ग्रंथांचा उपयोग होईल, अशी कवींची योजना आहे.

याप्रमाणें या ग्रंथाचे महत्व आहे. आधुनिक पद्धतींला अनुसरुन आमच्या कृष्ण व मधुकर या कवींनी सर्व पुराणें, व भारत रामायणादि इतिहास गुंडाळून सर्व कथांचा एकत्र संग्रह केला. या अनेक कथांचा संग्रहाचा आधुनिक पद्धतीनें दंतकथांचा विचार करणाऱ्या प्राचीन विद्यापंडीतास चांगला उपयोग होईल. ज्याना त्याच्यापासून असे कांही मोठे काम करावयाचे नाही, त्यांना निदान कादंबरीप्रमाणें या कथा मनोरम वाटतील; आणि जे भाविक आहेत त्यांना तर हा कथाकल्पतरू अमृताप्रमाणें शांतिदायक व ईश्वरीप्रेरणेंप्रमाणें स्फूर्तिदायक होईल. कोणत्याही दृष्टीनें विचार केला, तरी कृष्ण मधुकर या कवींद्वयांची ही कृती फार महत्वाची असून, सर्व प्रकारच्या व सर्व मतांच्या लोकांना तिचा आपापल्या परी उपयोग करून घेता येईल, त्यानी करून घ्यावा, एवढी विनंती करून, प्रचंड अशा या कथाकल्पतरूचा हा लहानसा उपसंहार आम्हीं पुरा करितो.

---